# संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास

लेखक

**पांडुरंग वामन काणे,**

एम्. ए. एल्‌एल्. एम्.



अनुवादक

**केशव लक्ष्मण ओगले, बी. ए.**



आवृत्ति पहिली



सन १९३१

किंमत दोन रुपये

# प्रस्तावना



सन १९२३ च्या जून महिन्यांत मी साहित्यदर्पणाची इंग्रजी टीपांसह दुसरी आवृत्ति छापून प्रसिद्ध केली तींत ' अलंकारशास्त्राचा इतिहास ' हा इंग्रजी निबन्ध अन्तर्भूत केला. या शास्त्राचा सांगोपांग इतिहास तोंपर्यंत कोणीहि लिहून प्रसिद्ध केला नव्हता. त्याच सुमारास प्रो. सुशिलकुमार दे यांनीं आपल्या संस्कृत साहित्य-शास्त्राच्या इतिहासाचा पहिला भाग ( ग्रंथकार व ग्रंथ यांचें वर्णन ) इंग्रजींत प्रसिद्ध केला. माझ्या ग्रंथाचें परीक्षण करितांना ' केसरीनें ' सूचना केली होती कीं त्या निबन्धाचें मराठींत भाषांतर करावें व माझ्या बऱ्याच मित्रांकडूनहि तशाच सूचना आल्या. त्यानंतर मी ' धर्मशास्त्राचा इतिहास ' लिहिण्याचें काम हातीं घेतल्यामुळे अलंकारशास्त्राच्या इतिहासाला मराठी नेपथ्य चढवि-ण्याचें काम मागें पडलें. पुढें गेल्या वर्षीं माझे मित्र रा. **केशव लक्ष्मण ओगले** यांचेजवळ या निबन्धाच्या भाषांतरासंबंधानें बोलणें निघतांच त्यांनीं तें भाषांतर करण्याचें काम मोठ्या उत्साहानें आंगावर घेऊन थोड्या दिवसांत मजकडे आणूनहि दिलें. रा. **ओगले** यांचा या साहाय्याबद्दल मी अत्यंत आभारी आहें. १९२३ सालानंतर आणखी बरीच माहिती उपलब्ध झाली असल्यामुळें तिची भर घातल्याशिवाय ग्रंथ प्रसिद्ध करणें बरें वाटलें नाहीं. यामुळें ती माहिती योग्य जागीं घालण्यांत बराच काळ लोटला. शेवटीं १९३० च्या डिसेंबर महिन्यांत ग्रंथ छापण्यास सुरवात झाली व तो आतां मराठी वाचकांच्या हातीं पडत आहे.

या ग्रंथांतील माहिती व मतें याबद्दल मी एकटाच पूर्णपणें जबाबदार आहें. मूळ इंग्रजी निबन्धाचा अगदीं शब्दशः अनुवाद या पुस्तकांत केलेला नाहीं. मात्र मूळ इंग्रजी निबन्धांत जीं अवतरणें आहेत तीं सर्व या मराठी अनुवादांत आहेत, इतकेंच नव्हे तर आणखीही कांहीं जास्त अवतरणें या ग्रंथांत आहेत. बऱ्याच संस्कृत अवतरणांचा अर्थहि या ग्रंथांत दिलेला आहे. या ग्रंथांत मूळ निबन्धांत नसलेलीं दोन नवीन प्रकरणें घातलीं आहेत, एक प्रकरण भक्तिरसाविषयीं सुप्रसिद्ध

असलेला जो उज्ज्वलनीलमणि ग्रंथ त्या विषयी व दुसरें साहित्यशास्त्रावर इतर शास्त्रांचा झालेला जो परिणाम त्या विषयीं. मूळ ग्रंथांत साहित्यशास्त्रावरील सर्व ग्रंथ व ग्रंथकार ( सुमारें ७०० ) यांची सूचि दिलेली आहे ती यांत गाळलेली आहे. कारण मराठी वाचकांना तिचा तादृश उपयोग नाहीं व जिज्ञासूंना ती इंग्रजींत पाहतां येण्यासारखी आहे. माझा इंग्रजी निबंध प्रसिद्ध झाल्यावर सन १९२५ सालीं प्रो. दे. यांच्या ग्रंथाचा दुसरा भाग प्रसिद्ध झाला. त्यानंतर मद्रास येथील प्रो. ए. शंकरन् यांनीं 'Some aspects of literary criticism in Sanskrit or the theory of Rasa and Dhvani' या नांवाचा सुमारें १५० पानांचा निबन्ध सन १९२९ सालीं छापिला आहे. याशिवाय गेल्या सात वर्षांत साहित्यशास्त्रांतील निरनिराळ्या विषयांवर व ग्रंथांवर पुष्कळ लेख प्राच्यविद्यासंशोधनाला वाहिलेल्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले व नाट्यदर्पण, भावप्रकाशन, अभिनवभारती, शृंगारप्रकाश इत्यादि साहित्यशास्त्रीय ग्रंथ प्रकाशित झाले त्यांचाही योग्य तो परामर्श या मराठी ग्रंथांत घेतला आहे.

हा ग्रंथ मुख्यत्वेंकरून इंग्रजी न जाणणाऱ्या पण संस्कृतज्ञ पंडितांसाठीं आणि मराठींतूनच साहित्यशास्त्राच्या इतिहासाचें ज्ञान मिळविणाऱ्या जिज्ञासु मराठी सर्व साधारण वाचकांसाठीं लिहिलेला आहे. याच्या वाचनानें जर वाचकांना संस्कृत साहित्यशास्त्राची यथार्थ कल्पना आली व त्याच्या अभ्यासाविषयीं उत्साह उत्पन्न झाला तर रा. ओगले यांनी मित्रस्नेहानें जो उद्योग केला त्याचें चीज होईल.

मुंबई
१५ एप्रील १९३१

पांडुरंग वामन काणे

# अनुक्रमणिका

# संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास

## प्रास्ताविक

अलंकारविषयक वाङ्मयाच्या इतिहासाचे स्वाभाविकपणेंच दोन भाग पडतात. एकांत अलंकारशास्त्रावरील ग्रंथांचे वर्णन, त्यांतील विषयांचा सारांश व पृथक्करण, ग्रंथकारांचा कालनिर्णय व दुसरे तत्सदृश विषय यांचा समावेश होतो; व दुसऱ्या भागांत अलंकारशास्त्रांत समाविष्ट होणाऱ्या विषयांचें विवेचन, साहित्यशास्त्र आणि काव्यमीमांसा यांतील मूळ कल्पनांचा विकास होऊन त्यांना कालांतरानें परिणत शास्त्रीय स्वरूप कसें आले याचे दिग्दर्शन, काव्यमीमांसेच्या विस्तीर्ण क्षेत्रांतील विविध संप्रदायाचे वर्णन, साहित्यविषयक कल्पनांचा इतिहास इत्यादि विषयांचा विचार येतो. या विभागणीला अनुसरून प्रस्तुत इतिहासाच्या प्रथम भागांत साहित्यविषयक ग्रंथ आणि ग्रंथकार यांचा वृत्तांत देऊं व त्यांत प्राचीन ग्रंथकारांचे वृत्त सविस्तर देण्याचा प्रयत्न करूं. तसेच द्वितीय भागांत भरतखंडांतील साहित्यविषयक कल्पनांचा उदय, प्रसार व विकास यांचा इतिहास देऊन त्यांतील निरनिराळ्या संप्रदायांचें विवेचन करूं.

## भाग १ ला

१ संस्कृत वाङ्मयाच्या अनेक शाखांत अशा पुष्कळ ग्रंथकारांचे उल्लेख आढळतात कीं त्यांचे ग्रंथ आज आपल्याला उपलब्ध नसून त्यांच्या नांवापलीकडे त्यांचें वृत्त कांहींच समजत नाहीं. अलंकारशास्त्रांतहि तोच प्रकार आढळतो. उदाहरण, **काव्यमीमांसा**नामक ग्रंथाचा कर्ता जो **राजशेखर** त्यानें, अलंकारशास्त्र हें मूळ शिवानें ब्रह्मदेवाला सांगितले व ब्रह्मदेवापासून पुढें तें परंपरेनें इतरांना मिळून शेवटी त्याचे अठरा भाग किंवा अधिकरणें झालीं व त्यांतील एकेका अधिकरणाचा पृथ्वीवर एकेका आचार्यानें पुरस्कार केला, असें आपल्या ग्रंथाच्या आरंभी सांगितलें आहे. तो म्हणतो,

'तत्र कविरहस्यं सहस्राक्षः समाम्नासीत्, औक्तिकं उक्तिगर्भः, रीतीनिर्णयं

सुवर्णनाभः, आनुप्रासिकं प्रचेतायनः, यमकानि चित्रं चित्रांगदः, शब्दश्लेषं शेषः, वास्तवं पुलस्त्यः, औपम्यं औपकायनः, अतिशयं पाराशरः, अर्थश्लेषमुतथ्यः, उभयालंकारिकं कुबेरः, वैनोदिकं कामदेवः, रूपकनिरूपणीयं भरतः, रसाधिकारिकं नंदिकेश्वर, दोषाधिकारिकं धिषणः, गुणौपादानिकमुपमन्युः, औपनिषदिकं कुचुमारः, इति ।'

साहित्यशास्त्रांतील पोटविषयांवर ग्रंथ लिहिणाऱ्या ग्रंथकारांच्या या नामावळीतील बरीच नांवे काल्पनिक दिसतात व त्यामुळे त्यांवर कितपत विश्वास ठेवावा हा प्रश्नच आहे. या नावांतील **सुवर्णनाभ** आणि **कुचुमार** हे कामशास्त्राच्या **साप्रयोगिक** व **औपनिषदिक** या भागांचे आचार्य म्हणून वात्स्यायनानें आपल्या कामसूत्रांत ( १, १, १३ व १७ ) उल्लेखिले असून **भरत** हा **रूपकावरील** म्हणजे नाट्यशास्त्रावरील ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध असून भरताचे नाट्यशास्त्र प्रस्तुत उपलब्धहि आहे. **दंडी**च्या काव्यादर्शावरील **हृदयंगमा** नावाच्या टीकेत **काव्यादर्शा**पूर्वीचे साहित्यशास्त्रावरील ग्रंथकार म्हणून **काश्यप** व **वररुचि** यांची नांवे सांगितली आहेत. तो टीकाकार म्हणतो,

'पूर्वेषां काश्यपवररुचिप्रभृतीनामाचार्याणां लक्षणशास्त्राणि संहृत्य पर्यालोच्य' ( काव्यादर्श परिच्छेद १ श्लोक २ वरील टीका ); तसेच आणखी 'पूर्वसूरिभिः काश्यपवररुचिप्रभृतिभिः' ( परि. २ श्लोक ७ ) येथे पहावें. काव्यादर्शावरील **श्रुतानुपालिनी** नामक टीकेत काश्यप, ब्रह्मदत्त आणि नन्दिस्वामी हे दंडीच्या पूर्वीचे साहित्यशास्त्रावरील ग्रंथकार म्हणून सागितले आहेत **सिय-बस-लकार** ( स्वभाषालङ्कार ) नांवाच्या सिंहली भाषेतील साहित्यविषयक ग्रथांत ब्रह्मा, शक्र, आणि बृहस्पति या आचार्यांना नमन करून काश्यप ऋषीचाहि नामोल्लेख केला आहे ( रॉ. ए. सो. जर्नल सन १९०५ पान ८४१ पहा ). अशी ही प्राचीन साहित्यशास्त्रकारांची नांवे आढळतात, पण त्यांपैकी कोणाचाहि ग्रंथ मात्र सांप्रत उपलब्ध नाही. साहित्यशास्त्राचें उपांग जे नाट्यशास्त्र त्याच्या परंपरेचे विवेचन पुढें करण्यांत येईल.

साहित्यविषयक वाङ्मयाच्या इतिहासांत यापुढील पहिला प्रश्न असा कीं अलंकारशास्त्रावरील उपलब्ध ग्रंथांतील अत्यंत प्राचीन असा ग्रंथ कोणता ? हा अग्रपूजेचा मान कित्येक अर्वाचीन साहित्यशास्त्रकारांनी अग्निपुराणाला दिला असून त्यांतील अलंकारविषयक विवेचन हेंच अर्वाचीन ग्रंथांना आधारभूत

आहे असें त्यांचें म्हणणें आहे. यास्तव तो मान अग्निपुराणाला मिळण्यासारखा आहे कीं नाहीं हें पाहणें अवश्य आहे.

## २ अग्निपुराण.

मम्मटाचा सुप्रसिद्ध ग्रंथ जो काव्यप्रकाश त्याच्या महेश्वर नांवाच्या टीकाकारानें आपल्या काव्यप्रकाशादर्श नामक टीकेत भरतानें अग्निपुराणांतील साहित्यशास्त्र-विषयक विवेचनाच्या आधारें कारिका रचिल्याचें सांगितलें आहे. तो म्हणतो:— ' सुकुमारान्राजकुमारान्स्वादुकाव्यप्रवृत्तिद्वारा गहने शास्त्रान्तरे प्रवर्तयितुमग्निपुराणादुद्धृत्य काव्यरसास्वादकारणमलंकारशास्त्रं कारिकाभिः संक्षिप्य भरतमुनिः प्रणीतवान्.' विद्याभूषणकृत साहित्यकौमुदीच्या कृष्णानंदिनी नामक टीकेतहि टीकाकारानें तोच अभिप्राय व्यक्त केला आहे. कृष्णानंदिनीकार म्हणतो, ' काव्यरसास्वादनाय वह्निपुराणादिदृष्टां साहित्यप्रक्रियां भरतः संक्षिप्ताभिः कारिकाभिर्निबबन्ध।'. या विधानांत कितपत तथ्य आहे हें आतां पाहूं.

अग्निपुराण हिंदुस्थानांत अनेक ठिकाणी छापिलेलें आहे. बिब्लिओथिका ग्रंथ-मालेमध्ये, तसेच मुंबईच्या वेंकटेश्वर छापखान्यात आणि पुण्याच्या आनंदाश्रम संस्थेनें आपल्या मालेंत तें छापिलेलें असून त्याच्या ३३६ पासून ३४६ पर्यंतच्या अध्यायांत ( कलकत्ताप्रत ) साहित्यशास्त्रांतील विषयांचा ऊहापोह केलेला आहे. ३३६ व्या अध्यायांत काव्याची व्याख्या करून त्याचे संस्कृत आणि प्राकृत असे भाषाविषयक आणि गद्य, पद्य व मिश्र असे स्वरूपविषयक भेद सांगितले आहेत. त्यातच पुढे या काव्यप्रकारांचे आणखी पोटभेद सांगून त्यांतील कथा, आख्यायिका, व महाकाव्य यांच्या विशेषतः व्याख्या दिल्या आहेत. ३३७ व्या अध्यायांत नाट्यशास्त्रांतील रूपकांचे प्रकार, प्रस्तावना, पांच प्रकारच्या अर्थप्रकृति, पांच प्रकारचे संधि इत्यादि विषयांचे विवेचन केलें आहे. ३३८ व्या अध्यायांत रसांचे उद्घाटन केलें असून स्थायिभाव, अनुभाव, व्यभिचारिभाव, आलंबनविभाव व उद्दीपन विभाव यांचाहि विचार केला आहे. नायक, उपनायक व नायिका यांच्या विविध प्रकारांचे वर्णनहि या अध्यायांत आहे. पुढील ३३९ व्या अध्यायांत पाञ्चाली, गौडी, वैदर्भी व लाटी या चार रीतींचा आणि भारती, सात्वती, कौशिकी ( किंवा कैशिकी ) व आरभटी या चार वृत्तींचा ऊहापोह केला आहे.

३४० व्या अध्यायांत नृत्यकलेतील हस्तपादमस्तकादि अवयवांचे व भुवयादि अंगाचे विक्षेप स्वाभाविकपणें किती प्रकार होतात त्यांचे वर्णन आलें आहे. त्याच्या पुढच्या ३४१ व्या अध्यायांत सात्विक, वाचिक, आङ्गिक व आहार्य हे चार अभिनयाचे प्रकार निरूपिले असून, ३४२ व्यांत अनुप्रास, यमक, चित्र इत्यादि शब्दालंकारांच्या व्याख्या व त्यांचे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत. ३४३ व्या अध्यायांत उपमा, रूपक, सहोक्ति इत्यादि अर्थालंकारांचा विचार असून ३४४ व्यांत शब्दार्थालंकारांचें विवेचन केल्याचें सांगितले आहे. तथापि या शब्दार्थालंकारांच्या विवेचनांत आक्षेप, समासोक्ति, पर्यायोक्त इत्यादि अर्थालंकारांचाहि समावेश केलेला आढळतो. शेवटच्या दोन म्हणजे ३४५ व ३४६ या अध्यायांत काव्याचे गुण व दोष यांचा अनुक्रमे विचार केला आहे. या साहित्यशास्त्रविषयक अकरा अध्यायांची श्लोकसंख्या एकंदर ३६२ होते.

अग्निपुराणाची एकंदर श्लोकसंख्या सुमारे ११००० असल्यामुळे त्या सर्वांचा अल्प सारांशहि देणे येथे शक्य नाही. थोडक्यांत सांगावयाचे तर हे पुराण ज्ञानकोशाच्या स्वरूपाचे असून मध्ययुगीन कालांत हिंदुस्थानांत ज्या विविध विषयांची पंडितांत चर्चा होई त्या सर्वांचा त्यांत समावेश करण्याचा प्रयत्न केलेला आहे. या पुराणांत कोणकोणते विषय विवेचिले आहेत हे शेवटच्या म्हणजे ३८२ व्या अध्यायाच्या ५२ ते ६३ या श्लोकांत संक्षेपानें सांगितले आहे. तात्पर्य अग्निपुराणांत संस्कृत वाङ्मयाच्या अनेक शाखांचें सार आलेले आहे.

आतां अग्निपुराणाचा व विशेषत त्यांतील साहित्यशास्त्रविषयक भागाचा रचनाकाळ कोणता ठरतो हे पाहून काव्यमीमांसाशास्त्रावरलि आद्य ग्रंथ म्हणून जे स्थान त्याला कित्येकांनी दिले आहे त्यासंबंधाच्या साधक बाधक प्रमाणांचा विचार करू. या विचाराची साधनें खाली दिल्याप्रमाणे आहेत:—

( अ ) अग्निपुराणामध्ये सप्तकांड रामायण, हरिवंश, पिङ्गल, पालकाप्य, शालिहोत्र, धन्वंतरि आणि सुश्रुत यांचा उल्लेख आढळतो. त्याच्या ३८० व्या अध्यायांत भगवद्गीतेचे संक्षिप्त सार दिले असून त्यांत गीतेंतील श्लोकार्धे जोडून श्लोक केलेले आहेत. या पुराणाच्या ३५९ ते ३६६ या आठ अध्यायांत शब्दकोशविषयक विवेचन असून ते बहुतेक जशाचें तसें अमरकोशांतील त्या त्या भागांत आलेलें आहे. आतां या गीता, अमरकोश इत्यादि सर्व ग्रंथांच्या कर्त्यांनीं आपले विषय व विवेचन अग्निपुराणांतून उचलून घेतली असे म्हणतां

येत नाहीं. उलट वाङ्मयाच्या प्रत्येक शाखेची संक्षिप्त माहिती एकत्र करण्याच्या इच्छेमुळें अग्निपुराणाच्या कर्त्यानें कोशविषयक विवेचन त्यावेळीं लोकांत सुप्रसिद्ध असलेल्या कोशांतून घेतलें असें म्हणणे सयुक्तिक आहे. अमरकोशकार अमरसिंहाच्या कालाचा विचार करितां निरनिराळ्या पंडितांनी त्याला निरनिराळ्या काळांत घातले आहे. संस्कृत वाङमयाच्या आपल्या इतिहासांत [ पान ४३३ ] प्रो. मॅक्डोनेल यांनीं अमरसिंहाचा काळ इ. स. ५०० च्या सुमारास धरण्यास हरकत नाहीं असें म्हटलें आहे. '**हिंदुस्थानापासून आपण काय शिकावें**' या पुस्तकांत प्रो. मॅक्स मुल्लरनें अमरकोशाचें भाषान्तर चिनी भाषेत सहाव्या शतकांत झाल्याचें सांगितले आहे (पहिली आवृत्ति पान २३२). डॉ. होर्नले यांच्या मतें अमरसिंहाचा काळ इ. स. ६२५ ते ९४० पर्यंत असावा. हें मत त्यांनी १९०६ च्या रायल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें (पान ९४०) प्रतिपादिलें आहे. पण त्या मताला प्रमाणभूत म्हणून घेतलेल्या गोष्टी तितक्याशा समर्पक वाटत नाहींत. क्षीरस्वामीच्या टीकेसह अमरकोशाची आवृत्ति पुण्याचे कै. ओकशास्त्री यांनीं काढिली असून तिच्या प्रस्तावनेंत त्यांनीं अमरकोशकार इ. स. च्या ४ थ्या शतकांत होऊन गेला असें प्रतिपादिलें आहे. आतां या काळांपैकी सर्वात प्राचीन म्हणजे इ. स. चे ४ थे शतक हा अमरकोशाचा काळ घेतला, तरी त्यांतून उतारे घेणाऱ्या अग्निपुराणाचा काळ ६ व्या किंवा ७ व्या शतकापूर्वीचा होऊं शकत नाही. कारण सर्वसंग्राहक अशा पुराणांत अवतरण घेण्याइतकी लोकप्रसिद्धि कोशाला मिळण्यास त्याच्या रचनेनंतर कांहीं काळ तरी लोटला असलाच पाहिजे.

(आ) अग्निपुराणाच्या ३३९ व्या अध्यायांत रीतीचे विवेचन करतांना भारती रीतीसंबंधानें 'भरतेन प्रणीतत्त्वाद्भारती रीतिरुच्यते ॥' (श्लो. ६) म्हणजे भरतानें तिचा पुरस्कार केल्यामुळें तिला भारती रीति असें म्हणतात असे म्हटलें आहे. ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून आपण चार वृत्ति प्रसिद्ध केल्या व त्यांतील भारती वृत्ति भरतांनीं तिचा प्रचार केल्यावरून भारती या नावाने प्रसिद्ध झाली असें नाट्यशास्त्रकार भरतानें सांगितले आहे. तो म्हणतो "मया काव्यक्रियाहेतोः प्रक्षिप्ता द्रुहिणाज्ञया ॥...स्वनामधेयैर्भरतैः प्रयुक्ता सा भारती नाम भवेत्तु वृत्तिः॥" (नाट्यशास्त्र २०-२३ व २५). यावरून उघड होतें कीं अग्निपुराणांतील रीतीचें विवेचन भरताच्या नाट्यशास्त्रावरून घेतलें आहे व अर्थात् भरतकृत नाट्यशास्त्र

निदान त्यांतील रीतींचे विवेचन करणारा भाग तरी अग्निपुराणाच्या पूर्वींचा आहे. पुराण नांवाच्या ग्रंथाचा उल्लेख नाट्यशास्त्रांत आढळतो. त्याच्या १३ व्या अध्यायांत ' अन्येऽपि देशा एभ्यो ये पुराणे संप्रकीर्तिताः' असें वचन आलें आहे ( श्लो. ३५ ). पण अग्निपुराणाचा उल्लेख नाटयशास्त्रांत कोठेंहि आलेला नाहीं.

( इ ) आग्निपुराणांतील किती तरी श्लोक शब्दशः नाट्यशास्त्रांत आहेत. उदाहरणार्थ, नाट्यशास्त्राच्या सहाव्या अध्यायांतील ३६ व ३९ हे श्लोक अग्निपुराणाच्या २३८ व्या अध्यायांत १२ व ७-८ असे आहेत, नाट्यशास्त्रांतील अ. २० श्लोक २८-२९ हे अग्निपुराणांत अ. ३३७ श्लोक ११-१२ आहेत; तसेच नाटयशास्त्र अ. १६ श्लो. ६०-६२ हे अग्निपुराणांत अ. ३४२ श्लो. १५-१६ असे आहेत. यास्तव या दोन्ही ग्रंथांच्या स्वरूपाचा विचार करितां अग्निपुराण हे संग्रहात्मक व नाटयशास्त्र हे स्वतंत्रपणे विवेचक असल्यामुळें अग्निपुराणांतील श्लोकच नाटयशास्त्रांतून घेतले आहेत असे मानणेंच सयुक्तिक ठरते

( ई ) रूपक, उत्प्रेक्षा, विशेषोक्ति, विभावना, अपह्नुति, व समाधि या अलंकारांच्या व्याख्या अग्निपुराणांत आणि काव्यादर्शांत बहुतेक त्याच शब्दांत दिलेल्या आहेत ( पहा अग्निपुराण अ. ३४८ श्लो २३, २४, २५, २६, २७, २८ व अध्याय ३४४ श्लो. १८, १३; काव्यादर्श परिच्छेद २ श्लो. ६६, २२१, ३२३, १९९, ३०४, व पारि. १ श्लो. ९३ ). या व्याख्यांशिवाय आणखीहि कित्येक वाक्यें व श्लोकार्धे या दोन्ही ग्रंथांत समान असलेली आढळतात. उदाहरणार्थ ( अग्नि. अ. ३३६ श्लो. २१ व काव्यादर्श पारि. १ श्लो. ११ ) 'पद्यं चतुष्पदी तच्च वृत्तं जातिरिति त्रिधा, ' ( अग्निपुराण ३३६, २३ व काव्यादर्श १, १२ ) ' सा विद्या नौस्तितीर्षूणां गम्भीरं काव्यसागरम् ' ही श्लोकार्धे पहा. तशींच आणखी उदाहरणे अग्नि. ३३६, २९ व काव्या. १, १६; अग्नि. ३३६, २५ व काव्या. १, १५ इत्यादि होत. आतां काव्यादर्शाचा विचार करितां असें दिसतें कीं, ' लिम्पतीव तमोऽङ्गानि ' ( काव्या. २, २२६ ) व ' अद्य या मम ' ( काव्या. २. २७६ ) या दोन उदाहरणांशिवाय दुसरी अलंकारांची उदाहरणें किंवा व्याख्या काव्यादर्शकार दंडीनें दुसऱ्या कोणाच्या ग्रंथांतून घेतल्या असें अद्यापि दाखवितां आलेलें नाही. म्हणून अशा स्वतंत्र ग्रंथकारानें अग्निपुराणांतून व्याख्या उचलल्या असें संभवत नाहीं. अर्थात् अग्निपुराणकारानेंच त्या काव्या-

दर्शातून घेतल्या असें धरिल्यास त्या पुराणाचा काल इ. सन ७ व्या शतका नंतरचा ठरतो. कारण पुढें काव्यादर्शाचा विचार करितांना दंडीचा काल इ. सनाचें ६ वें किंवा ७ वें शतक असला पाहिजे असें आम्हीं दाखविणार आहोंच.

( उ ) काव्यालंकार नामक ग्रंथाचा कर्ता भामह यानें आपल्या ग्रंथांत रूपक, आक्षेप, अप्रस्तुतप्रशंसा, पर्यायोक्त आणि समासोक्ति या अलंकारांच्या व्याख्या जशा दिल्या आहेत तशाच त्या बहुतांशीं अग्निपुराणांतहि आल्या आहेत. हे अलंकार काव्यालंकार परिच्छेद २, श्लोक २, ६८, परि. ३ श्लो. २८, ८, परि. २ श्लो. ७९ यांत आले असून अग्निपुराणांत अध्याय ३४३ श्लो. २२ व अ. ३४४ श्लो. १६, १८, १७ यांत आले आहेत. आपण आपल्या ग्रथांत स्वत: रचिलेल्याच अलंकाराच्या व्याख्या व स्वत:चींच त्या अलंकारांचीं उदाहरणें दिलीं आहेत असे भामहानें स्पष्ट म्हटले आहे. तो म्हणतो, ' स्वयं कृतैरेव निदर्शनैरियं मया प्रक्लृप्ता खलु वागलंकृतिः ( परि. २, श्लो. ९६ ); गिरामलङ्कारविधिः सविस्तरः स्वय विनिश्चित्य धिया मयोदितः ( परि. ३ श्लो. ५७ ). भामहाचा काल इ. सनाचें ६ वें किंवा ७ वें शतक होय असें आम्हीं पुढें दाखविणार आहों.

( ऊ ) अग्निपुराणकाराला साहित्यशास्त्रांतील ध्वनिवाद ठाऊक होता असें दिसतें. हा ध्वनिवाद प्रथम ध्वनिकारिकांत प्रतिपादिला असून ध्वन्यालोकनामक ग्रंथांत त्याचा सविस्तर विचार केलेला आहे. ध्वनीला स्वतंत्र अस्तित्व नसून पर्यायोक्त, अपह्नुति, समासोक्ति, अप्रस्तुतप्रशंसा, आक्षेप, या अलकारांपैकीं कोणत्याना कोणत्या तरी एखाद्या अलंकारांत त्याचा अंतर्भाव होतो असे अग्निपुराणांत म्हटलें आहे. ' स आक्षेपो ध्वनिः स्याच्च ध्वनिना व्यज्यते यतः । ' अ. ३४४ श्लो. १४; ' एषामेकतरस्यैव समाख्या ध्वनिरित्यतः । ' अ. ३४४ श्लो. १८. या वचनांवरून असें दिसते की अग्निपुराणकाराला जरी ध्वनिवाद ठाऊक होता तरी तो त्याला मान्यता द्यावयाला तयार नव्हता. अग्निपुराणकाराचें हे ध्वनिविषयक मत भामह व उद्भट यांच्या मतांशीं जुळतें आहे. अलंकारसर्वस्व नामक ग्रंथांत याविषयीं म्हटलें आहे की ' इमं हि तावद्भामहोद्भटप्रभृतयश्चिरंतनालङ्कारकाराः प्रतीयमानमर्थं वाच्योपस्कारकतयालङ्कारपक्षनिक्षिप्तं मन्यन्ते । तथाहि पर्यायोक्ताप्रस्तुतप्रशंसासमासोक्त्याक्षेपव्याजस्तुत्युपमेयोपमानन्वयादौ वस्तुमात्रं गम्यमानं वाच्योपस्कारकत्वेन स्वसिद्धये पराक्षेपः परार्थं स्वसमर्पणमिति यथायोगं

द्विविधया भङ्ग्या प्रतिपादितं तैः । ( अलंकारसर्वस्व पा. ३ ); पण ध्वन्यालोककाराचें मत निराळें असून तो म्हणतो, ' पर्यायोक्तेऽपि यदि प्राधान्येन व्यंग्यत्वं तद्भवतु नाम तस्य ध्वनावन्तर्भावः । न तु ध्वनेस्तत्रान्तर्भावः । '. वाच्यार्थाला व्यंग्यार्थ खुलवून दाखवित असल्यामुळें तो व्यंग्यार्थ म्हणजे एक प्रकारचा अलंकारच होय असें भामहादिकांच्या पक्षाचें व अग्निपुराणकाराचें मत असून, पर्यायोक्तासारख्या अलंकारांत व्यंग्यार्थाचें प्राधान्य असेल तर त्या अलंकारांचा ध्वनीमध्यें अन्तर्भाव करणेंच युक्त, त्या अलंकारांत ध्वनीचा अन्तर्भाव करणें उचित नाहीं, असें ध्वन्यालोककाराचें मत आहे. यावरून असें म्हणावयास हरकत नाहीं की अग्निपुराणांतील साहित्यशास्त्रविषयक भाग ध्वन्यालोकानंतर लवकरच लिहिलेला असला पाहिजे. ध्वन्यालोक ग्रंथ इ. सनाच्या ९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत झाला असे आम्हीं पुढें दाखविणार आहों. या बाबतीत आणखी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, ' अपारे काव्यसंसारे कविरेव प्रजापतिः । ' आणि " शृंगारी चेत्कविः ' इत्यादि हे दोन श्लोक अग्निपुराण ( अ. ३३८ श्लो. १०—११ ) व ध्वन्यालोक ( पा. २२२ ) या दोहोंतहि आलेले आहेत. आतां ध्वन्यालोकांत हे श्लोक देतांना ' तथा चेदमुच्यते ' म्हणजे ' आणखी असें म्हटलें आहे कीं ' अशा आशयाचें अवतरण केलेलें असल्यामुळें त्यांत हे श्लोक दुसऱ्या ग्रंथातून घेतले असावेत असें म्हणतां येण्यासारखें आहे. परंतु या श्लोकानंतर जी चर्चा आली आहे तिची समाप्ति ' ध्वनिरेव प्राधान्येन काव्यमिति स्थितमेतत् ' ( पा. २२३ ) म्हणजे ' ध्वनि हेंच मुख्यतः काव्य होय हे सिद्ध होतें ' या शब्दांनीं केलेली आहे व त्यावरून असें निष्पन्न होतें की, अग्निपुराणकार ध्वनीचा उल्लेख करूनहि त्याला मान्यता देत नसल्यामुळे त्यानेच उपरोक्त दोन्ही श्लोक ध्वन्यालोकांतून घेतले असावेत.

या विवेचनावरून असा निर्णय करावा लागतो कीं अग्निपुराणाची रचना इ. सनाच्या निदान सातव्या शतकानंतर झालेली असून त्यांतील साहित्यशास्त्रविषयक भाग बहुधा इ. स. ९०० च्या सुमारास रचिलेला असला पाहिजे. 'धर्मशास्त्राचा इतिहास' या माझ्या पुस्तकांत अग्निपुराणांत याज्ञवल्क्यस्मृतीतून व्यवहारकाण्डावरील जे श्लोक घेतलेले आहेत त्यांवरूनहि अग्निपुराणाच्या त्या भागाचा काळ इ. स. ९०० च्या सुमारांस येतो असें मी दाखविलें आहे.

साहित्यशास्त्रावरील कोणत्याहि प्राचीन ग्रंथकारानें अग्निपुराणांतील एकहि उतारा घेतलेला नाहीं, किंबहुना त्या पुराणाचा उल्लेखहि कोठें केलेला नाही ही गोष्ट अग्निपुराणाचा कालनिर्णय करण्याच्या बाबतींत महत्त्वाची होय. काव्यप्रकाशकार मम्मटानें विष्णुपुराणांतील उतारे घेतले आहेत, पण अग्निपुराणाचा उल्लेख त्यानें मुळींच केलेला नाहीं. साहित्यशास्त्रावरील प्रमाणग्रंथ म्हणून अग्निपुराणाचा स्पष्ट निर्देश करणारा पहिला अलंकारशास्त्रावरील ग्रंथकार म्हणजे साहित्यदर्पणाचा कर्ता विश्वनाथ हा होय. विश्वनाथाचा काळ इ. सनाचें १४ वे शतक होय. त्यानें अग्निपुराणांतलि अ. ३३६ लोक ३-४ व अ. ३३७ श्लो. ७ ( त्रिवर्गसाधनं नाट्यं इ. ) यांतून उतारे घेतले आहेत. साहित्याशिवाय इतर शास्त्रावरील विश्वनाथाच्या पूर्वींच्या ग्रंथकारानीं अग्निपुराणाचा प्रमाणग्रंथ म्हणून निर्देश केला आहे. उदाहरणार्थ, अपरार्कटीका व बल्लालसेनकृत अद्भुतसागर ( इ. स. ११६८ ) यांत त्याचा उल्लेख आढळतो. पण ध्वन्यालोक, लोचन इत्यादि प्राचीन साहित्यग्रंथांच्या कर्त्यांनीं भरताच्या नाट्यशास्त्रांतील उतारे आदरपूर्वक आपल्या ग्रंथांत घेतले आहेत. भामह व दंडी याहि साहित्यग्रंथकारांनी नाट्यशास्त्राचा प्रमाणभूत ग्रंथ म्हणून उल्लेख केलेला दिसतो, व त्याविषयीं पुढे विचार येणारच आहे. या सर्व गोष्टींचा विचार केल्यास अग्निपुराण हा अलंकारशास्त्रावरील आदिग्रंथ या मानास पात्र नसून तो भरत, भामह, दंडी व बहुधा ध्वन्यालोककार या सर्वांच्या नंतर झालेला होय असें म्हणावें लागते. पण सर्व पुराणें एका व्यासमुनीनें प्राचीन काळी लिहिलीं असे समजून सामान्यतः त्या सर्वांविषयीं पूज्यबुद्धि बाळगणाऱ्या अर्वाचीन साहित्यग्रंथकारांनी अग्निपुराणाला अलंकारशास्त्रावरील आदिग्रंथ म्हणून मानिलें व तें त्यांच्या दृष्टीनें स्वाभाविकच होतें.

## २ भरताचें नाट्यशास्त्र

भरताचा नाट्यशास्त्रनामक ग्रंथ प्रस्तुत उपलब्ध असलेल्या साहित्यशास्त्रविषयक सर्व ग्रंथांत प्राचीन होय, असे अनेक कारणांस्तव मानावें लागतें. साहित्यशास्त्रांतील रसवादाचें प्रतिपादन यांतच केलेलें आढळतें. ( रसवादाचा विचार आम्हीं पुढें दुसऱ्या भागांत केला आहे ). अलंकारशास्त्रविषयक दुसऱ्याहि अनेक गोष्टींचें विस्तृत विवेचन नाटयशास्त्रांत केलेले आहे.

निर्णयसागरांत छापलेल्या काव्यमाला ग्रंथमालेंत नाटयशास्त्र प्रसिद्ध झालेलें

आहे, पण त्या आवृत्तीत पुष्कळच अशुद्धें असून अनेक ठिकाणीं शब्दहि गळलेले आहेत व त्यामुळे त्याची शुद्ध प्रत कोणी छापिल्यास तिची अत्यंत जरूरी आहे.* नाट्यशास्त्राचे ३७ अध्याय असून त्याची श्लोकसंख्या सुमारें ५००० आहे व ते बहुतेक अनुष्टभ् छंदांत आहेत. कित्येक ठिकाणीं गद्यहि आले असून ६, ७ व २७ या अध्यायांत तें विशेषतः आलें आहे. त्यांतील कांहीं पद्ये आर्या व इतर छंद यांतहि रचिलेलीं आहेत. आर्याबद्ध पद्यांच्या पूर्वी कित्येक ठिकाणी ‘ अत्र सूत्रानुबद्धे आर्ये भवतः ’ (अ. ६ पान ६४ पहा ) किवा ‘ अत्रानुवंश्ये आर्ये भवतः ’ ( अ. ६ पा. ६५ व ६८; अ. ७ पा. ७३ पहा ) असे शब्द योजून अवतरणें घेतलेलीं आहेत. यांतील पहिल्या शब्दप्रयोगाचे तात्पर्य असे दिसते की कोणत्या तरी सूत्रग्रंथाला धरून आर्या रचिलेल्या होत्या व त्यांतील आर्या ग्रंथकार उतरून घेत आहे. आतां ही सूत्रें भरताने स्वतः रचिलेली होतीं की दुसऱ्या कोणाचीं तीं होती हे निश्चित सांगणे कठीण असलें, तरी बहुधा ती स्वतः भरताचींच असावीं व त्यांना धरून रचिलेल्या आर्याहि त्याच्याच असाव्या. कदाचित् सूत्रानुबद्धे या शब्दाचा अर्थ सूत्रांना धरून रचिलेल्या असा नसून सूत्रांप्रमाणें संक्षिप्त रीतीनें रचिलेल्या असाहि असेल. या अवतरणांशिवाय आणखी ‘ अत्रानुवंश्यौ श्लोकौ ’ किंवा नुसते ‘ अत्र श्लोकः ’ अथवा ‘ अत्र आर्यौ ’ असेहि म्हणून कांही ठिकाणीं अवतरणं घेतलेली आढळतात. यांतील आनुवंश्य शब्दावरून काय बोध होतो हें सांगणे बिकट आहे शब्दार्थच पाहिला तर आनुवंश्य म्हणजे वंशपरंपरेने आलेले, परंपरागत असा अर्थ होईल. हा अर्थ घेतल्यास ती पद्ये नाट्यशास्त्रकार भरताला गुरुपरंपरेनं मिळाली होतीं किंवा त्याच्या कुळांत वंशपरंपरेने तीं आलेलीं होतीं असें म्हणावे लागेल. पण आनुवंश्य या शब्दाचा ‘ त्याच विषयासंबंधी ’ किवा ‘ त्या विषयांतून निघणारा व त्याचे अधिक स्पष्टीकरण करणारा ’ असा दुसराहि अर्थ होणें शक्य आहे. तो घेतल्यास उद्धृत केलेली पद्ये प्रकृत विषयावर प्रकाश पाडणारी आहेत असा भावार्थ घ्यावा लागेल. महाभारत वनपर्वात ( अ. १२९ श्लो.

* अलीकडे ‘ काशी संस्कृत सीरीज ’ मध्यें नाट्यशास्त्र छापलें आहे. काव्यमालेतीलप्रतीत ३७ अध्याय आहेत, तर शेवटचे दोन अध्याय एक करून काशी प्रतींत ३६ अध्याय केले आहेत.

८ ) 'अत्रानुवंशं पठतः शृणु मे कुरुनन्दन' असा श्लोक आहे त्यावरून व आभनवगुप्तानें नाटयशास्त्राच्या ६ व्या अध्यायांत 'अत्रानुवंश्यौ श्लोकौ भवतः' ( पान २९१ ) यांचें स्पष्टीकरण 'अनुवंशभवौ शिष्याचार्यपरंपरासु वर्तमानौ श्लोकाख्यौ वृत्तविशेषौ सूत्रार्थसंक्षेपप्रकटीकरणेन कारिकाशब्दवाच्यौ' या शब्दांनीं केलें आहे, त्यावरून पहिला अर्थ जास्त बरा दिसतो.

नाट्यशास्त्र या समग्र ग्रंथाचा सारांशहि विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. त्याची केवळ रूपरेखा देऊनच काम भागविलें पाहिजे. त्याच्या पहिल्या अध्यायांत पंचम वेद जो नाट्यशास्त्र त्याचा उपदेश ब्रह्मदेवानें भरताला दिल्याचें वर्णन आहे. दुसऱ्या अध्यायांत नाट्यमंडपाची म्हणजे नाटकगृहाची रचना व तिसऱ्यात नाट्यदेवतेचें पूजन यांचें विवेचन आहे. चवथ्या अध्यायांत तांडवनृत्य व त्याचें साहित्य याचें वर्णन असून, पाचव्यांत पूर्वरंग, नान्दी व प्रस्तावना या अंगांचें विवरण केलें आहे. सहाव्यात रस, रसनिष्पत्ति व रसोत्कर्ष करणारे विभाव आणि स्थायिभाव यांचें वर्णन असून, सातव्यांत स्थायी, सात्त्विक आणि व्यभिचारी भावांचें विवेचन केलें आहे. आठव्यांत आङ्गिक, वाचिक, आहार्य व सात्त्विक या चार अभिनयप्रकारांचें वर्णन असून, नवव्यांत हस्त, पाद, ऊर, कटि इत्यादि अंगांच्या निरनिराळ्या विक्षेपांचा विचार आहे. दहा व अकरा या अध्यायांत नृत्याच्या निरनिराळ्या चाली, त्यांतील द्रुतगति व शरीराच्या ठेवणी ( चारी ) यांची चर्चा केली असून बाराव्यात देवता, राजे, सेवकवर्ग इत्यादिकांची भूमिका करताना पात्रांनी कसें चालावें, कसें बोलावें व त्यांनीं कसें व कोठें बसावें हें सांगितलें आहे. तेराव्या अध्यायांत आवन्ती, दक्षिणात्या, पाञ्चाली व ओड्रमागधी या चार प्रवृत्तींचा म्हणजे बतावणी, वेश, भाषा व चालीरीति यांचा विचार केला आहे. चवदा व पंधरा या अध्यायांत छंदःशास्त्राचें सोदाहरण विवेचन असून, सोळाव्यांत काव्याची लक्षणें, व्याख्या, उपमा, रूपक, दीपक व यमक हे अलंकार आणि काव्याचे दहा दोष व दहा गुण यांचें विवेचन आहे. सतराव्यांत प्राकृत भाषा, पात्रांनी एकमेकांना निरनिराळ्या भूमिकांत हाक मारतांना योजावयाची नांवें, तसेंच नाटकांतील संवादांत उच्च नीच स्वरांची ठिकाणें, यांचा ऊहापोह आहे. अठराव्यांत रूपकाचे म्हणजे नाटकाचे दहा प्रकार वर्णिले असून एकोणिसाव्यांत नाटकाचें वस्तु म्हणजे कथानक, व पांच प्रकारचे संधि व त्यांचीं अंगें यांचा विचार आहे. विसाव्या अध्यायांत भारती, सात्वती, कैशिकी व आर-

भटी या वृत्तींचें व एकविसाव्यांत पात्रांचे वेष व भूषणें यांचें विवेचन आहे. बाविसाव्यांत स्त्रीपात्रें व पुरुषपात्रें यांनीं करावयाच्या हावभावांचें वर्णन, प्रणयाच्या दहा पायऱ्या, व नायिकांचे आठ भेद यांचा विचार आला आहे. तेविसाव्यांत प्रणयाच्या खटाटोपांत यशस्वी होण्याचे मार्ग व कुट्टनी म्हणजे प्रणयि जनांची गांठ घालून देणारी वृद्ध स्त्री यांचें वर्णन, चोविसाव्यांत नायक व नायिका यांचे प्रकार, राजे व त्यांचें अंत:पुर यांचे सेवक आणि सूत्रधार, विदूषक व इतर पात्रें, यांचे गुण व पंचविसाव्यांत अभिनयाविषयीं कांहीं विशेष सूचना असे विषय आले आहेत. सव्विसाव्या अध्यायांत नाटक मंडळींतील पात्रांना त्यांच्या लिंग-वयो-बुद्धि-भेदानुसार कोणत्या भूमिका याव्या हे सांगितलें असून नाट्यप्रयोगांत यश मिळविण्याची साधनें सांगून नाट्यचिकित्सक आणि प्रेक्षक कसे असावे याचें विवेचन केलें आहे. अठ्ठाविसाव्या अध्यायांत वाद्ये, सप्तस्वर, ग्राम, मूर्च्छना, इत्यादिकांचे वर्णन असून एकोणतीस ते चवतीस या अध्यायांत गायनवादनाची निरनिराळीं स्वरूपें सांगितली आहेत. पसतिसाव्या अध्यायांत नाटकमंडळींत काम करणाऱ्या माणसांना व त्यांना कामासाठीं लागणाऱ्या कारागीर लोकांना कोणते गुण अवश्य आहेत हें सांगितलें असून सदतिसाव्या अध्यायांत नाट्यशास्त्राचा अवतार भूलोकावर कसा झाला याचा वृत्तान्त दिला आहे.

नाट्यशास्त्रांतील विषयांच्या या स्थूल रूपरेषेवरून असे दिसून येईल कीं, त्याच्या सदतीस अध्यायांपैकीं साहित्यशास्त्र किंवा काव्यमीमांसा यांच्या दृष्टीनें सहा, सात, सोळा, अठरा, वीस व बावीस हेच अध्याय काय ते महत्वाचे होत. नाट्यशास्त्राचा कर्ता म्हणून मानिलेला भरत भूलोकांतल्याप्रमाणेंच स्वर्गांतहि संचार करणारा असल्यामुळें त्याचे ऐतिहासिक अस्तित्व मानतां येत नाहीं; तो केवळ पौराणिक व्यक्ति होय. आतां नटांना भरत असें जे म्हणतात, ते ते भरताच्या नाट्यशास्त्राचा अभ्यास करितात म्हणून की, मूळ भरत म्हणजे नाटयकलेत प्रावीण्य मिळविलेली एखादी लोकांची जात असून जातिवाचक नामांवरून रूपकाने बनावलली नाटयकलेची प्रतिनिधिभूत अशी काल्पनिक व्यक्ति म्हणजे भरत, या प्रश्नाचा निश्चित निर्णय करणे कठीण आहे. पण खरा प्रकार कोणताहि असला तरी एवढें खरें कीं, भरत म्हणून जी कोणी नाटयकलाप्रवीण अशी पौराणिक व्यक्ति प्रसिद्ध आहे त्या भरताने रचिलेला कांही प्रस्तुतचा नाटयशास्त्र हा ग्रंथ नव्हे.

नाट्यशास्त्राकडे बारकाईनें पाहिल्यास त्यांत चार भाग दिसतात; ( १ ) सहाव्या अध्यायांतील ' विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः ' अशासारखीं गद्य सूत्रें, ( २ ) अशा प्रकारच्या सूत्रांचें विवरण करणारा 'भाष्य' या स्वरूपाचा गद्य भाग; ( ३ ) अनुष्टुप् किंवा आर्यावृत्तांतील कारिका ( यांनींच बहुतेक नाट्यशास्त्र भरलेलें आहे), ( ४ ) व ' सूत्रानुबद्धे आर्ये', ' आनुवंश्यौ श्लोकौ ' वगैरे शब्दांनीं अवतारित केलेले श्लोक किंवा आर्या. अभिनवगुप्ताचार्यांच्या * मतानें पहिले तीनहि भाग भरताचेच आहेत. ' अतःपरं प्रवक्ष्यामि सूत्रग्रंथविकल्पनम् ' ( अ. ६ श्लो. ३४ ) ह्याचे व्याख्यान करितांना अभिनवगुप्ताचार्यांनीं ' सूत्र ' म्हणजे लक्षण, ' ग्रन्थ ' म्हणजे ' भाष्य ' आणि त्या भाष्यांच्या मागून कारिका असा क्रम आहे असे सांगितले आहे ( पान २७३ ) जागोजाग अभिनवगुप्ताचार्यांनी येथें भाष्य आहे असें सांगितलें आहे; उदाहरणार्थ पान २८८ वर ' को दृष्टान्तः...रसत्वमाप्नुवन्तीति ' हें भाष्य आहे असे म्हटलें आहे. पान ३०१ वर ' तत्र शृंगारो नाम रतिस्थायिभावप्रभव उज्ज्वलवेषात्मकः ' याला सूत्र, व पुढील गद्यभागाला भाष्य म्हटले आहे. अभिनवगुप्तपादानें पान ८ वर असें म्हटलें आहे की, कांहीं जणांच्या मतानें पहिले सहा श्लोक कोणी शिष्यानें रचिले व नाट्यशास्त्रांत मधून मधून प्रश्न प्रतिवचन प्रयोजन दर्शविणारीं वाक्ये आहेत तीं शिष्यांचीं आहेत व बाकीचा ग्रंथ भरताचा आहे. परंतु अभिनवगुप्ताला हे मत मान्य नाहीं. वरील चवथ्या भागासंबंधानें अभिनवगुप्तानें महत्वाची माहिती दिली आहे. सहाव्या अध्यायांत शृङ्गार वगैरे रसांचें प्रथम गद्यांत विवेचन करून प्रत्येक रसाच्या शेवटीं संग्रहरूपानें आर्या ( व क्वचित् अनुष्टुप् ) दिलेले आहेत. त्याबद्दल अभिनवगुप्त ( पान ३२८ वर ) म्हणतो की ह्या सर्व आर्या पूर्वाचार्यांनी एका ठिकाणीं पठित केल्या होत्या. पण भरतमुनीनें त्यांना योग्य ठिकाणीं घातल्या आहेत ( ता एता ह्यार्या एकप्रघट्टकतया पूर्वाचार्यैर्लक्षणत्वेन पठिताः मुनिना तु सुखसंग्रहाय यथास्थानं निवेशिताः ). इतकें स्पष्ट दिसतें की अभिनवगुप्ताच्या पूर्वी बरीच शतकें उपलब्ध नाट्यशास्त्र आहे याच स्थितींत होतें. ते हल्लींच्या स्वरूपांत केव्हां ग्रथित करण्यांत आलें व ते कोणी केलें हें सांगणें कठीण

*अभिनवगुप्तपादाचार्यासंबंधीं उल्लेख अलीकडे 'गायकवाड ओरिएन्टल सीरिज' मध्यें प्रसिद्ध झालेल्या नाट्यशास्त्राच्या सात अध्यायांवरील अभिनवभारतीटीकेला अनुलक्षून केलेले आहेत.

आहे. राघवभट्टाच्या शाकुन्तलावरील टीकेंत कांही अवतरणें भरताची म्हणून व कांहीं आदिभरताचीं म्हणून येतात व तीं सर्व हल्लीच्या नाट्यशास्त्रांत मिळत नाहीत; म्हणून आदिभरत व भरत ह्या किंवा अशाच नांवाचे दोन ग्रंथ असावे असे दिसते व त्यांचे एकीकरण करून हल्लींचे नाट्यशास्त्र बनविले असावे. 'भावप्रकाशन' ( गायकवाड ऑरिएन्टल सीरिज, पान ३६ ) या ग्रंथांत नाट्यशास्त्रांतील गद्यभाग भरतवृद्धाचा व कारिका भरताच्या असा फरक केलेला आढळतो. ( 'व्यञ्जनौषधिसंयोगो यथान्नं स्वादुतां नयेत् । एवं नयन्ति रसतामितरे स्थायिन श्रिता. ॥ एवं हि नाट्यवेदेऽस्मिन् भरतेनोच्यते रस । तथा भरतवृद्धेन कथित गद्यमीदृशम् । यथा नानाप्रकारैर्व्यञ्जनौषधैः पाकविशेषैश्च संस्कृतानि व्यञ्जनानि ' इत्यादि ). यांतील 'व्यञ्जनौषधि०' हा अर्धा श्लोक हल्लीच्या नाट्यशास्त्रांत आहे ( पान २९४ ). व भरतवृद्धाचा म्हणून जो गद्यभाग दिला आहे त्यासारखा पण तोच मात्र नव्हे असा भाग पान २८९ येथे आहे भावप्रकाशन ( पान २८७ ) येथ मनूने सांगितल्यावरून भरताने नाट्यवेदांतून संग्रह करून एक बारा हजार श्लोकांचा व एक सहा हजार श्लोकाचा असे दोन संग्रहात्मक ग्रंथ केले असे म्हटले आहे या सर्व विवेचनाचा निष्कर्ष हा की, उपलब्ध असलेले भरताचे नाट्यशास्त्र हे नाटयविद्येचे परंपरागत व पुस्तकी असे सर्व ज्ञान मिळविलेल्या दुसऱ्या कोणी तरी रचिले आहे नाटयशास्त्रांत राहिलेले विषय 'कोहल' हा दुसरा ग्रंथ लिहून पुरे करील असे भविष्य हल्लीच्या नाट्यशास्त्राचे शेवटी सांगितलें आहे ( शेषमुत्तरतंत्रेण कोहलः कथयिष्यति । अ. ३६, ६५ काशीप्रत, अ. ३७. १८ काव्यमाला प्रत; 'शेषं प्रस्तारतन्त्रेण कोलाहलः कथिष्यति ') व याचेपुढे कोहल, वात्स्य, शाण्डिल्य, धूर्तिल यांचेकडून नाटयशास्त्राचा प्रसार होईल असें म्हटले आहे ( अ. ३६. ७१ किंवा काव्यमाला ३७. २४ ). यावरून उपलब्ध नाटयशास्त्र पुरं झाले तेव्हां कोहल व इतर तीन यांचे ग्रंथ तयार झाले होते असे स्पष्ट दिसते हल्लीच्या नाटयशास्त्रांत पहिल्या अध्यायांत भरताच्या शंभर पुत्रांचीं नांवें दिलीं आहेत त्यांत प्रथमच शाण्डिल्य, वात्स्य, कोहल, व दत्तिल हे येतात. दामोदरगुप्ताच्या ( ८ वें शतक ) कुट्टनीमतांत ( ८१ वा श्लोक ) भरताबरोबर कोहलाचा उल्लेख आहे; ( कतमत्कतमल्लग्नं प्रस्थाने का च नर्तकी भर्ता । विटखटके का नृत्यति कोहलभरतोदितक्रियया ।). अभिनवगुप्ताने अभिनवभारती टीकेंत अनेक ठिकाणी कोहलाचीं मतें दिलीं आहेत.

' जितमुडुपतिना ' ( रत्नावली अंक १ ) हा श्लोक भरताच्या मताप्रमाणें बरोबर नान्दीचा श्लोक आहे असें कोहलानें दाखविलें आहे असें अभिनवगुप्त म्हणतो ( पान २५ ); नाट्यशास्त्रांतील (अ ६-१०) ' रसा भावा: ह्यभिनया: धर्मी वृत्तिप्रवृत्तय: । सिद्धि: स्वरस्तथातोद्यं गानं रंगश्च संग्रह: ॥' या श्लोकांत नाट्याचीं जी अकरा अंगें कोहलाचे मतानें होतात ती सांगितली आहेत, भरताचे मताप्रमाणें नव्हत असे औद्भटांचें [ म्हणजे उद्भटाच्या अनुयायांचे] मत आहे असें अभिनवगुप्त म्हणतो (पान २६६). भावप्रकाशन वगैरे ग्रंथांत भाण, उत्सृष्टिकाङ्क इत्यादिकांच्या लक्षणाचे बाबतीत भरत व कोहल यांची मते भिन्न होतीं असे दाखविले आहे. संगीतरत्नाकरांत ' चालक ' यावर कोहलाचे ग्रंथांतून छापी अकरा पानांचा पद्यमय उतारा घेतलेला आहे ( आनंदाश्रम प्रत पान ६७९-६८९ ) यावरून कोहलाचा ग्रंथ अत्यत विस्तृत, पद्यमय व नाट्यशास्त्राच्या सर्व अगांचे साकल्यानें विवरण करणारा होता व कोहल हा रत्नावलीचे मागून व उद्भटाचे पूर्वीं झाला असें दिसतें. म्हणजे इ. स. ६५० पासून ७५० पर्यंतचा त्याचा काळ ठरतो. कोहलाचा तालशास्त्रावरील ग्रथ लंडनच्या इंडिया ऑफिसच्या संग्रहांत आहे. हेमचंद्रानें आपल्या काव्यानुशासनांत कोलाहलाचा ( कोहलाचा ) उल्लेख दोनदां केला आहे ( काव्यमाला पान ३२५, ३२९ ). नाट्यशास्त्रांत वर लिहिले आहेत त्यांखेरीज आणखीहि त्या शास्त्रावरील आचार्य उल्लेखित झाले आहेत. अ. ४. १७-१८ यांत म्हटलें आहे की तंडु मुनीनें अङ्गहारांचा प्रयोग भरताला शिकविला व अभिनवगुप्तपाद म्हणतात कीं तण्डु व मुनि हे शब्द अनुक्रमें नदि व भरत ह्यांची अपरनामें आहेत. याखेरीज स्वाति, नारद व पुष्कर यांचाहि उल्लेख नाटयशास्त्रांत आहे. नाटयशास्त्र पृथ्वीवर कसे प्रकट झाले याबद्दल अनेक प्रकारच्या कथा नाट्यशास्त्रावरील ग्रंथांत आहेत. ' भावप्रकाशन ' ( पा. २८६-२८८ ) या ग्रंथांत शंकरानें नंदिकेश्वराला नाट्यशास्त्र शिकविलें; त्यानें ब्रह्मदेवाला व ब्रह्मदेवानें सहा शिष्यांना शिकविलें व मग तो म्हणाला ' तानब्रवीन्नाट्यवेदं भरतेति पितामह: '. म्हणून त्या सहा शिष्यांना भरत म्हणूं लागले व मग मनूकरितां भरत पृथ्वीवर आला व त्यानें नाट्य पृथ्वीवर प्रसृत केलें. त्याच ग्रंथांत पान ५८ वर शृङ्गार वीरादि रसांबद्दल नारदानें भरताला माहिती दिली असें म्हटलें आहे. नाटयशास्त्राच्या काव्यमाला प्रतींत शेवटी ' समाप्तश्चायं नन्दिभरतपुस्तकं ' असा उल्लेख आहे तो वर उद्धृत केलेल्या नन्दि व भरत ह्यांच्या संबंधालाच अनुलक्षून असावा असें

वाटतें. भावप्रकाशन ( पान २ ) या ग्रंथांत सदाशिव, गौरी, वासुकि, सरस्वती, नारद, अगस्त्य, व्यास, भरतशिष्य, आञ्जनेय ( मारुति ) यांनीं नाटयशास्त्रावर ग्रंथ लिहिले होते असें म्हटले आहे. रसार्णवसुधाकरांत शाण्डिल्य, कोहल, दत्तिल, मतङ्ग व इतर भरतपुत्र यांनीं नाटयशास्त्रावर ग्रंथ लिहिल्याचें सांगितलें आहे ( पान ८ ). संगीतरत्नाकरांत संगीत संप्रदायांची फारच लांब यादी दिलेली आहे ( १·२·१५–२० ). ती अशी ' सदाशिव, शिवा, ब्रह्मा, भरत, कश्यप, मतङ्ग, याष्टिक, दुर्गाशक्ति, शार्दूल, कोहल, विशाखिल, दन्तिल, कम्बल, अश्वतर, वायु, विश्वावसु, रम्भा, अर्जुन, नारद, तुंबुरु, आञ्जनेय, मातृगुप्त, रावण, नन्दिकेश्वर, स्वाति, गुण, बिन्दुराज, क्षेमराज, राहुल, रुद्रट, नान्यदेव, भोज, सोमेश्वर. संगीतसमयसार ह्या ग्रंथांत म्हटले आहे ' लोके दत्तिलकोहला-निलसुताः सोमेश्वरस्तुम्बुरु शास्त्रं भोजमतङ्गकश्यपमुखा व्यातेनिरे ते पुरा। ' दामोदरगुप्ताचे कुट्टनीमतांत [ १२३ वी आर्या ] भरत, विशाखिल व दन्तिल एकत्र येतात. वामनाच्या काव्यालंकारसूत्रवृत्तीत ( १–३–७ ) विशाखिलाने गीतादि कलांवर ग्रंथ लिहिला होता असा उल्लेख आहे. दत्तक ( कामशास्त्रावर लिहिणारा ) व दन्तिल किंवा दत्तिल हे भिन्न असावेत. दन्तिल व धूर्तिल हे एकच की काय हे सांगतां येत नाहीं.

आणखीहि कित्येक ग्रंथकारांचा उल्लेख नाट्यशास्त्रांत ' अन्ये, अन्यैस्तु ' इत्यादि शब्दांनी केलेला आहे ( काव्यमाला प्रत पा. ४८, १०९ इ. पहा ).

## नाट्यशास्त्राचा रचनाकाल

नाट्यशास्त्राच्या रचनाकालासंबंधाने अनेक पंडितांनी अनेक मते प्रतिपादिली आहेत. प्रो. मॅकडोनेल या पंडिताने तो इ. सनाचे ६ वें शतक असा ठरविला आहे. महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री यांनी इ. सनापूर्वीचे २ रें शतक असा तो ठरविला आहे. नाट्यशास्त्रांत स्वामी आदिकरून शब्दांचा जो संबोधनार्थी उपयोग केलेला आहे त्यावरून तो ग्रंथ इंडोसिथियन क्षत्रपांच्या काळीं लिहिलेला असावा असें प्रो. लेव्ही यांनी एका लेखांत प्रतिपादिलें असून त्याचे इंग्रजी भाषांतर इंडियन ॲटिक्करीच्या ३३ व्या पुस्तकांत ( पा. १६३ ) छापिलेलें आहे. तत्कालीन कोरीव लेखांत कित्येक क्षत्रपांना स्वामी हें उपपद लाविलेलें आढळतें यावर प्रो. लेव्ही यांच्या प्रतिपादनाची मदार आहे. प्रो. लेव्ही यांचें

प्रतिपादन भपकेदार कोटिक्रमानें व निश्चयात्मक जोमदारपणानें सजविलेलें आहे हे खरें, पण सस्कृत नाट्यशास्त्राचा व कलेचा उदय क्षत्रपांच्या अमदानींत त्यांच्या आश्रयानें झाला व प्राकृत भाषांना मागें सारून संस्कृत गीर्वाणाचे पुनरुज्जीवन करण्याचें कार्य त्या क्षत्रपांच्या नेतृत्वाखाली झाले असे प्रतिपादन करणें म्हणजे वाळूच्या भुसभुशीत पायावर प्रचंड इमारत उभारणेच होय असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. प्रो. लेव्ही यांच्या साऱ्या कोटिक्रमाला थोडक्यांत व सरळ उत्तर एवढेंच आहे कीं स्वामी शब्दाचा उपयोग करणाऱ्या क्षत्रपांच्या कोरींव लेखांत जे नाट्यविषयक निर्देश आले आहेत ते करणारा लेखक नाट्यशास्त्रांत अंगिकारलेल्या परिभाषेंत पूर्णपणे मुरलेला आहे, म्हणजे अर्थात् नाट्यशास्त्र हा ग्रंथ त्या लेखापूर्वींच मान्यता पावलेला होता. असो. नाट्यशास्त्राच्या रचनाकालाची आदिम मर्यादा निश्चयात्मक सांगणे कठिणच आहे. त्यांत पाशुपत ( अ. १२ श्लो. ७६ ), विश्वकर्मा ( २१-३५ व ४० ), पुराण ( १३-३५ ), कामतन्त्र ( २३-६१ व ७३ ) बृहस्पतिमत ( राजनीतीवर, अ. २४. ७४-७५ ), शाक्य, निर्ग्रंथ ( अ. १२ श्लोक ७८ ), शबर, आभीर ( अ. १७ श्लो. ४९ ), शक ( १७, ५३ ) यांचा, तसेच शौरसनी, मागधी, अर्धमागधी, आवन्ती, दाक्षिणात्या इत्यादि अनेक प्राकृत भाषा व त्यांचे विशेष आणि अनेक प्रांतांची नांवें ( अ. १३ ) यांचे निर्देश केलेले आहेत. पण त्याच्या रचना—कालासंबंधानें निश्चित विधान करतां येण्याचें साधन या साऱ्या उल्लेखांत कांही नाही. त्यांवरून फार तर एक मर्यादा निश्चित होईल म्हणजे नाट्यशास्त्र हें ख्रिस्ती शकाच्या आरंभाहून फारसें प्राचीन नाही एवढ म्हणतां येईल. नाट्यशास्त्राच्या रचनाकालाची उत्तर मर्यादा याहून अधिक निश्चितपणें सांगतां येण्यासारखी आहे, पण ती कांही अंशीं कालिदासाच्या काळावर अवलंबून आहे. नाट्यशास्त्राच्या रचनाकालाचा सविस्तर विचार आम्ही इंडियन ॲटिक्करीच्या ४६ व्या पुस्तकांत ( स. १९१७, पानें १७१-१८३ ) केला आहे. त्याचें संक्षिप्त सार कांहीं अधिक प्रमाणें घालून पुढें दिलें आहे.

( अ ) दामोदरगुप्ताच्या कुट्टनीमतनामक ग्रंथांत ( श्लो. ७५ ) नाट्यशास्त्राला ब्रह्मोक्त म्हणजे ब्रह्मदेवानें सांगितलेले असे म्हटले आहे. इ. स. १००० च्या सुमारास रचिलेल्या दशरूपकांतहि ‘ उद्धृत्योद्धृत्य सारं यमखिलनिगमान्नाट्यवेदं विरिञ्चिश्चक्रे यस्य प्रयोगं मुनिरपि भरतस्ताण्डवं नीलकंठः । ’ ( १, ४ ) या

श्लोकांत साऱ्या वेदांचें सार काढून हा नाट्यवेद ब्रह्मदेवानें केला व भरतानें त्याचा प्रयोग केला असें सांगितले आहे. म्हणजे, प्रस्तुत नाट्यशास्त्रांत ( १,१–४ व ११–१६ ) तें शास्त्र भरताला ब्रह्मदेवापासून मिळाल्याचे जें वर्णन आहे तें तसेंच आठव्या शतकांतहि होतें असें सिद्ध होतें.

( आ ) ध्वन्यालोककार आनंदवर्धन यानें भरताचा व त्याच्या नाट्यशास्त्रांतील विषयांचा अनेक ठिकाणी उल्लेख केला आहे. 'यदि वा वृत्तीनां भरतप्रसिद्धानां कैशिक्यादीनाम्' ( पा. १६३ काव्यमाला प्रत ), 'यथा वेणीसंहारे विलासाख्यस्य प्रतिमुखसंध्यङ्गस्य प्रकृतरसनिबंधनाननुगुणमपि भरतमतानुसरणमात्रेच्छया घटनम्' ( पान १५० , 'अत एव च भरते प्रबंधप्रख्यातवस्तुविषयत्व प्रख्यातोदात्तनायकत्वं च नाटकस्यावश्यकर्तव्यतयोपन्यस्तम्' ( पा. १४६ ), 'एतच्च रसादितात्पर्येण काव्यनिबन्धनं भरतादावपि सुप्रसिद्धमेव' ( पान १८१ ). यांतील पहिल्या उताऱ्यांत उल्लेखिलेल्या कैशिक्यादि वृत्तींचे वर्णन नाटयशास्त्राच्या विसाव्या अध्यायांत आलं असून दुसऱ्या उताऱ्यांतील विलास नांवाच्या अंगाचा विचार १९व्या अध्यायांत केलेला आहे. त्यांत आनंदवर्धनानें वेणीसंहाराचा उल्लेख केलेला असून भरताच्या नाटयशास्त्रांतील नियम प्रमाण मानून तें नाटक लिहिलेलें असल्याचेंहि सांगितलें आहे. आनंदवर्धन इ. सनाच्या ९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला; अर्थात् त्याच्यापूर्वी कांही शतकें तरी नाटयशास्त्र अस्तित्वांत असून त्यांत रस, नायक, वृत्ति इत्यादिकांचें व विलासनामक अंगासारख्या सूक्ष्म पण महत्वाच्या गोष्टींचें विवेचन केलेलें होतें हे उघड होतें.

( इ ) नाटयशास्त्राच्या ६ व्या अध्यायांतील 'विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः' हे सूत्र मम्मटानें आपल्या काव्यप्रकाशांत घेतलें असून भट्टलोल्लट, शङ्कुक, भट्टनायक आणि अभिनवगुप्त या चार पंडितांनी केलेलें त्या सूत्राचें विवरणहि त्यानें दिलेलें आहे. यांपैकीं अभिनवगुप्ताच्या पांडित्याचा उत्कर्ष काळ इ स. ९९० पासून १०२० पर्यंत होता असें पुढें दाखविण्यांत येईल. भट्टनायकाचा काल इ. स. ९०० ते ९२५ हा होय. शङ्कुक हा राजतरंगिणीत* ( अ. ४, श्लो. ७०५ ) सांगितलेला भुवनाभ्युदय नामक काव्याचा

* कविर्बुधमनःसिंधुशशाङ्कः शङ्कुकाभिधः । यमुद्दिश्याकरोत्काव्यं भुवनाभ्युदयाभिधम् ॥

कर्ता शङ्कुक कविच असावा. तसा तो असेल तर त्याचा काळ इ. स. ८४० च्या सुमाराचा येतो. काव्यप्रकाशाचा एक टीकाकार सोमेश्वर यानें भरताच्या उपरोक्त सूत्रावरील शंकुकाच्या विवरणांतील कांहीं श्लोक व भट्टतौताची त्यावरील चर्चा हीं दिलीं आहेत. नाट्यदर्पण ( पान ८६ ) या ग्रंथांत अमात्य शंकुकाचा चित्रोत्पलावलम्बितक या प्रकरणाचा कर्ता म्हणून उल्लेख केलेला आहे व त्याच ग्रंथांत ( पान १३३ ) त्याचे मत म्हणून असें दिलें आहे की, वीथी नांवाच्या रूपकप्रकारांत एका दिवसांत घडलेलें संविधानक असावें व अधमप्रकृति नायक वीथींत सुद्धां चालणार नाही. भावप्रकाशन (पान २५०) ग्रंथांत रंगभूमीवर वध दाखविण्यास हरकत नाही असें शंकुकाचें मत होतें असें सांगितलें आहे. भट्टलोल्लटाचा काळ निश्चित करतां येत नाही. पण ज्या अर्थी मम्मटानें शंकुक, नायक आणि अभिनवगुप्त ही नांवें कालाक्रमानुसार सांगितली आहेत, त्यावरून भट्टलोल्लटाचें नांवहि त्याच क्रमाने असलें पाहिजे म्हणजे तो शंकुकादि त्रयीच्या पूर्वी होऊन गेलेला असला पाहिजे असें म्हणावयास हरकत नाही. लोल्लट हा बहुधा मीमांसक असावा. त्याचें नांव आलंकारिकांच्या संबंधांत जे आलें आहे ते शब्दाची अर्थज्ञापक शक्ति अभिधा नामक एकच असून लक्षणा व व्यंजना या स्वतंत्र शक्ति नव्हत या त्याच्या मतामुळे होय. ध्वन्यालोकावरील लोचन नामक टीकेंत ( पान १८८ ) अभिनवगुप्ताने व महिमभट्टानें आपल्या व्यक्तिविवेक नामक ग्रंथांत ( पान २७ ) उपर्युक्त मत प्राभाकर सांप्रदायाचे आहे असें म्हटले आहे. काव्यप्रकाशावरील काव्यप्रकाशसंकेत नामक माणिक्यचद्रकृत टीकेत ( म्हैसूर प्रत पान ८२ ) लोल्लटाने रसविवरण नांवाचा ग्रंथ लिहिला असें म्हटले असून सोमेश्वरकृत काव्यादर्श नांवाच्या टीकेत लोल्लटाचा म्हणून पुढील उतारा दिला आहे: ' यमकानुलोमतदितरचक्रादिभिदा हि रसविरोधिन्यः । अभिधानमात्रमेतद्गड्( ड्ड ? ) रिका प्रवाहो वा ' ॥. ही आर्या रुद्रटाच्या काव्यालंकारावरील ( ३, ५९ ) टीकेंत नमिसाधूनेहि घेतली आहे, पण त्यानें तिच्या कर्त्याचें नांव सांगितलेलें नाही. हेमचन्द्राच्या काव्यानुशासनांत लोल्लटाचे दोन श्लोक दिलेले आहेत. त्यांतील एक वरील ' यमकानुलोम ' हा व दुसरा राजशेखराच्या काव्यमीमांसेत ' आपराजिति ' याचा म्हणून दिलेला आहे. तो श्लोक असा ' यस्तु सरिदद्रिसागरपुरतुरगरथादिवर्णने यत्नः । कविशक्तिख्यातिफलो विततधियां नो मतः स इह ॥" ( पान २१५ ). या उल्लेखांवरून लोल्लट हा प्रभाकरानंतर व शंकुकाच्या

पूर्वी म्हणजे इ. स. ७०० पासून ८०० पर्यंत होऊन गेला असें दिसते. म्हणजे एकंदरींत असें निष्पन्न होतें की नाट्यशास्त्राच्या सहाव्या अध्यायांतील रसविवेचन इ. स. ८ व्या शतकापूर्वी पंडितांच्या चर्चेचा विषय बनलेले होते.

( ई ) अभिनवगुप्तानें आपल्या लोचनामध्यें, यमक हा शब्दालकार व उपमा हा अर्थालंकार असें भरतादि प्राचीन मुनींचें मत असल्याचे सांगितलें आहे. नाटयशास्त्रांत १६ व्या अध्यायांत ज्या चार अलंकारांचे विवेचन आहे त्यांतील यमक व उपमा हे दोन आहेत. अभिनवगुप्तानें भामह व उद्भट यांची मतें सांगतांना त्यांना चिरंतन म्हणजे प्राचीन हें विशेषण लाविलेलें नाही. यावरून नाटयशास्त्रकार हा भामहादिकांहून बराच प्राचीन होता असा लोचनकाराचा अभिप्राय दिसतो.

( उ ) इ. स. आठव्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेलेला भवभूति, भरताला तौर्यत्रिक सूत्राचा म्हणजे नाटयसूत्राचा कर्ता व रामायणकार वाल्मीकीचा समकालीन मानितो ( उत्तर रामचरित अंक ४ ).

( ऊ ) बाणभट्टानें भरताच्या नृत्तशास्त्राचा उल्लेख केला असून चंद्रापीडाने संपादिलेल्या कलांमध्यें त्याची परिगणना केली आहे. हर्षचरिताच्या तिसऱ्या उच्छ्वासांत ( च्छेदक ५ ) ‘ भरतमार्गभजनगुरु’गीताचा म्हणजे भरतप्रणीत मार्गाचें अनुकरण करणाऱ्या गायनाचा उल्लेख बाणानें केलेला आहे आणखी हर्षचरिताच्या दुसऱ्या उच्छ्वासांतीहि ( च्छेदक ४ ) आरभटीवृत्तियुक्त नट त्यानें सांगितले आहेत· ‘ रेणवावर्तमण्डलीरेचकरासरसरभसारब्धनर्तनारंभारभटीनटाः ’. यांतील रेचकाचे विवेचन नाट्यशास्त्रांत अ. २२ श्लो. २० यांत व आरभटी वृत्तीचें अ. २० श्लो. ५४ यांत आलेले आहे.

( ऋ ) भरत हा देवांचा नाट्याचार्य होता असे विक्रमोर्वशीयाच्या पहिल्या अंकांत कालिदासानें म्हटलें आहेः ‘ मुनिना भरतेन यः प्रयोगो भवतीष्वष्टरसाश्रयः प्रयुक्तः । ललिताभिनयं तमद्य भर्ता मरुतां द्रष्टुमनाः सलोकपालः ॥’. या श्लोकांत कालिदासाने नाट्यप्रयोगाला अष्टरसाश्रय म्हणजे आठ रसांवर अवलंबून असलेला असें म्हटलें असून त्याचे रंगभूमीवरील प्रदर्शन अप्सरांकडून करविल्याचें सांगितले आहे. या सर्व गोष्टी सांप्रत उपलब्ध असलेल्या नाट्यशास्त्रांत आढळतात. अ. ६ श्लोक १५ यांत आठ रस आणि अ. ३७ श्लो. १९ यांत अप्सरांचे नाटयप्रयोगाशी संबंध वर्णिले आहेत. कालिदासाचा काळ अद्यापि सर्वानुमतें निश्चित झालेला

नसला तरी त्याची उत्तर मर्यादा इ. स. ४५० च्या अलीकडे आतां कोणताहि पंडित आणीत नाहीं. भरताच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या नाटयशास्त्राचा कालिदासाला चांगला परिचय होता व तो भरताला अर्धवट दिव्यव्यक्ति मानीत होता. अर्थात भरताचा ग्रंथ कालिदासापूर्वी कांहीं शतकें तरी अस्तित्वांत असला पाहिजे.

( ऋ ) भट्टि, भामह, दण्डी इत्यादि इ. स. ५०० पासून ६५० पर्यंत झालेल्या सर्व प्राचीन साहित्यशास्त्रकारांनी तिसांहून अधिक अलंकार सांगितले आहेत. पण भरतानें मात्र उपमा, दीपक, रूपक आणि यमक असे चारच सांगितले आहेत. भरतानें छंद व प्राकृत भाषा यासंबंधानें विस्तृत विवेचन केलेलें असल्यामुळें त्याला अधिक अलंकारांची माहिती असती तर त्यांचेंहि वर्णन त्यानें निःसंशय दिलें असतें. ते त्याने दिलेले नाहीं यावरून त्याच्यावेळीं अधिक अलंकारांकडे काव्यचिकित्सकांचें लक्ष्य गेलेले नव्हतें हें उघड आहे. अर्थात नाटयशास्त्राचा कर्ता, भट्टिभामहादिकांच्यापूर्वी कित्येक शतकें तरी होऊन गेला असला पाहिजे. उपरिनिर्दिष्ट सर्व गोष्टींचा विचार केल्यास नाटयशास्त्राची रचना इ. स. ३०० च्या अलीकडची असणें संभवत नाही असें अनुमान करावे लागतें. आतां मूळ नाटयशास्त्र जसेंच्या तसेंच आजवर चालत आले असून त्यांत मुळींच कोणी भर टाकलेली नाहीं असे मात्र म्हणवत नाही. तशी भर कित्येक ठिकाणी पडलेली दिसते. पण निदान इ. स. ३०० च्या सुमारास भरताच्या नांवावर प्रसिद्ध असलेला नाटयशास्त्र नांवाचा ग्रंथ अस्तित्वांत असून त्यांत नाटयकलेचे विवेचन व रसवादाची मांडणी केलेली होती याविषयीं कांही संशय बाळगावयास नको. इ. स. ३०० इतक्या प्राचीनकाळी लिहिलेला साहित्यशास्त्र व काव्यचिकित्सादि विषयांवरील दुसरा कोणताहि ग्रंथ अद्यापि उपलब्ध नाहीं. म्हणून आहे या परिस्थितींत तरी नाट्यशास्त्र हाच अलंकारशास्त्रावरील प्राचीनतम ग्रंथ मानणें प्राप्त आहे.

धनञ्जय नामक ग्रंथकाराच्या दशरूपावरील ( ३, ५७–६० ) धनिक नामक टीकाकाराने अवलोक नांवाच्या आपल्या टीकेंत भरताचा म्हणून एक श्लोक सांगितला आहे, तो असा:—" एतच्च ' इदं त्रिपुरदाहे तु लक्षण ब्रह्मणोदितम् । ततस्त्रिपुरदाहश्च डिमसंज्ञः प्रयोजितः ॥ ' इति भरतमुनिना स्वयमेव त्रिपुरदाहेतिवृत्तस्य तुल्यत्वं दर्शितम् ". पण यांतील उत्तरार्ध मात्र प्रस्तुत नाट्यशास्त्रांत ( अ. ४ श्लो. ९ ) आढळते. भोजदेवकृत सरस्वतीकंठाभरणाच्या टीकेत ( पान २५४ बनारस ) टीकाकारानें मुरजबंधाचें विवेचन करतांना म्हटलें आहे

कीं, " पाठाक्षराणि मुरजे लहकारौ तथदधाच्छमौ रेफः । नणकखगघङाश्चेत्थं षोडश भरतादिकथितानि ॥ ". मुरजबंधाला कोणती अक्षरें लागतात ते या श्लोकांत भरताच्या मताचा अनुवाद करून सांगितलें आहे. पण नाट्यशास्त्रांत याविषयीं कांहीं उल्लेख आढळत नाहीं. अभिनवगुप्तानें नाट्यशास्त्रावर टीका लिहिली आहे. अभिनवगुप्ताच्या टीकेंतील कित्येक भाग मद्रास इलाख्यांत उपलब्ध झाले असून त्यांत त्या टीकेला नाट्यवेदविवृति किंवा अभिनवभारती असें नांव आढळतें. ह्या अभिनवभारती टीकेचा नाट्यशास्त्राच्या पहिल्या सात अध्यायांवरील पहिला हप्ता गायकवाड ओरिएन्टल सीरीजमध्यें नुकताच छापून प्रसिद्ध झाला आहे. त्यावरून नाट्यशास्त्राविषयीं व त्याच्या टीकाकारासंबंधानें अत्यंत महत्वाची माहिती मिळते. प्रो. पाठक ह्यांना ८० व्या वर्षी अभिनन्दनात्मक जो लेखसंग्रह समर्पण करण्यांत आला त्यांत मी लिहिलेला ' ग्लीनिंग्ज फ्रॉम दी अभिनवभारती ' हा एक लेख आहे. त्यांतील कांहीं माहिती येथे थोडक्यांत देतो. हल्लीं उपलब्ध असलेल्या नाट्यशास्त्रालाच ' भरतसूत्र ' असें अभिनवगुप्त म्हणतो व तें ३६ अध्यायांचें होतें व ६००० श्लोकसंख्येनं परिमित होतें असें तो वारंवार म्हणतो. उदा० ' षट्त्रिंशकं भरतसूत्रमिदं विवृण्वन्वन्दे शिव०', 'अपि तु यथावसर महावाक्यात्मना षट्सहस्रीरूपेण प्रधानतया प्रश्नपंचकनिरूपणपरेण शास्त्रेण तत्त्वं निर्णीयते । ' ( पान ८ ). भरताच्या नाटयशास्त्रावर अनेक टीकाकार होऊन गेले असें या ग्रंथावरून दिसतें. नाटयशास्त्र ४. १६९ येथें एकाच श्लोकाचे चार अर्थ दिले आहेत व ४. ३३१ येथें सहा भिन्न मतें सांगितलीं आहेत. भरताचे नाटयशास्त्र हें सूत्र म्हटल्याबरोबर अर्थात् वार्तिकाची कल्पना मनांत उभी राहते. त्याप्रमाणें अभिनवभारतीत 'हर्षवार्तिक' म्हणून नाटयशास्त्रावर होतें असें पान २०७ २११ व २५१ येथील उल्लेखांवरून दिसतें. हे वार्तिक गद्यमय व पद्यमय होतें, कारण पान २११ वर श्रीहर्षाची एक आर्याहि उद्धृत केलेली आहे. हा हर्ष कोण व कधीं झाला हें सांगणे कठीण आहे. याशिवाय वार्तिककाराची म्हणून अनेक ठिकाणी गद्यांत व आर्यावृत्तांत मतें उद्धृत केलीं आहेत ( पान ३१, ६७, ६८, १७२, १७४, २१२ ) व कांहीं ठिकाणीं अभिनवगुप्तानें वार्तिककाराची मतें अग्राह्य ठरविलीं आहेत. हा वार्तिककार व हर्षवार्तिककार एक किंवा भिन्न हें सांगणे कठीण आहे. पण ते भिन्न असावेत असें दिसतें. याशिवाय लोल्लट, उद्भट व शङ्कुक यांनीं नाट्यशास्त्रावर टीका रचिल्या

असाव्यात असें अभिनवभारती व इतर ग्रंथांवरून वाटतें. संगीतरत्नाकारांत म्हटलें आहे की, भारतीय नाट्यशास्त्राचे लोल्लट, उद्भट, शङ्कुक, अभिनवगुप्त व कीर्तिधर हे टीकाकार आहेत. ( व्याख्यातारो भारतीये लोल्लटोद्भटशङ्कुकाः । भट्टाभिनवगुप्तश्च श्रीमत्कीर्तिधरोपरः ॥ १. २. १९ ). अभिनवभारतींत भट्ट-लोल्लटांचा मते पान २०८, २६६, २९९ येथे उद्धृत केली असून रससूत्रावरील त्याचे विवरण पान २७४ वर दिले आहे. तो रसाचे बाबतीत उत्पत्तिवादी होता. उद्भटाचें मत वरती कोहलासंबंधाचे विवरण केलें आहे त्यांत दिले आहे. शंकु-काच्या टीकेंतील उतारे अभिनवभारतीत अनेक वेळां घेतले आहेत ( पान ६७ २१६–२१७, २९८, ३१८ ) व त्याचे रससूत्रावरील व्याख्यान विस्ताराने देऊन त्याचे खण्डन अभिनवगुप्तानें केलें आहे. ( पान २७४–२७८ व २८५ व २९३ ). शंकुक हा रसाचे बाबतीत अनुमितिवादी होता. याशिवाय भट्टनायक ( हृदयदर्पण या ग्रंथाचा कर्ता ) याचें रसवादाविषयींचें ( भुक्तिवादि ) मत अभिनवभारतीत ( पान २७८ पासून पुढें ) दिले असून त्याचे खंडनहि केलेलें आहे. पान ४–५ येथें भट्टनायकाच्या मताचा अनुवाद केला आहे व त्याच्या ग्रंथांतील प्रास्ताविक श्लोक दिला आहे, त्यावरून भट्टनायक हा अद्वैतवेदान्ती दिसतो. भट्टनायकानें सर्व नाट्यशास्त्रावर टीका लिहिली नाही असें दिसतें, फक्त रससूत्राचें विवरण त्यानें आपल्या हृदयदर्पणांत केलें. कीर्तिधराचार्यांचे मत अभिनव-भारती ( पान २०८ ) येथे उद्धृत केलें आहे. यापेक्षां त्याची कांहीं माहिती नाही. त्याच पानावर ‘ भट्टयन्त्र ’ याचें म्हणून एक मत दिलें आहे. अभिनव भारतींत वरील ग्रन्थकारांशिवाय ‘ राहुल ’ किंवा ‘ राहुलक ’ याचींहि मतें बऱ्याच वेळां उद्धृत केलेली आहेत ( पान ११५, १७२, १९७ ). हा ‘राहुलक’ टीकाकार असावा किंवा यानें नाट्यशास्त्रावर स्वतन्त्र ग्रंथ केला असावा. पान १७२ वरील उल्लेखांवरून तो वार्तिकारापासून भिन्न होता असें दिसतें. अभिनव गुप्ताच्या अभिनवभारती टीकेशिवाय आज कोणतीहि नाट्यशास्त्रावरील टीका उपलब्ध नाही. काव्यप्रकाशाचा एक टीकाकार सोमेश्वर यानें ओजस् संबंधानें कांही अवतरण भरताच्या ग्रंथांतून म्हणून घेतलें असून त्याचें मङ्गलकृत स्पष्टीकरणहि दिलें आहे. पण तें अवतरण प्रस्तुत नाट्यशास्त्रांत आढळत नाहीं. सोमेश्वर म्हणतो ‘ तत्राव-गीतस्य हीनस्य वा वस्तुनः शब्दार्थसंपदा यदुदात्तत्वं निषिञ्चति कवयस्तदोज इति भरतः । अवगीतस्य हीनस्य वा वस्तुनः शब्दार्थयोरर्थसंपदा पद (र) मुदात्तत्वं निषिञ्चन्ति कवयः तर्हि तदनोजः स्यादिति मङ्गलः । ’. मङ्गलाचीं मतें माणिक्य-

चंद्रानेंहि काव्यप्रकाशावरील आपल्या टीकेंत दिलीं आहेत. त्यांत एका ठिकाणीं तो म्हणतो ' दण्डयुक्तं समासदैर्घ्यमोज इत्यपि रीतित्रयेऽप्योजसः साधारणत्वाद्गौडीयानिर्देशो न युक्तिमानिति वामनमङ्गलौ ' ( म्हैसूर प्रत पान २९२ ). मङ्गलाच्या टीकेंतील हींच दोन अवतरणे हेमचंद्रानें काव्यानुशासनाच्या विवेक नामक टीकेंत दिलीं आहेत. काव्यमीमांसाकार राजशेखर यानेंहि मङ्गलाला साहित्यग्रंथकार समजून त्याच्या मतांचा निर्देश केलेला आहे ( पान ११, १४, १६, २० ). म्हणजे मङ्गल हा नाट्यशास्त्रावरील एक टीकाकार होता किंवा साहित्य व नाट्यशास्त्र यांवर त्याने स्वतंत्र ग्रंथ लिहिला असावा असे अनुमान करावें लागतें. ध्वन्यालोकाच्या लोचन नामक टीकेंत अभिनवगुप्तानें नाट्यशास्त्रांतील ( अ. ८ श्लो. ११२ ) ' बहूनां समवेतानां रूपं यस्य भवेद्बहु । स मन्तव्यो रसः स्थायी शेषाः सञ्चारिणो मताः ॥ ' या श्लोकाचे अनेकांनीं अनेक अर्थ केले आहेत असें म्हटलें असून तद्विषयक भागुरीचें मत सांगितलें आहे, तें असें: ' तथा च भागुरिरपि किं रसानामपि स्थायिसंचारिताऽस्तीत्याक्षिप्याभ्युपगमेनैवोत्तरमवोचद्बाढमस्तीति । ' ( पान १७५ ). हे अवतरण जर बरोबर असेल तर भरताच्या नाट्यशास्त्रांतील नियमांचें स्पष्टीकरण भागुरीनें केलें असल्याचें दिसून येतें, पण त्यानें सर्व ग्रंथावर टीका केली कीं काय हें समजत नाही. दुसऱ्याहि अनेकानीं काव्यचिकित्सा करतांना नाट्यशास्त्रांतील नियम सांगून त्यांची चर्चा केलेली आढळते. पण त्यांनी समग्र नाट्यशास्त्रावर टीका लिहिलेली नाही. सन १६१३ त सुंदरमिश्र नामक पंडिताने लिहिलेल्या नाट्यप्रदीप ग्रंथांत नाट्यशास्त्रांतील (अ. ५ श्लो. २५-२८) नांदीची व्याख्या दिली असून पुढे म्हटले आहे ' अस्य व्याख्याने मातृगुप्ताचार्यैः षोडशांघ्रिपदाऽपीयमुदाहृता ' ( इंडिया आफिसांतील हस्तलिखित ग्रंथांची नामावली पा. ३४८ क्रमांक ११९९ पहा ). या विधानावरून मातृगुप्ताचार्यांचाहि नाट्यशास्त्राशीं थोडाबहुत तरी टीकाकारासारखा संबंध होता असें अनुमान होतें. ' भावप्रकाशन ' या ग्रंथांत ( पान २३४ ) मातृगुप्तांचें मत दिलें आहे की नाटकांतील कथानक हें पूर्वकालीन कथांपैकीं असून त्यांत थोडीशी भर कवीनें आपल्या पदरची घातली असली पाहिजे ( पूर्ववृत्ताश्रयमपि किंचिदुत्पाद्यवस्तु च । विधेयं नाटकमिति मातृगुप्तेन भाषितम् ॥ ). संगीतरत्नाकरांतहि मातृगुप्ताचा उल्लेख आला आहे तो वर दिला आहे. शाकुंतलाचा टीकाकार राघवभट्ट यानेंहि आपल्या अर्थद्योतनिकेंत ( नि. सा. पा. १५ ) आरंभ व बीज यांविषयीं नाट्यशास्त्रांतील अवतरण घेऊन म्हटलें आहे " अत्र विशेषो मातृगुप्ताचार्यैरुक्तः 'क्वचि-

त्कारणमात्रं तु क्वचिच्च फलदर्शनम् ' । इ. इतरहि बरींच श्लोकबद्ध वचनें मातृगुप्ताचार्यांची म्हणून राघवभट्टानें दिलीं असून त्यांत सूत्रधार ( पा. ५ ), नांदी ( पान ४ ), नाटकलक्षण ( पा. ९ ), काव्याच्या छत्तीस अलंकारापैकीं पहिलें भूषण ( नाट्य. अ. १६ ), यवनी ( पा. २७ ) इत्यादि विषयांचा संबंध आलेला आहे. यावरून असें दिसतें कीं मातृगुप्ताचार्यांचे नाट्यशास्त्राशीं टीकाकाराचें नाते नसून वार्तिकाकारासारखें तें असावें. म्हणजे नाट्यशास्त्रांत पाहिजे असून न आलेले असे विषय घालून किंवा नको असलेल्या पण मूळ ग्रंथकारानें घातलेल्या गोष्टी काढून टाकून व इतर दोष दूर करून नाट्यशास्त्राला अधिक व्यापक व पद्धतशीर स्वरूप देणारा तो असावा.* मातृगुप्त नांवाचा एक कवि काश्मीरचा राजा झाला होता व तें राज्यपद त्याला उज्जयिनीच्या हर्ष विक्रमादित्यानें दिलें असें राजतरंगिणीत ( अ. ३ श्लो. १२९–१८९ ) वर्णन आहे. हा कवि व राजा असा मातृगुप्त आणि उपर्युक्त मातृगुप्ताचार्य हे एकच कीं भिन्न हें निश्चित करणें कठीण आहे. 'मातृगुप्ताचीं अवशिष्ट राहिलेलीं वचनें' या विषयावर जर्नल ऑफ ओरिएंटल रिसर्च [ मद्रास ] व्हॉल्यूम २ पान ११८-१२७ येथे एक लेख आहे.

## ४ मेधाविन्

भामहानें काव्यालंकारांत उपमा अलंकारांतील सात दोष दाखविणाऱ्या मेधाविनामक आलंकारिकाचा दोन वेळां उल्लेख केला आहे. ' त एत उपमादोषाः सप्त मेधाविनोदिताः' ( काव्या. २, ४० ), 'यथासंख्यमथोत्प्रेक्षामलंकारद्वयं विदुः । संख्यानमिति मेधाविनोत्प्रेक्षाऽभिहिता क्वचित् '। यांतील दुसऱ्या अवतरणाच्या उत्तरार्धाचा अर्थ असा होतो कीं, ' मेधावीने कित्येक ठिकाणीं उत्प्रेक्षा अलंकारालाच संख्यान हें नांव दिलेलें आहे. ' पण हा अर्थ नीट दिसत नाहीं. संख्यान हे नांव यथासंख्य नांवाच्या अलंकाराला कित्येकांनीं दिलें असून दंडीनें काव्यादर्शांत ही गोष्ट नमूद केली आहे ( यथासंख्यमिति प्रोक्तं संख्यानं क्रम इत्यपि । २, २७३ ). म्हणून भामहाच्या उपरोक्त अवतरणांत कांहीं तरी चूक असावी असें वाटतें. 'मेधाविनोत्प्रेक्षा'च्या स्थानीं ' मेधावी नोत्प्रेक्षा ' असें जर असेल तर त्याचा अर्थ ' मेधावीनें यथासंख्य अलंकाराला संख्यान असे म्हटलें आहे; व कोणी कोणी ग्रंथकार उत्प्रेक्षा हा स्वतंत्र अलंकार म्हणून मानीत नाहींत, ' असा होईल व तो दंडीनें नमूद केलेल्या मताला धरून आहे. रुद्रटाच्या काव्यालंकार ग्रंथावर टीका लिहिणारा नमिसाधु देखील मेधावीचा उल्लेख करितो. ' दंडिमेधा-

*उक्तानुक्तदुरुक्तचिन्ताकरं वार्तिकम् । अशी वार्तिकाची व्याख्या आहे.

विरुद्धभामहादिकृतानि सन्त्येवालंकारशास्त्राणि ।’ पण आतां प्रश्न येतो की, या उताऱ्यांतील मेधाविरुद्र हें एक नांव समजावयाचें की मेधावी आणि रुद्र असे दोन पृथक् आलंकारिक होते असें म्हणावयाचें ? रुद्रनामक ग्रंथकारानें लिहिलेला अलंकारशास्त्रावरील ग्रंथ प्रसिद्ध नाहीं व दुसऱ्या कोणी ग्रंथकारानें त्याचा उल्लेखहि केलेला नाहीं. रुद्रभट्टकृत शृंगारतिलक म्हणून एक ग्रंथ आहे; पण तो अलंकारशास्त्रावरील नव्हे हे त्याच्या नांवावरूनहि समजण्यासारखें आहे. या गोष्टीचा विचार केल्यास मेधाविरुद्र हें एकच नांव मानावें लागतें व या मोठ्या नांवातून केव्हां केव्हां संक्षेपानें मेधावी एवढ्याच भागाचा उल्लेख करितात. अशा प्रकारची दुसरी उदाहरणें धर्मकीर्ति आणि भर्तृहरि हीं होत. या नांवाचे कीर्ति व हरि असे संक्षेप अनुक्रमें अनेक वेळां उल्लेखिलेले आढळतात. रुद्र हें पद नांवाचें उत्तरांग असलेले दुसरेहि कित्येक ग्रंथकार आहेत. उदाहरण, शार्ङ्गधरपद्धति व सुभाषितावली या दोन सुभाषितसंग्रहांमध्ये मालवरुद्र ( शा. क्रमांक १०९१ ), कपिलरुद्र ( शा. ३७८७ ) व कपिलरुद्रक [ सु. १६६६ ] या नांवाच्या ग्रंथकारांचे श्लोक दिले आहेत. असो. मेधावीचा आणखी उल्लेख रुद्रटाच्या काव्यालंकारावरील नमिसाधुकृत टीकेंतहि ( रुद्रट ११·२४ ) आला आहे. त्या प्रकरणांत उपमेच्या सात दोषांचा संबंध आला असून नमिसाधूनें स्वीकारलेल्या विपर्यविवेचनाच्या पद्धतीवरून असें दिसतें की त्यानें दिलेलीं उदाहरणें मेधावीच्या ग्रंथांतून घेतलेलीं असावीं. नमिसाधु म्हणतो, ‘अत्र च स्वरूपोपादाने सत्यपि चत्वार इति ग्रहणाद्यन्मेधाविप्रभृतिभिरुक्तं यथा लिङ्गवचनभेदौ हीनताधिक्यमसम्भवो विपर्ययोऽसादृश्यमिति सप्तोपमादोषा......तदेतन्निरस्तम् ।’. दुसऱ्या एका ठिकाणीं ( रुद्रट २·१२ ) नमिसाधूनें म्हटलें आहे कीं मेधाविरुद्र आदिकरून पंडितांनी शब्दाचे प्रकार चारच सांगितले आहेत. ‘अत एव चत्वारः शब्दविधा इति येषां सम्यङ्मतं तत्र तेषु नामादिषु मध्ये मेधाविरुद्रप्रभृतिभिः कर्मप्रवचनीया नोक्ता भवेयुः ’।. या उल्लेखांशिवाय मेधारुद्र व मेधाविरुद्र असे आणखीहि उल्लेख आढळतात. त्रिकांडशेष या कोशग्रंथांत मेधारुद्र व कालिदास हीं नांवें समानार्थक म्हणून दिलीं आहेत व काव्यमीमांसाकार राजशेखरानें मेधाविरुद्र हा कवि जन्मान्ध होता असें म्हटलें असून ( पान १२ ) कालिदासाचा साहित्यशास्त्रावरील ग्रंथकार म्हणून उल्लेख केला आहे ( पान १४ ). अशा रीतीनें मेधावी किंवा मेधाविरुद्र या साहित्यग्रंथकाराचें अस्तित्व दिसून येतें, पण त्याचा ग्रंथ मात्र आज उपलब्ध नाहीं.

# ५ धर्मकीर्ति

सुबंधु नामक प्रसिद्ध कवीच्या वासवदत्ता नांवाच्या ग्रंथावर टीका लिहिणारा शिवराम याने " बौद्धसंगतिमिवालङ्कारभूषिताम् " या वासवदत्तेतील शब्दांचें स्पष्टीकरण करतांना **अलङ्कार** हा एक ग्रंथ असून तो **धर्मकीर्ति** नामक लेखकानें लिहिला असें म्हटले आहे व या स्पष्टीकरणाच्या आधारावर ऑफ्रेक्ट, हॉल, पीटरसन्, या पाश्चात्य संस्कृत पंडितांनी धर्मकीर्तीला अलंकारशास्त्रावरील एक फार प्राचीन ग्रंथकार म्हणून मानिलें आहे ( सुभाषितावली प्रस्तावना पा. ४७, रॉ. ए. सो. मुं. शा. ग्रंथ १६ पा. १७३ पहा ). पण ' बौद्धसंगतिमिवालंकारभूषिताम् ' ( हॉलची आवृत्ति पा. २३५ ) याऐवजी श्रीरंग प्रतीत (पा. ३०३) ' सत्कविकाव्यरचनामिवालंकारप्रसाधिताम् ' असे शब्द असल्यामुळे त्या मताचा बराच आधार तुटून पडतो. तथापि अलंकार हा ग्रंथ होता असें धरून चाललें तरी देखील शिवरामाच्या विधानापलीकडे धर्मकीर्ति हा अलंकारशास्त्रावर ग्रंथ लिहिणारा होता असें दाखविण्याला दुसरें कांहींच प्रमाण नाही. कारण अलंकार हा ग्रंथांच्या नांवांत आढळून येणारा अगदी सामान्य शब्द आहे. उदाहरण अश्वघोषाचा **सूत्रालंकार** नामक ग्रंथ असून तो त्याच्या चिनी भाषान्तरावरून माहीत झालेला आहे. त्या ग्रंथात ९० गोष्टींचा संग्रह केलेला आहे ( के. जे. सॉडर्सचे एपॉक्स इन् बुद्धिस्ट हिस्टरी पास्ट ५६ ). संगीति हे बौद्ध वाङ्मयाच्या एका भागाचें नांव आहे व महायानसूत्रालंकार हा असंगाचा एक ग्रन्थ आहे. ( हा प्रो. लेव्ही यांनी संपादिला आहे ). प्रो. उई ( Ui ) यांच्या मतानें महायानसूत्रालंकार हा असंगाने लिहिला नाही. धर्मकीर्ति नांवाचा एक बौद्ध कवि होऊन गेला ही गोष्ट खरी आहे. त्याचे श्लोक शार्ङ्गधरपद्धति ( क्र, ९४७) सुभाषितावली ( क्र. ६५७, ७३७, १५८७, १६१७, २२४६, ३२३२ ) इत्यादि सुभाषितसंग्रहांत घेतलेले आहेत व त्यांत त्याला भदंत धर्मकीर्ति असें नांव दिलेलें आहे. ध्वन्यालोकांतहि ( का. मा. पा. २१६ ) धर्मकीर्तींच्या नांवावर एक श्लोक दिला आहे तो असा:—' लावण्यद्रविणव्ययो न गणितः क्लेशो महानर्जितः स्वच्छन्दं चरतो जनस्य हृदये चिन्ताज्वरो निर्मितः । एषाऽपि स्वयमेव तुल्यरमणाभावाद्वराकी हता कोऽर्थश्चेतसि वेधसा विनिहितस्तन्व्यास्तनुं तन्वता ॥ ' हा श्लोक व्याजस्तुति नामक अलंकाराचें उदाहरण म्हणून कित्येक

जण समजतात, पण वस्तुतः तो अप्रस्तुतप्रशंसेचें उदाहरण होय असे सांगून ध्वन्यालोककार पुढे म्हणतो ' तथा चायं धर्मकीर्तेः श्लोक इति प्रसिद्धिः सम्भाव्यते च तस्यैव ' म्हणजे हा श्लोक धर्मकीर्तींचा म्हणून प्रसिद्ध आहे व तेंच संभवनीय दिसतें. या अनुमानाचें त्याचें कारण असें आहे की धर्मकीर्तींचा म्हणून निश्चितपणे ठाऊक असलेल्या दुसऱ्या श्लोकांत ज्या कल्पना आलेल्या आहेत त्याच याहि श्लोकाच्या मुळाशी आहेत. हा दुसरा श्लोकहि ध्वन्यालोकांत पुढें दिला आहे (ध्व. पा. २१७). ध्वन्यालोककाराच्या या मताचा अनुवाद क्षेमेन्द्रानें आपल्या औचित्यविचारचर्चेत, तसेंच इतर सुभाषितसंग्रहकारांनी करून ' लावण्यद्रविण' इत्यादि श्लोक धर्मकीर्तीचाच ठरविला आहे. तात्पर्य दिङ्नागाच्या प्रमाणसमुच्चयावर टीका लिहिणारा बौद्ध तत्वज्ञानी धर्मकीर्ति हा कवि होता असें म्हणतां आलें तरी तो अलंकारशास्त्रावर ग्रंथ लिहिणारा काव्यचिकित्सक होता, असे मानायास मुळींच प्रमाण सांपडत नाहीं.

## ६ भट्टि

भट्टि कवीचें भट्टिकाव्य सुप्रसिद्ध आहे. त्याचे बावीस सर्ग असून व्याकरणाच्या नियमांनी सिद्ध झालेल्या रूपांचे प्रयोग करून दाखविण्याच्या प्रधान हेतूनेंच त्याची रचना केलेली आहे. त्याची प्रकीर्णकाण्ड ( स. १–५ ), अधिकारकाण्ड ( ६–९ ), प्रसन्नकाण्ड ( स. १०–१३ ) व तिङन्तकाण्ड ( स. १४–२२ ) अशीं चार काण्डें आहेत. त्यांतील तिसऱ्या म्हणजे प्रसन्नकाण्डांत भट्टीनें साहित्यशास्त्रांत ज्यांचा अतर्भाव होतो अशा विषयांची उदाहरणे दिलीं आहेत. दहाव्या सर्गांत अनुप्रास व यमक हे दोन शब्दालंकार धरून एकंदर अडतीस अलकारांची उदाहरणें त्यानें दिलीं असून अकराव्यांत ३७ श्लोकांमिळून माधुर्य गुणाची उदाहरणं सांगितली आहेत. बाराव्या सर्गांत, भामहानें ( ३, ५२ ) व दंडीनें ( २, ३६४ ) ज्याला प्रबंधविषय म्हटलें आहे त्या भाविक नामक अलंकाराचीं उदाहरणें ८७ श्लोकांत सांगून १३ व्या अध्यायांत ५० श्लोकां मिळून भाषासमाचीं, म्हणजे एकच श्लोक संस्कृत व प्राकृत अशा उभय भाषांत रचिलेला मानितां येईल अशाप्रकारचीं, उदाहरणे रचिलेलीं आहेत. या चार सर्गांतील विषयांमुळेंच साहित्यशास्त्राचा इतिहास देतांना भट्टीचा थोडा तरी निर्देश करणें अवश्य होतें. पुढें बाराव्या छेदकांत जे तुलनात्मक कोष्टक दिले आहे त्यावरून दिसून येईल

कीं, भामह व दंडी यांनी जे अलंकार सांगितले आहेत त्यांचीच बहुतेक उदाहरणें भट्टीनें दिली आहेत. त्यांतहि भामहानें स्वीकारिलेल्या अलंकारांच्या क्रमानुसारच बहुधा भट्टीची उदाहरणें आली असून क्वचित् ठिकाणीं मात्र तो क्रम सोडलेला आढळतो. उदाहरण, भामहानें रूपकानंतर दीपक आणि आक्षेपानंतर अर्थान्तरन्यास सांगितला आहे, तर भट्टीचा क्रम उलट आहे; भामहानें विरोधानंतर तुल्ययोगिता सांगितली आहे, तर भट्टीनें उपमा रूपक आणि विरोध यांच्या पूर्वीच तुल्ययोगितेचे उदाहरण दिले आहे. भामहाने अप्रस्तुतप्रशंसा सांगितली आहे, पण भट्टीने तिचे उदाहरण दिलेले नाहीं आणि भामहानें हेतु व वार्ता यांची गणना अलंकारांत केली नसतांहि भट्टीने त्यांची उदाहरणें दिली आहेत. भट्टीनें निपुण नांवाच्या अलंकाराचें उदाहरण दिले आहे. पण भामह किंवा दंडी यांपैकी कोणीच त्याचा निर्देश केलेला नाही. दंडीनें हेतूप्रमाणेच लेश आणि सूक्ष्म असे दोन अलंकार फार चमत्कृति-जनक म्हणून सांगितले आहेत, पण भट्टी त्यांची उदाहरणें देत नाहीं. भामहाने तर त्या तिहीपैकी कोणताच अलंकार म्हणून मानिलेला नाही. भट्टीने यमकाच्या उदाहरणांसाठी वीस श्लोक रचिले आहेत व त्यांतील क्रम दंडीच्या काव्यादर्शांत यमकाचे विवेचन करतांना स्वीकारलेल्या क्रमानुसारच आहे. पण भामहाचे यमक-विषयक विवेचन अगदी त्रोटक आहे. यावरून असे दिसतें कीं, भामह किंवा दंडी यांपैकी कोणाचाच क्रम वस्तुतः भट्टीने स्वीकारलेला नसून त्या दोघांच्याहि पूर्वी झालेल्या ग्रंथांतून तो घेऊन त्याने आपली उदाहरणे रचिली असावी.

भट्टीच्या काळाचें विवेचन व निर्णय कै. प्रो. कमळाशंकर प्राणशंकर त्रिवेदी यांनी मुंबई सरकारच्या संस्कृत ग्रंथमालेत छापलेल्या भट्टिकाव्याच्या प्रस्तावनेंत केला आहे. आपल्या ग्रंथाच्या अंतिम श्लोकांत भट्टीने स्वतःच सांगितले आहे की, "काव्यमिदं विहितं मया वलभ्यां श्रीधरसेननरेंद्रपालितायाम् ।" (म्हणजे श्रीधरसेन राजाच्या संरक्षणाखाली असलेल्या वलभी नगरीमध्ये मी हें काव्य लिहिलें.). जयमंगला टीकेत 'श्रीधरसुनुनरेंद्र' असा पाठ आहे. आतां धरसेन या नांवाचे राजे वलभीत (प्रस्तुतचें काठेवाडांतील वला नांवाचें ठिकाण) एकंदर चार होऊन गेले. त्यांतील पहिल्या धरसेनाचें राज्य केव्हां चालू झालें हे नीट समजत नाहीं. दुसऱ्या धरसेनाच्या दानपत्रांतील अगदी पहिल्या पत्रावर-

वलभी शकाचे २५२ हें वर्ष आहे. तसेंच चवथ्या धरसेनाचें शेवटचे दानपत्र वलभी शक ३३२ या वर्षातलि आहे. वलभी शक इ. स. ३१९ या सुमारास चालू झाला. म्हणजे हीं दोन वर्षें इ. सनाची ५७१ व ६५१ अशी अनुक्रमें येतात. पहिल्या धरसेनाच्या मागून राज्यावर आलेल्या द्रोणसिंहाच्या राजवटींतील वलभी शक १८३ म्हणजे इ. स. ५०२ हे वर्ष एका ठिकाणी नमूद केलेलें असल्यामुळें त्यापूर्वीं कांहीं वर्षें पहिला धरसेन सिंहासनावर आलेला असला पाहिजे. म्हणजे भट्टीचा काल इ. स. ५०० पासून ६५० पर्यंत कोणता तरी असला पाहिजे.

भट्टिकाव्याच्या हस्तलिखित प्रतीत भट्टीचे नांव अनेक वार भट्टस्वामी किंवा भर्तृस्वामी असें दिलें असून त्याच्या पित्याचे नांव जयमंगला नामक टीकेत श्रीस्वामी व विद्याविनोद नामक टीकाकारानें श्रीधरस्वामी असे दिले आहे. कित्येक पंडितांच्या मते भट्टिकाव्याचा कर्ता भट्टि व वलभी शक ३४४ म्हणजे इ. स. ६६३ या वर्षी चवथ्या धरसेनाचा पुत्र तिसरा ध्रुवसेन याने ज्याच्या नांवाने दानपत्र करून दिले आहे तो बप्पपुत्र भट्टिभट्ट हे एकच होत. पण डॉ. हुल्टश याने या मतावर एपिग्रॅफिआ इंदिका ग्रंथ १ मध्यें ( पा. ५२ ) आक्षेप काढिले आहेत. मंदसोरच्या सूर्यमंदिरांतील शिलालेखांत जो एक वत्सभट्टि म्हणून सांगितला आहे, तोच भट्टिकाव्याचा कर्ता होय असें रॉयल एशियाटिक सोसायटीच्या स. १९०४ च्या जर्नलमध्ये श्री मुजुमदार यांनी प्रतिपादिलें आहे. हा मंदसोर शिलालेख इ. स. ४७३ या वर्षींचा असून डॉ. फ्लीटनें प्रसिद्ध केलेल्या गुप्तांच्या कोरीवलेखसंग्रहांत क्रमांक १८ म्हणून छापलेला आहे. श्री. मुजुमदारांचे मत त्या लेखांतील श्लोक व भट्टिकाव्याच्या दुसऱ्या सर्गातील शरद्वर्णनाचे श्लोक यांच्या साम्यावरून झालेलें आहे. तें मान्य केल्यास भट्टि हा पहिल्या धरसेनाच्या राजवटींत होऊन गेला असं म्हणावें लागतें. पण प्रो. कीथ यांनी त्या मताला सर्वथैव अग्राह्य म्हटलें आहे. अशा रीतीनें भट्टीच्या निश्चित कालाविषयी कीथ व मुजुमदार यांमध्ये वाद असला तरी भट्टि हा भारवि व दंडी यांच्यापूर्वीं होऊन गेला व भट्टिकाव्य हें वाक्यपदीयाचा कर्ता जो भर्तृहरि त्यानें रचिलेलें नव्हे याविषयीं उभयतांचं एकमतच आहे. भट्टिकाव्यावर अनेक टीका असून त्याविषयीची माहिती ऑफ्रेक्टनें आपल्या ग्रंथसूचीत दिली आहे.

# ७ भामह

भामहाचा काव्यालंकार नांवाचा अलंकारविषयक ग्रंथ इतर ग्रंथांत घेतलेल्या त्यांतील अवतरणांरूनच कायतो कांही वर्षांपूर्वी माहीत होता. परंतु आतां तो साग्र उपलब्ध झाला असून कै. प्रो. त्रिवेदी यांनीं प्रसिद्ध केलेल्या विद्यानाथकृत प्रतापरुद्रयशोभूषण नांवाच्या ग्रथाच्या शेवटीं परिशिष्टरूपाने छापिलेला असून तंजावरचे नागनाथ शास्त्री यांनी त्याची इंग्रजी भाषान्तर व टीपा यांसह स्वतंत्र आवृत्ति प्रसिद्ध केली आहे वनारस येथील प्रो. बटुकनाथशर्मा ह्यांनींहि भामहालंकार विस्तृत व विद्वत्ताप्रचुर इंग्रजी टिप्पणीसह सपादिला आहे. भामहकृत काव्यालंकाराचे सहा परिच्छेद असून श्लोकसंख्या ३९८ आहे. त्यांतील शेवटच्या दोन श्लोकांत ग्रंथांत प्रतिपादिलेल्या पांच विषयांची स्थूल श्लोकसंख्या दिली आहे ती अशी:—‘ षष्ट्या शरीरं निर्णीतं शतषष्ट्या त्वलंकृतिः । पञ्चाशता दोषदृष्टिः सप्तत्या न्यायनिर्णयः ॥ षष्ट्या शब्दस्य शुद्धिःस्यादित्येवं वस्तुपंचकम् । उक्तं षड्भिः परिच्छेदैर्भामहेन क्रमेण वः ॥’ या संख्यांची बेरीज ४०० होते व ती अर्थातच स्थूल आहे. काव्यालंकारांतील श्लोक बहुतेक अनुष्टुभ् वृत्तांत असून प्रतिपरिच्छेदाच्या शेवटीं व थोड्याशा इतर ठिकाणी मात्र दुसऱ्या वृत्तांची योजना केलेली आहे. पहिल्या परिच्छेदांत प्रथम शर्वाला नमन करून काव्याचा उद्देश सांगितला आहे. व नंतर कवीचे गुण, काव्याची व्याख्या व गद्य पद्य संस्कृत प्राकृत अपभ्रंश इत्यादि विविध दृष्टींनीं होणारे काव्याचे भेद दिले आहेत. वृत्तदेवादिचरितशंसि, उत्पाद्यवस्तु, कलाश्रय व शास्त्राश्रय असे एका प्रकारें काव्याचे भेद त्यांत केले असून आणखी सर्गबन्ध, अभिनेयार्थ, आख्यायिका, कथा, आणि आनिबद्ध असे पांच निराळ्या तत्त्वानुसार होणारे भेद सांगितले आहेत. त्यांपैकीं सर्गबंधाचे मात्र लक्षण दिलें असून अभिनेयार्थ म्हणजे नाटक या विषयाचें विवेचन इतरांनी केले असल्यामुळें आपण तें करीत नाहीं असे भामहानें म्हटले आहे. पुढें कथा व आख्यायिका यांमधील भिन्नता दाखवून वैदर्भी व गौडी या रीतींचा उल्लेख त्यानें केला आहे व या दोन रीतींमध्यें कित्येकांनीं दाखविलेले भेद निरर्थक होत असे सांगून नेयार्थ, क्लिष्ट इत्यादि दोषांचें विवेचन केलें आहे. दुसऱ्या परिच्छेदांत माधुर्य, प्रसाद व ओजः या तीन गुणांचा विचार केल्यावर अलंकारांच्या चर्चेला आरंभ केला असून ती तिसऱ्या परिच्छेदांत संपविली आहे. त्यानें सांगितलेल्या अलंकारांचा क्रम पुढीलप्रमाणें आहे:—अनुप्रास ( ग्राम्यानुप्रास व लाटीयानुप्रास वा इतर

ग्रंथकारांनीं सांगितलेल्या प्रकारांचाहि उल्लेख धरून ), पांच प्रकारचे यमक, रूपक, दीपक, सात दोषांसह उपमा, उपमेचा एक प्रकार म्हणून प्रतिवस्तूपमा, आक्षेप, अर्थान्तरन्यास, व्यतिरेक, विभावना, समासोक्ति, अतिशयोक्ति, यथासंख्य, उत्प्रेक्षा, स्वभावोक्ति, प्रेयस्, रसवत्, ऊर्जस्वि, पर्यायोक्त, समाहित, दोन प्रकारचा उदात्त, श्लिष्ट, अपह्नुति, विशेषोक्ति, विरोध, तुल्ययोगिता, अप्रस्तुतप्रशंसा, व्याजस्तुति, निदर्शना, उपमारूपक, उपमेयोपमा, सहोक्ति, परिवृत्ति, ससन्देह, अनन्वय, उत्प्रेक्षावयव, संसृष्टि, भाविक व आशी . यापैकीं स्वभावोक्ति व आशीः हे दुसऱ्यांनी सांगितलेले म्हणून भामहाने दिले आहेत. हेतु, सूक्ष्म व लेश हे तीन अलंकार भामहाच्या पूर्वींच्या साहित्यपंडितांनी सांगितले असावे. पण भामह त्यांना अलंकार समजत नाही, कारण त्यांत वक्रोक्ति नाही. चवथ्या परिच्छेदांत काव्याच्या अकरा दोषांचें विवरण केलें असून त्यांतील पहिल्या दहांच्या व्याख्या व उदाहरणे दिलीं आहेत. अकराव्या दोषाची व्याख्या व उदाहरणे पांचव्या परिच्छेदांत आली आहेत. दोषयुक्त प्रतिज्ञा, हेतु किंवा दृष्टांत यांमुळें हा दोष उद्भवतो असें भामहाचें म्हणणें असून तत्संबधी विवेचन न्यायवैशेषिक शास्त्रांतील प्रमाणांची संख्या व लक्षणे, प्रतिज्ञेची लक्षणे व तिचे प्रकार, हेतु व त्याचे प्रकार, दृष्टांत इत्यादि विषयांच्या विवेचनाला धरून आहे. सहाव्या परिच्छेदांत काव्यांत सौशब्द्य म्हणजे व्याकरणशुद्धि कशी साधावी याविषयीं कांही व्यावहारिक सूचना भामहाने कवींना केल्या असून हे विवेचन वामनाच्या काव्यालंकारसूत्राच्या पंचमाधिकरणांतील विवेचनासारखेंच बहुतांशी आहे. पण वामनाचें विवेचन सूक्ष्म व विस्तृत आहे एवढेंच.

साहित्यशास्त्रांतील अलंकारवादी संप्रदायाचा आज ज्ञात असलेला अत्यंत प्राचीन असा आचार्य म्हणजे भामहच होय. त्याची व्यक्तिगत माहिती फारशी मिळत नाहीं. काव्यालंकाराचा शेवटचा श्लोक ‘ अवलोक्य मतानि सत्कवीनामवगम्य स्वधिया च काव्यलक्ष्म । सुजनावगमाय भामहेन ग्रथितं रक्रिलगोमिसूनुनेदम् ॥ ’ असा असून त्यांत भामह हा रक्रिलगोमिन् याचा पुत्र होता असें म्हटले आहे. रक्रिलगोमिन् या त्याच्या पित्याच्या नांवावरून भामह हा बौद्ध असावा कीं काय असा प्रश्न उत्पन्न करून त्यावर अनेक चिकित्सकांनीं मोठा पूर्वपक्ष उत्तरपक्ष केलेला आहे. रक्रिलगोमिन् या संयुक्त नांवांतील रक्रिल हा भाग राहुल, पोतल इत्यादि खास बौद्ध नांवासारखा असून गोमिन् हे बुद्धाच्या

एका चेल्याचें नांव होतें असें म्हणून भामह हा त्या रक्रिलगोमिचा पुत्र अस- ल्यामुळें बौद्धच असला पाहिजे असें प्रो. एम्. टी. नरसिंह अय्यंगार यांनी प्रति- पादिलें आहे, तर कित्येकांनी त्याच्याविरुद्ध मत प्रतिपादन केलें आहे. रॉयल एशियाटिक सोसायटीच्या सन १९०५ [ पान ५३५-५४५ ] व १९०८ [ पा. ५४३ ] च्या जर्नलमध्ये प्रो. अय्यंगार यांचें मत व त्याला उत्तर अशीं अनुक्रमें प्रसिद्ध झालेली आहेत. प्रो. पाठक यांनी इंडियन ॲंटिक्वेरींत [ सन १९१२ पा. २३५ ] म्हटलें आहे की, गोमिन् हे गोस्वामिन् शब्दाचें संक्षिप्त स्वरूप नसून त्याचा अर्थ ' पूज्य ' किंवा ' मान्य ' असा आहे व रक्रिल हा बौद्धच होता. चांद्र व्याकरणांतील ' गोमिन् पूज्ये ' ( ४-२-१४४ ) व ' गोमान् अन्यः ' या सूत्रांना अनुसरून प्रो. पाठक यांनी आपलें विधान केलें आहे. पण केवळ नांवावर एवढा काथ्याकूट करण्यांत विशेष अर्थ दिसत नाहीं. बौद्धधर्मीय व ब्राह्मणधर्मीय लोक शेकडों वर्षें एकत्र रहात आलेले असल्यामुळें खास बौद्ध सांप्रदायांतील नांवेंहि कित्येक वेळां ब्राह्मणधर्मीयांनीं घेतलेलीं अस- ल्यास त्यात आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं. इतर बौद्ध साधु सोडून दिले तरी त्या पंथाचा प्रत्यक्ष संस्थापक जो गौतम बुद्ध त्याला इ. स. ११ व्या शतका- पूर्वीच विष्णूचा अवतार बनवून ब्राह्मणांनी त्याला दशावतारांत नववें स्थान दिलें. आजहि तसला प्रकार दृष्टीस पडतो. म्हणजे हिंदु लोकांनी खास मुसलमानी नांवें व मुसलमानांनीं हिंदु नांवें स्वीकारलेलीं आढळतात. अगदीं अलीकडे पाहिलें तरी सुद्धां इंग्रजी नांवांचा प्रवेश हिंदु व पारशी लोकांत झालेला कोठें कोठें दिसून येतो. अशी स्थिति असल्यामुळें एखाद्या ग्रंथकाराचा धर्म कोणता होता हे त्याच्या ग्रंथांतील प्रतिपादनावरून ताडिलें पाहिजे, केवळ त्याच्या नांवावरून कोणतेंहि अनुमान करणें ठीक होणार नाहीं. या दृष्टीनें विचार केल्यास भामहाच्या काव्यालंका- रांत बौद्धधर्मविशिष्ट असें प्रतिपादन कांहींच नसल्यामुळें किंवा बुद्धचरित्रांतील गोष्टी व बौद्ध कथा यांविषयी सुद्धां कांहीं उल्लेख नसल्यामुळें तो बौद्ध होता असें ठाम मत प्रतिपादण्यांत अर्थ नाहीं. काव्यालंकाराच्या पहिल्या श्लोकांत ' सार्व सर्व- ज्ञाला ' नमन आहे खरें. पण ' सर्वज्ञ ' हें जसें बुद्धाचें नांव आहे ( ' सर्वज्ञः सुगतो बुद्धो ' अमर ) तसेंच शिवाचेंहि आहे व ' सार्व ' म्हणजे सर्वांचें हित करणारा एवढाच अर्थ असून बुद्धाच्या नांवांत त्याचा समावेश अमरानें केलेला नाहीं. स्वतः भामहानें सार्व व सार्वीय या शब्दांची साधनिका ( परि. ६

श्लोक ५३ ) दिली असून तिला पाणिनीच्या ' सर्वपुरुषाभ्यां णढञौ ' या ( अ. ५ पाद १, सूत्र १० ) सूत्राचा आधार घेतलेला दिसतो. तो म्हणतो ' हितप्रकरणे णं च सर्वशब्दात् प्रयुञ्जते । ततश्छमिष्टया च यथा सार्वः सर्वीय इत्यपि '. शब्दांच्या अर्थप्रतिपादक शक्तीसंबंधाचा बौद्धांचा जो अपोहवाद त्याचें तर भामहानें सहाव्या परिच्छेदांत ( श्लो. १६-१७ ) खंडनच केलें आहे. तो म्हणतो ' अन्यापोहेन शब्दोऽर्थमाहेत्यन्ये प्रचक्षते ।...यदि गौरित्यं शब्दः कृतार्थोऽन्यनिराकृतौ । जनको गवि गोबुद्धेर्मृग्यतामपरो ध्वनिः ॥ '* यांतील अन्ये या शब्दावरून स्वतः भामहाला बौद्धांचा अपोहवाद नापसंत होता असें अनुमान करावें लागतें. पण भामह बौद्ध नव्हता असें म्हणावयास स्पष्ट कारणेंहि आहेत. त्यानें सोमपान करणाऱ्या राजांचा गौरव केलेला आहे ( परि. ४ श्लोक ४९ ) व त्याने दिलेलीं अलंकाराची उदाहरणें ब्राह्मणधर्मीय देवता व पौराणिक विभूति यांच्याच वर्णनांनं युक्त आहेत. तसेंच रामायण व महाभारत यांतील अनेक पात्रे व कथा यांचा त्यानें अनेकवार संबंध आणिलेला आहे. उदादरणार्थ परि. ३, श्लो. ७ यांत कर्ण, पार्थ, शल्य; परि. ३ श्लो. ११ यांत रामाचा वनवास ( उदात्तं शक्तिमान् रामो गुरुवाक्यानुरोधकः । विहायोपवनं राज्यं यथा वनमुपागमत् ); परि. ३ श्लो. ५ यांत श्रीकृष्ण ( अद्य या मम गोविन्द जाता त्वयि गृहागते । कालेनैषा भवेत्प्रीतिस्तवैवागमनात्पुनः ॥ ); परि. २ श्लो. ४१ यांत यदुप्रवीर व शार्ङ्ग; परि. २ श्लो. ५५ यांत ब्रह्मदेव ( युगादौ भगवान् ब्रह्मा विनिर्मित्सुरिव प्रजाः ); परि. ३ श्लो. २३ यांत शंभु व कुसुमायुध; परि. ३, ३१ मध्यें राम व परशुराम ( रामः सप्ताभिनत्तालान् गिरिं क्रौञ्चं भृगूत्तमः ); ४, २१ मध्यें शिव व विष्णु ( रथाङ्गशूले बिभ्राणौ पातां वः शंभुशार्ङ्गिणौ ); ६, ३९ यांत भीमाने केलेलें रुधिरपान; ५, ४१-४३ यांत दुर्योधन, युधिष्ठिर व भीष्म यांच्या प्रतिज्ञा; ५,४४ मध्यें परशुराम व राम यांची भेट; ५,३७ मध्यें हनुमान् व सीता; इत्यादि.

---

* शब्द वस्तु दर्शवितो तो प्रत्यक्ष दर्शवीत नाही, तर जी वस्तु दाखवावयाची आहे तिच्याशिवाय इतर सर्व वस्तूंना तो दूर करितो व त्यामुळें त्या वस्तूचा बोध होतो असें बौद्धांचें मत आहे. पण भामह म्हणतो, इतर वस्तूंचें निराकरण एवढेंच जर शब्दाचें कार्य असेल, तर पुनः इष्ट वस्तूचा बोध करून देणारें दुसरें कांहीं तरी साधन शोधिलें पाहिजेच.

भामह हा निरभिमानी ग्रंथकार होता. काव्यांत टाळावयाचे दोष कोणते ते सांगितल्यावर चतुर्थ परिच्छेदाच्या शेवटीं तो म्हणतो, ' न दूषणायायमुदाहृतो विधिर्न चाभिमानेन किमु प्रतीयते । कृतात्मनां तत्त्वदृशां च मादृशो जनोभिसन्धिं क इवावभोत्स्यते ' ॥ ( श्लो. ५७ ). माझ्यासारख्या सामान्य माणसाला तत्त्वज्ञानी अशा कृतार्थ पुरुषांचे मनोगत नीटपणें समजणें कठीण आहे असें म्हणून त्यानें आपला नम्रपणा दाखविला आहे. आपला ग्रंथ लिहितांना त्याने पूर्वीच्या ग्रंथ-कारांनी लिहिलेल्या ग्रंथांचा उपयोग केलेला असून त्यांतील मेधाविन् नामक ग्रंथकाराचें नांव त्याने सांगितले आहे. आपल्यापूर्वी साहित्यशास्त्रविषयक अशी जी चिकित्सा होऊन गेलेली त्याला आढळली तिचें सार त्यानें दिले आहे व इतर अनेक ग्रंथकारांचे ग्रंथ पाहून व त्या विषयाचा स्वतःशी चांगला विचार करून मग आपली अलंकारांची नामावलि देत आहों असेंहि त्यानें म्हटलें आहे. तो म्हणतो, ' समासेनोदितमिदं धीखेदायैव विस्तरः । असंगृहीतमप्यन्यदभ्यूह्यमनया दिशा ' ॥ ( परि. २ श्लो. ९५ ) व ' इति निगदितास्तास्ता वाचामलंकृतयो मया बहुविधकृतीर्दृष्ट्वान्येषां स्वयं परितर्क्य च ' ॥ ( परि. ५ लो. ६९ ). काव्या-लंकाराच्या दुसऱ्या परिच्छेदाच्या शेवटी ' स्वय कृतैरेव निदर्शनैरियं मया प्रक्लृप्ता खलु वागलंकृतिः ' असें ( श्लो. ९६ ) म्हटलेलें आढळतें. यांतील ' स्वतः रचिलेल्या उदाहरणांनी मी **ही वागलंकृति** ( इयं वागलंकृतिः ) सिद्ध केली आहे ' या शब्दांवरून कित्येक पंडितांनी महत्वाची अनुमानें काढण्याचा प्रयत्न केला आहे. वास्तव ' ही वागलंकृति ' म्हणजे काय याचा थोडा सूक्ष्म विचार केला पाहिजे. या शब्दांवरून काव्यालंकार या ग्रंथाचा जर बोध होत असेल तर त्या श्लोकार्धात ' एव ' शब्द घालून ठांसून केलेल्या विधानाला जपूनच मान्यता दिली पाहिजे. कारण काव्यालंकारांतील अनेक उहाहरणें उघडपणें दुसऱ्यांच्या ग्रंथांतून घेतली आहेत. उदाहरणार्थ, परि. ४ श्लो. ८ मधील 'दाडिमानि दशापूपाः षडित्यादि यथोदितम् ' । हा भाग, परि., श्लो. ४१ यातील ' हिमापहामित्रधरै-र्व्याप्तं व्योमेत्यवाचकम् ' । हे अर्धे इत्यादि. असे असल्यामुळे काव्यालंकारांतील एकूण एक उदाहरण स्वतः भामहाचें आहे असें म्हणणे वस्तुस्थितीस धरून नाही. आतां ' इयं वागलंकृतिः' हे शब्द जर केवळ अलंकारांच्या उदाहरणांनाच उद्देशून असतील, तर त्या दृष्टीनें त्यांचे स्थान तृतीय परिच्छेदाच्या शेवटीं पाहिजे होतें; कारण दुसऱ्या व तिसऱ्या परिच्छेदांतच अलंकारांचा विचार आलेला आहे हे

पूर्वी सांगितलेच आहे. पण ' स्वयंकृतैरेव ' इत्यादि विधान तिसऱ्या परिच्छेदाच्या शेवटी घातल्यानेंहि सार्थ ठरत नाही. कारण दुसऱ्या परिच्छेदांतहि अलकाराच्या उदाहरणांतील कांही श्लोक दुसऱ्या ग्रंथकारांच्या ग्रंथांतून घेतलेले आहेत व ते कोठून घेतले हेहि सांगितलेलें आहे. पण ' स्वयंकृतैरेव ' म्हणजे ' स्वतः रचलेल्याच ' असा निश्चय दाखविण्यासाठी ' एव ' शब्द त्या विधानांत असल्यामुळे अन्य ग्रंथांतून घेतलेल्या एकाहि उदाहरणाला त्यामुळे अपवादाची सवलत मिळूं शकत नाहीं. तात्पर्य ' स्वयंकृतैरेव ' इत्यादि विधानांवरून कांही निश्चित अनुमान काढणे व्यर्थ आहे. भामहानें आपल्या ग्रंथांत जी उदाहरणें दुसऱ्यांच्या ग्रथांतून घेतलीं, त्याच्या कर्त्यांची नांवेहि मुळात दिलीं असतील, पण शेकडो वर्षे त्याच्या प्रति होत असताना लेखकांनीं तीं गाळिलीं असतील. शिवाय भामहाच्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रति बऱ्याच नसल्यामुळे त्याच्या मूळ ग्रंथाचे स्वरूप आज उपलब्ध झालेल्या प्रतीत आहे तसेच होते असे ठाम म्हणणें कठीणच आहे. उदाहरण, ' भामहेन हि गुरुदेवनृपतिपुत्रविषयप्रीतिवर्णनं प्रेयोलंकार इत्युक्तम् ' असें लोचनकारानें ( पा. ७१ ) म्हटले आहे. पण भामहानें प्रेय. नांवाचा अलंकार सांगितलेला असला, तरी त्याचें लक्षण कोठही दिलेलें आजच्या उपलब्ध प्रतीत मिळत नाही, केवळ देवविषयीच्या प्रीतीच्या वर्णनाचें उदाहरण परि. ३ श्लो. ४–५ यात दिलेलें आढळतें. भामहाच्या काव्यालंकारावरील एखादी टीकाहि अद्यापि उपलब्ध नाही. उद्भट नामक प्रसिद्ध पंडितानें ' भामहविवरण ' नांवाची टीका लिहिल्याचे उल्लेख कोठें कोठें आहेत, पण ती टीका अजून तरी अज्ञात आहे. तेव्हां ' स्वयंकृतैरेव ' इत्यादि श्लोकाला आज तरी फारसे महत्व देतां येत नाही

भामहानें इतर ग्रंथ व ग्रंथकार यांचे उल्लेख अनेक केले आहेत. परि २ श्लो. १९ व ५८ यांत रामशर्म्याचा अच्युतोत्तर; १, ३३ मध्ये अश्मकवंश, ५,१७ मध्ये कणभक्ष; ६,३६ यांत न्यास; ६,६२-६३ यांत पाणिनि ( याला सालातुरीय असेंहि म्हटलें आहे ); ३,८ मध्यें मेधावी व रत्नाहरण: २,४५ व ३,१० यांत राजमित्र नांवाचा ग्रंथ; २,४७ मध्यें शाखवर्धन, असे उल्लेख आढळतात. यांपैकीं अच्युतोत्तर, अश्मकवंश, रत्नाहरण, राजमित्र व शाखवर्धन हीं पांच नांवें मात्र दुसऱ्या कोठें आढळत नाहीत. या पांचांतील अश्मकवंशांतून कोणतेहि

अवतरण भामहाने घेतलेलं नसून रत्नाहरण हें खरोखर एखाद्या ग्रंथाचें नाव आहे कीं काय याचा संशयच आहे. रत्नाहरणाचा उल्लेख ज्यांत आहे तो श्लोक असा—' उवाच रत्नाहरणे चैवं शार्ङ्गधनुर्यथा । गृहेष्वध्वसु वा नान्नं भुञ्ज्महे यद्धीनिनः । न भुञ्जते द्विजास्तच्च रसदाननिवृत्तये ॥ ' यांतील रत्नाहरण हें ग्रंथाचें नांव असेल किंवा एखाद्या प्रसंगाचेंहि असूं शकेल. उरलेल्या तिहींपैकीं शाखवर्धन व रामशर्मा यांच्या ग्रंथांतून जी उदाहरणे घेतलेलीं आहेत, तीं दोषांचीं म्हणून घेतलेलीं असून, रुद्रटाच्या काव्यालंकारावरील नमिसाधूच्या टीकेंत ( अध्याय ११, २४ ) व काव्यप्रकाशांत देखील तीं आलेलीं आहेत; पण तेथें तीं कोणाचीं हें मात्र सांगितलेलें नाहीं. आतां हे जे ग्रंथ व ग्रंथकार भामहानें सांगितले असून इतर ठिकाणी कोठें उल्लेखिलेले आढळत नाहीत, त्यांच्या निर्देशावरून भामह हा फार प्राचीन ग्रंथकार असावा असें कांहीं विद्वानांचें म्हणणें आहे. पण वास्तविक प्रकार तसा नाहीं. भामहानें उल्लेखिलेले ग्रंथ आज उपलब्ध नसले, म्हणजे ते फार प्राचीन असले पाहिजेत व त्यांवरून भामह हाहि प्राचीन असला पाहिजे असें अनुमान बांधतां येत नाहीं. स्वतः भामहाचा ग्रंथ तरी कोठें आजवर उपलब्ध होता ? यास्तव अपुऱ्या माहितीवरून कांहीं निश्चित अनुमान करणें अप्रशस्त होय. ते ग्रंथ पुढें केव्हां उपलब्ध होतीलहि; त्याचा काय नेम ? असो.

भामहानें नांवानें ज्यांचा उल्लेख केला नाहीं, पण जे ग्रंथ त्याला माहिती होते अशा रीतीनें त्यांचेबद्दल तो लिहितो असेहि ग्रंथ व ग्रंथकार कित्येक आहेत. परि. १,२४ यांत ' उक्तं तदभिनेयार्थमुक्तोऽन्यैस्तस्य विस्तरः ' असें म्हटलें आहे, त्यांतील **अन्यैः** म्हणजे नाट्यशास्त्रकार भरत होय. परि. २,४ यांतहि भरताचा उल्लेख असून परि. ६,२१ मध्यें पतञ्जलीच्या महाभाष्याचा आहे. याशिवाय आणखी ज्या ग्रंथांचा व ग्रंथकारांचा उल्लेख भामहाने केला असावा असें दिसतें त्याचा निर्देश पुढें भामहाच्या कालाचा निर्णय करतांना केला आहे. त्यानें बृहत्कथेतील मुख्य पात्रें जीं वत्सराज व नरवाहनदत्त यांचा परि.४,४० व ४,५० यांत अनुक्रमे उल्लेख केला असून अपरे, अन्ये, केषांचित् या शब्दांनी दुसऱ्या साहित्यशास्त्रकारांचा निर्देश केलेला आहे ( परि. २,६,८,८७;परि.३,१२,५४ ).

या शिवाय व्याकरणादि इतर शास्त्रांवरील ग्रंथकारांचा सुद्धां परि. ४, ६; ५, ६, ११, ६० इत्यादि ठिकाणी त्यानें नामनिर्देश केलेला आढळतो. पाणिनीच्या

व्याकरणपद्धतीविषयी त्याने ( परि. ४, ६३ ) ' श्रद्धेयं जगति मतं हि पाणिनीयम् । ' असे म्हणून मोठा आदर दर्शविला असून सहाव्या परिच्छेदाच्या आरंभी व्याकरणावर सुंदर रूपक केले आहे. तो म्हणतो, 'सूत्राम्भसं पदावर्तं पारायणरसातलम् । धातूणादिगणग्राहं ध्यानग्रहबृहत्प्लवम् ॥ नापारयित्वा दुर्गाधममुं व्याकरणार्णवम् । शब्दरत्नं स्वयंगममलंकर्तुमयं जनः ' ॥. व्याकरणरूपी सागराची सूत्रें हीच पाणी व शब्द हेच भोवरे असून त्याचा खोल अभ्यास हेच तळ होय. धातुपाठ, उणादिसूत्रे, गणपाठ इत्यादि त्या सागरांतील मकर असून मननपूर्वक अभ्यास हाच त्यांतील नाव होय. अशा या अत्यंत खोल व्याकरण समुद्राच्या पार गेल्याशिवाय शब्दरूपी रत्न स्वाधीन करून घेणे शक्य नाही. दंड नीतीचा म्हणजे राजकारणशास्त्राचा उल्लेख भामहाने परि. ४, ३९ मध्ये केला असून ६, १२ मध्ये स्फोटवादाचा निर्देश केला आहे. ' शपथैरपि चादेयं वचो न स्फोटवादिनाम् । नभःकुसुममस्तीति श्रद्दध्यात् कः सचेतनः ' ॥. स्फोटवादाला आकाशपुष्पाची उपमा देऊन त्याने तो वाद न स्वीकारण्याची सूचना दिली आहे. त्याची पद्यरचना सरळ व सुसंस्कृत असून ध्वन्यालोकावरील लोचननामक टीकेत आणि पुढील दुसऱ्या अनेक ग्रंथकारांनी तीतून पुष्कळ अवतरणे घेतली आहेत.

भामहाच्या काव्यालंकारांत प्रस्तुत न आढळणारी अशी कित्येक पद्ये वाणीविलास ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालेल्या वामनकाव्यालंकारसूत्रवृत्तीची जी कामधेनु टीका आहे तीत भामहाची म्हणून दिली असून त्यात सूत्र, वृत्ति यांच्या व्याख्या व साहित्यशास्त्रविषयक गोष्टी आल्या आहेत. वृत्तरत्नाकर नांवाच्या ग्रंथावरील एक टीकाकार नारायण याने भामहाच्या ग्रंथांतून म्हणून लांब लांब अवतरणे दिली आहेत. त्यांवरून भामहाने छंदःशास्त्रावरहि ग्रंथ लिहिला असावा असे दिसते. वररुचीच्या प्राकृतव्याकरणावर टीका लिहिणारा लेखक भामह नांवाचाच आहे, पण तो व काव्यालंकाराचा कर्ता हे एकच की भिन्न याचा निर्णय करितां येण्यासारखा नाहीं.

आतां भामहाच्या काळाचा विचार करावयाचा. पण साहित्यशास्त्राच्या इतिहासांत भामहाबरोबर दंडीचा उल्लेख जोडगोळीनें होत असल्यामुळें भामहाच्या कालनिर्णयाची भूमिका स्पष्ट करण्यासाठी प्रथम दंडी व त्याचा काव्यादर्श यांचें थोडें निरीक्षण करणें अवश्य आहे.

# ८ दंडीचा काव्यादर्श

काव्यादर्श हा ग्रंथ हिंदुस्थानांत आजवर अनेक वेळां छापिलेला आहे. सन १८६३ या वर्षी कलकत्ता येथे छापिलेल्या आवृत्तींत प्रेमचंद्र तर्कवागीश यांची मालिन्यप्रोञ्छनी नामक टीका दिली अस १९१० त मद्रास येथे प्रो. रंगाचार्य यांनीं छापिलेल्या प्रतीत दोन टीका आल्या आहेत. डॉ. बेलवलकर आणि रंगाचार्य शास्त्री रड्डी यांनीहि पुणे येथे काव्यादर्श प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथाचे तीन परिच्छेद आहेत; पण प्रो. रंगाचार्यांच्या प्रतींत इतर प्रतीतील तिसऱ्या परिच्छेदाचे दोन स्वतंत्र परिच्छेद केल्यामुळे परिच्छेदसंख्या चार झाली आहे. मद्रासच्या या चार परिच्छेदांच्या प्रतीतील चवथ्या परिच्छेदाला दोषांच्या विवेचनापासून आरंभ झालेला आहे. कलकत्ता प्रतीतील श्लोकसंख्या ६६० असून मद्रास प्रतीत ती ६६३ आहे. कारण मद्रास प्रतीत तिसऱ्या परिच्छेदाच्या शेवटीं दोन श्लोक आणि चवथ्याच्या आरंभी व मध्यें एक एक श्लोक असे चार श्लोक अधिक असून कलकत्ता प्रतीतील ‘ लिम्पतीव तमोङ्गानि वर्षतीवाञ्जनं नभः । असत्पुरुषसेवेव दृष्टिर्विफलतां गता ॥ ’ हा सुप्रसिद्ध श्लोक गाळलेला आहे. चवथ्या परिच्छेदाच्यामध्यें एक श्लोक ‘आधिव्याधिपरीताय अद्य श्वो वा विनाशिने । को हि नाम शरीराय धर्मापेतं समाचरेत् । ’ असा असून तो कलकत्ता प्रतीतील तिसऱ्या परिच्छेदाच्या १६० व्या श्लोकापुढे आलेला आहे. पुढील विवेचनांत अवतरणे घेतलीं आहेत तीं कलकत्ता प्रतींतील आहेत.

काव्यादर्शाच्या प्रथम परिच्छेदांत काव्याची व्याख्या करून त्याचे गद्य, पद्य व मिश्र असे विभाग केल्यावर महाकाव्याची व्याख्या केली आहे व आख्यायिका आणि कथा असे गद्यकाव्याचे दोन प्रकार सांगून त्यांत वस्तुतः कांही भेद नाही असें म्हटले आहे. नंतर संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश व मिश्र असे वाङ्मयाचे चार भाग सांगितल्यावर वैदर्भ आणि गौड हे भाषाशैलीचे प्रकार व काव्याचे दहा गुण यांचें विवेचन केले आहे. पुढें कवि होण्याला कोणते गुण अवश्य आहेत याचें विवरण करून प्रतिभा म्हणजे कल्पनाशक्ति, श्रुत म्हणजे विद्वत्ता आणि अभियोग म्हणजे सतत परिश्रम या तीन गोष्टींमुळें कवित्व सिद्ध होतें असें सांगितलें आहे. दुसऱ्या परिच्छेदांत अलंकाराची व्याख्या केल्यावर पस्तीस अलंकारांच्या व्याख्या व उदाहरणें दिली आहेत. या अलंकारांचा क्रम, स्वभावोक्ति, उपमा, रूपक,

दीपक, आवृत्ति, आक्षेप, अर्थान्तरन्यास, व्यतिरेक, विभावना, समासोक्ति, अतिशयोक्ति, उत्प्रेक्षा, हेतु, सूक्ष्म, लेश किंवा लव, यथासंख्य किंवा क्रम, प्रेयः रसवत, ऊर्जस्वि, पर्यायोक्त, समाहित, उदात्त, अपह्नुति, श्लेष, विशेषोक्ति, तुल्ययोगिता, विरोध, अप्रस्तुतप्रशंसा, व्याजोक्ति, निदर्शना, सहोक्ति, परिवृत्ति, आशीः, संकीर्ण आणि भाविक असा आहे. तिसऱ्या परिच्छेदांत यमकासंबंधानें सविस्तर विवेचन केल्यावर गोमूत्रिका, अर्धभ्रम, सर्वतोभद्र, स्वरस्थानवर्णनियम इत्यादि चित्रबंधाच्या व्याख्या व उदाहरणे सांगून प्रहेलिकेचे सोळा प्रकार आणि दोषांचे दहा प्रकार वर्णिले आहेत.

दंडीचा काव्यादर्श हा कांहीं अंशीं रीतीसंप्रदायाचा तर कांहीं अंशीं अलंकारसंप्रदायाचा पुरस्कर्ता आहे. दण्डी हा दाक्षिणात्य निदान नर्मदेच्या दक्षिणेस कोठें तरी रहाणारा असावा असें दिसतें. कारण त्यानें दिलेल्या उदाहरणांत मलयानिल म्हणजे मलयवायु ( २, १७४; ३, १६५ ), कावेरी नदी ( ३, १६६ ), चोल देश ( ३, १६६ ), कलिंग देश ( ३, १६५ ), अवन्ती नगरी ( २, २८० ) यांचें विशेष वर्णन असून काञ्ची नगरीचा ( ३, ११४ ) स्पष्ट नसला तरी अस्पष्ट निर्देश केलेला आहे. मद्रास प्रतींत अवन्ती हें नांव वासवदत्तेचें म्हणून आलें आहे. 'आदिराजयशोबिंबमादर्शं प्राप्य वाङ्मयम् । तेषामसन्निधानेऽपि न स्वयं पश्य नश्यति ' ॥ १, ५ व 'भगवन्तौ जगन्नेत्रे सूर्याचंद्रमसावपि । पश्य गच्छत एवास्तं नियतिः केन लंघ्यते ' ॥ २, १७२, या श्लोकांत जो ' पश्य ' म्हणजे पहा असा शब्द आला आहे त्यावरून दंडीनें काव्यादर्श ग्रंथ कोणा विलासी राजपुत्राकरितां लिहिला अशी कथा उत्पन्न झाली आहे; पण त्या शब्दाला इतकें महत्व देण्याचें कारण नसून वाक्याला भारदस्तपणा आणण्यासाठीं व अनुप्रास साधण्यासाठीं पादपूरक म्हणूनच तो घातलेला दिसतो. पस्तीस अलंकारांची नामावली द्वितीय परिच्छेदाच्या ४–७ या श्लोकांत दिली असून ते श्लोक प्रक्षिप्त असावे असें डॉ. बेलवलकरांसारखे कित्येक पंडित मानितात. कारण त्यांत दीपकावृत्तीच्या

---

[1] पूर्वींच्या थोर राजांच्या कीर्तीचें प्रतिबिंब काव्यरूप आरशांत पडल्यावर ते राजे स्वतः नाहींसे झाले तरी तें प्रतिबिंब नाहींसें होत नाहीं पहा; विश्वाचे प्रकाशक असे भगवान् चंद्र सूर्य देखील अस्त पावतात; पहा, तेव्हां भवितव्याचें उल्लंघन कोण करूं शकणार ?

जागीं दीपकावृत्ती, लेशाच्या जागीं लव, अप्रस्ततुप्रशंसा व विशेषोक्ति यांच्या जागी अप्रस्तुतस्तोत्र व विशेष असे जे शब्द आहेत ते दंडीच्या पद्धतीला अनुचित होत. हे दोष संशय उत्पन्न करणारे आहेत खरे, तथापि तेवढ्यावरून ही अलंकार नामावली मागाहून प्रक्षिप्त केलेली आहे असें म्हणणें जरा साहसाचेंच आहे. प्राचीन साहित्यग्रंथांत अलंकारांची चर्चा करण्यापूर्वीं त्यांची नामावली देण्याची चाल सर्वत्र आढळते. भामह, उद्भट व रुद्रट यांच्या ग्रंथांतहि अलंकारांचीं नांवें सर्वच एका ठिकाणी नसली तरी गटागटांनीं दिलेली आहेत. अलंकाराच्या नांवांत प्रशंसा न म्हणतां स्तोत्र असा पर्याय योजणें हेंहि चमत्कारिक नसून इतर ग्रंथकारांनी तसे पर्यायशब्द योजिलेले आढळतात उदाहरणार्थ, उद्भटानें अलंकारसारसर्वस्व नामक ग्रंथांत ( ६, १ ) ' काव्यदृष्टान्तहेतू चेत्यलंकारान्परे विदुः ' असें म्हणून **काव्यदृष्टान्त** व **काव्यहेतु** असे दोन अलंकार दुसरे ग्रंथकार मानीत असल्याचें सांगितले आहे. पण पुढें अलंकाराच्या व्याख्या देतांना या अलंकारांचीं नांवें त्यानेंच दृष्टान्त व काव्यलिंग अशी सर्वप्रसिद्ध असलेलींच दिलीं आहेत, काव्यदृष्टान्त व काव्यहेतु अशी दिली नाहीत. या गोष्टीचा विचार केल्यास दंडीने **लेशा**च्या जागीं **लव** आणि **विशेषोक्ती**च्या जागीं **विशेष** असे कां म्हटले असावे हे लक्षांत येईल.

काव्यादर्श ग्रंथ अथपासून इतिपर्यंत सरळ व गोड भाषेत लिहिलेला आहे. भामह आणि दंडी यांची तुलना केल्यास काव्यदृष्ट्या वरची पदवी दंडीलाच द्यावी लागेल; पण निश्चितपणा, सूक्ष्म विचार, तर्कशुद्ध कोटिक्रम व स्पष्ट कल्पना या बाबतींत दंडीपेक्षां भामहाची पायरी श्रेष्ठ ठरेल. दंडीनें दिलेल्या उदाहरणांत त्याची स्वतःची कल्पकता स्पष्ट दिसत असून दोन तीन उदाहरणें वगळतां त्यानें उदाहरणासाठीं अन्य ग्रंथाचा आश्रय केल्याचें आढळत नाहीं. त्या अन्यग्रंथोक्त उदाहरणासंबंधीचें विवेचन पुढें करावयाचें आहे.

छंदोविचिति ( छंदोविचित्यां सकलस्तत्प्रपञ्चो निदर्शितः १, १२ ), बृहत्कथा ( भूतभाषामयीं प्राहुरद्भुतार्थां बृहत्कथाम् १, ३८ ) व सेतुबन्ध ( महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः । सागरः सूक्तिरत्नानां सेतुबन्धादि यन्मयम् ॥१, ३९ ) या ग्रंथांचा दंडीनें काव्यादर्शांत नांवानें उल्लेख केला आहे. तिसऱ्या परिच्छेदाच्या १७१ व्या श्लोकांत ' इत्थं कलाचतुषष्टिविरोधः साधु नीयताम् । तस्याः कलापरिच्छेदे

रूपमाविर्भविष्यति ।' म्हणजे चौसष्ट कलांशीं काव्यांतील वर्णनाचा विरोध कसा होऊं शकतो याविषयीं समजूत करून घ्यावी असे सांगून त्या चौसष्ट कलांचे स्वरूप **कलापरिच्छेद** नामक ग्रंथांत आपण स्पष्ट करून दाखविणार आहों असे दंडीने म्हटले आहे, त्यावरून कला परिच्छेद नांवाचा ग्रंथ काव्यादर्शाची पुरवणी म्हणून लिहिण्याचा त्याचा उद्देश होता असें दिसतें; पण तो त्याच्या हातून लिहून झाला कीं नाहीं समजत नाहीं. त्याने उल्लेखिलेल्या दुसऱ्या ग्रंथांपैकीं **छंदोविचिति** हा दंडीचाच असावा असें मोठ्या विद्वानांचे मत एका काळीं झालें होतें. परंतु छंदोविचिति हे छंदःशास्त्राचे सामान्य नांव असून छंदः नामक वेदांगाला तें विशेषतः लाविलेले आहे असें आम्हीं इंडियन ॲंटिक्वेरींतील ( सन १९११ पा. १७७ ) लेखांत दाखविलें आहे. या वेदांग छंदाचा कर्ता पिङ्गलनाग म्हणून कोणी मानिलेला असून मीमांसा सूत्रांवरील शाबर भाष्यांत त्याचीं म्हणून अवतरणे घेतलेली आहेत ( शा. भा. ग्रं. १ पा. १६ ). कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत देखील ( १, ३, १ ) छंदोविचिति हा शब्द आढळतो. तात्पर्य छंदोविचिति हा दंडीचा ग्रंथ होता असे मानण्यासारखे कांहीं सबळ कारण दिसत नाहीं.

नांव स्पष्टपणे न सांगतां ज्यांचा उल्लेख दंडीने केला आहे असेहि कित्येक ग्रंथ व ग्रंथकार आहेत. उदाहरणार्थ, 'नोपमानं तिङन्तेनेत्यतिक्रम्याप्तभाषितम्' ( २, २२७ ) यांतील आप्तभाषित म्हणजे पतञ्जलीचें व्याकरणमहाभाष्य होय. तसेंच 'यच्च सन्ध्यङ्गवृत्त्यङ्गलक्षणाद्यागमान्तरे । व्यावर्णितमिदं चेष्टमलङ्कारतयैव नः' ( २, ३६७ ) यांतील आगमान्तर म्हणजे भरताचें नाट्यशास्त्र असावे असे दिसतें. संध्यङ्ग, वृत्त्यङ्ग, व लक्षण यांचे विवेचन नाट्यशास्त्राच्या १९, २० व १६ या अध्यायांत केलेलें आहे. परि १ श्लो. ३१ यांत 'मिश्राणि नाटकादीनि तेषामन्यत्र विस्तरः' असें म्हणून दंडीने ग्रंथकाराच्या विशिष्ट ग्रंथाचा ( म्हणजे भारतीय नाट्यशास्त्राचा ) निर्देश केला आहे. भामहानेहि तसा उल्लेख केल्याचे पूर्वी सांगितले आहेच ( उक्तं तदभिनेयार्थमुक्तोऽन्यैस्तस्य विस्तरः । भा. १, २४ ). पूर्वीच्या आचार्यांचा व पंडितांचा सामान्य उल्लेखहि त्याने केलेला आढळतो. परि. १ श्लो. २ मध्ये 'पूर्वशास्त्राणि संहृत्य' म्हणजे पूर्वीच्या ग्रंथांचे समालोचन करून आपण आपला ग्रंथ लिहीत आहों असे त्याने म्हटलें असून इतर ग्रंथकारांचाहि तसें म्हणण्याचा सामान्यतः धाराच आहे. उदाहरणार्थ अमर-

सिंहाने अमरकोशाच्या आरंभीं 'समाहृत्यान्यतंत्राणि' असे शब्द घातले आहेत. परि. १ श्लोक ९-१० यांत दंडीनें पूर्वीच्या साहित्यशास्त्रकारांचा व आलंकारिकांचा 'सूरयः' म्हणजे पंडित या सामान्य शब्दानें निर्देश केला आहे ( अतःप्रजानां व्युत्पत्तिमभिसन्धाय सूरयः । वाचां विचित्रमार्गाणां निबबन्धुः क्रियाविधिम् ॥ ), तसाच पुनः २, ७ मध्येंहि 'इति वाचामलंकारा दर्शिता पूर्वसूरिभिः' असें म्हणून केला आहे. २, २ व ३, १०६ यांत तो निर्देश करण्यासाठीं 'पूर्वाचार्यैः' हा शब्द योजिलेला आढळतो ( किंतु बीजं विकल्पानां पूर्वाचार्यैः प्रदर्शितम् ।; एताः षोडश निर्दिष्टाःपूर्वाचार्यैःप्रहेलिकाः । ), तर २,२२७ व १,७९ यांत '**केषांचित्**' किंवा '**कैश्चित्**' व २,२६८ यांत '**एके**' या शब्दांनीं पूर्वग्रंथकारांचा उल्लेख केलेला आहे. 'लिम्पतीव तमोऽङ्गानि वर्षतीवाञ्जनं नभः ।' हें श्लोकार्ध २, २२६ मध्यें उदाहृत करून त्यावर दंडीनें सविस्तर चर्चा केली आहे. हा श्लोक मृच्छकटिक नाटकांत आलेला असून भासाच्या नांवावर गणिल्या गेलेल्या अशा थोड्या वर्षांपूर्वी प. वा. गणपतिशास्त्री यांस उपलब्ध झालेल्या नाटक ग्रंथांतील दोन नाटकांतहि आढळतो. त्यांतील चारुदत्त हें मृच्छकटिकाच्याच कथानकावर रचिलेलें असून त्यांत पहिल्या अंकांत ( १९ वा श्लोक ) हा श्लोक आला आहे. दुसरें नाटक बालचरित नांवाचें असून त्यांतहि पहिल्या अंकांतच ( १५ वा श्लोक ) आढळतो. या श्लोकांत जो **इव** शब्द दोन तीन वेळां आला आहे तो सर्व ठिकाणीं उपमादर्शक समजून कित्येक जण त्यांत उपमा अलंकार आहे असें चुकीनें समजतात, पण वस्तुतः उपरोक्त श्लोकार्धांत दोन्ही **इव** शब्द उत्प्रेक्षावाचक होत, कारण ते उपमान व उपमेय यांना जोडणारे नसून क्रियापदांशीं संयुक्त असल्यामुळें त्यांतून उपमा निष्पन्न होत नाहीं, तर उत्प्रेक्षा उत्पन्न होते असा अभिप्राय दंडीनें दिला आहे. या दंडीकृत चर्चेचा उल्लेख उद्भटाच्या अलंकारसारसंग्रहावरील टीकेंत प्रतीहारेन्दुराजानें ( पा. २६ ) विशेष रीतीनें केलेला आहे. दंडीनें सांख्यदर्शन, बौद्धदर्शन व न्यायदर्शन यांचाहि उल्लेख केलेला आढळतो. ३, १७३ मध्यें 'विरोधो हेतुविद्यासु न्यायाख्यासु निदर्श्यते' न्यायशास्त्राचा संबंध आला असून त्याला हेतुविद्या असें म्हटलें आहे. पुढील १७४ व्या श्लोकांत 'सत्यमेवाह सुगतः संस्कारानविनश्वरान्' असा बुद्धाचा उल्लेख असून त्याच्या पुढच्या श्लोकांत 'कापिलैरसदुद्भूतिः स्थान एवोपवर्ण्यते' असा सांख्यवादी कापिलांचा उल्लेख आहे.

शार्ङ्गधरपद्धतीतील १७४ वा श्लोक राजशेखराचा म्हणून घेतलेला असून त्यांत दंडी हा तीन ग्रंथाचा कर्ता होता असें त्यानें म्हटलें आहे. तो श्लोक असा—' त्रयोऽग्नयस्त्रयो वेदास्त्रयो देवास्त्रयो गुणाः । **त्रयो दंडिप्रबंधाश्च** त्रिषु लोकेषु विश्रुताः' ।. हे तीन ग्रंथ कोणते असावे हे शोधून काढण्यासाठी अनेक पंडितांनी आपले बुद्धिसर्वस्व खर्च केलें आहे; पण त्यांत सांगण्यासारखी यशःप्राप्ति झालेली नाही. पिशेल यानें मृच्छकटिक नाटक दंडीचें असावें असा धाडसी तर्क केला. ' लिंपतीव तमोऽङ्गानि ' इत्यादि श्लोकावरील दंडीच्या चर्चेंचें रहस्य पिशेलला कळले नाही, म्हणूनच त्यानें हे अवास्तव धाडस केलें दंडीचे तीन ग्रंथ पिशेलच्या मतें मृच्छकटिक, काव्यादर्श व दशकुमारचरित हे होत. पण 'लिंपतीव' इत्यादि श्लोक मृच्छकटिकाशिवाय इतर दोन नाटकांतहि आढळत असल्यामुळें, त्या श्लोकावरून मृच्छकटिक दंडिकृत समजल्यास दुसऱ्या दोन्ही नाटकांचेंहि जनकत्व दंडीकडेच जाईल. अर्थात् पिशेलचें मत अग्राह्य होय. छंदोविचिति हा दंडीच्या तिसरा ग्रंथ असावा असा अभिप्राय डॉ. पीटरसन् व डॉ. याकोबी यांनी दर्शविला आहे. पण त्याचें खंडन पूर्वी आलेंच आहे छंदोविचिति हें एखाद्या विशिष्ट ग्रंथाचें नांव म्हणून दंडीनें योजिलेलें नसून छंद शास्त्राला तें सामान्यपणे लाविलेलें आहे. दंडीनें उल्लेखिलेला कलापरिच्छेद हा त्याचा तिसरा ग्रंथ असावा असें आणखी कित्येक विद्वानांचें प्रतिपादन आहे. पण दंडीनें योजिलेला कलापरिच्छेद ग्रंथ त्याच्याकडून झाला कीं नाही, त्या नावाचा स्वतंत्र ग्रंथ झालेला होता की काय, तसेंच राजशेखरापुढें ' दंडिकृत कलापरिच्छेद ' असा एखादा ग्रंथ होता की काय हे सारे प्रश्न अनिर्णीत असल्यामुळें, त्याचा निर्णय झाल्याशिवाय कलापरिच्छेद नामक तिसरा ग्रंथ दंडिकृत होता असें ठाम प्रतिपादन करण्यांत स्वारस्य नाहीं.

दंडीनें केलेले तीन ग्रंथ होते या कल्पनेवर कित्येक पंडितांनीं जो घोटाळा उडविला आहे, त्यांत भर घालण्याकरिताच कीं काय कित्येक विद्वानांनी काव्यादर्शकार दंडी व दशकुमारचरितकार दंडी हे एकच कीं दोन असा संशय गंभीरपणें प्रदर्शित केला आहे. काव्यादर्शकर्ता दंडी हा दशकुमाराचा कर्ता असणें शक्य नाहीं असा प्रो. त्रिवेदी व रा. आगाशे यांचा कोटिक्रम असून, तो त्रिवेदीनीं प्रतापरुद्रयशोभूषणाच्या प्रस्तावनेंत व आगाशे यांनी सन १९१७ च्या इन्डियन अँटिक्वेरींत ( पान ६७ ) आणि त्यानंतर दशकुमारचरिताच्या प्रस्तावनेंत सविस्तर दिला आहे. त्यांच्या कोटिक्रमाचें विस्तारानें परीक्षण करण्याचें हें स्थल

नसलें तरी त्याचा थोडाबहुत तरी परामर्श घेणें अवश्य आहे. काव्यादर्शाचा कर्ता दंडी हा मोठा चोखाळ चिकित्सक असून काव्यात लहानसहान दोषहि राहूं देऊं नयेत असें त्यानें कवींना बजावून सांगितलें आहे. ' तदल्पमपि नोपेक्ष्यं काव्ये दुष्टं कथंचन । स्याद्वपुः सुंदरमपि श्वित्रेणैकेन दुर्भगम् ॥ ( १, ७ ) असें त्यानें म्हटलें असून तदनुसार ' कन्ये कामयमानं मां न त्वं कामयसे कथम् ' असल्या सामान्यतः निरुपद्रवी विधानालाहि ग्राम्य गणिलें आहे ( इति ग्राम्योऽयमर्थात्मा वैरस्याय प्रकल्पते । १, ६३ ). असला सोंवळा साहित्यशास्त्री दंडी दशकुमार-चरितांतील कथांसारख्या सदभिरुचीला न मानवणाऱ्या कथा व्याकरणदृष्ट्या चुकीचे शब्दप्रयोग आणि स्त्रीपुरुषसंबधाचें उघड वर्णन याचा जनक असणें शक्य नाही असा आगाशे याचा कोटिक्रम आहे. पण हा कोटिक्रम मान्य करण्यापूर्वी एक दोन गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. पहिली गोष्ट अशी की उपदेश आणि तो करणाराची स्वत.ची कृति यामध्यें एकवाक्यता नित्य असतेच असें नाहीं व ही गोष्ट सर्व साहित्यचिकित्सकांनी मान्य केलेली आहे. मोठ्या काव्याचें परीक्षण करतांना त्यातील दोष दाखविले म्हणजे ते दाखविणाराला अगदी निर्दोष काव्य करतां आलें पाहिजे असें नाहीं, एखादा वैद्य रोग्याला नीट पथ्य सांभाळण्यास सांगतो. पण स्वत वर प्रसंग आल्यास त्याला तसें पथ्य पाळता येईल असें नाहीं; असा कोटिक्रम करून व्यक्तिविवेककार महिमभट्ट यानें मोठ्या कवींचे दोष स्वतः काढून आपल्या त्या कृतीचें समर्थन केलें आहे. तो म्हणतो ' स्वकृतिष्वयन्त्रितः कथमनुशिष्यादन्यमयमिति न वाच्यम् । वारयति भिषगपथ्यादितरान्स्वयमाचरन्नपि तत् ' । (पा. ३७ ). औचित्यविचारचर्चा याचा कर्ता क्षेमेन्द्र कवि यानें तर आपल्याच काव्यांतील दोष आपल्या चर्चाविषयक ग्रंथांत २० व २१ कारिकांत दाखविले आहेत. असें असल्यामुळे दशकुमारचरित रचणाऱ्या दंडीनें पुढें काव्यादर्श लिहिला असणें अगदीं शक्य आहे. पहिला ग्रंथ त्यानें तरुणपणी व नवशिका ग्रंथकार म्हणून लिहिला असेल व पुष्कळ अनुभव घेऊन परिणतप्रज्ञ झाल्यावर त्यानें साहित्यशास्त्रावरील ग्रंथ लिहिला असेल. शिवाय ' कन्ये कामयमानं ' इत्यादि श्लोकांतलि ' ग्राम्य ' शब्दानें दंडीनें काय सूचित केलें आहे हेंहि नीट लक्षांत घेतलें पाहिजे. त्या विधानांत जसा धटिंगणपणा दिसतो तसा आपलें नाजुक मनोगत दुसऱ्यास सांगतांना दाखविणें उचित नाहीं, तर तें ध्वनित करणेंच योग्य असें सांगण्याचा दंडीचा आशय आहे व तो त्यानें पुढील श्लोकांत दाखवून

तीच गोष्ट निराळ्या मार्गानें कशी ध्वनित करावी हें सांगितलें आहे. ' कामं कंदर्पचाण्डालो मयि वामाक्षि निर्दयः । त्वयि निर्मत्सरो दिष्टयेत्यग्राम्योऽर्थो रसावहः ॥ ' ( १, ६४ ). या दोन्ही उदाहरणांवरून दंडीचा ग्राम्यत्वाच्या आरोपाचा रोख अर्थावर नसून शब्दावर आहे हें दिसून येईल. आगाशांच्या कोटिक्रमांत दुसरा मुद्दा असा आहे कीं काव्यादर्शाची शुद्ध व सरळ भाषाशैली आणि दशकुमारचरिताची अवजड व दीर्घसमासयुक्त भाषा यांत फारच अंतर असल्यामुळें त्या दोहोंचा कर्ता एक असणें शक्य वाटत नाही. पण हाहि कोटिक्रम समजुतीच्या घोटाळ्यावरच उभारलेला दिसतो. कारण काव्यादर्श हा पद्यात्मक असल्यामुळे त्यांत लांब लांब समासांना वावच नाही; तरी देखील त्यांत सबंध श्लोकार्ध एकाच समासांत गोविलेलें कोठें कोठें आढळतें. उदाहरणार्थ, ' पयोधरतटोत्संगलग्नसन्ध्यांतपांशुका । कस्य कामातुरं चेतो वारुणी न करिष्यति ' । ( १, ८४ ). दंडीनें दीर्घ समासांचा निषेध केला आहे तो पद्यासंबंधानें असून गद्यासंबंधानें नव्हे हें ' ओजः समासभूयस्त्वमेतद्गद्यस्य जीवितम् । पद्येऽप्यदाक्षिणात्यानामिदमेकं परायणम् । ( १, ८० ) या त्याच्या म्हणण्यावरून उघड दिसतें. अर्थात् दशकुमारचरितांत जे समासबाहुल्य आहे, ते दंडीच्या उपदेशाला धरूनच आहे, कारण दशकुमारचरित हें पद्यात्मक नसून गद्यात्मक आहे. एकाच लेखकाचें गद्य व पद्य यांत अंतर कसें असतें याचें दुसरें उदाहरण पाहिजे असेल तर तें सुबंधूच्या वासवदत्तेचें होय. त्यांतील आरंभीच्या पद्याची सरळ व सुबोध भाषा आणि पुढील कथानकाची गद्यभाषा यात महदंतर आहे. स्वतः दशकुमारांतील थोडीशीं पद्यें पाहिलीं तरी त्यांचेंहि भाषादृष्टीनें गद्याहून चांगलें वैशिष्ट्य दिसून येतें. तेव्हां दशकुमारचरिताचा कर्ता काव्यादर्शकार दंडी नव्हे असें ठाम म्हणावयास अजून तरी पुरेशीं प्रमाणें मिळालेलीं नाहींत असेंच म्हणावें लागतें. असो. सरस्वतीकंठाभरणाचा कर्ता भोजदेव यानें ( पा. २४८ ) दशकुमारांतील आरंभींचा ' ब्रह्माण्डच्छत्रदंडः शतधृतिभवनाम्भोरुहो नालदण्डः ' इत्यादि श्लोक उद्धृत केला असून काव्यादर्शांतीलच पुष्कळच उतारे घेतले आहेत. तेव्हां एकंदरींत दंडीचे तीन ग्रंथ कोणते हा प्रश्न सर्वथैव अनिर्णीतच आहे. भोजाचा शृंगारप्रकाश म्हणून विस्तीर्ण ग्रंथ उपलब्ध झाला आहे. त्यांत दण्डीनें ' द्विसंधानमहाकाव्य ' लिहिल्याचें सांगितलें आहे ( बुलेटिन ऑफ दी स्कूल ऑफ ओरिएन्टल स्टडीज्, व्हाल्यूम ३ पान २८२ ). हा कदाचित् दण्डीचा राजशेखराला अभिप्रेत असलेला तिसरा ग्रंथ असेल.

भामह आणि दंडी यांच्या ग्रंथांत कित्येक वचनें शब्दशः एक आहेत, त्यांचा आतां निर्देश करूं. ‘सर्गबंधो महाकाव्यम्,’ १, १४ व भामह १, १९; ‘मंत्रदूतप्रयाणाजिनायकाभ्युदयैरपि,’ दंडी १, १७ व भामह १, २० (पण भामहाचा पाठ ‘मंत्रदूतप्रयाणाजिनायकाभ्युदयैश्च यन्’। असा आहे); ‘कन्याहरणसंग्रामविप्रलंभोदयादयः’, दंडी १, २९ व भामह १, २७ (पण भामहाच्या पाठांत **दयादयः** च्या जागी **दयान्विताः** असे आहे); ‘अद्य या मम गोविन्द जाता त्वयि गृहागते। कालेनैषा भवेत्प्रीतिस्तवैवागमनात्पुनः।’ दंडी २, २७६ व भामह ३, ५ (दोघांनीहि हा श्लोक प्रेयोऽलंकाराचें उदाहरण म्हणून दिला आहे); ‘तद्भाविकमिति प्राहुः प्रबन्धविषयं गुणम्’। दंडी, २, ३६४ व भामह ३, ५२ (यांत भामहाचा पाठ ‘भाविकत्वमिति’ असा आहे); ‘अपार्थं व्यर्थमेकार्थं ससंशयमपक्रमम्। शब्दहीनं यतिभ्रष्टं भिन्नवृत्तं विसन्धिकम्॥ देशकालकलालोकन्यायागमविरोधि च। इति दोषा दशैवैते वर्ज्याः काव्येषु सूरिभिः॥’ दंडी ३, १२५-१२६ व भामह ४, १-२; ‘समुदायार्थशून्यं यत्तदपार्थकमिष्यते’ दंडी ३, १२८ व भामह ४, ८; ‘गतोस्तमर्को भातीन्दुर्याति वासाय पक्षिणः’ दंडी २, २४४ व भामह २, ८७; ‘आक्षेपोर्थान्तरन्यासो व्यतिरेको विभावना’ दंडी २, ४ व भामह २, ६६; आणि ‘प्रेयो रसवदूर्जस्वि पर्यायोक्तं समाहितम्’ दंडी २, ५ व भामह ३, १.

दण्डीची व्यक्तिगत माहिती त्याच्या ग्रंथावरून कांहीं मिळत नव्हती. परतु सन १९२४ सालीं प्रो. रामकृष्ण कवि ह्यांनी ‘दक्षिणभारती’ ग्रंथमालेत ‘अवन्तिसुन्दरी कथा’ व ‘अवन्तिसुन्दरीकथासार’ या नांवाचे दोन ग्रंथ संपादिले. यांपैकीं पहिला ‘अवन्तिसुन्दरीकथा’ हा ग्रंथ अपुरा असून शब्द सोडलेल्या धड्याप्रमाणे छापलेला आहे व फक्त २५ पानेच छापलेली आहेत. ‘अवन्तिसुन्दरीकथासार’ हेंही अपूर्ण असून सुमारें आठशें श्लोक छापलेले आहेत. अवन्तिसुन्दरीकथासारांत दण्डीच्या कुलाची हकीकत दिलेली आहे ती अशी. वायव्येकडे आनन्दपुर (कदाचित् गुजराथेंतील आनन्द असेल) येथें रहाणारा कौशिक गोत्री ब्राह्मण होता; तो नासिक्य देशांतील मूलदेवानें वसविलेल्या अचलपुरींत (हल्लींचे वऱ्हाडांतील इलिचपूर?) रहात होता. त्याचें नांव नारायणस्वामी. त्याचा पुत्र दामोदर. तोच ‘भारवि’ होय (दामोदर व भारवि एकच हे कथेवरून दिसत नाहीं. छापी कथासारावरून दिसतें). त्याची विष्णुवर्धन राजाशीं मैत्री होती. त्यानें मृगयासक्त होऊन एकदां भूक लागल्यामुळें मांसभक्षण केलें तेव्हां प्रायश्चित्तार्थ तीर्थयात्रा करीत असतां तो गंगवंशीय दुर्विनीत राजा-

जवळ येऊन राहिला. त्याने केलेली एक आर्या ऐकून पल्लवनरेन्द्र सिंह-विष्णु याला फार कौतुक वाटले. दामोदर याला तीन पुत्र होते. त्यांतील मधला मनोरथ ह्याचे चार पुत्र होते. त्यांतील वीरदत्ताची स्त्री गौरी म्हणून होती तिला दण्डी नांवाचा पुत्र झाला. म्हणजे दण्डी हा दामोदराचा पणतू असे म्हटले आहे व भारवि हा पल्लवराज सिंहविष्णु, गंगवंशीय दुर्विनीत व विष्णुवर्द्धन चालुक्य यांचा समकालीन होता असे या ग्रंथाचे म्हणणे आहे. या दण्डीने अवन्ति-सुन्दरी नामक कथा सांगितली. ही कथा दशकुमारचरिताच्या कथानकाप्रमाणेच आहे. राजहंस राजा, त्याची राणी पद्मावती, राजहंसाचा प्रतिस्पर्धी मानसार, राज-वाहनादि कुमार वगैरे नांवे व कथा दशकुमारचरिताप्रमाणेच आहेत. अवन्ति सुन्दरीकथेच्या आरंभी श्लोक आहेत त्यांत रामायण, महाभारत, सुबन्धु, बृहत्कथा, मूलदेव, शूद्रक, भास, सर्वसेन सेतु, कालिदास, नारायण, बाण, मयूर ह्या ग्रंथांचे व ग्रंथकारांचे हर्षचरितांत आहे त्या धर्तीवर वर्णन आहे. अवन्तिसुन्दरीकथा हा ग्रंथ दण्डीचाच आहे की काय याबद्दल संशय आहे. प्रास्ताविक सर्व श्लोक उपलब्ध नाहीत. यांतच कादम्बरीच्या पूर्वभागाचा सारांश आला आहे व राजवाहनाला हंस नांवाचा भाऊ होईल असे सांगितले आहे. दण्डीने सांगितलेली कथा दुसऱ्याच कोणी विस्तारून सांगत आहे असाही मुळांत प्रकार असण्याचा संभव आहे. दशकुमारचरित लिहून पुनः अवन्तिसुन्दरी कथा तीच नांवे असलेली व त्याच कथानकाने युक्त अशी लिहि-ण्याची दण्डीला काय जरुरी पडली ते समजत नाही. ह्या दोन ग्रंथांत दिलेली दण्डीच्या कुलाची हकीकत खरी असेल तर भारवि हा सहाव्या शतकाच्या अखेरीस झाला व त्याचा पणतू (किंवा त्याचा मित्र दामोदर याचा पणतू) दण्डी हा इ. स. ६४०–६७५ च्या सुमारास झाला असावा असे ठरेल. ह्या अवन्तिसुन्दरीकथा व सार यांचे बाबतीत प्रोसीडींग्ज, दुसरे ओरिएन्टल कॉन्फरन्स पान १९४–२०१, इन्डियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली, व्हाल्यूम ३ पान ३९५–४०३ ही पहावीत (प्रो. दे ह्यांनी आम्ही म्हटल्याप्रमाणेंच अवन्तिसुन्दरीकथासारांतील हकीकत भारवीला व त्याचा पणतू प्रसिद्ध कवि दण्डी यालाच अनुलक्षून असल्याबद्दल संशय प्रकट केला आहे, आणि अवन्तिसुन्दरीकथा ही दशकुमारचरिताची प्रस्तावना नव्हे असें दाखविले आहे) व पान १६९–१७१ येथें प्रो. हरिहरशास्त्री यांनी अवन्तिसुन्दरी-कथेच्या जुन्या हस्तलिखित प्रतीवरून असे दाखविले आहे की, दामोदर हा भारवि नसून दामोदर हा भारवीचा मित्र होता आणि विष्णुवर्धन हा युवराज इ. स. ६०८ पासून ६१५ पर्यंत होता.

# ९ भामह व दंडी यांचें सापेक्ष स्थान

भामह आणि दंडी यांतून पूर्वीचा कोण आणि नंतरचा कोण या प्रश्नावर आणि तशाच प्रकारच्या भामह आणि न्यासकाराविषयीच्या प्रश्नावर चिकित्सक विद्वानांत मोठा वाद पडलेला दिसून येतो. हा वाद बराच काळ चाललेला असून कोणताहि पक्ष निश्चित सिद्ध झाला असें म्हणतां येण्यासारखी स्थिति अद्यापि आलेली नाहीं. प्रो. त्रिवेदी, डॉ. याकोबी, प्रो. रंगाचार्य, महामहोपाध्याय गणपतिशास्त्री व प्रो. पाठक यांच्या मतें भामह हा आधीचा असून दंडी नंतरचा होय. प्रो. त्रिवेदी यांचे मत प्रतापरुद्रयशोभूषणाची प्रस्तावना ( पा. २३ ), इंडियन ॲटिक्वरी ( सन १९१३ पा. २५८–२७४ ) व डॉ. भांडारकरस्मृतिग्रंथ ( पा. ४० ) यांत प्रसिद्ध झालें असून, प्रो. याकोबींचें प्रतिपादन जर्मन नियतकालिक Z. D. M. G. vol. 64 pp. 134–139 यांत आहे. प्रो. रंगाचार्यांनीं आपलें म्हणणे काव्यादर्शाच्या प्रस्तावनेंत व गणपतिशास्त्री यांनीं स्वप्नवासवदत्तेच्या प्रस्तावनेंत मांडिलें असून प्रो. पाठकांचा अभिप्राय कविराजमार्ग नांवाच्या कन्नड ग्रंथाच्या प्रस्तावनेंत ( पा. १६ ) प्रथम १८९८ या वर्षी प्रकट झालेला आहे. पण प्रो. पाठक यांचें मत पुढे पालटलें असें रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबईशाखेच्या इतिवृत्तमालेंत ( ग्रंथ २३ पा. १९ ) व इंडियन ॲटिक्वरींत ( सन १९१२, पा. २३६ ) त्यांनीं केलेल्या प्रतिपादनावरून दिसून येतें. प्रो. त्रिवेदीप्रभृतींच्या विरुद्ध मत प्रो. नरसिंह अय्यंगार यांनीं प्रतिपादिलें असून तें ब्रिटिश रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें ( सन १९०५ पान ५३५ ) प्रसिद्ध झालें आहे. त्यांच्या मतें दण्डी हा भामहाचे पूर्वीचा होय. प्रो. दिवेकर यांनीं ब्रिटिश रॉयल एशिआटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें ( सन १९२९ पान ८२५–८४२ ) भामह, भट्टि व धर्मकीर्ति यांवर लेख लिहिला असून भामह हा भट्टि व धर्मकीर्ति यांपेक्षां प्राचीन आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. डॉ. नोबेल ( Zeitschrift fur Indologie und Iranistic, vol. 5 p. 136-152) यांनीं अवन्तिसुन्दरीकथा व सार यांवरून दण्डी हा भामहानंतरचा होय असें ठरविलें आहे. भामहासंबंधानें प्रो. बटुकनाथ शर्मा यांनीं आपल्या भामहालंकाराच्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत विस्तृत चर्चा केली असून त्यांत भामह हा बौद्ध होता कीं काय, भामह व भास, वगैरे मुद्यांवर आम्ही केलेली चर्चा मान्य केली असून कांही

मुद्यांवर मतभेद दर्शविला आहे व भामह दण्डीचे आधी झाला असें प्रतिपादिलें आहे. प्रो. सुशिल कुमार दे यांनी आपल्या साहित्यशास्त्राच्या इतिहासांत ( व्हाल्युम १ पा. १६४–७० ) हेच मत प्रतिपादिले आहे. या उभयपक्षीय मतांचे सार परीक्षणासह देऊन त्यासंबंधाने आमचे म्हणणेंहि आम्ही याठिकाणीं यथाशक्ति सांगणार आहों.

या विषयाला आरंभ करण्यापूर्वी दोन महत्वाच्या गोष्टी स्पष्ट करून सांगणें अवश्य आहे. पहिली गोष्ट म्हणजे भामह आणि दंडी या दोघांनीहि आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या ग्रंथकारांचा व त्यांच्या ग्रंथांचा नामतः नसला तरी अनामतः पण स्पष्ट निर्देश केला असून भामहाने तर मेधाविन् ग्रंथकाराचे नांवहि सांगितलें आहे; तेव्हां उभयतांच्या ग्रंथांमध्ये कांहीं शब्दसाम्य आढळल्यास एकानें दुसऱ्याची उसनवारी केली आहे किंवा एखाद्या विषयावर त्यांचे भिन्न मत दिसल्यास एकाने दुसऱ्यावर टीका केली आहे असे एकदम अनुमान करण्याचे धाडस कोणी करूं नये. या उभय साहित्यशास्त्रकारांपूर्वी होऊन गेलेल्या ग्रंथांची आपल्याला फारशी माहिती नाही ही गोष्ट लक्षांत घेतां दोघांच्या ग्रंथांतील शब्दसाम्य किंवा भिन्नमतप्रीतपादन ही दोघांच्याहि पूर्वीच्या पण सांप्रत नष्टप्राय झालेल्या ग्रंथांना उद्देशून असली पाहिजेत असेंच अनुमान करणे प्रथमदर्शनी तरी युक्त दिसते. यासंबंधी दुसरी महत्वाची गोष्ट म्हणजे भामह व दंडी हे दोघेहि साहित्यशास्त्रवाङ्मयाच्या इतिहासांतील आद्य नसले तरी फार प्राचीन ग्रंथकार होत. इ. स. ८ व्या शतकांत होऊन गेलेल्या उद्भटाने भामहाच्या काव्यालंकारावर टीका लिहिली असल्यामुळे भामहाचा काळ इ. स. ७५० च्या तरी पूर्वीचा असला पाहिजे हे उघड आहे. त्याचप्रमाणें 'शान्तरक्षित' याच्या ' तत्त्वसंग्रह ' ह्या ग्रंथांत तीन श्लोक (कारिका ९१२–९१४, गायकवाड ओरिएन्टल सीरीज ) हे त्याचा टीकाकार कमलशील म्हणतो त्याप्रमाणें भामहाच्या अपोहवादखण्डनांतून ( भामहालंकार ६. १७–१९) घेतले आहेत. हे दोन्ही ग्रंथकार इ.स. ७०० ते ८५० पर्यंत झाले. म्हणून भामह इ. स. ७५० चे सुमारास झाला असावा. दंडीचा काळ सुद्धा यानंतरचा असणे शक्य दिसत नाहीं ध्वन्यालोकावरील लोचन नामक टीका इ. स. १००० च्या सुमारास झाली असून, तींत दंडीचा उल्लेख असून त्याची चम्पूची व्याख्याहि तीत दिली आहे व त्याबरोबरच भामह आणि उद्भट यांच्यांतूनहि अवतरणें घेतलीं आहेत. तसेंच अभिनवगुप्तपादाच्या अभिनवभारतींतहि दण्डीला चिरन्तन म्हटलें

आहे ( पान २७४ ). इ. स. ९५० च्या सुमारास झालेल्या प्रतिहारेन्दुराजाच्या ग्रंथांतसुद्धा दंडीचा उल्लेख आहे. प्रो. पाठकांनीं प्रसिद्ध केलेल्या कविराजमार्ग नामक कानडी ग्रंथांत दंडीला प्रमाणभूत ग्रंथकार म्हणून मानिलें असून त्याच्या तिसऱ्या परिच्छेदांतील बहुतेक पद्यें दंडीच्या पद्याचीं भाषान्तरें किंवा रूपान्तरें आहेत असें संपादक प्रो. पाठक यांनी सप्रमाण सिद्ध केलें आहे. हा ग्रंथ राष्ट्रकूट घराण्यांतील अमोघवर्ष किंवा नृपतुंग या राजानें रचिला असून शके ७३७ ते ७९७ या काळांत म्हणजे इ. स. ८१५ ते ८७५ या कालावधींत तो झाला असला पाहिजे. सिंहली भाषेत सिय-बस-लकार म्हणजे स्वभाषालंकार नांवाचा ग्रंथ साहित्यशास्त्रावर झालेला आहे. तो दंडीच्या काव्यादर्शाच्या आधारानें रचिलेला आहे व त्यांत दंडीचा नामनिर्देशहि आहे असें डॉ. बार्नेट यानें ब्रिटिश रॉयल एशियाटिक सोसायटीच्या इतिवृत्तांत ( सन १९०५ पा. ८४१ ) दाखविलें आहे. त्या ग्रंथाचा कर्ता पहिला सेन राजा हा महावंशांतील वर्णनावरून इ. स. ८४६ पासून ८६६ पर्यंत राज्य करीत होता, असें समजून येतें व यावरून दंडीचा काळ त्यापूर्वी एकदोन शतकें असला पाहिजे हें उघड होतें. आतां भामहाचा टीकाकार जो उद्भट त्यानें केलेलें अलंकारांचें शास्त्रीय विवेचन व विशेषतः उपमा व रूपक यांची चिकित्सा ही दंडीच्या विवेचनाशीं ताडून पाहिल्यास व उद्भटानें काव्यलिंग, दृष्टान्त, पुनरुक्तवदाभास, छेकानुप्रास इत्यादि जे नवीन अलंकार सांगितले व संसृष्टि आणि संकर यांतील जो भेद दाखविला तो लक्षांत घेतल्यास, दंडी हा उद्भटापूर्वी म्हणजे सन ८०० पूर्वीं बराच काळ होऊन गेलेला असला पाहिजे असें म्हणणें भाग पडतें. काव्यालंकारसूत्राचा कर्ता वामन हाहि सन ८०० च्या सुमारास होऊन गेलेला ग्रंथकार आहे. त्याच्या ग्रंथांतील काव्याचे दहा गुण व दहा दोष यांविषयीचें विवेचन दंडीच्या तत्सदृश विवेचनाशीं ताडून पहातां अधिक शास्त्रीय व सूक्ष्म दृष्टीचें दिसत असल्यामुळे दंडी हा वामनापूर्वी बराच काळ होऊन गेलेला असला पाहिजे असें सहज अनुमान होतें. एवं च दंडीचा काळ सन ७५० नंतरचा नाहीं यांत कांहीं संशय नाहीं.

या दोन गोष्टी स्पष्ट केल्यावर आतां भामह हा दंडीच्यापूर्वी होऊन गेला असें जे प्रतिपादन करितात ते तें कोणत्या आधारावर करितात हे पाहूं.

( अ ) रुय्यकाच्या अलंकारसर्वस्व नामक ग्रंथांत ( पा. ३ ) भामहाचा उल्लेख ‘ चिरन्तन ’ म्हणजे ‘ फार प्राचीन ’ या विशेषणानें केला आहे; त्याच्या

काव्यालंकाराला शाकुंतलाचा टीकाकार राघवभट्ट यानें ( निर्णयसागर आवृत्ति पा. १४ ) आकर ग्रंथ म्हणून म्हटले आहे व प्रतापरुद्रयशोभूषणांत विद्यानाथानें भामहाला ' पूर्व ' किंवा ' प्राचीन ' असे म्हटले आहे ( पूर्वेभ्यो भामहादिभ्यः; प्राचा भामहेन; पा. ११ ). या आधारांवर त्रिवेदी व प्रो. रंगाचार्य यांनी भामहाला दंडीच्या पूर्वीचा ठरविला आहे. भामहाच्यापूर्वी दंडीचा निर्देश करणारें ठिकाण त्रिवेदींच्या मते एकच असून ते रुद्रटाच्या काव्यालंकारावरील नमिसाधुकृत टीकेत आहे ( १, २ ननु दंडिमेधाविरुद्रभामहादिकृतानि सन्त्येवालंकारशास्त्राणि । ). पण असल्या आधारावर दंडीच्यापूर्वी भामह होऊन गेला असें सिद्ध कसें होणार, किंवा नुसते संभवनीय तरी कसें दिसणार ? भामह हा प्राचीन ग्रंथकार आहे याविषयी वादच नाही. तेव्हां त्याला पूर्व किंवा चिरन्तन हें विशेषण लावल्याने विशेष कांही सिद्ध होतें असें थोडेच आहे ? पूर्वीच्या ग्रंथकारांचा कोठेंहि उल्लेख करावयाचा झाला म्हणजे झाडून साऱ्या प्राचीन ग्रंथकारांची झडती घेतली पाहिजे असें या विद्वानांचे मत आहे की काय ? पण असल्या आधारांवर जर कांहीं अनुमान काढावयाचें ठरलेंच तर त्रिवेदींच्या नामावळींतील सर्व ग्रंथकारांत नमिसाधु हाच प्राचीन असल्यामुळे त्याने मेधावीच्यापूर्वी दंडीचा उल्लेख केलेला असल्याकारणाने त्रिवेदींच्या अनुमानाचा सारा पायाच ढांसळून पडतो. कारण मेधावी हा भामहाच्या पूर्वीचा आहे व त्यामुळें दंडी भामहाच्या फारच पूर्वीचा ठरेल. तात्पर्य दंडीच्या प्राचीनत्वासंबंधाने कांहीं ठिकाणी उल्लेख केलेले नसले, तरी त्यांहून प्राचीन ग्रंथकाराचा तशा प्रकारचा एकहि उल्लेख त्या अभावरूप पुराव्याला अप्रमाण ठरविण्यास पुरे आहे. त्रिवेदींच्या अनुमानासंबंधानें दुसरी गोष्ट अशी कीं, त्यांनी सांगितलेले ग्रंथकार इ स. १४ व्या शतकांतील असल्यामुळे त्यांच्यापूर्वी सात आठशे वर्षे होऊन गेलेल्या ग्रंथकारांच्या सापेक्ष कालानुक्रमासंबंधानें त्यांच्या विधानांवर कितपत विसंबून रहावें हा प्रश्नच आहे. असल्या अर्वाचीन ग्रंथकारांवर कालनिर्णयाच्या कामीं विसंबून राहिल्यास फारच घोटाळा उडणार आहे. उदाहरणार्थ अलंकारसर्वस्वकारानें उद्भटालाहि **चिरन्तन** हें विशेषण लाविलें आहे. तेव्हां त्रिवेदींच्या विचारसरणीप्रमाणें उद्भटहि दंडीच्या पूर्वीचा ठरूं लागेल. अलंकारसर्वस्वांतील या वचनावर टीका करतांना **जयरथ** नामक टीकाकारानें प्राचीन ग्रंथकारांमध्येंच दंडीचा उल्लेख केला आहे, हेंहि त्रिवेदींच्या ध्यानांत आलेलें दिसत नाहीं. तात्पर्य, त्रिवेदीप्रभृतीचें भामहाच्या

पूर्वगामित्वासंबंधाचें अलंकारसर्वस्वावर विसंबून दिलेले मत मुळीच विचारार्ह नाही. अशा प्रकारच्या एकतर्फी विधानांवरून केलेली अनुमानें किती फोल असतात हे दाखविण्यासाठीच कीं काय अभिनवगुप्ताच्या अभिनवभारतींत रसप्रक्रियेसंबधानें विचार करितांना दण्डीला चिरंतन म्हटलें आहे ( चिरन्तनानां चायमेव पक्षः । तथाहि दण्डिना स्वालंकारलक्षणेऽभ्यधायि । पान २७४ ). अलंकारसर्वस्वापूर्वी सुमारें दीडशे वर्षे झालेल्या अभिनवभारतीत दण्डीला चिरन्तनांत अन्तर्भूत केलें आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे

( आ ) यमक आणि शब्दालंकार यांचे भेद भामहानें विशेष सूक्ष्मपणे दर्शविले नाहींत, पण दंडीनें त्यांची चर्चा स्वतंत्र परिच्छेदामध्ये सविस्तर केली असून उपमे-चेहि पोटभेद त्यानें पुष्कळ दिले आहेत; म्हणून भामह हा पूर्वीचा व दंडी नंतरचा असें कित्येक अनुमान करितात. पण आमच्या मते ह्या वस्तुस्थितीवरून अगदीं उलट अनुमान काढिले पाहिजे असे आहे. कारण साहित्यशास्त्राच्या इतिहासांत अलंकारविषयक कल्पनांच्या विकासासंबंधानें असें आढळून येतें की, ग्रंथकार जो जों प्राचीन तो तो त्याचे लक्ष यमकादि शब्दालंकारांकडे अधिक असून उत्तरोत्तर तें अर्थालंकार व त्याचे शास्त्रीयदृष्ट्या सूक्ष्म भेद यांकडे लागलेले दिसते. उदाहरणार्थ भरताच्या नाट्यशास्त्रात ( १६, ५१-६३ ) यमकाचे प्रकार दहा सांगितले असून भामहानें ( २, ९ ) पांचच सांगितले आहेत. कालिदासालाहि यमकांची मोठी आवड असून रघुवंशाच्या नवव्या सर्गात तर त्यानें प्रतिश्लोकांत सुंदर यमक साधिलें आहे. इ. स. १५० मधील रुद्रदामन् याच्या एका कोरींव लेखांतहि यमकें आढळतात. पण उत्तरकालीन ग्रंथकार यमकाला फार मान देत नाहींत. उद्भटानें अनुप्रासाला थोडें तरी स्थान दिलें आहे, पण यमकाची त्यानें वास्त-पुस्तहि घेतलेली नाहीं, आणि मम्मटानें त्याचा विचार अगदीच संक्षेपानें केला आहे. शृंखलाबंध, अक्षरच्युतक, प्रहेलिका इत्यादि कूटालंकार सुबन्धु व बाण यांनाहि परिचित होते. दंडीचें उपमाविषयक विवेचन अशास्त्रीय असून भरताच्या विवेचनाला धरून आहे पण उपमेचे भेद व्याकरणशास्त्राच्या दृष्टीनें प्रथमतः करणारा भामहच असून पुढे उद्भट व मम्मट यांनींहि तीच पद्धति उचलली. ही वस्तुस्थिति लक्षांत घेतल्यास भामहाच्यापूर्वी दंडी होऊन गेला असेंच म्हणावें लागतें. नाहींतर उपमेचे अनेक प्रकार सांगणाऱ्या दंडीला भामहाच्या मागाहूनचा ठरविल्यास त्याच कोटिक्रमानें भामहाला नाट्यशास्त्रापूर्वीचा ठरवावा लागेल. पण

हे धाडस कोणी केलेले नाही. असो. तात्पर्य एवढेच की भामहाला दंडीच्या पूर्वीचा ठरविण्यासाठी दिलेले हे दुसरे कारण व्यर्थ आहे. निदान त्यावरून तितक्याच सप्रमाण रीतीने दंडीहि भामहाच्या पूर्वीचा ठरेल. तेव्हां आमच्या मते खरा प्रकार कदाचित् असा असेल की, दंडी व भामह हे निरनिराळ्या साहित्यसंप्रदायाचे अनुयायी असून दंडीचा ओढा भरताच्या संप्रदायाकडे व भामहाचा ओढा अर्थालंकारांना विशेष महत्व देणाऱ्या संप्रदायाकडे होता.

( इ ) काव्यादर्शावर तरुणवाचस्पति याची टीका आहे, तीत दंडीने कित्येक ठिकाणी भामहाच्या मतांचे खंडन केले आहे असे त्या टीकाकाराने म्हटले आहे. उदाहरणार्थ परि. १, २३–२९; २, २३५–३५८; ३, १२७ यांवरील टीका पहा. परंतु या टीकाकाराच्या मताला किती प्रामाण्य द्यावयाचे हा विचारच आहे. तरुणवाचस्पति .हा दंडी व भामह यांच्या मानाने अर्वाचीन आहे. इ. स. १००० च्या सुमारास होऊन गेलेल्या धनञ्जयाच्या **दशरूपां**तील अवतरणे त्याने घेतली आहेत ( उदाहरण काव्या. परि २, श्लो. २८१ वरील टीका पहा ) आणि ११ व्या शतकांतील भोजदेवाच्या सरस्वतीकंठाभरणांतील रीतीच्या षड्विध विभागाचाहि त्यानें उल्लेख केलेला दिसतो. म्हणजे तो निदान ११ व्या शतकानंतरचा आहे. टीका लिहितांना त्याला परस्परविरोधी अशी दोन मतें आढळली, तेव्हां टीकाविषय दंडी असल्यामुळे तो भामहाचा दोष काढून त्याच्या मताचे खंडन करीत आहे असे त्याला वाटले असावे. प्राचीन ग्रंथकारांचा कालानुक्रम ठरवितांना अर्वाचीन टीकाकारांचे प्रामाण्य जपूनच कसे मानिले पाहिजे हे आणखी एका उदाहरणावरून स्पष्ट होईल मम्मटाच्या काव्यप्रकाशावरील एक टीकाकार चक्रवर्तिभट्टाचार्य याच्या मते काव्यप्रकाशाच्या १० व्या उल्लासांत अलंकारसर्वस्वांतील ‘ राजति तटीय ’ इत्यादि पद्यावर चर्चा केली आहे व नागोजी भट्टानेहि आपल्या उद्योतनामक उपटीकेत तसेंच म्हटले आहे. पण अलंकारसर्वस्वाचा टीकाकार जयरथ याच्या मते सर्वस्वकारानेच काव्यप्रकाशांतील वचनावर खंडनात्मक चर्चा केली आहे ( अलंकारसर्वस्व पा. ११९ ). यांपैकीं जयरथ हा १२०० च्या सुमारास झाला असून काव्यप्रकाशकार मम्मट व अलंकारसर्वस्वकार रुय्यक या दोघांनाहि निकट होता. अशा स्थितीत तरुणवाचस्पतीचें विधान इतर चांगल्या प्रमाणाच्या अभावीं मान्य करणे धाडसाचेंच होईल.

( ई ) कथा आणि आख्यायिका या भिन्न होत असे भामहाने म्हटलें आहे.

परंतु त्या संबंधाने दंडीचें मत ' तत् कथाऽऽख्यायिकेत्येका जातिः संज्ञाद्वयाङ्किता । ' ( १,२८ ) म्हणजे कथा आणि आख्यायिका मिळून नांवें दोन असलीं तरी प्रकार तोच असे आहे. भामहानें या दोहोंतील भेदांची कारणें दिली आहेत तीं अशीः—(१) ' सोच्छ्वासाऽऽख्यायिका मता ' ( भामह १.२५ ) म्हणजे जीत गोष्टीच्या भागांस उच्छ्वास म्हणतात ती आख्यायिका समजावी; (२) ' वृत्तमाख्यायते तस्यां नायकेन स्वचेष्टितम् ' । म्हणजे आख्यायिकेंत नायक आपले वृत्त आपणच सांगतो; (३) वक्त्रं चापरवक्त्रं च काले भाव्यर्थशंसि च ' । म्हणजे आख्यायिकेत प्रति उच्छ्वासाच्या आरंभीं वक्त्र किंवा अपरवक्त्र या वृत्तांतील पद्य असून त्यांतील अर्थ पुढील कथाभागाचा सूचक असावा; (४) ' कवेरभिप्रायकृतैः **कथनैः** कैश्चिदङ्किता ' । म्हणजे कवीच्या इच्छेस येईल त्या खुणेच्या शब्दांनी आख्यायिका युक्त असावी; (५) ' कन्याहरणसंग्रामविप्रलंभोदयान्विता ' म्हणजे आख्यायिकेंत कन्याहरण, युद्ध, प्रेमी स्त्री पुरुषांचा विरह व नायकाचा उत्कर्ष असे प्रसंग असावे. याच्या उलट कथानामक काव्यभेदांत वक्त्र, किंवा अपरवक्त्र हीं वृत्तें नसावीं, तीत उच्छ्वास नसावे व नायकाचे पराक्रम तींत नायकानें स्वतः न सांगतां दुसऱ्या कोणी सांगावे. आख्यायिकेला अवश्य असलेल्या पहिल्या तीन गोष्टी कथेला अवश्य असलेल्या या तीन गोष्टीच्या उलट आहेत. आख्यायिकेपैकी ४ व ५ या गोष्टी कथेसंबधानें त्याने सांगितल्या नाहीत यावरून त्याहि कथेंत नसाव्या असाच भामहाचा अभिप्राय दिसतो. आतां हे जे भेद भामहानें सांगितले त्यांतील एक वगळून इतरांचें खडन दंडीनें केले आहे. कथा व आख्यायिका यांतील भेद पूर्वपक्ष रूपानें मांडतांना दंडी म्हणतो ' तयोराख्यायिका किल । नायकेनैव वाच्याऽन्या नायकेनेतरेण वा ' । म्हणजे कथा व आख्यायिका यांपैकी आख्यायिकेंतील वृत्त नायकानें स्वतः सांगितलेलेच असावें, पण कथेतील वृत्त नायकानें किंवा दुसऱ्या कोणीहि सांगितलेले चालते असे कित्येकांचें म्हणणे आहे ( १,२३—२४ ). पण भामहाचें मत वर दिले आहे त्यावरून दंडीने सांगितलेला पूर्वपक्ष भामहाच्या मताचा अनुवाद नव्हे हे उघड आहे. अर्थात दंडीची चर्चा भामहाला उद्देशून नव्हे. आख्यायिकांतहि कित्येक ठिकाणीं नायकाशिवाय दुसऱ्यानें वृत्त सांगितलेलें असतें, अर्थात् वृत्त स्वतः सांगणें किंवा दुसऱ्यानें सांगणें हें भेदाचें कारण होऊं शकत नाही ( अपि त्वनियमो दृष्टस्तत्राप्यन्यैरुदीरणात् । अन्यो वक्ता

स्वयं वेत्ति कीदृग्वा भेदकारणम् । काव्यादर्श १,२५ ) असे दंडीचे त्या पूर्वपक्षाला उत्तर असून उच्छ्वास व वृत्तयोजना यांसंबंधानें दंडीचें उत्तर असें आहे कीं कथेतील विभागांना लंभ ( किंवा बृहत्कथेंतील विभागाप्रमाणें लंबक ) म्हणत असले तरी त्यांना उच्छ्वास म्हटल्यानेंहि कांहीं बिघडत नाहीं आणि कथांत जसा आर्याच्छंद येतो, तशी वक्त्र व अपरवक्त्र ही वृत्ते प्रसगवशात् आली तरी त्यामुळेंहि कांही हानि होणार नाहीं ( वक्त्रं चापरवक्त्रं च स्वोच्छ्वासत्वं च भेदकम् । चिह्नमाख्यायिकायाश्चेत्प्रसंगेन कथास्वपि । आर्यादिवत्प्रवेशः किं न वक्त्रापरवक्त्रयोः । भेदश्च दृष्टो लंभादिरुच्छ्वासो वाऽस्तु किं ततः । ( १,२६–२७ ). कवीला अभीष्ट असा सांकेतिक शब्द व कन्याहरणादि प्रसंगांसंबंधानें दंडीच्या म्हणण्याचा भावार्थ असा आहे कीं, कन्याहरणासारखे प्रसंग सर्गबंध काव्यांतहि येतात, केवळ आख्यायिकांतच ते येतात असे नाहीं आणि शिशुपालवध काव्यांतील प्रतिसर्गाच्या अंतिम पद्यांत **श्री** हें पद किंवा किरातार्जुनीयांत **लक्ष्मी** हे पद, किंवा सेतुबंधकाव्यांत अनुराग हा शब्द कवीने योजिलेला आहे, तसा कोणी तो कथेत योजिल्यास तो दोषावह होईल असे नाही. त्याचे श्लोक असे, 'कन्याहरणसंग्रामविप्रलंभोदयादयः । सर्गबंधसमा एव नैते वैशेषिका गुणाः ॥ कविभावकृतं चिह्नमन्यत्रापि न दुष्यति ' । काव्या. १, २९–३० कथा व आख्यायिका हे भेद भामहानें उत्पन्न केलेले नसून ते व्याकरणमहाभाष्यकार पतंजलीलाहि परिचित होते व त्याने तसल्या कित्येक ग्रंथांचीं नांवेंहि दिली आहेत; यासंबंधाचे विवेचन पुढे दुसऱ्या भागांत येणारच आहे. येथे इतकें सांगितलें म्हणजे पुरे की सुबंधु व बाण यांनी दर्शविल्याप्रमाणें इ. स. ६ व्या शतकापूर्वींहि बराच काळ आख्यायिका नांवाचे प्रबंध अस्तित्वात होते व भामहानें त्याचीं जीं लक्षणे दिली आहेत तीं त्यांना लागू पडत होतीं. बाणानें कादम्बरीला ' कथा ' म्हटलें व त्यांत उछ्वास नाहीत, पण हर्षचरिताला आख्यायिका म्हटलें आहे त्यांत उच्छ्वास आहेत, वक्त्र व अपरवक्त्र ही वृत्ते आहेत. अमरकोशांतहि ' आख्यायिकोपलब्धार्था ' व ' प्रबन्धकल्पना कथा ' अशी दोघांची भिन्न लक्षणे दिली आहेत. तेव्हां दंडीची चर्चा भामहाला उद्देशूनच होती असे मानण्याचें कांहींच कारण नाहीं. विशेषतः भामहानें निर्दिष्ट केलेल्या लक्षणांतील एक लक्षण म्हणजे वृत्तकथन कोणी करावें यासंबंधाचें मत दंडीनें खंडन केलेल्या माताहून वेगळ्या प्रकारचें असल्यामुळें तर दंडीपुढें भाम-

ह्याचा ग्रंथ होता असें मानतां येणें कठीणच आहे. या बाबतीत प्रो. दे यांनीं आपल्या साहित्यशास्त्राच्या इतिहासांत ( व्हा. १ पान ६७ ) जें विधान केलें आहे की, दण्डी भामहावर हल्ला करितो, ते चूक आहे असें वरील विवेचनावरून दिसून येईल.

( उ ) उपमा अलंकारामध्यें कोणत्या गोष्टी दोषावह होतात यांविषयीं लिहितांना दंडी म्हणतो ' न लिंगवचने भिन्ने न हीनाधिकताऽपि वा । उपमा दूषणायालं यत्रोद्वेगो न धीमताम् ' । ( २, ५१ ) म्हणजे उपमान व उपमेय यांतील लिंगभेद, वचनभेद, न्यूनत्व किंवा आधिक्य हीं कांहीं ठिकाणी दोषावह असली तरी जेथे बुद्धिमान् पुरुषाला त्यांमुळे कसेंसे न वाटतां साम्यप्रतीति होते तेथे ती दोषावह होत नाहींत. यांत चारच गोष्टी उपमेला दोषावह म्हणून दंडीनें सांगितल्या आहेत, आणि भामहाने सात प्रकारचे दोष येऊं शकतात असें म्हटलें आहे. पण म्हणून भामह आधीचा व दंडी नंतरचा असे म्हणण्याला आधार मिळू शकत नाही. मेधावीनें सात उपमादोष सांगितल्याचे भामह स्वतःच सांगतो व त्यांचीच लक्षणे व उदाहरणें मी देतो असे तो म्हणतो हें पूर्वीं दाखविलेंच आहे ( भामह २-४० ). तेव्हां उपमेतील दोषस्थले हा विषय फार प्राचीन आहे; तो कांहीं भामहानें उत्पन्न केलेला नव्हे. पण यावरून जर कोणाच्या पूर्वगामित्वासंबंधाने अनुमान करतां येणे शक्य असेल तर ते दंडीच्याच होय. कारण दंडीने चारच उपमादोष सुचविले, पण मेधावीनें त्यांत भर घालून ते सात केले व पुढे भामहाने मेधावीचा अनुवाद केला असें म्हणणें सयुक्तिक असून त्यावरून दंडी हा आधी होऊन गेला असें म्हणतां येईल. वामनाने काव्यालंकारसूत्रांत ( ४, २, ८ ) उपमेचे दोष सहा प्रकारचे सांगितले आहेत ( हीनत्व, आधिक्त्व, लिंगभेद, वचनभेद, असादृश्य व असंभव ).

( ऊ ) ' गतोऽस्तमर्को भातीन्दुर्यान्ति वासाय पक्षिणः ' हें वर्णनात्मक श्लोकार्ध भामह व दंडी या दोघांनीहि चर्चेला घेतलें असून त्याविषयी निरनिराळी मतें प्रकट केलीं आहेत. भामह म्हणतो ' इत्येवमादि किं काव्यं वार्तामेनां प्रचक्षते ' ( २, ८७ )-म्हणजे ' गतोऽस्तमर्को ' इ. वर्णन हे कांहीं काव्य नसून त्याला वार्ता असें इतर लोक नांव देतात. भामहाच्या या विधानांतील **किंकाव्यं** शब्दाचा अर्थ वाईट काव्य असाहि होईल. पण दंडी त्यासबंधानें म्हणतो कीं, ' इतीदमपि साध्वेव कालावस्थानिवेदने ' । ( २, २४४ )-म्हणजे ' गतोऽस्तमर्को '

इत्यादि वर्णन त्यांतील स्पष्टार्थासाठी केलेलें नसून संध्याकाळ झाल्यामुळे कांही विशिष्ट कार्यें करण्याचा समय आला असें ध्वनित करण्यासाठी असेल तर चांगलें काव्यच आहे. हा जो दोघांमध्ये मतभेद आहे त्यावरून प्रो. रंगाचार्य व त्रिवेदी यांनी भामहाचे पूर्वगामित्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पण भामहाच्या ' इत्येवंमादि किंकाव्यं वार्तामेनां प्रचक्षते ' या शब्दांवरून उघड होते की तो परिचित असें वाक्य उदाहृत करून तें वार्तेचे उदाहरण उत्तम काव्य नव्हे असें सांगत आहे. ' लिम्पतीव ' इत्यादि श्लोकार्धाची चर्चा करितांना दंडीनें ' इतीदमपि ' असे शब्द घालून तें श्लोकार्ध आपलें नसून लोकप्रसिद्ध अशा एका वचनावर आपण चर्चा करीत आहों असें याचप्रमाणे दर्शविलें आहे वार्ता हा अलंकार भामहापूर्वी झालेल्या किंवा त्यापेक्षां अर्वाचीन नव्हे अशा भट्टीने सांगितला आहे ( भ. का. १०, ४५ ) व दंडीनें ' तच्च वार्ताभिधानेषु वर्णनास्वपि दृश्यते ' । ( १ ८५ ) या शब्दांत त्याचाच संबंध आणिला आहे असें दिसतें. पण स्वतः दंडीनें तो अलंकार म्हणून वर्णिलेला नाहीं. त्याला तो बहुधा मान्य नसावा व म्हणूनच त्याप्रकारचीं उदाहरणें स्वभावोक्ति अलंकाराची म्हणून त्यानें दिली आहेत. त्यांतील पूर्वीच्या एखाद्या ग्रंथकारानें दिलेलें ' गतोस्तमर्को ' इत्यादि उदाहरण घेऊन तें ध्वनितार्थानें घेतल्यास चांगल्या काव्याचे उदाहरण होईल व वाच्यार्थानें घेतल्यास तें काव्य नव्हे असें दंडीनें म्हटलें आहे. या शब्दांवरून किती प्रकारचे अर्थ निघूं शकतील याचें विवेचन काव्यप्रकाशाच्या ५ व्या उल्लासांतहि केले आहे ( वामनाचार्यांची आवृत्ति पा. २४० ). तात्पर्य भामहानें उल्लेखिलेल्या ( ४, ८ ) व शाबरभाष्यांतहि आलेल्या ( भाग १ पा. १३ व ४९७ ) **दशदाडिमादि** वाक्याप्रमाणे * ' गतोस्तमर्को ' इत्यादि वाक्य सुप्रसिद्ध असें मूर्धाभिषिक्त उदाहरण असून भामहानें स्वतः रचिलेलें नव्हे व त्यावरून भामह हा दंडीच्यापूर्वी होऊन गेला असें म्हणणे युक्तीस धरून होणार नाहीं.

---

* समुदायार्थशून्यं यत्तदपार्थकमिष्यते । दाडिमानि दशापूपाः षडित्यादि यथोदितम् ॥ भामह ४, ८. ' वृद्धिरादैच् ' या सूत्रावरील ' इतरथा ह्यसंप्रत्ययो यथा लोके ' ह्या वार्तिकावरील पातञ्जलमहाभाष्यांत ( कीलहॉर्नप्रत व्हाल्यूम १ पान ३८ येथें ) ' अनर्थकानि ' असें म्हणून ' दश दाडिमानि षडपूपाः कुण्डमजाजिनं पललपिण्डः ' इत्यादि वाक्यें उदाहरणें म्हणून दिली आहेत.

(ऋ) भामह व दंडी या दोघांनीहि 'अद्य या मम गोविन्द' इत्यादि श्लोक प्रेयो-लंकाराचे उदाहरण म्हणून दिला आहे. यासंबंधाने त्रिवेदीचा कोटिक्रम असा आहे: जेव्हां भामहाला दुसऱ्या ग्रंथांतूत अवतरण घ्यावयाचे असते तेव्हां आपण ते कोठून करीत आहों हे तो सांगतो, व दंडी तसे करीत नाही; उदाहरण 'लिम्पतीव' इत्यादि वाक्य कोठून घेतले हें दंडीने सांगितलेले नाही पण या कोटि-क्रमाच्या योगानें दंडीच्या माथी त्रिवेदींनी व्यर्थ दोषारोप केला आहे असें म्हणावे लागेत. 'इतीदमपि' असे शब्द घालून आपण दुसऱ्या सुप्रसिद्ध श्लोकाची चर्चा करीत आहों असे दंडीने स्पष्ट दर्शविले आहे; आणि भामहाच्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रतीचा विचार करितां, त्यावर सर्वस्वी विसंबून रहाण्या-इतका तो निर्मळ मूळाप्रमाणे राहिलेला नाही असे दिसून येतें, हे पूर्वी सांगि-तलेच आहे. तेव्हां भामह हा आपल्या अवतरणाचे मूळ सांगतो असें म्हणण्याने कांहीच निष्पन्न होत नाही. पण 'अद्य या मम' इत्यादि श्लोकाचा विचार करतां दुसऱ्याहि गोष्टी लक्षांत येण्यासारख्या आहेत. स्वतः भामहाने **प्रेयः** व **उर्जस्वि** हे अलंकार सांगितले नसून प्रत्येकाचा उल्लेख मात्र केला आहे व एक एक उदा-हरण दिले आहे. पण दंडीनें दोन्ही अलंकार म्हणून स्वतः व्याख्यांसहित दिले असून प्रेयोलंकाराची दोन उदाहरणे सांगितली आहेत. या वस्तुस्थितीवरून सरळ अनुमान काढावयाचे तर, भामहाने पूर्वींच्या ग्रंथांत वर्णिलेले हे दोन्ही अलंकार पाहून ते वस्तुतः अलंकार नव्हेत असे दर्शविण्यासाठी पूर्वग्रंथकारांच्या परिपाठाप्रमाणे त्यांचा नुसता सोदाहरण उल्लेख मात्र केला, असें म्हटले पाहिजे. याहून दुसरे अनुमान काढून दंडीने ते उदाहरण भामहाच्या ग्रंथांतून घेतलें असें म्हणणे म्हणजे सुताने स्वर्ग गांठणेच होय. कारण तसे म्हटल्यास भामहानेच दंडीच्या प्रेयोलंकाराच्या दोन उदाहरणांतील एक आपल्या ग्रंथांत दिलें असें तितक्याच सयुक्तिकपणे म्हणतां येईल. असो. 'अद्य या मम गोविन्द' हा श्लोक विदुरानें श्रीकृष्ण घरी आला असतां त्याला उद्देशून जें म्हटले तें दर्श-विणारा असून महाभारताच्या उद्योगपर्वांत (अ. ८९ श्लो. २४) 'या प्रीतिः पुण्डरीकाक्ष तवागमनकारणात् । सा किमाख्यायते तुभ्यमन्तरात्मासि देहिनाम् ' ॥ या श्लोकाशी समानार्थक आहे.

(ॠ) भामहाने उपमारूपक (३, ३४), ससन्देह (३, ४२), अनन्वय (३, ४४) आणि उत्प्रेक्षावयव (३, ४६) हे अलंकार स्वतंत्रपणें निरूपिले

आहेत. पण दंडी त्यांना निरनिराळे अलंकार मानीत नसून त्यानें उपमारूपकाचा रूपकांत, ससन्देह व अनन्वय यांचा उपमेत आणि उत्प्रेक्षावयवाचा उत्प्रेक्षेत समावेश केला आहे. तो म्हणतो ' अनन्वयससन्देहावुपमास्वेव दर्शितौ । उपमारूपकं चापि रूपकेष्वेव दर्शितम् ॥ उत्प्रेक्षाभेद एवासावुत्प्रेक्षावयवोऽपि च ' । ( २, ३५८–३५९ ). या प्रकारावरून दंडी हा भामहाने सांगितलेल्या अलंकारांची निराळी मांडणी करतो असे मानून भामह हा पूर्वीचा व दंडी नंतरचा असे त्रिवेदीप्रभृतींनीं ठरविले. पण हे सर्व अलंकार भट्टिकाव्यांत स्वतंत्र उदाहरणांनी भट्टीनें दाखविले असल्यामुळे दंडीने भामहाची विभागणी पुढे ठेवूनच आपलें मत सांगितले असलें पाहिजे, दुसऱ्या कोणा भट्टीपूर्वीच्या आलंकारिकांच्या विभागणीला उद्देशून नव्हे असे ठाम म्हणावयास कांही प्रमाण नाही. याशिवाय आणखीहि एका कारणानें त्रिवेदीप्रभृतींच्या अनुमानाला बाध येतो. भामहाने उपमेयोपमा अलंकार स्वतंत्र म्हणून वर्णिला आहे ( ३, ३७ ); पण दंडीनें तसें केलें नसून त्यानें वर्णिलेला अन्योन्योपमा अलंकार ( २, १८ ) म्हणजेच उपमेयोपमा होय. तेव्हां दंडीपुढे जर भामहाचाच ग्रंथ असता, तर त्याने उपमेयोपमेसंबंधानें सुद्धां इतर चार अलंकाराच्या बाबतींत म्हटल्यामुळें उपमेतच तिचा समावेश होतो असें म्हटलें असतें. पण तो उपमेयोपमा या नांवाचा उल्लेख न करतां अन्योन्योपमा या नांवानें तो अलंकार वर्णीत असल्यामुळें भामहाच्या ग्रंथाला उद्देशून त्याचे उपर्युक्त चार अलंकारविषयक विधान नव्हे असें उघड दिसते.

( ल ) दंडीने जे काव्याचे ' अपार्थं व्यर्थमेकार्थं ' इत्यादि दहा दोष सांगितले आहेत ( काव्यादर्श ३,१२५–१२६ ) ते तसेच भामहानेंहि सांगितले असून ( ४,१–२ ) ' प्रतिज्ञाहेतुदृष्टान्तहीनं दुष्टं च नेष्यते ' या शब्दांनीं आणखी अकरावा दोष सांगितला आहे आणि त्याची चर्चा सबंध पांचव्या परिच्छेदांत केली आहे. आतां हा जो प्रतिज्ञाहेतुदृष्टान्तहानि नांवाचा दोष त्या विषयींची चर्चा शुष्क व गूढ असून तिच्यापासून अर्थनिष्पत्ति कांहीच नाही, ' प्रतिज्ञाहेतुदृष्टान्तहानिर्दोषो न वाप्यसौ । विचारः कर्कशः प्रायस्तेनालीढेन किं फलम् । ' असें दंडीनें म्हटलें आहे ( ३,१२७ ). दंडीची ही टीका भामहाच्या चर्चेवर आहे असें मानून भामहानंतरचा दंडी होय असें अनुमान करण्यांत आलें आहे. परंतु साहित्यशास्त्रविषयक विवेचनांत प्रतिज्ञाहेतुदृष्टान्तहानीसारख्या न्यायशास्त्र-

विषयक गोष्टींची चर्चा कांही भामहानें प्रथम चालू केलेली नाही. नाटयशास्त्रकार भरतानें सुद्धां जे काव्याचे दहा दोष सांगितले आहेत, त्यांत **न्यायादपेत** असा एक दोष असून ' न्यायादपेतं विज्ञेयं प्रमाणपरिवर्जितम् ' म्हणजे ज्याला कांही प्रमाण नाहीं असं विधान केल्यास न्यायादपेत हा दोष होतो अशी त्याची व्याख्या केलेली आहे ( अ. १६,८९ ). प्रमाण हा तर न्यायशास्त्राचा विशेष विषय आहे. तेव्हां काव्यादर्शातील टीका जर कोणाला उद्देशून असेल तर ती भरताच्या नाटयशास्त्राला किंवा नाटयशास्त्रांतील या साध्या व्याख्येचा अनुवाद करून त्याचें विस्तृत विवेचन करणाऱ्या कोणा दुसऱ्या आलंकारिकाला उद्देशून असली पाहिजे. कारण भामहाच्या सबंध पांचव्या परिच्छेदांतील चर्चेवरच जर दंडीची ही टीका असती तर ' तेनालीढेन किं फलम् ' एवढ्या साध्या मृदु शब्दांनीच दंडीनें भामहाची बोळवण केली असती हें असंभवनीय दिसते. भरतानें सांगितलेले काव्यदोष ( १६,८४ ) अर्थहीन, एकार्थ, गूढार्थ, अर्थान्तर, विसन्धि, शब्दच्युत ( किंवा 'शब्दहीन' १६,८० ), विषम, भिन्नार्थ, अभिप्लुतार्थ आणि न्यायादपेत हे होत. यांपैकीं पहिले सात हे भामह व दंडी यांच्या अपार्थ, एकार्थ, ससंशय, अपक्रम, विसन्धि, शब्दहीन आणि भिन्नवृत्त या दोषांशीं थोडेबहुत जुळतात. नाट्यशास्त्रांतील भिन्नार्थ हा दोष आणि असभ्य किंवा ग्राम्य हे एकच होत व अभिप्लुतार्थाची व्याख्या त्यांत ' यत्पादेन समस्यते ' ( यत्पादे न समस्यते असा पदच्छेद आहे कीं काय ? ) अशी दिली आहे. भामहानें ज्यांना **यतिभ्रष्ट,** व **व्यर्थ** असें म्हटलें आहे ते नाट्यशास्त्रांतलि **विषम** व **अर्थहीन** यांत अनुक्रमें अंतर्भूत होतात. अलंकारशास्त्रकारांनीं दोषविभाग सांगतांना कांहीं दोषांचीं नांवें न्यायसूत्रांतून देखील घेतलेली आढळतात. ' प्रतिज्ञाहेतुदृष्टान्तहानि ' या प्रयोगाशीं न्यायसूत्रांतील ( अ. ५ पा. २, सू. १ ) ' **प्रतिज्ञाहानिः** प्रतिज्ञान्तरं प्रतिज्ञाविरोधः प्रतिज्ञासंन्यासः **हेत्वन्तर**मर्थान्तर**निरर्थक**माविज्ञातार्थ**मपार्थक**मप्राप्तकालं न्यूनमधिकं **पुनरुक्त**मननुभाषण...प्रतिभा...निग्रहस्थानानि ' हें सूत्र ठेविल्यास ही गोष्ट लक्षांत येईल.

भामहाला दंडीच्या पूर्वींचा मानणाऱ्यांच्या कोटिक्रमांचें येथवर परीक्षण केलें; आतां उलट म्हणजे दंडीला भामहाच्या पूर्वींचा होय असें म्हणणारे कोणत्या आधारावर म्हणतात तें पाहूं.

( १ ) 'हिमापहामित्रधरैर्व्याप्तं व्योमेत्यवाचकम्' असे भामहाने ( १, ४१ ) म्हटले असून हा भाग ज्यांत आला आहे ते सार पद्य **प्रहेलिकेचें** उदाहरण म्हणून दंडीनें दिले आहे, तें असें: ' विजितात्मभवद्वेषिगुरुपादहतो जनः । हिमापहामित्रधरैर्व्याप्तं व्योमाभिनन्दति' ॥ अ. ३. १२०. यांतील **विजितात्म**च्या जागी तरुणवाचस्पतीच्या टीकेंत विजितान्न असा पाठ आहे. हे पद्य शार्ङ्गधर-पद्धतीत दंडीच्या नांवावर दिले असून त्याचे स्पष्टीकरणहि त्यांत आले आहे. तेव्हां तें खरोखर दंडीचे असल्यास त्याचे अवतरण घेणारा भामह उघडच नंत-रचा ठरतो. दंडीच्या पूर्वगामित्वासंबंधानें हे कारण बरेच दृढ आहे, व त्याचे निराकरण करावयाचे तर दंडीने ते पद्य कोणा प्राचीन ग्रंथांतून घेतलें असून भामहानेंहि त्याच ग्रंथांतून ते घेतले असे मानणे हाच कायतो त्याचा एक मार्ग आहे पण हा मार्ग दिसतो तितका सुगम नाही. त्याच्याविरुद्ध सुद्धां कांही बळकट कारणे आहेत. ' लिम्पतीव ' इत्यादि पद्याशिवाय दुसरें कोणतेहि पद्य दंडीने दुसऱ्याच्या ग्रंथातून घेतलेले असे निःसंदिग्धपणाने दाखवितां येत नाही. जी पद्ये इतर ग्रंथांतून दंडीने घेतली असावी असे कित्येकांना वाटते ती वाद-विषय होऊन राहिली आहेत. तेव्हां काव्यादर्शातील एखादे पद्य घेऊन ते दुसऱ्या ग्रंथांतून अवतरण घेतले आहे असे म्हणणे म्हणजे तसे न मानिल्यास त्यावरून निघणारे अप्रिय अनुमान टाळण्यासाठी निष्कारण कांही गोष्ट गृहीत धरण्यासारखें होय. प्रहेलिकांचे विवेचन करितांना दंडीने ' दोषानपरिसंख्येयान्मन्यमाना वयं पुनः । साध्वीरेवाभिधास्यामस्ता दुष्टा यास्त्वलक्षणाः ' । ( ३, १०७ ) म्हणजे आम्ही प्रहेलिकांमध्ये अनेक दोष असतात असे जाणत असल्यामुळे चांगल्या प्रहेलिकाच देऊं. ज्या प्रहेलिकांत पूर्वी सांगितलेली लक्षणें नसतील त्या अर्थात् दोषयुक्त समजाव्या, असें म्हटले असल्यामुळे त्याने दिलेली प्रहेलिकांची उदाहरणे दोष टाळण्यासाठी त्याने स्वतःच रचिलेली असावी असे मानणे युक्त दिसते.

( २ ) दंडीचे उपमाविषयक विवेचन शास्त्रीय दृष्टीने केलेले नाही भामहाच्या विवेचनांत सूक्ष्म शास्त्रीय दृष्टि अधिक दिसून येते तसेच दंडीने अनुप्रासाचें विवरण फारच संक्षेपानें केले असून यमकावर फार विस्तार केला आहे. यास्तव भामहाच्या पूर्वी दंडी झाला असावा असे म्हणणे आहे. परंतु हें प्रमाण फारसे बळकट नाही. कारण अग्निपुराणांतील विवेचन अनेकदां भामहावरून घेतलेलें दिसत असतां त्यांतील उपमाविवरण दंडीच्या विवरणासारखेंच आहे, आणि

उलट रुद्रटासारख्या त्यानंतरच्या ग्रंथकारांनी सुद्धां यमकावर पुष्कळ ऊहापोह केला आहे.

( ३ ) भामहाच्या काव्यालंकारांत इतर साहित्यशास्त्रकारांच्या मताचें दिग्दर्शन अनेक ठिकाणी केलें असून कित्येक ठिकाणी त्या मतांची थट्टाहि केली आहे. या विरोधी टीकांचे विषय झालेली बहुतेक मतें दंडीच्या काव्यालंकारांत आढळत असल्यामुळें भामह हा दंडीनंतरचा असावा असा पक्ष स्थापन होऊं पहातो. वैदर्भ आणि गौड या दोन भाषासरणींत किंवा रीतींत भेद दाखवून त्यांतील वैदर्भी रीतीला मान्यता देणाऱ्या साहित्यकारांच्या मतांचें उपहासपूर्वक खंडन करून भामहानें त्यांना उपरोधिकपणें सुधियः म्हणजे मोठे बुद्धिवान् असें विशेषण लाविलें आहे. तो म्हणतो, ' वैदर्भमन्यदस्तीति मन्यन्ते **सुधियोऽपरे** । तदेव च किल ज्यायः सदर्थमपि नापरम् । गौडीयमिदमेतत्तु वैदर्भमिति किं पृथक् । गतानुगतिकन्यायान्नानाख्येयममेधसाम् ' ॥ ( भा. १,३१–३२ ). दंडीनें वैदर्भी व गौडी असा भेद काढिला असून वैदर्भीला चांगलें म्हटलें आहे, तो म्हणतो ' अस्त्यनेको गिरा मार्गः सूक्ष्मभेदः परस्परम् । तत्र वैदर्भगौडीयौ वर्ण्येते प्रस्फुटान्तरौ ॥ इति वैदर्भमार्गस्य प्राणा दश गुणाः स्मृताः । एषां विपर्ययः प्रायो दृश्यते गौडवर्त्मनि ॥' (दंडी १,४० व ४२ ). पण यांत दंडीनें भाषासरणि केवळ दोनच होत्या असें मात्र म्हटलें नाहीं असें **अनेको मार्गः** या त्याच्या शब्दांवरून स्पष्ट होते. त्याच्यापूर्वी पुष्कळ भाषासरणि भिन्न म्हणून मानिलेल्या होत्या. यास्तव दंडीपूर्वींच्या सर्व ग्रंथकाराचे ग्रंथ उपलब्ध होत तोंपर्यंत ( आणि ते तसे मिळणें दुरापास्तच आहे ), भामहाची टीका दुसऱ्या कोणाला उद्देशून नसून दण्डीलाच उद्देशून आहे असें म्हणणें धाडसाचें होईल. सुप्रसिद्ध बाणभट्टानें सुद्धां गौड भाषापद्धतीचा निर्देश केला असून तींत शब्दाचें अवडम्बर विशेष असते ( 'गौडेष्वक्षरडम्बरः' हर्षचरित, प्रा. श्लो. ७ ) असें म्हटलें आहे हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. येथें इतकें लक्षांत ठेविलें पाहिजे की दण्डीने पुढें प्रसिद्धीस आलेला ' रीति ' हा शब्द येथें वापरला नसून ' मार्ग ' व ' वर्त्म ' व ' पद्धति' ( काव्यादर्श १,५० ) हे शब्द वापरले आहेत आणि भामहानें ही ' रीति ' शब्द उपयोगांत आणिला नाहीं. भामह ' न नितान्तादिमात्रेण जायते चारुता गिराम् ' ( १–३६ ) या श्लोकार्धांत केवळ नितान्तादि शब्दांचा उपयोग केल्यानें वाणीला सौन्दर्य येत नाहीं असें म्हणतो. यांत नितान्तादि शब्द अत्यंत सुन्दर आहेत असें म्हणणाऱ्या

कोणत्या तरी साहित्यशास्त्रज्ञावर कोरडा आहे. भामहाच्या ग्रंथाची हस्तलिखितें थोडीं मिळतात. छापी सर्व प्रतीत ‘ न नितान्तादिमात्रेण ’ असें आहे. कदाचित् ‘ न हि वान्तादिमात्रेण ’ असे मूळ असण्याचा संभव आहे व तसें असल्यास दंडीच्या ‘ निष्ठ्यूतोद्गीर्णवान्तादि गौणवृत्तिव्यपाश्रयम् । अतिसुन्दरमन्यत्र० ’ यावर प्रतिकूल टीका भामहाने केली असें म्हणतां आले असते.

( ४ ) दंडीनें काव्याचे दहा गुण सांगितले असून त्यांची नांवें भरताच्या नाट्यशास्त्रांत आहेत ( १६,९२ ) तीच आहेत. भामहाने काव्यगुणांसंबंधानें फारशी चर्चा केलेली नाही; पण त्यानें प्रथम गुणांची संख्या कमी करून तीहीवर आणिली आणि समासवैपुल्यानें ओज नामक गुण उत्पन्न होतो ( ओजः समासभूयस्त्वम् । काव्यादर्श १,८०) असें म्हणणारांची थट्टा केली आहे. पुढें ध्वनिकारिका- ( २–८,१०,११ ) व काव्यप्रकाशकार मम्मट यांनीहि गुण तीनच मानिले आहेत. भामह म्हणतो, ‘ माधुर्यमभिवाञ्छन्तः प्रसादं च सुमेधसः । समासवन्ति भूयांसि न पदानि प्रयुञ्जते ॥ केचिदोजोऽभिधित्सन्तः समस्यन्ति बहून्यपि । श्रव्यं नातिसमस्तार्थं काव्यं मधुरमिष्यते । अविद्वदङ्गनाबालप्रतीतार्थं प्रसादवत् ’ ॥ ( २,१–३ ): काव्यांत प्रसाद व माधुर्य गुण ज्यांना पाहिजे ते समासयुक्त पदे फारशी घालीत नाहीत पण ओजोगुण पाहिजे असणारे कित्येक पुष्कळ पदांचे समास करितात. ऐकण्यास गोड असून ज्यांत फारसे समास नाहीत व ज्याचा अर्थ सामान्य लोक, व स्त्रिया आणि मुलें यांच्याहि लक्षांत येतो ते काव्य प्रसादयुक्त समजावें, असा भामहाचा आशय आहे. ह्यावरून हें मत नंतरचें असून दंडी हा प्राचीन अशा भरतसंप्रदायाचाच अनुयायी आहे असें कित्येकांचें मत पडतं. पण गुणसंख्या कमी करण्याच्या प्रवृत्तीला आरंभ केव्हां झाला हें कोणालाच निश्चित सांगतां येत नाही. भामहाच्या मागून झालेल्या वामनाच्या काव्यालंकार सूत्रांतहि काव्यगुण दहाच सांगितले आहेत. तेव्हां भामहाची टीका दंडीलाच अनुलक्षून आहे असे निश्चित म्हणतां येत नाहीं. शिवाय समासवैपुल्यानें ओजोगुण येतो असें दंडीनें ( १,८० ) स्पष्ट सांगितलें असलें तरी माधुर्य व प्रसाद या गुणांना लांब समास सर्वथैव वावडेच असले पाहिजेत असें त्यानें निक्षून सांगितलेलें नाहीं. असें असल्यामुळें भामहाची ओजोगुणविषयक टीका दंडीच्या मतावर नसून दुसऱ्या कोणाच्या मतावर आहे असें प्रतिपादन करितां येण्यासारखें आहे.

( ५ ) उपमेच्या प्रकारांसंबंधानें लिहितांना भामह म्हणतो ‘ यदुक्तं त्रिप्रकारत्वं तस्याः कैश्चिन्महात्मभिः । निन्दाप्रशंसाचिख्यासाभेदादत्राभिधीयते ॥ सामान्यगुणनिर्देशात् त्रयमप्युदितं ननु । मालोपमादिः सर्वोऽपि न ज्यायान् विस्तरो मुधा ’ ( २. ३७-३८ ). यांत जे निंदोपमा, प्रशंसोपमा व आचिख्यासोपमा हे तीन प्रकार सांगितले, ते काव्यादर्शात याच क्रमानें आले आहेत ( २. ३०-३२ ). या पूर्वी नाट्यशास्त्रांत यांतील प्रशंसोपमा व निंदोपमा हे प्रकार आले आहेत (१६.४९-५०); पण आचिख्यासोपमा भरताने सांगितलेली नाही. यास्तव भामहापुढे दंडीकृत प्रकारच असावेत असें म्हणणे आहे. पण याच्या विरुद्ध असे म्हणतां येईल की भामहाच्या शब्दांचा नीट अर्थ केल्यास त्यांत केवळ तीनच प्रकार उपमेचे सांगितले आहेत, व दंडीने तर हे तीन धरून एकंदर उपमेचे प्रकार तिसांच्या वर सांगितले आहेत. भामहाला दंडीच्या प्रकारांचा उल्लेख करून त्यांतील तिहींवरच टीका करावयाची असती तर त्यानें ‘ यदुक्तं त्रिप्रकारत्वम् ’ असें न म्हणतां ‘ प्रकारास्त्रय एतेऽपि तस्या उक्ता महात्मभिः ’ असें कांही म्हटले असतें. या दोन पक्षातील उत्तर पक्षांत कांहीं तथ्य आहे खरें. पण त्या बरोबर हेहि लक्षात घेतलें पाहिजे की, भामहानें मालोपमा व इतर उपमाप्रकार यांचा उल्लेख करून असा भेद करणें निरर्थक आहे असेंहि म्हटलें आहे. यातील मालोपमा काव्यादर्शात ( २.४२ ) आलेली असल्यामुळे एकंदरीत हा कोटिक्रम दंडीचें पूर्वगामित्व ठरविण्यास अगदींच निरुपयोगी आहे असे नाही.

( ६ ) हेतु, सूक्ष्म व लेश या तीन अलंकारांसंबधानें दंडी व भामह यांच्यांत मतभेद आहे. दंडीने त्यांना उत्तम प्रकारचे अलंकार म्हटलें आहे; ‘हेतुश्च सूक्ष्मलेशौ च वाचामुत्तमभूषणम् ’ ( दंडी २,२३५ ) तर भामह मुळीच त्यांना अलंकारच म्हणण्यास सिद्ध नाहीं; ‘ हेतुश्च सूक्ष्मो लेशश्च नालंकारतया मतः ’ । ( भा. २,८६ ). या अलंकारांत वक्रोक्ति नाही म्हणून भामहानें त्या विषयींचा आपला निषेध ठांसून सांगितला आहे. आतां या मतभेदांत पूर्वपक्ष कोणता हें ठरविणें कठीण आहे. ज्याचा उत्तरपक्ष तो मागूनचा व पूर्वपक्ष करणारा पूर्वीचा. दंडी पूर्वीचा म्हणणारे भामह हा दंडीचा पक्ष खोडून काढीत आहे असे समजतात. पण याच्या उलट, भामहानें ते अलंकार नव्हत असें जोरानें प्रतिपादिल्यामुळें प्रतिक्रिया म्हणून दंडीनें त्यांना उत्तम अलकार म्हटलें असेंहि म्हणणें संभवते.

( ७ ) स्वभावोक्ति अलंकारासंबंधानें दंडीनें जी शब्दयोजना केली आहे तशीच जवळ जवळ भामहाची आहे. ' नानावस्थं पदार्थानां रूपं साक्षाद्विवृण्वती । स्वभावोक्तिश्च जातिश्चेत्याद्या साऽलंकृतिर्यथा ' । ( दं २,८ ). दंडी या स्वभावोक्तीला जाति असें आणखीहि नांव देत असून तिला आद्य अलंकार म्हणतो. भामह म्हणतो, ' स्वभावोक्तिरलंकार इति केचित्प्रचक्षते । अर्थस्य तदवस्थत्वं स्वभावोऽभिहितो यथा ' । ( भा. २, ९३ ) हें जे साम्य शब्दांत दिसतें याचें कारण, स्वभावोक्ति हा अलंकार प्राचीन असल्यामुळें दंडी व भामह या दोघांनींहि एकाच जुन्या व्याख्येचा अनुवाद केला असेंहि असूं शकेल. बाणानेंहि या अलंकाराचा जाति या नांवानें उल्लेख केला आहे.* तात्पर्य ही बाब देखील निर्णायक नाही.

( ८ ) उदात्त अलंकारासंबंधानें भामहानें म्हटलें आहे, ' एतदेवापरेऽन्येन व्याख्यानेनान्यथा विदुः । नानारत्नादियुक्तं यत्तत किलोदात्तमुच्यते ' ॥ ( ३,१२ ). यांतील रत्नशब्द दंडीनें दिलेल्या उदात्तालंकाराच्या उदाहरणांत प्रथम आला आहे, त्यावरून दंडीला उद्देशून भामहाची टीका असली पाहिजे असें अनुमान करण्यांत येतें. उदात्ताची दंडीची व्याख्या ' आशयस्य विभूतेर्वा यन्महत्त्वमनुत्तमम् । उदात्तं नाम तं प्राहुरलंकारं मनीषिणः । ( २,३०० )' अशी दोन प्रकारची असून त्यांतील दुसऱ्या प्रकाराचें उदाहरण ' रत्नभित्तिषु संक्रान्तैः प्रतिबिम्बशतैर्वृतः । ज्ञातो लङ्केश्वरः कृच्छ्रादाञ्जनेयेन तत्त्वतः ' ॥ ( २,३०२ ) असें आहे. या आधारावर दंडीला उद्देशून भामहाचें लिहिणें आहे असें म्हणतांना उदात्त हा अलंकार दंडीनें प्रथम सांगितलेला नसून जुना आहे व भट्टिकाव्यांतहि दंडीनें सांगितलेल्या दोन्ही प्रकारच्या उदात्तांची उदाहरणें दिलीं आहेत हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे.

( ९ ) **आशीः** नांवाच्या अलंकाराचा हाच प्रकार आहे. ' आशीरपि च केषांचिदलंकारतया मतः ' । ( भा. ३, ५४ ) असें भामहानें सांगितलें असून त्यानें त्याचीं दोन उदाहरणें दिलीं आहेत. **केषांचित्** शब्दावरून दंडीचा

---

*हरन्ति कं नोज्ज्वलदीपकोपमैर्नवैः पदार्थैरुपपादिताः कथाः । निरन्तरश्लेषघनाः सुजातयो महास्रजश्चम्पककुड्मलैरिव " ॥ कादम्बरी; ' नवोऽर्थो जातिरग्राम्या श्लेषोऽक्लिष्टः स्फुटो रसः' । हर्षचरित

बोध होण्यासारखा आहे. कारण " आशीर्नामाभिलषिते वस्तुन्याशंसन यथा। पातु वः परमं ज्योतिरवाङ्मनसगोचरम् ' ॥ असं दंडीनें त्याचें सोदाहरण लक्षण दिलें आहे. येथेंहि दंडीला उद्देशून भामह लिहितो कीं काय याचा विचार करतांना आशीः हा अलंकार जुनाच आहे व भट्टीने त्याचें उदाहरण दिलें आहे आणि भरतानेंहि नाट्यशास्त्रांत ( १६,२९ ) सांगितलेल्या ३६ लक्षणांतच त्याचा अन्तर्भाव केलेला आहे हेंहि ध्यानांत ठेविलें पाहिजे.

( १० ) पुनरुक्त दोषाविषयीं भामह लिहितो ' पुनरुक्तमिदं प्राहुरन्ये शब्दार्थभेदतः ।...अत्रार्थपुनरुक्तं यत्तदेवैकार्थमिष्यते ।...तामुत्कमनसं नूनं करोति ध्वनिरम्भसाम् । सौधेषु घनमुक्तानां प्रणालीमुखपातिनाम् ' ॥ ( भा. ४. १२,१५–१६ ) यातील अन्ये शब्द दंडीला अनुलक्षून असण्याचा संभव आहे. कारण दंडीची व्याख्या व उदाहरण ' अविशेषेण पूर्वोक्तं यदि भूयोऽपि कीर्त्यते । अर्थतः शब्दतो वाऽपि तदेकार्थं मतं यथा । उत्कामुन्मनयन्त्येते बालां तदलकत्विषः । अम्भोधरास्तडित्वन्तो गम्भीराः स्तनयित्नवः ' ॥ ( दं. ३, १३५–१३६ ) अशीं आहेत. भामहाचें उदाहरण दंडीच्या उदाहरणाशीं अगदीं सदृश आहे हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे

( ११ ) पूर्वी ( मेधाविवरील परिच्छेद ४ येथें ) सांगितल्याप्रमाणें रुद्राटाच्या काव्यालंकारावरील नमिसाधुकृत टीकेंत ( १,२ ) दंडि, मेधाविरुद्र, भामह इत्यादिकांच्या अलंकारशास्त्रावरील ग्रंथांचे उल्लेख केले आहेत. त्यातील मेधावी हा निःसंशय भामहपूर्वकालीन असल्यावरून, नमिसाधूनें तीं सर्वच नांवे कालानुक्रमानें दिलेलीं असावीं असें मानून दंडी मेधावीच्याहि पूर्वीचा असला पाहिजे असें अनुमान करण्यांत येते. या म्हणण्यांत अगदींच तथ्य नाहीं असें नाहीं. तरी पण त्यांत नमिसाधूनें उपरोक्त ग्रंथकारांची नांवें कालानुक्रमाने जाणून बुजून दिलीं आहेत असें गृहीत धरिलेलें आहे, त्याला स्पष्ट असा कांहीं आधार नाहीं रुद्रटाच्यापूर्वी कित्येक साहित्यशास्त्रकार होऊन गेले एवढें सांगण्याचाच नमिसाधूचा उद्देश दिसतो. त्यांत कालानुक्रमही दाखविण्याचा मानस होता असें मानावयाचें तर मीमांसकांच्या परिभाषेत नमिसाधूनें ' वाक्यभेद ' म्हणजे एकाच वाक्यांत दुहेरी विधान केलें असें म्हणावें लागेल.

दंडीभामहांच्या सापेक्ष कालासंबंधानें आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून

निष्कर्ष निघतो तो असा की, भामहाच्या पूर्वगामित्वासंबंधाने जो कोटिक्रम पुढें करण्यांत आला आहे तो दुर्बळ असून भामह हा दंडीच्या पूर्वी होऊन गेला असें मानिल्याशिवायहि त्यांत अंतर्भूत झालेल्या प्रत्येक गोष्टीचा सरळ उलगडा करतां येतो व याच्या उलट दंडी हा भामहाच्या आधी झाला असें सिद्ध करण्यासाठीं जो पुरावा देण्यांत येतो त्यांत जरी थोडेसें तथ्य दिसले तरी एकंदरींत तो तटस्थ वृत्तीच्या सर्वांना पटेल इतका सबळ नाही. तेव्हां भामह व दंडी यांपैकी कोणीही कोणावर टीका करीत नसून दोघे दोन स्वतंत्र संप्रदायांचे अनुयायी असावेत आणि भामह हा आलंकारिकांशी अधिक समरस होणारा असून दंडी भरताच्या रससंप्रदायाला अधिक मानणारा असावा असाच बहुतेक संभव दिसतो. थोड्या बहुत कालावधीनें एक दुसऱ्याच्या मागे पुढे असला तरी एकदरीत स्थूलमानानें ते समकालीन असून इ. स. ६०० पासून ७५० पर्यंतच्या काळांत होऊन गेले असें दिसून येतें. आतां उपरोक्त विवेचनांत चिकित्सेसाठी जी सामग्री घेतली आहे तीवरून आम्ही काढलेलें तटस्थ अनुमान न काढतां कोणी तरी एक दुसऱ्याच्या आधारानें लिहितो किंवा त्याला उद्देशून टीका करितो असाच निष्कर्ष काढणे अपरिहार्य असेल तर आमच्या मतें दंडी हाच भामहाच्या पूर्वी होऊन गेला असें म्हटलें पाहिजे. या मताच्या सिद्ध्यर्थ अवश्य असलेला कोटिक्रम पूर्वोक्त विवेचनांत आला असल्यामुळें तो पुनः मांडून दाखविण्याची आवश्यकता नाही. दंडीच्या पूर्वगामित्वासंबंधानें जी कारणे वर सांगितली आहेत ती सर्वथैव निर्णायक नसली तरी भामहाच्या पूर्वगामित्वासंबधाने दिलेल्या कारणांपेक्षा त्यांत निःसंशय अधिक अर्थ आहे असें आम्हांला वाटते.

याठिकाणीं भामह व न्यासकार यांविषयींच्या खडाजंगी वादासंबंधाने चार शब्द सांगणे अवश्य आहे. भामहाच्या काव्यालंकारात ( ६, ३६ ) न्यास-नामक ग्रंथाचा उल्लेख आहे हें पूर्वी भामहाच्या वर्णनांत सांगितलेंच आहे. या दोन ग्रंथकारांसंबंधाच्या वादांतील प्रतिस्पर्धी प्रो. पाठक व प्रो. त्रिवेदी हे होत. **तृच्** आणि **अक** या कृत्प्रत्ययांनी झालेल्या कर्तृवाचक नामांचा षष्ठीतत्पुरुष समासांत द्वितीयपदस्थांनी उपयोग करूं नये व या बाबतींत केवळ पाणिनीय सूत्राचा ज्ञापक म्हणून उपयोग करून न्यासकारानें जसे **वृत्रहंता व तद्गमक** असे प्रयोग केले आहेत, तसें करणें नीट नव्हे असें भामहानें सांगितलें आहे. तो म्हणतो, ' शिष्टप्रयोगमात्रेण न्यासकारमतेन वा । तृचा समस्तषष्ठीकं न कथं-

चिदुदाहरेत् ॥ सूत्रज्ञापकमात्रेण वृत्रहंता यथोदितः । अकेन च न कुर्वीत वृत्ति तद्गमको यथा ॥ ( भा. ६, ३६-३७ ). भामहाच्या या विधानावरून असें दिसतें कीं, न्यासकाराच्या मतें हर्ता, कर्ता, याजक, पूजक इत्यादि कर्तृवाचक नामांचा कर्मवाचक शब्दांशी समास होऊं शकतो व त्याप्रमाणं **वृत्रहन्ता व तद्गमक** असे समास न्यासकाराच्या न्यासांत भामहाला आढळून आले. पाणिनीच्या अष्टाध्यायीवर जी काशिकावृत्ति नांवाची टीका आहे, त्या टीकेवर जिनेन्द्रबुद्धि याची न्यास किंवा काशिकाविवरणपञ्जिका नांवाची उपटीका असून तींत तृच् व अक प्रत्यय अंतीं असलेलीं नामे षष्ठीतत्पुरुषाच्या द्वितीयपदस्थानी असलीं तरी चालतात असें सांगितलें आहे असें प्रो. पाठक यांना वाटत अस-ल्यामुळे त्यांनी काशिकेनंतर न्यास व न्यासानंतर भामह असा कालानुक्रम लाविला आहे. पाणिनीय पद्धतीच्या व्याकरण ग्रंथांविषयी चिनी प्रवाशी इत्सिंग याने कांहीशी असबद्ध विधाने केली असून त्यांतून अर्थ काढण्याचा जो प्रयत्न झालेला आहे तो बरोबर असल्यास काशिकावृत्तीची रचना इ. स ६६० च्या सुमारास झाली असे ठरतं. काशिकेचा हा काळ धरिल्यास न्यासाचा काळ इ. स. ७०० च्या पलीकडे जात नाही व त्या न्यासाचा उल्लेख करणारा भामह त्यानंतर ७५० च्या सुमारास झाला असे म्हणावं लागतं. पण प्रो. पाठकांच्या उलट प्रो. त्रिवेदींचें मत आहे व भामहाने न्यासकाराचे जे मत दिले आहे ते प्रो. पाठकांनी काशिका-न्यासांतील उद्धृत केलेल्या वचनांत आढळून येत नाही, अर्थात् भामहाचा उल्लेख काशिकेवरील न्यासाला उद्देशून नव्हे असं त्यांचे प्रतिपादन आहे. प्रो. पाठक व प्रो. त्रिवेदी यांच्यासारख्या नामांकित पंडितांचा एखाद्या निवळ व्याकरणविषयक गोष्टीवर एवढा मतभेद जेथें होतो तेथें त्यांतील कोणत्याहि एका पक्षाचें समर्थन करण्यास पुढें सरसावणें म्हणजे मोठे धाडस आहे हे खरें, पण प्रस्तुत प्रसंगी प्रो. त्रिवेदींचें म्हणणेंच यथार्थ दिसतं असें आमचें मत नम्रपणे सांगणे अवश्य आहे. न्यासविषयक हा वाद इंडियन ॲंटिक्वरी सन १९१२ पान २३५ व रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेचे तेविसावें इतिवृत्त ( पा. १८ ) यांतील प्रो. पाठकांच्या लेखांत आणि इंडियन ॲंटिक्वरी सन १९१३ पा. २५८ यांतील त्रिवेदींच्या लेखांत आला आहे. व्याकरण ग्रंथांपैकीं वृत्ति व न्यास या ग्रंथांचा उल्लेख बाणभट्टानेंहि हर्षचरितांत ( उ. ३ परिच्छेद ५ ) 'प्रसन्नवृत्तयो गृहीतवाक्याः कृतगुरुपदन्यासा...लोक इव व्याकरणेऽपि ' असा श्लेषानें

केला आहे. बाणानें उल्लेखिलेला हा न्यास काशिकान्यास असणें शक्य नाहीं; कारण बाणाचा काळ इ. सन ७ व्या शतकाचें पूर्वार्ध असा निश्चित असून वर सांगितल्याप्रमाणें भामहोल्लेखित न्यासाचा काळ फार तर ७ व्या शतकाच्या शेवटींचा आहे. तेव्हां बाणानें उल्लेखिलेल्या न्यासाला अनुलक्षूनच भामहाचाहि उल्लेख अस-ण्याचा बराच संभव आहे. प्रो बटुकनाथ शर्मा यांनीं आपल्या भामहालंकाराच्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत ( पान १६–२५ ) आमचेंच मत ग्राह्य धरिलें आहे.

भामह आणि दंडी यांच्या ग्रंथांत प्राचीन ग्रंथकारांच्या ग्रंथांतील वचनांशी समानार्थक अशीं जीं वचनें आढळतात त्यांवरून हे दोघे ग्रंथकार त्या प्राचीन ग्रंथकारांनंतरचे होत अशा कोटिक्रमानें भामह व दंडी यांचा काळ निश्चित कर-ण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. परंतु समानार्थक स्थलांत जर शब्द-तादात्म्य नसेल तर केवळ विचारसादृश्यावरूनच उसनवारीचा आरोप करण्यांत मुळींच अर्थ नाहीं असें आमचें ठाम मत आहे. ध्वनिकारिकाकारांनीं म्हटलें आहे ‘ संवादास्तु भवन्त्येव बाहुल्येन सुमेधसाम् ’ । ( ४,११ )–बुद्धिमान पुरुषांच्या विचारांत पुष्कळ सादृश्य दिसून येतेंच. विचाराच्या साम्राज्यांत कोणालाहि राखीव अधिकार असा दिलेला नाहीं. दंडीचें ‘ इन्दोरिन्दीवरद्युति । लक्ष्म लक्ष्मीं तनोतीति प्रतीतिसुभगं वचः ’ । हे प्रसादगुणाचें उदाहरण ( काव्यादर्श १,४५) त्यानें ‘ मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ’ या शाकुन्तलांतील चरणाव-वरून घेतलें असें कित्येकांचें म्हणणें आहे. तसेंच ‘ प्रभामात्रं हि तरलं दृश्यते न तदाश्रयः ’ । ( काव्यादर्श २. २९ ) हें आक्षेपाच्या उदाहरणांतील श्लोकार्ध त्याला ‘ न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात् ’ या शाकुन्तलवचनावरून सुचलें असावें असेंहि म्हणतात. या शिवाय काव्यादर्शांतील ‘ यस्याः कुसुमशय्या-पि कोमलाङ्ग्या रुजाकरी । साऽधिशेते कथं तन्वी हुताशनवतीं चिताम् ’ । ( २,२८६ ) हा श्लोक रघुवंशांतील ( ८,५७ ) ‘ नवपल्लवसंस्तरेऽपि ते मृदु दूयेत यदङ्गमर्पितम् । तदिदं विसहिष्यते कथं वद वामोरु चिताधिरोहणम् ’ । या श्लोकाशीं समानार्थक आहे. ‘ अरत्नालोकसंहार्यमवार्यं सूर्यरश्मिभिः । दृष्टिरो-धकरं यूनां यौवनप्रभवं तमः ’ ॥ ( दंडी २,१९७.) हें दंडीचें व्यतिरेकालंकाराचें उदाहरण बाणाच्या कादंबरीतील ‘ केवलं च निसर्गत एवाभानुभेद्यमरत्नालोकोच्छे-द्यमप्रदीपप्रभापनेयमतिगहनं तमो यौवनप्रभवम् ’ । या शुकनासोपदेशान्तर्गत शब्दांवरून सुचल्यासारखें दिसतें.

दंडीनें काव्यादर्शात ( २, २४०-२४१ ) कर्माच्या **निर्वर्त्य, विकार्य** आणि **प्राप्य** या तीन प्रकारांचें जे वर्णन केले आहे ते प्रो. पाठकांच्या मतें वाक्यपदीयांतून घेतलेलें आहे. वाक्यपदीयाचा काल इ. स. ६५० च्या सुमाराचा असावा असे पाठकांनी सन १९१२ च्या इंडियन ॲंटिक्वरींत ( पा.२३५) दाखविलें आहे. पण कर्माचा असा त्रिप्रकार भेद वाक्यपदीयापूर्वी कोणी केला नव्हता असें दाखविल्याशिवाय दंडीने तो वाक्यपदीयावरून घेतला हे म्हणणें निरर्थक होय.

काव्यादर्शाच्या तिसऱ्या पदिच्छेदांत ( श्लोक ११४ ) 'नासिक्यमध्या परितश्चतुर्वर्णविभूषिता । अस्ति काचित्पुरी यस्यामष्टवर्णाह्वया नृपाः' ॥ असें जे संख्याता नामक प्रहेलिकेचें उदाहरण दंडीनें दिले आहे त्यावरून काञ्ची नगरी व तीतील पल्लव राजे यांचा बोध होतो असे तरुणवाचस्पति या टीकाकाराचें मत आहे. * दुसऱ्या एका स्थळीं ( २, २७९ ) 'इति साक्षात्कृते देवे राज्ञो यद्राजवर्मणः । प्रीतिप्रकाशनं तच्च प्रेय इत्यवगम्यताम् ।' असा राजवर्मन् ( किंवा कांही टीकाकारांच्या मतें रातवर्मन् ) राजाचा उल्लेख असून त्याला देवाचा साक्षात्कार झाल्याचे सांगितले आहे हे उपरोक्त दोन्ही श्लोक एकत्र घेऊन त्यांवरून राजवर्मन् राजा हा काञ्चीच्या पल्लवांपैकीं असावा व तो इ. स. ६९० पासून ७१५ पर्यंत ज्याने राज्य केले तो दुसरा नरसिंहवर्म किंवा राजसिंहवर्मच असावा असा प्रो नरसिंहाचार ( इंडियन ॲण्टिक्वरी १९१०, पा. ९० ) व प्रो. बेलवलकर ( काव्यादर्शावरील टिप्पणीत ) यानीं प्रतिपादिले आहे व तदनुसार दंडीचा काळ त्यांनीं इ. स. ७ व्या शतकाचा शेवटाचा ठरविला आहे. पण प्रोफेसरद्वयांचा हा प्रयत्न व्यर्थ दिसतो. कारण राजवर्मन् किंवा रातवर्मन् हा पल्लव घराण्यांतील होता याला प्रमाण काय ? उलट काव्यादर्शावरील श्रुतानुपालिनी नामक टीकेत राजवर्मन् हा केरल राजा होता असे सांगितलें आहे. पण यांतील खरा प्रकार एवढाच आहे की राजवर्मन् हे नांव अगदीं सामान्य असून हिंदुस्थानाच्या प्राचीन इतिहासांत तें दहावीस राजांनाहि लाविलेलें आढळून येईल. शिवाय नासिक्यमध्या इत्यादि शब्दांवरून काञ्चीचा बोध होतो हाहि

---

* क् आ च ई या चार वर्णांच्या मध्यें एक अनुनासिक ञ् हें घातले म्हणजे काञ्ची हें नांव सिद्ध होते. 'पल्लवाः' शब्दांत प् अ ल् ल् अ व् आ स् असे आठ वर्ण आहेत. प्रेमचंद तर्कवागीशांच्या मतें हीं नांवें काञ्ची व पुण्ड्रक अशीं असावीं.

तर्कच आहे. काञ्ची जशी नासिक्यमध्या व चतुर्वर्णविभूषिता आहे, तोच प्रकार **वञ्ची** या नांवाचाहि आहे. वञ्ची शहर कोचीन जवळ असून प्राचीन चेर राज्याची राजधानी होतें.

कित्येक विद्वानांच्या मतें भामहानें पहिल्या परिच्छेदांत ( श्लोक ४२-४४ ) मेघदूताचा गुप्त उल्लेख करून त्यावर प्रतिकूल टीका केली आहे. ते श्लोक असे 'अयुक्तिमद्यथादूता जलभृन्मारुतेन्दव.* । तथा भ्रमरहारीतचक्रवाकशुकादयः ॥ अवाचोऽव्यक्तवाचश्च दूरदेशविचारिणः । कथं दूत्यं प्रपद्येरन्निति युक्त्या न युज्यते । यदि चोत्कण्ठया यत्तदुन्मत्त इव भाषते । तथा भवतु भूम्नेदं सुमेधोभिः प्रयुज्यते'॥ ज्यांना बोलण्याची निसर्गतः शक्ति नाहीं अशा मेघादिकांना किंवा अस्पष्ट शब्द करणाऱ्या भ्रमरादि प्राण्यांना दूत करण्यांत स्वारस्य नाहीं असा भामहाचा उद्देश आहे व मेघदूतांत तसे केलेलें आहे. पण गणपतिशास्त्री यांना स्वतःच्या एका कल्पनेचें पिल्लूं पुढे करावयाचे असल्यामुळे त्यांनीं वरील कालक्रमाविषयक कल्पनेवर जोराची टीका केली असून कालिदासानेंच उलट 'धूमज्योतिःसलिलमरुतां सन्निपातः क्व मेघः' इत्यादि श्लोकांत भामहाच्या कडक सोवळेपणाच्या विधानाला सौम्यपणें उत्तर दिले आहे असें स्वप्नवासवदत्ता नाटकाच्या प्रस्तावनेत ( १९१६ आवृत्ति पा. ७ ) प्रतिपादिले आहे.

दुसऱ्या एका स्थळीं भामहानें वत्सराजा उदयन याच्या कथेचा निर्देश केला असून त्याची कथा शास्त्र व लौकिक यांना विरुद्ध अशा रीतीनें सांगितल्याबद्दल एका किंवा अनेक कवींना दोष दिला आहे. तो म्हणतो, 'अन्तर्योधशताकीर्णं सालंकायननेत्र(तृ)कम् । तथाविधं गजच्छद्म नाज्ञासीत् स स्वभूगतम् ॥ यदि वोपेक्षितं तस्य सचिवैः स्वार्थसिद्धये । अहो नु मन्दिमा तेषां भक्तिर्वा नास्ति भर्तरि । शरा दृढधनुर्मुक्ता मन्युमद्भिररातिभिः । मर्माणि परिहृत्यास्य पतिष्यन्तीति काऽनुमा ॥ **इतोऽनेन मम भ्राता मम पुत्रः पिता मम** । मातुलो भागिनेयश्च रुषा संरब्धचेतसः । अस्यन्तो विविधान्याजावायुधान्यपराधिनम् । एकाकिनमरण्यान्यां न हन्युर्बहवः कथम् ॥ नमोस्तु तेभ्यो विद्वद्भ्यो येऽभिप्रायं कवेरिमम् । शास्त्रलोकावपास्यैवं नयन्ति नयवेदिनः ॥ सचेतसो वनेभस्य चर्मणा निर्मितस्य च ।

---

*'मारुतेन्दवः' च्या जागी भामहाच्या उपलब्ध प्रतींत 'मात्र केड च' अशीं अस्पष्ट अक्षरें आहेत.

अन्तरं वेद बालोपि कष्टं किंनु कथं नु तत्' ॥ (भा. ४,४१-४७). या श्लोकांत 'नमोस्तु तेभ्यो विद्वद्भ्यो' इत्यादि उपरोधिक शब्दांनी चढविलेला हल्ला भासाच्या म्हणून प्रसिद्ध झालेल्या प्रतिज्ञायौगन्धरायणनामक नाटकावर आहे असे गणपतिशास्त्री यांचें मत आहे. गणपति शास्त्र्यांना पुढें दामटावयाचें असलेले कल्पनेचें तट्टू म्हणून जें वर सांगितले तें असे की भामह हा भासानंतर व कालिदासाच्या पूर्वी होऊन गेला असे म्हणून भासाचें प्राचीनत्व सिद्ध करावयाचें. हे दाखवितांना, त्या नाटकांतील ( अं. १ पा. १३ ) हंसकाच्या भाषणांत 'अणेण मम भादा हदो अणेन मम पिता अणेण मम सुदो मम वअस्सात्ति अण्णहा भाट्टिणो वण्णअन्ता' इत्यादि जे शब्द उपरोक्त श्लोकांतील 'हतोनेन मम भ्राता' इत्यादि शब्दांशी अगदी समान आहेत त्यांवर मोठा भर त्यांनीं दिला आहे व प्रथम दर्शनीं तो सयुक्तिक दिसण्यासारखा आहे. पण जरा सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास ही सारी इमारत अगदी कच्या पायावर उभारिलेली असल्याचें आढळून येते. कारण भामहाच्या श्लोकांतील कित्येक गोष्टींकडे पंडित गणपति शास्त्री यांचे मुळींच लक्ष गेलेले दिसत नाहीं.

या ठिकाणीं त्या सर्वच गोष्टीचें सविस्तर विवेचन करण्याचे कारण नाही. एक दोन महत्वाच्या मुद्यांचाच विचार करूं. प्रतिज्ञायौगंधरायण नाटकांतील कथानकांत उदयन राजा वीस पादचारी योद्ध्यांसह अरण्यांत गेला असतां तेथें त्या सर्वांवर छापा पडून हंसकाखेरीज त्यांचा सर्वांचा वध झाला असें दाखविलें आहे. पण भामहानें 'एकाकिनं' म्हणजे एकट्यावर तो छापा पडला असें म्हटलें आहे. शिवाय छापा घालणाऱ्या लोकांनीं त्यावर हल्ला करितांना जे रागाचे शब्द उच्चारिले ते दोन्ही स्थळीं खरोखर एकच नाहीत. प्रतिज्ञा नाटकांत **मातुल** व **भागिनेय** हे शब्द नाहीत, पण भामहाच्या श्लोकांत ते आहेत. या गोष्टीचा विचार केल्यास, भामहाच्या 'नमोस्तु तेभ्यो' इत्यादि शब्दांवरून अनुमान काढावयाचें तर, कोणी एका कवीनें प्रथम उदयनाची कथा लिहिली व नंतर इतर कवींनीं ( ज्यांना भामह विद्वद्भ्यः हें पद लावतो ) नाटक किंवा महाकाव्य रचण्यासाठी ती कथा घेऊन तिला आपल्याला हवें तसें स्वरूप दिलें आणि त्यांत उदयन राजाला खरा हत्ती व चामड्यांचा बनविलेला हत्ती यांतील भेद ओळखतां न आल्यामुळें तो एकटाच साहस करावयास गेला व तेथें बनावट हत्तीमध्यें लपून बसलेल्या लोकांनीं त्यावर छापा घातला असें दाखविलें असें

म्हणण्याचा भामहाचा आशय दिसतो असें आम्हांला वाटते. ही मूळची कथा बहुधा बृहत्कथेतील असावी व ' कवेः अभिप्राय ' या शब्दांनी तिचा निर्देश करून भामहानें त्या कथेवर रचलेल्या काव्याचें किंवा नाटकाचे दोषाविष्करण केले असावे असें दिसते. क्षेमेन्द्रकृत बृहत्कथामञ्जरीत ( लंबक २ अ. २ ) उदयनाच्या साहसाची कथा आली असून तीत उदयन हा एकटाच आपली वीणा घेऊन हत्ती पकडण्यासाठी वनांत शिरला असें म्हटले आहे, ' गजेन्द्र-बंधकुशलो विवेशैको महद्वनम् ' । ( श्लो ३४ ) आणि त्या साहसासंबंधानें ' प्रायेण व्यसनासक्तिर्मोहाय महतामपि ' ( म्हणजे ' व्यसनासक्त मनुष्य मोठा थोर असला तरी मोह पावतो ' ) असे उद्गार क्षेमेन्द्रानें काढलेले आहेत. ' कवेरभिप्रायम् ' म्हणून भामहानें जो म्हटला तोच हा मूळ कथाभाग बहुधा असावा. या कथेचा अधिक विस्तार कथासरित्सागरात दिला आहे. पण त्यांतहि उदयनाच्या गुप्त हेरांनी त्याला एका चमत्कारिक हत्तीची वार्ता सांगितली ती ऐकून व तो हत्ती खरोखरीचा आहे असें मानून उदयन सैनिक बरोबर न घेतां ' चारमात्रसहायस्तु...विवेश महाटवीम् ' ( २,४,१५ ) म्हणजे गुप्त हेर मात्र समागमें घेऊन निबिड अरण्यांत शिरला व ' एकाकी वादयन्वीणाम् ' म्हणजे वीणा वाजवीत वाजवीत एकटाच हत्तीजवळ गेला ( २,४,१७ ) हे सर्व भाग आले आहेत. बृहत्कथामञ्जरी व कथासरित्सागर हे दोन्ही ग्रंथ गुणाढ्याच्या पैशाची भाषेतील बृहत्कथानामक ग्रंथावरून लिहिलेले होत असें त्यांच्या कर्त्यांनीच म्हटलें आहे. तेव्हां भामहापुढें उदयनाच्या गोष्टीसाठीं प्रतिज्ञायौगन्धरायण नाटिकाच होती असें मानण्याचें कारण नाहीं. कारण बृहत्कथेशिवाय इतर दहा बारा काव्यनाटकादि ग्रंथांतहि उदयन राजाची कथा आली असून त्यांत महत्त्वाच्या बाबतींत विरोधहि आढळून येतात. आमचें हे प्रतिपादन प्रो. बटुकनाथ शर्मा ह्यांना मान्य आहे.

भट्टिकाव्यांत बाविसाव्या सर्गात ( श्लो. ३४ ) ' व्याख्यागम्यमिदं काव्य-मुत्सवः सुधियामलम् । हता दुर्मेधसश्चास्मिन् विद्वत्प्रियतया मया ' असा श्लोक असून भामहाच्या काव्यालंकारांत ( २,२० ) 'काव्यान्यपि यदीमानि व्याख्याग-म्यानि शास्त्रवत् । उत्सवः सुधियामेव हन्त दुर्मेधसो हताः ' असे सारखे शब्द असलेला श्लोक आहे. या निकट सादृश्यावरून भट्टीनें आपले शब्द भामहावरून घेतले असें मानून त्रिवेदींनी भामहाला भट्टिपूर्वकालीन ठरविले आहे. पण उप-

रोक्त श्लोकांत शब्दसादृश्य असलें तरी सांगण्याचीं तत्वें निराळी आहेत व दोन्ही श्लोक जवळ जवळ ठेविल्यास त्यांवरून भामह हाच भट्टीचें दोषाविष्करण करीत आहे असेंच दिसून येण्यासारखे आहे. पूर्वींच्या श्लोकांत भामहानें प्रहेलिकांसंबंधीं सांगून त्या रामशर्म्याच्या अच्युतोत्तरांत येतात असे म्हणून हा श्लोक दिला आहे. ह्या श्लोकांत ' काव्यान्यपि यदीमानि ' हे श्लोक महत्वाचे आहेत. भामहाने फक्त एकाच काव्याचा नामनिर्देश ( अच्युतोत्तर ) केला आहे. पण तो म्हणतो ' हीं काव्येंही जर शास्त्रप्रमाणें व्याख्यागम्यच असतील तर ' म्हणजे असलीं अनेक क्लिष्ट काव्ये त्याचे डोळ्यांपुढें होतीं. त्यामुळें भट्टिकाव्य त्याचे डोळ्यांपुढें होतें असें मानण्याला अडचण येत नाहीं. विशेषतः शब्दसादृश्य दोहोंत जें दिसतें त्यावरून भट्टीचे काव्याला अनुलक्षून त्याचें वचन आहे असें अनुमान केल्यास त्याला बराच दृढ आधार आहे.

भामहाच्या कालाचा निर्णय करण्याच्या कामी दोन महात्वाच्या गोष्टी उपयोगीं पडणाऱ्या असून अद्यापि त्यांच्यावर कोणाहि पंडिताने भर दिलेला आम्हांला आढळत नाही. ध्वन्यालोकाच्या ४ थ्या उदद्योतांत, एखादी कल्पना एखाद्या कवीनें एकदां व्यक्त केली तरी तीच पुनः नव्यासारखी सुंदर भासते असें तत्व सांगितलें असून त्याच्या पुष्ट्यर्थ कांहीं उदाहरणें दिली आहेत. ध्वन्यालोककार म्हणतो, ( नि. सा. आवृत्ति पा. २३६ ) " तथा विवक्षितान्यपरवाच्यस्यैव शब्दशक्त्युद्भवानुरणरूपव्यङ्ग्यप्रकारसमाश्रयेण नवत्वम् । यथा ' धरणीधारणायाधुना त्वं शेषः ' ( हर्षचरित उ ६, १५ ) इत्यादौ ' शेषो हिमगिरिस्त्वं च महान्तो गुरवः स्थिराः । यदलंघितमर्यादाश्चलन्तीं बिभ्रते भुवम् ' । ( भामह ३, २७ ) इत्यादिषु सत्स्वपि तस्यैवार्थशक्त्युद्भवानुरणरूपव्यङ्ग्यसमाश्रयेण नवत्वम् । ". या ध्वन्यालोकांतील विधानावरून असें उघड होतें कीं ' शेषो हिमगिरि ' इत्यादि भामहकृत श्लोक बाणानें हर्षचरित लिहिण्यापूर्वी अस्तित्वांत होता असा ९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत आनंदवर्धनाचा अभिप्राय होता. अर्थात् भामह बाणाच्या पूर्वी म्हणजे इ. स. ६०० च्या सुमारास होऊन गेला असें आनंदवर्धनाचें मत आहे. अर्थात् या बाबतीत एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे ती ही की आनंदवर्धन हा भामहानंतर सुमारें दोन अडीचशे वर्षांनीं झाला. भामह हा काश्मीरक व आनंदवर्धनहि काश्मीरक असल्यामुळें भामहाबद्दल त्याला दंतकथांच्या रूपानें तरी चांगली माहिती असण्याचा संभव आहे. उलट पक्षीं बाणभट्ट हा काश्मीरक

नसून दूरच्या बिहार प्रांतांतील होता व तोहि आनंदवर्धनाच्या पूर्वी दोन अडीचशें वर्षे होऊन गेला. यामुळे त्यांचे पौर्वापर्य आनंदवर्धनाला बिनचूक माहित होतें असें मानणे धाडसाचे होईल. शिवाय भामह हा काश्मीरक व साहित्याचार्य असल्यामुळे आनंदवर्धनाने त्याला अग्रपूजेचा मान देऊन बाणानें भामहाकडून कल्पना घेतली असे म्हणणे थोडेसें स्वाभाविक आहे. म्हणून या प्रमाणावरच फार जोर देऊन चालणार नाही.

दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की भामहाने 'प्रत्यक्षं कल्पनापोढं ततोऽर्थादिति केचन । कल्पनां नामजात्यादियोजनां प्रतिजानते ॥' असे **प्रत्यक्षाचें** लक्षण देताना म्हटलें आहे ( परि. ५.६ ) व वाचस्पतिमिश्राच्या न्यायकणिकेंत दिङ्नाग व धर्मकीर्ति यांच्या प्रत्यक्षाच्या व्याख्या दिल्या आहेत, त्यांत पुढील शब्द आढळतात:—" न खलु ' प्रत्यक्षं कल्पनापोढमन्यनिर्दिष्टलक्षणम् ' इति प्रणयतो दिङ्नागस्यैव कल्पनापोढत्वमात्रं प्रत्यक्षलक्षणम्, अपि तु तदेवाभ्रान्तत्वसहितं प्रत्यक्षे लक्षणमिति मन्यते स्म कीर्तिः । यथाह ' प्रत्यक्षं कल्पनापोढमभ्रान्तमिति ' ( ब्रिटिश रॉ. ए. सो. इ. त्रै. सन १९०५ पा. ३६१–३६२ ). प्रत्यक्षाची ही व्याख्या **न्यायबिंदू**मध्यें आढळते. तेव्हां दिङ्नाग व धर्मकीर्ति यांनी दिलेली प्रत्यक्षाची व्याख्या आणि अनुमान यांविषयींचें विवेचन पाहिल्यास ते न्यायबिंदूतील विवेचनाशी फारच जुळतें व त्यावरून भामहाला न्यायबिंदु चांगला परिचित असावा असें दिसतें. एक दोन उदाहरणें पहा. परि. ५ मधील ' सत्वादयः प्रमाणाभ्यां प्रत्यक्षमनुमा च ते । असाधारणसामान्यविषयत्वं तयोः किलः ' । भामहाचा हा श्लोक ( ५ ) ' द्विविधं सम्यग्ज्ञानं प्रत्यक्षमनुमानं च ।...तस्य विषयः स्वलक्षणं...अन्यत्सामान्यलक्षणं सोऽनुमानस्य विषयः ' । या न्यायबिंदूतील वाक्याशी सदृश आहे. तसाच परि. ५ मधील भामहकृत ' त्रिरूपाल्लिंगतो ज्ञानमनुमानं च केचन ' हे श्लोकार्ध (११) ' अनुमानं द्विधा स्वार्थ परार्थं च, तत्र स्वार्थं त्रिरूपाल्लिंगाद्यदनुमेये ज्ञानं तदनुमानम् । ' या न्यायबिंदूतील वाक्याला धरून आहे. यावरून दिङ्नाग व बहुधा धर्मकीर्ति यांच्या मागून भामह होऊन गेला असें ठरतें. डॉ. सतीशचंद्र विद्याभूषण यांच्यामतें दिङ्नागाचा काल इ. स. ५०० च्या सुमाराचा आहे व हें मत त्यांनी भाण्डारकरस्मृतिग्रंथांत ( पान १६३ ) प्रतिपादिलें आहे. त्याचप्रमाणें सन ६७१ पासून ६९५ पर्यंत हिंदुस्थानांत येऊन गेलेल्या इत्सिंग या चिनी प्रवाशानें दिङ्नाग हा बऱ्याच वर्षा-

पर्वी होऊन गेला असें म्हटल्याचे डॉ. ताकाकुसु याने ब्रिटिश रॉ. ए. सो. सन १९०५ च्या वृत्तांत ( पा. ३३ व ४० ) दाखविलें आहे. तेव्हां भामहाचा काळ इ. स. ५०० नंतरचा असला पाहिजे व तो धर्मकीर्तींच्या मागून झालेला अस ल्यास तो काळ इ स. ६०० नंतरचा ठरतो.*

---

*हे लिहून झाल्यावर अलीकडे आणखी माहिती मिळाली व लेख प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून वरील विवेचनांत थोडा फरक केला पाहिजे. आमचे हें मत प्रसिद्ध झाले त्याच सुमारास प्रो. याकोबी ह्यांनी भामह व धर्मकीर्ति यांचीं कांहीं साधर्म्ये दाखवून भामह धर्मकीर्तीनंतर झाला असें मत दिले. जयन्त-भट्टाच्या न्यायमञ्जरी या ग्रंथांत ' प्रत्यक्षं कल्पनापोढमभ्रान्तं ' असे प्रत्यक्षाचें लक्षण भिक्षु म्हणजे धर्मकीर्ति याने केलें असें म्हटलें आहे ( यत्तावत्कल्पनापोढ-मभ्रान्तमिति लक्षणम् । प्रत्यक्षस्य जगौ भिक्षुस्तदत्यन्तमसांप्रतम् ॥ विजयानगर प्रत पान ९२ ). प्रो. बटुकनाथ शर्मा यांनीं आम्ही वर केलेल्या भामहाच्या ५ व्या परिच्छेदांतील तर्कशास्त्रविषयांचा अनुवाद करून जास्त सूक्ष्म अभ्यास करून असें दाखविलें आहे की, ' प्रत्यक्षं कल्पनापोढं ' ही प्रत्यक्षाची व्याख्या दिङ्नागानें दिली व त्यांतच ' अभ्रान्त ' हें विशेषण घालून धर्मकीर्तीनें दिली म्हणून भामह हा दिङ्नागाचा उल्लेख करितो, धर्मकीर्तींचा करीत नाहीं ( भाम हालंकाराची प्रस्तावना पान ४१–५५ ). दिङ्नागाचा काल विवादास्पदच आहे. पण तो इ. स. ४०० ते ५०० असण्याचा संभव आहे. धर्मकीर्ति ६५० च्या सुमारास झाला. म्हणून भामह हा दिङ्नागानंतर व धर्मकीर्तींचे पूर्वीं झाला असें प्रो. बटुकनाथ यांचे म्हणणें आहे ( भामहालंकाराची प्रस्तावना पान ४०-५५ ). त्याचप्रमाणे प्रो. टुचि ( Tucci ) यांनीं अगदी अलीकडे इन्डियन ॲण्टिक्करी ( जुलै १९३० ) या मासिकांत लेख लिहून असें सिद्ध केलें आहे कीं भामह हा ५ व्या परिच्छेदांत दिङ्नागाच्या मतांचा अनुवाद करीत आहे, धर्म-कीर्तींचा नव्हे. प्रो. टुचि यांचे मताचें सारही विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. परंतु त्यांचे मताचे विरुद्ध एक दोन गोष्टींचा उल्लेख येथें केला पाहिजे. ' प्रत्यक्षं कल्पनापोढं...केचन । प्रतिजानेत ' ॥ ( भामह ५-६ ) यांत ' केचन ' शब्दाचा भामहानें प्रयोग केला आहे यावरून दिङ्नागाची प्रत्यक्षाची व 'कल्पना' ची व्याख्या भामहाला पसंत नव्हती असें होतें. त्याचप्रमाणें ' त्रिरूपाल्लिङ्गतो

दंडीचा काळ देखील दुसऱ्या एका मार्गानें निश्चित करितां येतो. शार्ङ्गधरपद्धति ( श्लो. १८० ) व इतर सुभाषितसंग्रह यांत 'नीलोत्पलदलश्यामां विज्जकां मामजानता । वृथैव दंडिना प्रोक्तं **सर्वशुक्ला सरस्वती**' हा विज्जका-नामक कवयित्रीचा श्लोक दिलेला आहे. यांतील 'सर्वशुक्ला सरस्वती' हे शब्द दंडीचे असून ते काव्यादर्शाच्या पहिल्याच श्लोकांत चवथ्या चरणाच्या रूपानें आलेले आहेत ( चतुर्मुखमुखाम्भोजवनहंसवधूर्मम । मानसे रमतां नित्यं **सर्वशुक्ला सरस्वती** ). शार्ङ्गधरपद्धतीत ( पद्य १६३ ) धनद-देवाच्या पद्यांत कवयित्रींच्या नामावळींत विज्जा हें नांव आलें असून सुभाषितसंग्रहात्मक अनेक ग्रंथांत या विज्जकेच्या नांवा-वर अनेक पद्यें दिलेलीं आढळतात. त्यांतील 'दृष्टि हे प्रति-वेशिनि' ( पद्य ५०० कवीन्द्रवचनसमुच्चय ) आणि 'धन्यासि या कथयसि'

---

ज्ञानमनुमानं च केचन' ( भामह ५, ११ ) यांतहि केचन शब्द आहे म्हणून भामह हा दिङ्नागाचे मत प्रमाण मानीत नसून केवळ त्याचा उल्लेख करीत आहे इतकेंच सिद्ध होईल. तसेंच 'सत्त्वादयः (सत्त्वादर्थः ) प्रमाणाभ्यां प्रत्यक्षमनुमा च ते । असाधारणसामान्याविषयत्वं तयोः किल ॥' यांतील 'किल' ह्या शब्दावरूनहि भामह केवळ एका मताचा अनुवाद करीत आहे हेंच सिद्ध होते. यामुळे दिङ्नागाच्या मतांचा अनुवाद भामहानें केला म्हणून त्यानंतरची मतें भामहाला माहिती नव्हतीं असें होत नाहीं. धर्मकीर्तीच्या शब्दांशीही भामहाचे ( ५, २८ दूषणं न्यूनतायुक्तिः व ५, २९ जातयो दूषणाभासा. ) अत्यंत सादृश्य प्रो. बटुकनाथ शर्मा यांनीच दाखविलें आहे. म्हणून माझें असें मत आहे कीं, भामहानें ( ५-१२ ) प्रतिज्ञा केल्याप्रमाणें काश्मीरांत त्यावेळी प्रचलित अस-लेल्या न्यायशास्त्राच्या क्रमिक पुस्तकांवरून ( Text Books ) प्रतिज्ञाहा-न्यादिदोष कसे असतात हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. प्रो. बटुकनाथ शर्मा यांनी यावरून व इतर प्रमाणांवरून जे अनुमान काढलें आहे कीं, भामह दंडीच्या पूर्वीं कित्येक शतकें झाला ( भामहालंकार प्रस्तावना पान ४० ) त्याला बिलकूल आधार नाही व हे मत मला मुळींच मान्य नाहीं. भामह हा धर्मकीर्तीचा सम-कालीन असण्याला प्रत्यवाय नाहीं व दण्डीही इ. स. ६००-६५० च्या सुमारास झाला असें मानण्याविरुद्ध अवन्तिसुन्दरीकथेशिवाय कांहीं विरुद्ध नाहीं.

( पद्य २९८ कवीन्द्रवचनसमुच्चय ) हीं दोन पद्यें अलंकारग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं उद्धृत केलेली आढळतात. दोन्ही मम्मटाच्या शब्दव्यापारविचारांत व दुसरें पुनः त्याच्या काव्यप्रकाशांत अशी आलेलीं आहेत. पहिलें पद्य दशरूपावलोक नांवाच्या धनिककृत दशरूपावरील टीकेंत ( २,२१ ) व मुकुलभट्टाच्या अभिधावृत्तिमातृकेंत ( नि. सा. प्रत पा. १२ ) आलें आहे. मुकुलाचा काल इ. स. ९३५ च्या सुमाराचा असून त्याविषयींचें विवेचन पुढें यथाप्रसंग येणार आहेच. या सामग्रीचा विचार करतां विज्जका ही सन ८५० नंतरची असणे शक्य नसल्यामुळे दंडी सहजच ८५० च्या बराच पूर्वीचा ठरतो. जल्हणाच्या सूक्तिमुक्तावलींत राजशेखराच्या नांवावर 'सरस्वतीव कार्णाटी विजयाङ्का जयत्यसौ । या विदर्भगिरां वासः कालिदासादनन्तरम् '। असा श्लोक दिला असून त्यांत एका कर्णाटकी कवयित्रीचा उल्लेख आहे ( शार्ङ्गधरपद्धति पद्य १८४ ). यांतील ' विजयाङ्का सरस्वतीव' या शब्दांवरून ती कवयित्री विजयनामांकित सरस्वतीच जणूं होती असा अर्थ निष्पन्न होतो. या कवयित्रीनें आपल्या काव्यांत **विजय** हा खुणेचा शब्द म्हणून घातलेला आहे असाहि दुसरा अर्थ त्या शब्दांवरून निघूं शकेल. यांतील पहिला अर्थ काढण्यास ' व्यासगिरां निर्यासं सारं विश्वस्य भारतं वंदे । भूषणतयैव संज्ञां यदाङ्किता भारती वहति ' ॥ अशासारख्या पद्यांचा आधारहि आहे. विज्जका हीमुद्धां दक्षिणप्रांतीय कवियित्री असावी असें दिसून येत असून ती व कार्णाटी विजयाङ्का या बहुधा एकच असाव्यात. आतां कार्णाटी विजयाङ्का ही जर दुसऱ्या पुलकेशीच्या मुलाची म्हणजे चंद्रादित्य राजाची सुप्रसिद्ध राणी विजयभट्टारिकाच असेल तर तिचा काळ इ. स. ६६० च्या सुमाराचा आहे. या विषयीं विस्तृत माहिती इंडियन अँटिक्वरी ग्रंथ ७ पा १६३ व ग्रंथ ८ पा. ४५ यांत दिलेल्या नेरूर व कोचरे येथील त्या राणीच्या ताम्रपटांच्या वर्णनांत आढळून येईल. या नांवाचे समीकरण सिद्ध मानिल्यास दंडीचा काळ इ. स. ६०० पूर्वीचा ठरेल. श्रावण बेळगोळ येथें मल्लिषेणाच्या शिष्यानें मल्लिषेणाचा जो मृत्युलेख कोरिला आहे त्यांत दिगम्बरांचा आचार्य श्रीवर्धदेव याची दण्डीनें एका श्लोकांत स्तुति केली होती असें म्हटलें आहे ' य एवमुपश्लोकितो दण्डिना 'जह्नो. कन्यां जटाग्रेण बभार परमेश्वरः । श्रीवर्धदेव संधत्से जिव्हाग्रेण सरस्वतीम्' ( एपिग्राफिआ इन्डिका व्हा. ३ पान १८४,१९१ )

इ. स. ६ वें शतक हा दंडीचा काळ बहुत विद्वानांनी मान्य केलेला आहे. ' हिंदुस्थानापासून काय शिकावें ' ? या पुस्तकांत मॅक्समुल्लरनें, संस्कृत वाङ्‌म-

याच्या इतिहासांत वेबरनें व मॅक्डोनेलने आणि कर्नल जेकब याने रॉ. ए. सो. च्या सन १८९७ च्या वृत्तांत ( पा. २८८ ) हाच काळ सांगितला. आहे.

काव्यादर्शावर अनेक टीका आहेत. त्यांतील कांहीं देतों. ( १ ) तरुण वाचस्पतीची **व्याख्या**, ( २ ) **हृदयंगमा** नांवाची पहिल्या दोन परिच्छेदांवरलि एका निनांवी पंडिताची टीका ( या प्रो. रंगाचार्य यांनी आपल्या काव्यादर्शाच्या आवृत्तींत छापल्या आहेत ), ( ३ ) महामहोपाध्याय हरिनाथकृत **मार्जन** नांवाची टीका ( डॉ. पीटरसनच्या हस्तलिखित ग्रंथाच्या ६ व्या इतिवृत्तांत पा. ३० सांगितली आहे ). हरिनाथ हा विश्वधराचा मुलगा व केशवाचा कनिष्ठ बंधु म्हणून म्हटलेला आहे. इंडिया आफिसच्या ग्रंथनामावलींत ( पा. २२१ ) बंगाल्यांतील गोपालपुरच्या कृष्णकिकर तर्कवागीशांची **काव्यतत्त्वविवेककौमुदी** टीका नमूद केली आहे. याशिवाय वादिघंघलकृत **श्रुतानुपालिनी** व जगन्नाथाचा पुत्र मल्लिनाथ याची **वैमल्यविधायिनी** अशा टीका असून आफ्रेक्टच्या ग्रंथनामावलींत आणखीहि कांही नांवें दिलीं आहेत.

## १० उद्भटकृत अलंकारसारसंग्रह.

हा ग्रंथ कर्नल जेकब यांनी ब्रिटिश रायल एशियाटिक सोसायटीच्या वृत्तान्तात सन १८९७ ( पा. ८२०–८४७ ) रोमन लिपीत प्रथम प्रसिद्ध केला व त्यानंतर १९१५ साली निर्णयसागर छापखान्यांत तो सटीक छापण्यांत आला. अलीकडे सन १९२५ मध्यें रा. नारायण दासो बनहट्टी यांनी बाम्बे संस्कृत सीरीजमध्यें सटीक संपादिला आहे. येथें निर्णयसागर प्रतीवरून वर्णन केले आहे. ती टीका लघुवृत्ति नांवाची प्रतिहारेन्दुराज नामक टीकाकाराने केलेली आहे. उद्भटाच्या या अलंकारसारसंग्रहाचे वर्ग नांवाचे सहा भाग असून ७९ कारिका आहेत व त्यांत ४१ अलंकारांच्या व्याख्या व त्यांच्या स्पष्टीकरणार्थ सुमारे शंभर उदाहरणात्मक श्लोक आले आहेत. हीं उदाहरणे उद्भटानें स्वतःच्याच **कुमारसंभव** नामक काव्यांतून घेतलीं आहेत असे टीकाकार प्रतीहारेन्दुराजानें म्हटले आहे ( पा. १५ ) ' अनेन ग्रंथकृता स्वोपरचित**कुमारसंभवैक**देशोत्र उदाहरणत्वेन उपन्यस्तः । तत्र पूर्वं दीपकस्योदाहरणानि । तदनुसंधानाविच्छेदाय उद्देशक्रमः परित्यक्तः ' ॥. उद्भटानें अलंकारांची नामावली देतांना रूपक, उपमा, दीपक असा क्रम धरिला ( रूपकं चतुः । उपमा दीपकं चैव इ०

कारिका १-२ ) पण व्याख्या देतांना रूपकानंतर दीपक प्रथम घेऊन उपमा मग घेतली, याचें कारण उदाहरणें त्यानें स्वतःच्या काव्यांतून घेतलीं असून तेथील पौर्वापर्यक्रम त्याला राखावयाचा होता हें होय असें प्रतीहारेन्दुराजानें सांगितलें आहे. सारसंग्रहाच्या पहिल्या वर्गात पुनरुक्तवदाभास, छेकानुप्रास, परुषा उपनागरिका व ग्राम्या किंवा कोमला या तीन वृत्तींना अनुसरणारा तीन प्रकारचा अनुप्रास, लाटानुप्रास, रूपक, उपमा, दीपकाचे आदि मध्य व अंत असे तीन प्रकार, प्रतिवस्तूपमा, इतके अलंकार आले असून दुसऱ्या वर्गात आक्षेप, अर्थान्तरन्यास, व्यतिरेक, विभावना, समासोक्ति व आतिशयोक्ति; तिसऱ्या वर्गात यथासंख्य, उत्प्रेक्षा व स्वभावोक्ति; चवथ्या वर्गात प्रेयः, रसवत्, ऊर्जस्वि, पर्यायोक्त, समाहित, दोन प्रकारचें उदात्त व श्लिष्ट; पांचव्यांत अपह्नुति, विशेषोक्ति, विरोध, तुल्ययोगिता, अप्रस्तुतप्रशंसा, व्याजस्तुति, विदर्शना, उपमेयोपमा, सहोक्ति, चार प्रकारचा संकर व परिवृत्ति; आणि सहाव्या वर्गात अनन्वय, ससंदेह, संसृष्टि, भाविक, काव्यदृष्टान्त व काव्यहेतु इतके अलंकार सोदाहरण आले आहेत. जे अलंकार ज्या वर्गात सांगितले आहेत, त्यांचीं नांवें त्या वर्गाच्या आरंभीं उद्भटानें दिलीं आहेत. या नामावळींतील क्रमावरून दिसून येईल कीं हा क्रम भामहाच्या क्रमाला धरूनच बहुतेक आहे. यमक, उपमारूपक, उत्प्रेक्षावयव इत्यादि भामहानें सांगितलेले अलंकार उद्भटानें गाळले आहेत, तर उलट पुनरुक्तवदाभास, संकर, काव्यहेतु व काव्यदृष्टांत हे भामहानें सांगितले नसतांहि उद्भटानें सांगितले आहेत. सामान्यतः ज्याला निदर्शना म्हणतात त्याला उद्भटानें विदर्शना म्हटलेलें आहे. **नि** च्या ठिकाणीं **वि** लेखकप्रमादानें पडला म्हणावा तर एखाद्या ठिकाणींच तसें नसून सर्वत्र व प्रतीहारेन्दुराजाच्या टीकेंतहि तसेंच आहे ही विचार करण्यासारखी गोष्ट दिसते. या अलंकाराच्या दोन्ही प्रकारच्या व्याख्या उद्भटानें दिल्या असून एकाचेंच उदाहरण दिलें आहे व दुसऱ्याच्या उदाहरणासाठी टीकाकारानें भामहाच्या ग्रंथाकडे धाव घेतली आहे " यत्र तु पदार्थसमन्वय उपमानोपमेयभावकल्पनया स्वात्मानमुपपादयति तस्य विदर्शनाभेदस्य उदाहरणमुद्भटपुस्तके न दृश्यते । तस्य तु भामहोदितमिदमुदाहरणम् । ' अयं मन्दद्युतिर्भास्वानस्तं प्रति यियासति । उदयः पतनायेति श्रीमतो बोधयन्नरान् ' । ( भामह ३, ३३ ) इति" (पा. ६२).

उद्भटाच्या अलंकाराच्या व्याख्या भामहाच्या व्याख्यांशी ताडून पाहिल्यास

आक्षेप, विभावना, अतिशयोक्ति, यथासंख्य, पर्यायोक्त, अपह्नुति, विरोध, अप्रस्तुतप्रशंसा, सहोक्ति, ससंदेह, व अनन्वय यांच्या व्याख्या बहुतेक शब्दशः एकच आहेत आणि अनुप्रास, उत्प्रेक्षा, रसवत्, भाविक इत्यादि कित्येक अलंकारांच्या व्याख्यांमध्यें सुद्धां अगदी निकट शब्दसाम्य आहे असें दिसून येईल. उद्भटानें भामहाच्या काव्यालंकारावर भामहविवरण * लिहिले असल्यामुळे उद्भटाच्या ग्रंथांत हें शब्दसादृश्य आलें असले पाहिजे असेंच वाटते. प्रतीहारेन्दुराजानें या टीकेचा उल्लेख आपल्या लघुवृत्तीत केला आहे. तो म्हणतो " एकदेशवृत्तीत्यत्र हि एकदा अन्यदा ईशः प्रभविष्णुर्यो वाक्यार्थस्तद्वृत्तित्वं रूपकस्याभिमतम् । विशेषोक्तिलक्षणे च **भामहविवरणे** भट्टोद्भटेन एकदेशशब्द एवं व्याख्यातो यथेहास्माभिर्निरूपितः । तत्र विशेषोक्तिलक्षणं ' एकदेशस्य विगमे या गुणान्तरसंस्तुतिः । विशेषप्रथनायासौ विशेषोक्तिर्मता यथा ' ॥" ( भामह ३, २२; लघुवृत्ति पान १३ ). भामहविवरण हा उद्भटाचा टीकाग्रंथ बराच विस्तृत असून अलंकारसारसंग्रह हा त्या टीकाग्रंथाचा संक्षेप असावा असें सारसंग्रह नांवावरून अनुमान होते. पुढील अलंकारग्रंथांत भामहविवरणाचा अनेक ठिकाणीं उल्लेख केलेला आढळतो. ध्वन्यालोकावरील लोचनटीकेंत ( पा. १० ) " भामहोक्तं ' शब्दश्छंदोभिधानार्थः ' ( भामह १, ९ ) इत्यभिधानस्य शब्दाद्भेदं व्याख्यातुं भट्टोद्भटो बभाषे शब्दानामभिधानमभिधाव्यापारो मुख्यो गुणवृत्तिश्च इति ।". तसेंच आणखी ( पा. ४० ) ' यत्तु विवरणकृद्दीपकस्य सर्वत्रोपमान्वयोस्तीति बहुनोदाहरणप्रपञ्चेन विचारितवांस्तदनुपयोगि नितरां सप्रतिक्षेपं च '. ध्वन्यालोकांत ( पा. ३८ ) अनुक्तनिमित्ता विशेषोक्तीचें उदाहरण म्हणून ' आहूतोऽपि सहायैरेमीत्युक्त्वा विमुक्तनिद्रोऽपि । गन्तुमना अपि पथिकः संकोचं नैव शिथिलयति ।' असा जो श्लोक दिला आहे त्याचें स्पष्टीकरण करतांना लोचनकारानें ' शीतकृता स्वल्पार्तिरत्र निमित्तमिति भट्टोद्भटः । ' असें

---

* भामहविवरण असें टीकेचें नांव होतें असें निश्चित म्हणतां येत नाहीं. विवरण म्हणजेच टीका म्हणून भामहविवरण हें त्या टीकाग्रंथाचें नुसतें वर्णन असण्याचा संभव आहे. परंतु पुढें अभिनवगुप्ताच्या लोचनांतील जे उतारे दिले आहेत त्यांवरून असें वाटतें कीं उद्भटाच्या भामहावरील टीकेला भामहविवरण असें नांव होतें.

उद्भटाचें मत दिलें आहे. तसेंच आणखी ( पा. १५९ ) एका ठिकाणीं **अन्यत्र** या ध्वन्यालोकावरील शब्दाचें ' भामहविवरणे ' असें स्पष्टीकरण लोचनांत केलें आहे. अलंकारसारसंग्रहावरील टीकेंतहि एका ठिकाणीं ( पा. ४९ ) प्रतीहारेन्दुराजानें " एषां च शृंगारादीनां नवानां रसानां स्वशब्दादिभिः पंचभिरवगतिर्भवति । यदुक्तं भट्टोद्भटेन ' पञ्चरूपा रसाः ' इति । तत्र स्वशब्दाः शृंगारादेर्वाचकाः शृंगारादयः शब्दाः " असें जें म्हटलें आहे त्यांतील उद्भटाच्या वचनाचा संबंध भामहविवरणाशींच असावा असें वाटतें. प्रतिहारेन्दुराजाच्या या विधानांतील शेवटचें वाक्य अलंकारसारसंग्रहांतील ' स्वशब्दस्थायिसंचारिविभावाभिनयास्पदम् ' । या शब्दांवरील टीका आहे. पण हेमचंद्रानें **विवेकामध्ये** ( पान ११० ) " एतेन रसवद्दर्शितस्पष्टशृंगारादिरसोदयम् । स्वशब्दस्थायिसंचारिविभावाभिनयास्पदम् ॥ ' इत्येतद्व्याख्यानावसरे यद्भट्टोद्भटेन ' पञ्चरूपा रसाः ' इत्युपक्रम्य ' स्वशब्दाः शृंगारादेर्वाचकाः शृंगारादयः शब्दाः ' इत्युक्तं तत्प्रतिक्षिप्तम् । " असें जें म्हटलें आहे त्यावरून हेमचंद्रानें केवळ प्रतीहारेन्दुराजाच्या शब्दांवरून अवतरण केलें असून त्याच्यापुढें भामहविवरण ही टीका प्रत्यक्ष नव्हती व म्हणून त्यानें ' रसवद्दर्शितस्पष्ट ' इत्यादि ' विभावाभिनयास्पदम् ' पर्यंतचा श्लोक वस्तुतः उद्भटाचा असतां तो भामहाच्या **रसवत्** या अलंकाराच्या व्याख्येंतील मानिला असें दिसतें. वस्तुतः भामहाची रसवत्‌ची व्याख्या ' रसवद्दर्शितस्पष्टशृंगारादिरसं ' ( ३, ६ ) एवढीच आहे. हीच चूक आणखी माणिक्यचंद्राच्या काव्यप्रकाशसंकेतांतहि झालेली दिसते. त्यांत म्हटले आहे ' एतेन शृंगाराद्याः शब्दा. शृंगारादेर्वाचका इत्युद्भटोक्त निरस्तम् । '. काव्यप्रकाशाच्या काव्यादर्शनामक सोमेश्वरकृत टीकेंतहि असाच प्रकार आढळतो. सोमेश्वर म्हणतो ' रसवद्......स्पदमित्यस्य व्याख्यायां पञ्चरूपा रसा इत्युपक्रम्य तत्र स्वशब्दाः शृंगारादेर्वाचका इति भट्टोद्भटोक्तं निरस्तम् । '. हेमचंद्रानें भामहविवरण या उद्भटकृत टीकेचा आणखीहि ( पा. १७ ) उल्लेख केला आहे " एतावता ' शौर्यादि गुणाः केयूरादितुल्या अलंकारा इति विवेकमुक्त्वा संयोगसमवायाभ्यां शौर्यादीनामस्ति भेदः, इह तूभयेषां समवायेन स्थितिरित्यभिधाय 'तस्माद्गड्डरिकाप्रवाहेण गुणालंकारभेदः ' इति भामहविवरणे यद्भट्टोद्भटोभ्यधात्तन्निरस्तम् ". माणिक्यचंद्रानें संकेतांतहि ( म्हैसूर प्रत पा. २८९ ) तसेंच म्हटलें आहे " शब्दार्थालंकाराणां गुणवत्समवायेन स्थितिरिति भामहवृत्तौ भट्टो-

द्भटेन भणनमसत्' व सोमेश्वरानेंहि तसेंच सांगितले आहे. याशिवाय रुय्यकाच्या अलंकारसर्वस्वावरील समुद्रबंधाच्या टीकेंतहि (पा. ८९) 'उद्भटेन च काव्यालंकारविवृतौ सत्कवित्वविरहिताया विदग्धताया अस्थैर्यस्याशोभनस्य च प्रतिपादनाय निदर्शनद्वयमिति वदता का श्रीरित्यस्य श्रीरस्थिरेत्यर्थोऽभिहितः।' असें म्हणून काव्यालंकारावरील उद्भटकृत विवरणाचा उल्लेख केला आहे.

उद्भटाच्या ग्रंथाचा अलंकारशास्त्राच्या प्रांतांत बराच पगडा बसलेला दिसतो. त्याने भामहाला मागे टाकिलें. त्याच्या साहित्यशास्त्रविषयक प्रामाण्यामुळें बहुधा भामहाचा ग्रंथ पुढें प्रसार पावला नाहीं व त्यामुळें त्याच्या प्रति दुर्मिळ होऊन बसल्या आहेत. उद्भटाचे उल्लेख ग्रंथकारांनीं बहुमानपुरस्सर केले असून मतभेद प्रदर्शित करतांनाहि त्यांनीं तो आदरानेच केलेला आहे. अलंकारसंप्रदायाचा तो अगदीं अध्वर्यु असून अलंकारशास्त्रविषयक अनेक मतांशी त्याचेंच नांव निगडित झालेलें आहे. अनेक महत्त्वाच्या बाबतींत त्याचा भामहाशीं मतभेद दिसतो. उदाहरणार्थ, भामहाने अनुप्रासाचे भेद ग्राम्या व उपनागरिका या वृत्तींना अनुसरून दोनच केले आहेत, रूपकाचेहि दोनच दिले आहेत व श्लेषाचे तीन दिले आहेत; पण उद्भटाने परुषावृत्तीला अनुसरून अनुप्रासाचा आणखी एक भेद, रूपकाचे चार भेद, व श्लेषाचे दोनच सांगितले आहेत. याविषयीं प्रतीहारेन्दुराज म्हणतो (पा. १) 'भामहो हि ग्राम्योपनागरिकावृत्तिभेदेन द्विप्रकारमेवानुप्रासं व्याख्यातवान्। तथा रूपकस्य ये चत्वारो भेदा वक्ष्यन्ते तन्मध्यादाद्यमेवं भेदद्वितयं प्रादर्शयत्।'; तसेंच आणखी (पा. ४७) "भामहो हि 'तत्सहोक्त्युपमाहेतुनिर्देशात्त्रिविधं यथा' (भामह ३, १७) इति श्लिष्टस्य त्रैविध्यमाह". लोचनकार म्हणतो, 'भामहेन गुरुदेवनृपतिपुत्रविषयप्रीतिवर्णनं प्रेयोलंकार इत्युक्तं...उद्भटमते हि भावालंकार एव प्रेय इत्युक्तः' (पा. ७१,७२) म्हणजे भामहानें गुरु, देव, राजा, पुत्र यांच्या विषयींच्या प्रेमाच्या वर्णनाला प्रेयस् नांवाचा अलंकार मानिलें असून उद्भटानें भावालंकारालाच प्रेयस् म्हटलें आहे. भामहानें परुषा, ग्राम्या व उपनागरिका या वृत्तींचा उल्लेख केला नाहीं, पण उद्भटानें तो केला आहे ही गोष्टहि लोचनकाराने दाखविली आहे (पा. ६). ध्वन्यालोकामध्यें उद्भटाचा उल्लेख 'तत्रभवद्भिरुद्भटादिभिः' (पा. १०८) असा आदरपूर्वक केला असून अलंकारसर्वस्वकाराने 'इह तावद्भामहोद्भटप्रभृतयश्चिरंतनालंकारकाराः' या शब्दांनी उद्भटाविषयींची आदरबुद्धि दर्शविली

आहे ( पा. ३ ). महिमभट्टाच्या व्यक्तिविवेकाच्या टीकेंत तर उद्भटाला अलंकारशास्त्राचा प्रजापति म्हटले आहे, ' इह हि चिरंतनैरलंकारतंत्रप्रजापातभिर्भट्टोद्भटप्रभृतिभिः शब्दार्थधर्मा एवालंकाराः प्रतिपादिता नाभिधाधर्माः । ' ( पा. ३ ). या नंतरच्याहि अनेक साहित्यशास्त्रकारांनी उद्भटाचे उल्लेख करून त्याच्या ग्रंथांतील अवतरणें घेतलेली आहेत, पण विस्तारभयास्तव त्या सर्वांचा येथें निर्देश करीत नाहीं.

आतां उद्भटाच्या कांहीं विशिष्ट मतांचा विचार करूं. १ ' अर्थभेदेन तावच्छब्दा भिद्यन्ते इति भट्टोद्भटस्य सिद्धान्तः ' म्हणजे शब्दाचें बाह्यरूप सारखें असले तरी जर अर्थ भिन्न असतील तर ते शब्दहि भिन्न होत, असे उद्भटाचें मत प्रतीहारेन्दुराजाने सांगितलें आहे ( पा. ५५ ). २ श्लेष दोन प्रकारचा म्हणजे शब्दश्लेष व अर्थश्लेष असा असून दोन्ही अर्थालंकारच होत असें उद्भटाचें मत दिसतें, कारण शब्दालंकार प्रथम वर्गात सांगितल्यावर अर्थालंकारांच्या विवेचनांत हे दोन्ही प्रकार त्याने वर्णिले आहेत. पण या मतावर मम्मटानें काव्यप्रकाशाच्या नवव्या उल्लासांत चरचरीत टीका केली आहे. तो म्हणतो ' शब्दश्लेष म्हणून नांव द्यावयाचे आणखी अर्थालंकारांत त्याचें लक्षण सांगावयाचे ही कोठली रीत ? ' शब्दश्लेष इति चोच्यते अर्थालंकारमध्ये च लक्ष्यते इति कोऽयं नयः ' । ( वामनाचार्यांची आवृत्ति पान ५२७ ). ३ उद्भटाच्या मतें श्लेष हा इतर अलंकारांहून प्रबल अलंकार आहे व म्हणून जेथें त्याच्या बरोबर इतर अलंकारांचा संयोग झालेला असतो तेव्हां त्यालाच प्राधान्य येऊन इतर अलंकारांना गौणत्व येते व ते श्लेषाच्या योगानें फिके पडतात. तो म्हणतो ' श्लिष्टमिहोच्यते । अलंकारान्तरगतां प्रतिभां जनयत्पदैः । ' इत्यादि. इतर अलंकारांची शोभा श्लेषांतील शब्दांमुळेंच उत्पन्न होते व त्यामुळे श्लेषच पुढे होऊन इतर मागे पडतात ( ' अतोऽनेनानवकाशत्वात् स्वविषयेऽलंकारान्तराण्यपोद्यन्ते, तेषां विषयान्तरे सावकाशत्वात् ' । प्रतीहारेन्दुराज पान ५५ ). उद्भटाच्या या मताचा निर्देश ध्वन्यालोककाराने केला आहे ( पान ९६ ) व मम्मटानें याहि मताला विरोध केला आहे. ४ वाक्यांचा अर्थ तीन प्रकारांनीं होतो असें उद्भटाचें मत असून ' तस्य ( म्हणजे वाक्यस्य ) च त्रिधाऽभिधाव्यापार इति औद्भटाः ' असा त्याचा काव्यमीमांसाकार राजशेखरानें निर्देश केलेला आहे. ५ अर्थ दोन प्रकारचा आहे असेंहि उद्भटाचें मत

असल्याचें राजशेखर सांगतो, ' किन्तु द्विरूप एवासौ विचारितसुस्थोऽविचारित-रमणीयः । तयोः पूर्वमाश्रितानि शास्त्राणि तदुत्तरं काव्यानि इति औद्भटाः ' ( पा ४४ का. मी. ). व्यक्तिविवेकटीकेतहि अशाच आशयाच्या उद्भटसांप्रदायिक मताचा उल्लेख आढळतो ' शास्त्रेतिहासवैलक्षण्य तु काव्यस्य शब्दार्थ-वैशिष्ट्यादेव नाभिधावैशिष्ट्यादिति भट्टोद्भटादीनां सिद्धान्तः '. या मताप्रमाणें शास्त्रीय ग्रंथ व काव्यग्रंथ यांत जो भेद आहे तो या दोन प्रकारच्या अर्थामुळें झालेला आहे. शास्त्रीय ग्रंथांत विचाराच्या नीटनेटकेपणाकडे लक्ष असते तर काव्यांत कार्यकारणभावादि विवेकाला फारशी जागा नसून रम्यपणाकडेच दृष्टि असते. ६ लोचनकाराने ' संघटनाया धर्मा गुणा इति भट्टोद्भटादयः ' (पा. १३४) अशा आणखी एका औद्भट मताचा उल्लेख केलेला आढळतो. ७. व्याकरणाच्या दृष्टीनें उपमेचे भेद मम्मटादि नंतरच्या ग्रंथकारांनी जे केले आहेत, त्यांचा मूळ विस्तृत विचार उद्भटानेच केलेला दिसतो. *

' रसाद्यधिष्ठितं काव्यं जीवद्रूपतया यतः । कथ्यते तद्रसादीनां काव्यात्मत्वं व्यवस्थितम्' हे पद्य उद्भटाचें होय असें वाटल्यावरून कर्नल जेकब यांनीं उद्भटाचे मत रस हाच काव्याचा आत्मा होय असे होतें असें मानिलें ( ब्रिटिश रॉ. ए. सो. वृत्त स. १८९७ पा. ८४७ ). पण अनेक कारणांवरून याच्या उलट अनुमान निघतें. प्रथम उपरोक्त पद्य प्रतीहारेन्दुराजानें ' असें म्हटले आहे ' ( तदाहुः पा. ७७ ) या शब्दांनीं उद्धृत केले आहे, अर्थात् त्याच्या पूर्वीच्या कोणा ग्रंथ-काराचें तें आहे हें उघड आहे. तें जर उद्भटाचें मानिलें तर उद्भटानें जो ग्रंथांत क्रम स्वीकारलेला आहे त्याचा भंग होतो. हें पद्य काव्यलिंग अलंकाराच्या व्याख्येवरील टीकेंत आलें आहे. आतां व्याख्या सांगितल्यानंतर लगेच अलकाराचें उदाहरण द्यावयाचें असा साऱ्या ग्रंथाचा क्रम आहे व तदनुसार काव्यलिंगाचें उदाहरण ' छायेयं तव शेषांगकान्तेः किञ्चिदनुज्ज्वला । विभूषाघटनादेशान्दर्शयन्ती दुनोति माम्' असें पुढे आलें आहे. पण कर्नल जेकबच्या अनुमानाप्रमाणें 'रसाद्यधिष्ठितं

* ' भावप्रकाशन ' या ग्रथांत ( पान १२ ) भारती, सात्वती, कैशिकी व आरभटी या चार वृत्तींशिवाय पांचवी अर्थवृत्ति उद्भटाचे अनुयायांनीं मानिली होती असें म्हटलें आहे.

काव्यं ' इत्यादि पद्य जर टीकेंतील नसून उद्भटाचें मानिले, तर तें काव्यलिंगाची व्याख्या व उदाहरण यांच्यामध्यें अकस्मात् घुसडून दिल्यासारखें होतें. पण उद्भट हा रससंप्रदायी नव्हता असें मानावयाला मोठें बलवत्तर प्रमाण म्हणजे त्याची स्वतःची रसवत् या अलंकाराची व्याख्याच होय. ' रसवत् दर्शित स्पष्टशृंगारादिरसादयम् ' अशी त्याची रसवत्ची व्याख्या असून त्यांत अलंकाराला प्रधान व रसाला गौण स्थान दिले आहे. अलंकारसर्वस्वामध्येंहि ( पा. ५ ) ' उद्भटादिभिस्तु गुणालंकाराणां प्रायशः साम्यमेव सूचितम् ।...तदेवमलंकारा एव काव्ये प्रधानमिति प्राच्यानां मतम् ' असे म्हणून उद्भटाचें अलंकारसांप्रदायिकत्वच दाखविले आहे. असो. काव्यमालेंत छापिलेल्या अलंकारसारसंग्रहाच्या आवृत्तींत ४२ व्या पानावर ' तदुक्तम् ' असें म्हणून ' तद् द्विगुणं त्रिगुणं वा ' इत्यादि पद्य जाड्या अक्षरांनी छापून ते उद्भटाच्या कारिकेंतील आहे असे दर्शविले आहे. पण वस्तुतः तें टीकाकाराने रुद्रटाच्या काव्यालंकारांतून उद्धृत केलेले आहे ( काव्यालंकार ७. ३५ ).

उद्भटानें आपल्या काव्यालंकारसारसंग्रहांत अलंकारांचीं उदाहरणें ज्या आपल्या कुमारसंभवकाव्यांतून घेतली ते कालिदासाच्या सुप्रसिद्ध कुमारसंभव महाकाव्याप्रमाणेंच असावें असें वाटतें. त्या दोन्ही काव्यांत शब्दसादृश्यच पुष्कळ आहे असे नाही, तर प्रसंगहि दोन्हींत सारखे सारखेच दाखविले आहेत. उदाहरणार्थ, ' प्रच्छन्ना शस्यते वृत्तिः स्त्रीणां भावपरीक्षणे । प्रतस्थे धूर्जटिरतस्तनुं स्वीकृत्य बाटवीम् ' ॥ ( उद्भट २, १० ), ' अपश्यच्चातिकष्टानि तप्यमानां तपांस्युमाम् । असंभाव्यप्रतीच्छानां कन्यानां का परा गतिः ' ॥ ( उद्भट ( २, १२ ), ' शीर्णपर्णाम्बुवाताशकष्टेऽपि तपसि स्थिताम् । समुद्वहन्तीं नापूर्व गर्वमन्यतपस्विवत् ' ॥ ( उद्भट २, १७ ) इत्यादि उद्भटाचे श्लोक, ' विवेश कश्चिज्जटिलस्तपोवनं शरीरबद्धः प्रथमाश्रमो यथा । ' ( कुमारसंभव ५, ३० ), ' इयेष सा कर्तुमवन्ध्यरूपतां समाधिमास्थाय तपोभिरात्मनः । अवाप्यते वा कथमन्यथा द्वयं तथाविधं प्रेम पतिश्च तादृशः ॥ ' ( ५, २ ), 'स्वयं विशीर्णद्रुमपर्णवृत्तिता परा हि काष्ठा तपसस्तया पुनः । तदप्यपाकीर्णमतः प्रियंवदां वदन्त्यपर्णेति च तां पुराविदः ॥' ( ५, २८ ) इत्यादि कालिदासाच्या श्लोकांशीं ताडून पाहिल्यास या विधानाची साक्ष पटेल.

उद्भटाचे ग्रंथ म्हणजे भामहविवरण, काव्यालंकारसारसंग्रह व कुमारसंभव हे तर तीन स्पष्ट आहेत. पण उद्भटानें भरताच्या नाट्यशास्त्रावर टीका लिहिली होती असें संगीतरत्नाकरांतील वर उद्धृत केलेल्या 'व्याख्यातारो भारतीये लोल्लटोद्भटशंकुकाः' या श्लोकावरून दिसते. अभिनवभारतींतही ( पान २६६ ) औद्भटांचे मत दिलेलें आहे. उद्भटाच्या कालनिर्णयासंबंधानें फारशी अडचण दिसत नाही. काश्मीरच्या जयापीड राजाचा तो सभापति होता असे राजतरंगिणीत सांगितलें आहे, 'विद्वान्दीनारलक्षेण प्रत्यहं कृतवेतनः। भट्टोऽभूदुद्भटस्तस्य भूमिभर्तुः सभापतिः।' ( रा. त. ४, ४९५ ). जयापीड राजा इ. स. ७७९ पर्यंत राज्यावर होता. अर्थात् उद्भटाचा काळ इ. स. ८०० च्या सुमाराचा होय असे उघड होते. ध्वन्यालोक या ९ व्या शतकाच्या उत्तरार्धात झालेल्या ग्रंथांत उद्भटाचा उल्लेख वारंवार आलेला असल्यामुळें या कालनिर्णयाला आणखी दुजोरा मिळतो.

उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रहावरील प्रतीहारेन्दुराजाची लघुवृत्तिनामक टीका ही अलंकारग्रंथांवरील उपलब्ध असलेल्या अत्यंत प्राचीन टीकांतील एक होय. हा टीकाकार मुकुलाचा शिष्य होता असे त्याच्या प्रास्ताविक श्लोकावरून दिसते. तो म्हणतो 'विद्वदग्र्यान्मुकुलकादधिगम्य विविच्यते। प्रतीहारेन्दुराजेन काव्यालंकारसंग्रहः।' म्हणजे विद्वन्मुकुटमणि अशा मुकुलाचार्यापासून अलंकारशास्त्र शिकून प्रतीहारेन्दुराजानें काव्यालंकारसंग्रहावर टीका लिहिली (प्रस्तावना पद्य ३ ). या टीकेतील शेवटच्या पद्यांत मुकुलाची फार स्तुति केली असून तो मीमांसा, व्याकरण, तर्क व साहित्य या शास्त्रांत पारंगत होता असें म्हटलें आहे—'मीमांसासारमेघात्पदजलधिविधोस्तर्कमाणिक्यकोशात् । साहित्यश्रीमुरारेर्बुधकुसुममधोः शौरिपादाब्जभृंगात् ॥ श्रुत्वा सौजन्यसिन्धोर्द्विजवर**मुकुला**त्कीर्तिवल्ल्यालवालात् । काव्यालंकारसारे **लघुविवृतिमधात्कौंकणः श्रीन्दुराजः** ॥'. यांत हा टीकाकार आपलं नाव नुसतें श्रीन्दुराज एवढंच देत असून आपल्याला **कौंकण** म्हणजे कोंकणचा रहिवाशी म्हणत आहे. प्रतीहारेन्दुराजाची टीका थोडक्यांत, स्पष्ट व विद्वत्तापूर्ण आहे. त्यानें अमरुक, उद्भट, व्याकरणवार्तिककार कात्यायन, चूर्णिकार ( म्हणजे महाभाष्यकार पतञ्जलि ), दण्डी, भामह, भामहविवरण, वामन इत्यादि ग्रंथकार व ग्रंथ यांचा नामतः उल्लेख केला असून नाट्यशास्त्र, रुद्रटकृत काव्यालंकार व ध्वन्यालोक यांतील अवतरणें अनेकवार घेतलीं

आहेत. प्रतीहारेन्दुराजाचा गुरु जो मुकुल तो इ. स. ९२५ च्या सुमारास होऊन गेला असल्यामुळें स्वतः हा टीकाकार ९५० च्या सुमारास किंवा थोडा बहुत त्यानंतर नांवारूपास आला असला पाहिजे. सुप्रसिद्ध अभिनवगुप्ताचा गुरु इन्दुराज व हा श्री इन्दुराज म्हणवून घेणारा प्रतीहारेन्दुराज हे एकच होते कीं काय या प्रश्नाचा विचार पुढें यथाप्रसंग येणार आहे. जयरथ नांवाच्या टीकाकाराची अलंकारसर्वस्वावर जी टीका आहे तीवरून असें दिसून येतें की उद्भटविवेक किंवा **उद्भटविचार** या नांवाचा राजानकतिलकाचा टीकाग्रंथ होता व रुय्यकाच्या अलंकारसर्वस्वनामक अलकारग्रंथांतील विवेचन सामान्यतः तिलकमताला अनुसरूनच केलेले आहे ( विमर्शिनी पा. ११५, १२४, २०५ ). मद्रासच्या संस्कृत हस्तलिखितांच्या ट्राएनियल कॅटलाग ( पान ४५९४ नंबर ३०९८ ) मध्यें मुकुलाचा उद्भटालंकारविवृति म्हणून एक ग्रंथ नमूद केला आहे. परंतु हा ग्रंथ भट्टेन्दुराजाचा गुरु जो मुकुल त्याचा नव्हे असें त्याच्या विवेचनावरून दिसते. तो मम्मटानंतर झाला असावा.

## ११ वामनकृत काव्यालंकारसूत्र

हा ग्रंथ अनेकवार छापिलेला आहे, पण श्रीरंग येथें वाणीविलास छापखान्यांत कामधेनुटीकेसहित छापिलेली आवृत्ति सर्वांत चांगली आहे. या ग्रंथाचे तीन विभाग आहेत. सूत्रें, त्यावरील स्वतः वामनाची वृत्ति व प्रतिपादिलेल्या विषयाची उदाहरणें. वृत्ति वामनाची असल्याविषयी त्यानेंच आरंभीं सांगितलें आहे. तो म्हणतो ' प्रणम्य परमं ज्योतिर्**वामनेन** कविप्रिया । काव्यालङ्कारसूत्राणां **स्वेषा** वृत्तिर्विधीयते । '. सूत्रकार व वृत्तिकार एकच असल्याचे प्रतीहारेन्दुराजानेहि सांगितलें आहे " यदवोचद्**भट्टवामनः**, ' काव्यशोभायाः कर्तारो धर्मा गुणाः । तदतिशयहेतवस्त्वलंकाराः ' । ( का सू. अधिकरण ३, अध्याय १ सूत्र १-२; लघुवृत्ति पा. १७ ). " भट्टवामनेन चात्र वक्रोक्तिव्यवहारः प्रवर्तितो यदवोचत् ' सादृश्याल्लक्षणा वक्रोक्तिः ' ( अधि ४ अध्याय ३ सू. ८ ) इति " ( लघुवृत्ति पा. ८१ ) असा सूत्रासंबधानें वामनाचा उल्लेख करून " यदवोचद्भट्टवामनः ' युवतेरिव रूपमङ्ग...नियतमलंकरणानि संश्रयन्ते । ' ( वामन अधि ४ अ. ३ सू. २ वरील वृत्ति व लघुवृत्ति पा. ७६ ); " यदुक्तं भट्टवामनेन ' लक्षणां हि...रहस्यमाचक्षते ' ( वामन अधि. ४ अ. ३

सूत्र ८ वरील वृत्ति ) इति । ” ( लघुवृत्ति पा. ८४ ) असे त्याच्या वृत्तीचेहि निर्देश त्यानें केले आहेत. तसेच लोचनकारानेंहि केले असून त्याने ( पा. ३७ ) वामनाची आक्षेपाची सूत्रांतील व्याख्या सांगून वृत्तींत दिलेलीं त्याचीं दोन उदाहरणेहि उद्धृत केली आहेत. वामनाने सांगितलेली बहुतेक उदाहरणे मान्य ग्रंथकारांच्या ग्रंथांतून घेतलेली आहेत असें त्याने स्वतःच सांगितलें आहे. अधि ४ अध्याय ३ सूत्र ३३ वरील वृत्तीत तो म्हणतो ‘ एभिर्निदर्शनैः स्वीयैः परकीयैश्च पुष्कलैः । शब्दवैचित्र्यगर्भेयमुपमैव प्रपंचिता ॥ ’. वामन हा बराच प्राचीन ग्रंथकार असून त्याने पुष्कळ ग्रंथांतून उतारे घेतलेले असल्यामुळें त्याचा ग्रंथ इतर ग्रंथकारांचा कालनिर्णय करण्याच्या कामी फार उपयोगी पडण्यासारखा आहे.

वामनाचा ग्रंथ प्राचीन सूत्रपद्धतीने लिहिला असून त्यानें त्याचे भाग व पोट भाग दाखविणारी परिभाषाहि जुन्या सूत्रकारांचीच उचललेली दिसते. काव्यालंकारसूत्राचे त्या पद्धतीनुसार अधिकरण नांवाचे पांच भाग केले असून प्रत्येक अधिकरणांत दोन किंवा तीन अध्याय आहेत. एकंदर अध्यायसंख्या १२ असून ( ३+२+२+३+२ ) सूत्रसंख्या ३१९ आहे. वामनानें आपली परिभाषा थोड्या वेगळ्या रीतीने मात्र योजिलेली आहे हे विशेष होय. प्राचीन शारीरकसूत्रादि ग्रंथांत अध्याय हा मोठा भाग असून अधिकरण हा त्यांतील विषयानुसार पोटभाग असतो. पण वामनाच्या काव्यालंकारसूत्रांत अध्याय हा अधिकरणाचा पोटभाग केलेला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. या बाबतीत त्याचा ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्रासारखा आहे. अर्थशास्त्रांत पंधरा अधिकरणें असून अधिकरणांत अनेक अध्याय आहेत. शारीर नांवाचे त्याचें पहिलें अधिकरण असून त्यांत काव्याचे प्रयोजन व काव्यमीमांसाशास्त्राचें अध्ययन करण्यास योग्य अधिकारी हे विषय प्रतिपादिल्यावर **रीति** म्हणजेच काव्याचा आत्मा होय ( ‘ **रीतिरात्मा काव्यस्य** ’ ) असें म्हटलें आहे, व तदनुसार वैदर्भी, गौडी व पांचाली या रीतींचें विवेचन करून, काव्याला सहायक गोष्टी कोणत्या व काव्याचे प्रकार कोणते तें सांगितलें आहे. दुसऱ्या अधिकरणाला त्यानें दोषदर्शनाधिकरण असें म्हटलें असून त्यांत पद म्हणजे शब्द, वाक्य आणि वाक्यार्थ यांचे दोष वर्णिले आहेत. तिसऱ्या अधिकरणाचें नांव गुणविवेचन असें आहे, व त्यांत गुण आणि अलंकार यांचे भेद सांगून ओजस् आदिकरून शब्दाचे व अर्थाचे दहा गुण सोदाहरण वर्णिले आहेत. आलंकारिक-

या चवथ्या अधिकरणांत यमक व अनुप्रास हे शब्दालंकार सांगितले असून पुढें उपमा, तिचे सहा प्रकारचे दोष, व उपमेवरून होणारे दुसरे अलंकार वर्णिले आहेत. पांचव्या प्रायोगिक नांवाच्या अधिकरणांत कवींनी पाळिलेले कित्येक संकेत म्हणजे एकच शब्द दोनदां न योजणे, संधि अवश्य करणें, श्लोकचरणाच्या आरंभीं **खलु** हा शब्द न घालणें इत्यादि यांचा निर्देश करून काव्यांत व्याकरण-शुद्धि कशी राखावी हे सांगितले आहे व पूर्वीं होऊन गेलेल्या कवींच्या ग्रंथांतून जे कित्येक अशुद्ध भासणारे प्रयोग आढळतात त्यांचा विचार करून त्याचें कसें बसें समर्थन करण्याचा यत्न केलेला आहे. या अधिकरणांतील शब्दशुद्धिविषयक शेवटच्या अध्यायाचे भामहाच्या ६ व्या परिच्छेदाशी निकट साम्य आहे. वामनानें अनुप्रास, यमक, आणि उपमा यांशिवाय जे अलंकार उदाहरणांसह सांगि-तले आहेत त्यांचा क्रम असाः—प्रतिवस्तूपमा, समासोक्ति, अप्रस्तुतप्रशंसा, अप-ह्नुति, रूपक, श्लेष, वक्रोक्ति, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति, संदेह, विरोध, विभावना, अनन्वय, उपमेयोपमा, परिवृत्ति, क्रम, निदर्शन, अर्थान्तरन्यास, व्यतिरेक, विशेषोक्ति, व्याजस्तुति, व्याजोक्ति, तुल्ययोगिता, सहोक्ति, समाहित, संसृष्टि, उपमारूपक आणि उत्प्रेक्षावयव, एकूण वामनाचे ३३ अलंकार सांगितले आहेत. पर्यायोक्त, प्रेयः, रसवत्, ऊर्जस्वि, उदात्त, भाविक, सूक्ष्म इत्यादि अलंकार वाम नानें सांगितलेले नाहीत हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

वामनानें कित्येक ग्रंथकार व ग्रंथ यांचा नांवानें स्पष्ट उल्लेख केलेला आहे अधि. ४ अ. १ सू. १० यांत कविराज म्हणून कोणी मोठा कवि; ४. १. २ मध्ये कामन्दकीनीति; १. ३. ५ मध्यें कामशास्त्र, छंदोविचिति, नाममाला नांवाचा शब्दकोश; १. २. ७ मध्यें विशाखिल नांवाचा कलाशास्त्रावरील ग्रंथकार; ३.२.४ मध्यें शूद्रकादिकांनी रचिलेले ग्रंथ (श्लेषनामक गुणाच्या उदाहरणासाठीं); ४. १. २ मध्यें यमकाच्या उदाहरणांसाठीं हरिप्रबोध, हे त्यांतील प्रमुख होत. ३. २. २ या सूत्रांत वामनानें 'साभिप्रायत्वं यथा–सोयं संप्रति चंद्रगुप्ततनयश्चंद्रप्रकाशो युवा जातो भूपतिराश्रयः कृतधियां दिष्ट्या कृतार्थश्रमः ॥ आश्रयः कृतधियामि-त्यस्य वसुबन्धुसाचिव्योपक्षेपपरत्वात् साभिप्रायत्वम् ॥' असें म्हटलें आहे. या वर्णनांतील चंद्रगुप्त राजा कोण आणि या वर्णनांतील 'वसुबन्धु'च्या जागीं 'च. सुबंधु' असा पाठ असावा कीं काय असे प्रश्न उत्पन्न झाले असून त्यांवर मोठा वाद. आहे. 'वसुबंधु' हाच पाठ बरोबर आहे असें प्रो. पाठक (इं. अॅ. ग्रंथ ४०-

सन १९११ पा. १७० ), डॉ. हॉर्नले ( तोच ग्रंथ पा. २६४ ) व प्रो. देवदत्त भांडारकर ( इं. अॅ. ग्रंथ ४१ सन १९१२ पा. १ ) यांनीं प्रतिपादिले असून, 'च सुबंधु' असा तो पाहिजे असें प्रो. नरसिंहाचार्य ( इं. अॅ. १९११ पा. ३१२ ) व महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री ( इं. अॅ. १९१२ पा. १५ ) यांचें म्हणणें आहे. इंडियन अॅंटिक्वरी सन १९२४ पान १७७ येथें वसुबंधु व सुबंधु यांवर एक लेख आहे. त्याचप्रमाणें Proceedings of 2nd Oriental conference पान २०१ येथेंही एक लेख असून ' सुबन्धु ' नांवाचा एक अत्यंत प्राचीन कवि असून त्यानें लिहिलेल्या ' वासवदत्तानाट्यधारा ' या नाटकांतील एक भाग अभिनवभारतींत नाट्यायिताचें उदाहरण म्हणून दिलेलें आहे असें दर्शविलें आहे व ' अवन्तिसुन्दरीकथा ' या ग्रन्थाचे प्रस्तावनेंत सुबंधु व बिन्दुसार यांचा संबंध दर्शविणारा श्लोक आहे त्याचाही आधार घेतला आहे. यावरून ' च सुबन्धु ' हा पाठ जास्त सयुक्तिक दिसतो. स्पष्ट नामनिर्देश न करितां वामनानें ज्यांतून अवतरणें घेतलीं आहेत असे ग्रंथ अमरुशतक, उत्तररामचरित [ इयं गेहे लक्ष्मीः इ. ], कादंबरी, किरातार्जुनीय, कुमारसंभव, मालतीमाधव, मृच्छकटिक [ द्यूतं हि नाम पुरुषस्यासिंहासनं राज्यम् ( का. सू. ४-३-२३ मधील उदाहरण ), महावीरचरित, मेघदूत, रघुवंश, विक्रमोर्वशीय, वेणीसंहार, शाकुंतल, शिशुपालवध, हर्षचरित हे होत. ' यासां बलिर्भवति ' इत्यादि पद्य ( का. सू. ५,१,३ ) मृच्छकटिक ( १-९ ) व भासाचे म्हणून मानिलेलें चारुदत्तनाटक [ १-२ ] या दोहोंतहि आहे. ' यो भर्तृपिंडस्य कृते न युध्येत् ' हें वाक्य व्याकरणदृष्ट्या अशुद्ध म्हणून ५, २, १३ मध्यें वामनानें दिलें असून तें कौटिल्याचे अर्थशास्त्र ( शामशास्त्री प्रत पान ३६८ येथें ) व भासाचे प्रतिज्ञायौगन्धरायण ( ४, ३ ) यांत एका श्लोकाचा चवथा चरण म्हणून आढळतें. वामनानें व्याजोक्तीचें उदाहरण म्हणून ' शरच्छशांकगौरेण वाताविद्धेन भामिनि । काशपुष्पलवेनेदं साश्रुपातं मुखं कृतम् ' हें पद्य दिलें आहे ( ५-३-२६ ) व तें थोड्याशा पाठभेदानें भासाच्या स्वप्नवासवदत्तेंत सांपडतें. ५, २, ३८ यांत आलेले ' मातंग मानभङ्गुरम् ' हे शब्द वामनानें भामहाच्या ' मदो जनयति प्रीतिं सानङ्गं मानभङ्गुरम् ' या पद्यांतून ( २, २७ ) घेतल्यासारखे दिसतात. वामनाची उपमेची व्याख्या ( उपमानेनोपमेयस्य गुणलेशतः साम्यमुपमा । ४, २, १ ) ही भामहाचे प्रतिबिंब दिसते [ विरुद्धेनोप-

मानेन देशकालक्रियादिभिः । उपमेयस्य यत्साम्यं गुणलेशेन सोपमा ॥ भामह २, ३० ]. याशिवाय स्वतः अलंकारशास्त्रावरील ग्रंथकारांच्या मतांचाहि वामनानें उल्लेख केलेला आहे. [ ४, ३, १० मध्यें ] उत्प्रेक्षा हीच कित्येकांच्या मतें अतिशयोक्ति होय [ ' उत्प्रेक्षैवातिशयोक्तिरिति केचित् ]; अर्थान्तरन्यास हा हेतुरूप व हेतु अन्वयव्यतिरेकात्मक असल्यामुळें व्यतिरेक हा त्यांहून भिन्न नाहीं असें कांहींजण म्हणतात ( ' अर्थान्तरन्यासस्य हेतुरूपत्वात् हेतोश्चान्वयव्यतिरेकात्मकत्वान्न ततः पृथग्व्यतिरेक इति केचित् ' । ४, ३, २१ ); उपमादोषांच्या विवेचनांत, असादृश्य हा दोष अनेक उपमाने असल्यास नाहींसा होतो असें कित्येक म्हणतात ( उपमाधिक्यात्तदपोह इत्येके ४, २, १८ ), हीनत्व व अधिकत्व या दोषांत विपर्ययनामक दोषाचा अन्तर्भाव होतो म्हणून तो निराळा सांगितला नाही व त्यामुळें आमच्या मतें उपमेचे दोष सहाच होत ( अनयोर्दोषयोर्विपर्ययाख्यस्य दोषस्यान्तर्भावान्न पृथगुपादानम्, अत एव अस्माकं मते षड् दोषाः इति । ४, २, ११ ); इत्यादि इतर ग्रंथकारांच्या मतांचा निर्देश आढळतो. यांतील शेवटचा उल्लेख मेधाविन् किंवा भामह ( २, ३९ ) यांसंबंधानें असावा असें दिसतें. ' श्लोकाश्चात्र भवंति ' ( ३, १, २५; ३, २, १४ इ० ) असें म्हणून कित्येक श्लोक वामनानें उद्धृत केले आहेत तेहि बहुधा जुन्या साहित्यशास्त्रग्रंथांतील अवतरणेंच असले पाहिजेत.

वामन हा रीतिसंप्रदायाचा मुख्य प्रतिनिधि होय. रीति म्हणजेच काव्याचा आत्मा होय असें धडकून त्यानेंच सांगितले आहे. माधुर्यादिगुणांनीं युक्त अशी जी शब्दरचना तिला **रीति** असें नांव असून तीच काव्याचा आत्मा होय असें त्याचें मत असून तें त्यानें '**रीतिरात्मा काव्यस्य** । विशिष्टा पदरचना रीतिः । विशेषो गुणात्मा ' । ( अधि. १ अध्याय २ सूत्रें ६–८ ) या सूत्रांत प्रतिपादिलें आहे. वामनाच्या नांवाशीं संलग्न असलेले दुसरेहि कित्येक सिद्धान्त आहेत. काव्याची शोभा मूळ उत्पन्न करणारे ते गुण व ती विशेष वाढविणारे ते अलंकार असा त्यानें गुण व अलंकार यांत भेद सांगितला असून तो ' काव्यशोभायाः कर्तारो गुणाः । तदतिशयहेतवस्त्वलंकाराः ।' ( अधि. ३ अध्याय २ सू. १–२ ) या सूत्रांत आला आहे. पण हा सिद्धान्त मम्मटानें जोराने खोडून काढिला आहे ( परि. ८ ). दुसरा त्याचा विशिष्ट सिद्धान्त म्हणजे रीति वैदर्भी, गौडी व पांचाली अशा तीन होत हा आहे. तिसरी गोष्ट अशी कीं त्याने वक्रोक्ति

हा स्वतंत्र अलंकार मानिला असून 'सादृश्याल्लक्षणा' (४. ३. ८.) म्हणजे ज्यांत लाक्षणिक अर्थ सादृश्यावरून उत्पन्न होतो तो अशी त्याची व्याख्या दिली आहे. 'उन्मिमील कमलं सरसीनां कैरवं च निमिमील मुहूर्तात्' हें त्या वक्रोक्तीचें त्याचे उदाहरण आहे. उघडणें व मिटणें हे जे नेत्राचे धर्म त्यांवरून सादृश्यामुळें कमळाच्या फुलण्याचा व संकोच पावण्याचा बोध लक्षणेनें होतो असें तो म्हणतो ('अत्र नेत्रधर्मौ उन्मीलननिमीलने सादृश्याद्विकाशसंकोचौ लक्षयतः). 'एकगुणहानिकल्पनायां साम्यदार्ढ्यं विशेषोक्तिः' अशी विशेषोक्तीची विशिष्ट व्याख्या (४. ३. २३) ही चवथी गोष्ट होय. अशा प्रकारच्या अलंकाराला जगन्नाथ पंडित आदिकरून साहित्यकोविदांनी दृढारोपरूपक म्हटलें आहे. त्याची पांचवी गोष्ट म्हणजे आक्षेप अलंकाराचे त्याने केलेले दोन अर्थ होत. 'उपमानस्य आक्षेपः प्रतिषेधः तुल्यकार्यार्थस्य नैरर्थक्यविवक्षायामाक्षेपः।' असा एक अर्थ असून 'उपमानस्य आक्षेपतः प्रतिपत्तिरित्यपि सूत्रार्थः' (४. ३. २७) असा दुसरा होय. उपमानाचा निषेध करून उपमेयामुळें उपमानाचें व्यर्थत्व भासविणें हा मम्मटाच्या मतें प्रतीप अलंकार असून उपमेयाच्या वर्णनानें उपमान सूचित करणें ही समासोक्ति होय.

वामनाच्या या ग्रंथावरील एक टीकाकार सहदेव यानें म्हटलें आहे कीं, काव्यालंकार एकदां प्रचारांतून नाहींसा झाला होता, पण पुढें भट्टमुकुलाला त्याची प्रत मिळाली असतां त्यानें तो संप्रदाय पुनः चालू केला 'वेदिता सर्वशास्त्राणां भट्टोऽभून्मुकुलाभिध । लब्ध्वा कुतश्चिदादर्शं भ्रष्टाम्नायं समुद्धृतम् ॥ काव्यालंकारशास्त्रं यत्तेनैतद्वामनोदितम् । असूया तत्र कर्तव्या विशेषालोकिभिः क्वचित् ॥' (राजशेखरकृत काव्यमीमांसा, बडोदें प्रत, टिप्पणी पा. ५). वामनानें कवींसंबंधानें लिहितांना 'अरोचकिनः सतृणाभ्यवहारिणश्च कवयः' असें जें म्हटलें आहे त्याचा उल्लेख राजशेखरानें (का. मी. पा. १४) "ते च द्विधाऽरोचकिनः सतृणाभ्यवहारिणश्च इति मङ्गलः। कवयोऽपि भवन्ति इति वामनीयाः" असा केला आहे व त्यावरून राजशेखराच्या मतें वामनाच्या परिभाषेंत मंगलाच्या ग्रंथांतील परिभाषेचाच अनुवाद केलेला आहे असें दिसतें.

वामनाच्या कालाचा निर्णय बराच निश्चयपूर्वक करितां येतो. या कालनिर्णयाविषयींचें विवेचन रॉ. ए. सो. मुंबई शाखा ग्रंथ २३ सन १९०९ (पा. ९१. इ.)

ऱ्यांतील लेखांत आम्हीं सविस्तर केलें आहे व येथें त्याचा तात्पर्यार्थ सांगतों. काव्यमीमांसाकार राजशेखरानें वामनीय संप्रदायाचा निर्देश केला आहे ( पा. १४ व २० ). राजशेखर इ. स. दहाव्या शतकाच्या प्रथम चरणांत होऊन गेला. प्रतीहारेन्दुराजानें वामनाच्या ग्रंथांतील वचनें अनेकवार उद्धृत केल्याचें पूर्वीं दाखविलेंच आहे. लोचनकारानेंहि तशीं अवतरणें घेतलेलीं आढळतात ( पा. ८, १०, १८० ), 'अभिनवभारती' टीकेंतही ( पान २८८ ) वामनाचा नांवानें निर्देश केला आहे 'यदाह वामनः सन्दर्भेषु दशरूपक श्रेयः' ( वामन १.३.३० ). अर्थात वामन या ग्रंथकारांपूर्वींचा म्हणजे इ. स. ९०० च्या पलीकडचा असला पाहिजे. 'अनुरागवती संध्या दिवसस्तत्पुरस्सरः अहो दैवगतिः कीदृक्तथापि न समागमः ॥' या ध्वन्यालोकांत दिलेल्या श्लोकावर टीका करितांना लोचनकार म्हणतो, 'वामनाभिप्रायेणायमाक्षेपः, भामहाभिप्रायेण तु समासोक्तिरित्यमुमाशयं हृदये गृहीत्वा समासोक्त्याक्षेपयोरिदमेकमेवोदाहरणं व्यतरद् ग्रंथकृत' म्हणजे उपरोक्त पद्यांत वामनाच्या मताप्रमाणें पहातां आक्षेप अलंकार आहे व भामहाच्या मतें समासोक्ति होईल; हा अभिप्राय लक्षांत घेऊन ध्वन्यालोककारानें समासोक्ति व आक्षेप या दोघांनाहि लागू पडेल असें हें पद्य उदाहरणासाठीं दिलें. या लोचनकाराच्या विधानावरून असें निष्पन्न होतें कीं, त्याच्या मतें वामन हा ध्वन्यालोककारापूर्वीं म्हणजे इ. स. ८५० च्या अगोदर होऊन गेलेला होता; कारण ध्वन्यालोकाचा रचनाकाल इ. सन ९ व्या शतकाचें उत्तरार्ध होय. 'अस्फुटस्फुरितं काव्यतत्त्वमेतद्यथोदितम् । अशक्नुवद्भिर्व्याकर्तुं रीतयः संप्रवर्तिताः' ॥ या ध्वनिकारिकांतील ( ३. ५२ ) पद्यांत बहुधा वामनाचाच रीतिसंप्रदायाचा प्रवर्तक म्हणून उल्लेख असावा. वामनानें ( ४. ३. ६ ) रूपकाचें उदाहरण म्हणून 'इयं गेहे लक्ष्मीः' इत्यादि उत्तररामचरितांतील १ ल्या अंकांतील श्लोक व शब्दशुद्धिप्रकरणांत ( ५. २. १८) 'पक्ष्मालीपिङ्गलिम्नः' हा मालतीमाधवांतील श्लोक हे उद्धृत केले आहेत. भवभूतीचा काल राजतरंगिणींतील श्लोकावरून इ. स. ७०० ते ७४० असा निश्चित झालेला आहे. अर्थात् वामन इ. स. ७५० नंतरचा असला पाहिजे असें उघड होतें. राजतरंगिणींतील ( ४ ४९७ ) 'मनोरथः शंखदत्तश्चटकः सन्धिमांस्तथा । बभूवुः कवयस्तस्य वामनाद्याश्च मन्त्रिणः । ' या श्लोकांत कोणी एक वामन जयापीड राजाचा मंत्री होता असें सांगितलें आहे. काश्मीरी पंडितांच्या मतें हाच वामन

काव्यालंकारसूत्राचा कर्ता होय व बुल्हर पंडितानें हें विश्वसनीय मानिलें आहे. हें मत वास्तविक असल्यास त्यावरून काव्यालंकारसूत्रकार वामन हा इ. स. ८०० सुमारास प्रसिद्ध होता असे निष्पन्न होतें. उद्भटाचाहि हाच काळ असल्यामुळें दोघे समकालीन असून बहुधा साहित्यशास्त्रांतील एकमेकांचे प्रतिस्पर्धीही असावे. दोघांच्या ग्रंथांत कोणीहि एकानें दुसऱ्याचा उल्लेख केलेला नाहीं या गोष्टीवरून त्यांच्या प्रतिस्पर्धित्वाचें अनुमान करण्यास हरकत येत नाहीं. वामनाच्या काळाचा निर्णय आणखीहि एक प्रकारें करितां येण्यासारखा आहे. त्यानें शब्दशुद्धिप्रकरणांत ‘ लभेर्गत्यर्थत्वाण्णिच्यणौ कर्तुः कर्मत्वाकर्मत्वे ’। ( ५. २. ८ ) या सूत्रवृत्तीत ‘ सितं सितिम्ना सुतरां मुनेर्वपुः ’ इत्यादि माघकृत शिशुपालवधांतील श्लोक ( १. २५ ) सांगितला आहे. तसेच अलंकारप्रकरणांत अतिशयोक्तीचें उदाहरण म्हणून ( ४, ३, १० ) ‘ उभौ यदि व्योम्नि ’ इत्यादि माघश्लोक ( ३. ८ ) व ‘ न पादादौ खल्वादयः ’ ( ५, १, ५ ) या सूत्रांत ‘ खलूक्त्वा खलु वाचिकम् ’ हा माघाचा चरण (२. ७०) उल्लेखित केला आहे. माघाने ( २, ११२ ) ‘ अनुत्सूत्रपदन्यासा सद्वृत्तिः सन्निबंधना ’ या श्लोकांत न्यास, वृत्ति व महाभाष्य यांचे उल्लेख केले असून त्या ग्रंथनामांच्या क्रमावरून त्यांतील न्यास हा वृत्तीवरील टीकारूप असावा असें दिसतें. पाणिनीच्या अष्टाध्यायीवरील काशिका वृत्ति इ. स. ६६० च्या सुमारास झाली असावी असें इत्सिंग या चिनी प्रवाशाच्या अस्पष्ट विधानांवरून अनुमान होतें हें पूर्वी सांगितलेंच आहे. तेव्हां माघाने उल्लेखिलेला न्यास त्या वृत्तीवरील टीका असेल तर त्या न्यासाचा काल इ. स. ७०० च्या पलीकडचा असणें संभवनीय नाहीं व तदनुसार माघाचा काल ७५० च्या सुमारास ठरवावा लागतो. पण माघाचा काळ कोणताहि ठरला तरी काशिकावृत्ति इ. स. ६६० च्या सुमारास झाली असें मानिल्यास काव्यालंकाराचा कर्ता वामन व काशिकाकार वामन हे एक मानणें अशक्य होतें. काव्यालंकारसूत्रांत प्रतिपादिलेली व्याकरणविषयक कित्येक मतें काशिकावृत्तींतील मतांप्रमाणेंच आहेत हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. उदाहरणार्थ, शब्दशुद्धिप्रकरणांत ( का. सू. ५, २, ३५ ) ‘ ब्रह्मादिषु हन्तेर्नियमादरिहाद्यसिद्धिः ’ या सूत्रावरील वृत्तींत ‘ ब्रह्मादिष्वेव, हन्तेरेव, क्विबेव, भूतकाल एवेति चतुर्विधश्चात्र नियमः ’ असें वामनानें म्हटलें आहे व ‘ ब्रह्मभ्रूणवृत्रेषु क्विप् ’ ( ३. २. ८७ ) या पाणिनीयसूत्रावरील काशिकावृत्तीतहि तसेंच प्रतिपादन आहे. पण

महाभाष्यांत चतुर्विध नियमाच्या जागीं द्विविध नियमच मानिला आहे. तसेंच काव्यालंकारसूत्रांत ( ५, २, ६७ ) 'सुदत्यादयः प्रतिविधेयाः' या सूत्रावरील वृत्तीत सुदती शब्दाची सिद्धि वामनानें दोन प्रकारें बसविली असून त्यांतील दुसरा प्रकार 'स्त्रियां संज्ञायाम्' या पाणिनीयसूत्रावरील ( ५. ४. १४३ ) काशिकावृत्तीलाहि संमत दिसतो.

अलीकडे गायकवाड ओरिएन्टल सीरीजमध्यें वामनाचा 'लिङ्गानुशासन' म्हणून एक ग्रंथ छापला आहे. त्याच्या विद्वान् संपादकांच्या मतानें काव्यालंकार-सूत्रकार वामन व काशिकावृत्तीचा कर्ता वामन आणि लिङ्गानुशासनाचा कर्ता हे सर्व एकच आहेत. काव्यालंकारसूत्रावरील गोपेन्द्रतिप्पभूपालाची टीका वाणीविलास प्रतींत व इतरत्र छापिलेली आहे. हा टीकाकार इ. स. १५ व्या शतकांतील किंवा त्याहि नंतरचा दिसतो. त्यानें काव्यप्रकाश, विद्याधर, विद्यानाथ, विदग्ध-मुखमंडन व इतरहि त्यानंतरचे ग्रंथ व ग्रंथकार यांचा उल्लेख केलेला आहे. त्यानें काव्यालंकारसूत्रांतील 'न पादान्तलघोर्गुरुत्वं च सर्वत्र' ( ५. १. ३ ) या सूत्रावरील टीकेंत 'श्रीतिप्पभूपालकमध्यलोकदेवेन्द्रवत्राङ्गदचंद्रिकाभिः । त्वद्बाहुराभाति हसन्निवार्थं प्रोढौ प्रदाने मणिपारिजातौ ॥' हा तिप्पभूपालाच्या स्तुतीचा श्लोक दिला आहे. त्याच्या टीकेचे नांव कामधेनु. त्यानें भट्टगोपालाचीं म्हणून कांहीं अवतरणें घेतलीं आहेत ( १. १. १; १. १. २; १. ३ १६ इत्यादि ). हा भट्टगोपाल काव्यालंकारसूत्राचा पूर्वीचा टीकाकारच असावा. या शिवाय वामनाच्या सूत्रवृत्तीवर साहित्यसर्वस्व नांवाची महेश्वराची ( इंडिया ऑफिस कॅटलॉग पा. ३२१ ) व दुसरी सहदेवाची अशा आणखीहि टीका आहेत.

## १२. अलंकारांची वर्णानुक्रमानें नामावली.

( भट्टि, भामह, दण्डी, उद्भट आणि वामन यांच्या ग्रंथांतील )

१ अतिशयोक्ति—सर्वांनीं सांगितली आहे.

२ अनन्वय—दंडीशिवाय इतरांनीं सांगितला आहे. यालाच दंडी असाधारणो-पमा म्हणतो.

३ अनुप्रास—सर्वांनीं सांगितला आहे.

४ अपह्नुति— ,,

५ अप्रस्तुतप्रशंसा—भट्टीशिवाय इतरांनीं सांगितली आहे.

६ अर्थान्तरन्यास—सर्वांनीं सांगितला आहे.

७ आवृत्ति—दंडीनें मात्र सांगितली आहे.

८ आशीः—भट्टि, दंडी व भामह ( यानें हा कित्येकांच्या मतें अलंकार आहे असें सांगितलें आहे ).

९ आक्षेप—सर्वांनीं सांगितला आहे. पण वामनोक्त आक्षेप हा पुढील अलंकारिक ज्याला समासोक्ति किंवा प्रतीप म्हणतात त्यांतील एक आहे.

१० उत्प्रेक्षा—सर्वांनी सांगितलेली आहे.

११ उत्प्रेक्षावयव—भट्टि व भामह यांनीं सांगितला आहे. वामन याला संसृष्टीचा एक प्रकार समजतो व दंडीनें उत्प्रेक्षेंत याचा समावेश केला आहे.

१२ उदात्त—सर्वांनीं सांगितला आहे. जयमङ्गलाटीकेच्या कर्त्याच्या मते भट्टि याला उदार म्हणतो.

१३ उपमा—सर्वांनीं सांगितली आहे.

१४ उपमारूपक—भट्टि व भामह यांनीं सांगितलें आहे. वामनानें याला संसृष्टीचा एक प्रकार म्हणून वर्णिले असून दंडीनें त्याचा अंतर्भाव रूपकांत केला आहे.

१५ उपमेयोपमा—दंडीशिवाय इतरांनीं वर्णिली आहे. दंडी हिलाच अन्योन्योपमा म्हणतो.

१६ ऊर्जस्वि—वामनाशिवाय सर्वांनीं सांगितलें आहे.

१७ काव्यलिंग—हा अलंकार उद्भटानें मात्र सांगितला आहे.

१८ छेकानुप्रास— ,, ,,

१९ तुल्ययोगिता—सर्वांनीं सांगितली आहे. पण दंडीच्या मतें हींत स्तुति व निन्दा दोन्ही येतात.

२० दीपक—सर्वांनीं वर्णिलें आहे.

२१ दृष्टान्त—उद्भटानें मात्र सांगितला आहे.

२२ निदर्शन (–ना )—हा अलंकार सर्वांनीं सांगितला आहे. उद्भटाच्या ग्रंथांत विदर्शना म्हटलें आहे.

२३ निपुण—भट्टीनें मात्र सांगितला आहे. जयमङ्गलाच्या मतें याचा समावेश उदात्तामध्यें व्हावा व मल्लिनाथाच्या मतें भट्टीच्या निपुणाच्या उदाहरणांत प्रेयः हा अलंकार आहे.

२४ परिवृत्ति—सर्वांमध्यें आढळते. पण भामह व भट्टि यांच्या मतें ती अर्थान्तरन्यासयुक्त असावी.

२५ पर्यायोक्त—वामनाशिवाय सर्वांनीं सांगितलें आहे.

२६ प्रतिवस्तूपमा—भट्टीशिवाय इतरांनीं वर्णिली आहे. भामह व दंडी हिला उपमेचा एक प्रकार मानितात.

२७ प्रेयः—वामनाशिवाय इतरांनीं हा अलंकार सांगितलेला आहे.

२८ भाविक— ,, ,,

२९ यथासंख्य—हा अलंकार सर्वांत आढळतो. वामन ह्याला क्रम म्हणतो. दंडीच्या मतें ह्याला संख्यान व क्रम हीं नांवेंही होतीं.

३० यमक—उद्भटाशिवाय इतर सर्वांत आढळतो.

३१ रसवत्—वामनाशिवाय सर्वांनीं वर्णिलें आहे.

३२ रूपक—सर्वांमध्यें आढळतें.

३३ लाटानुप्रास—उद्भटानें मात्र सांगितला आहे. भामहानें मात्र याचा निर्देश केला आहे.

३४ लेश—दंडीने मात्र सांगितला आहे. यालाच मम्मटान व्याजोक्ति म्हणन वर्णिलें आहे. याला व्याजस्तुति म्हणतां येईल अशाच प्रकारें त्याची व्याख्या कित्येकांनीं केली असल्याचें दंडीनेंहि सांगितलें आहे. भामह याला अलंकार असें समजत नाहीं.

३५ वक्रोक्ति—वामनानें मात्र हिची अलंकारांत गणना करून व्याख्या दिली आहे. भामह ( २, २५ ) व दंडी ( २, २२० व ३६३ ) यांनीं सर्वच अलंकारांत वक्रोक्ति ही सूत्ररूपानें असते असें प्रतिपादिलें आहे.

३६ वार्ता—भट्टीनें मात्र सांगितली आहे. भामह ( २, ८७ ) व दंडी ( १. ८५–८६ ) यांनीं नुसता तिचा निर्देश केला आहे.

३७ विभावना—हा अलंकार सर्वांमध्यें आढळतो.

३८ विरोध— ,, ,,

३९ विशेषोक्ति—सर्वांनीं सांगितली आहे. पण वामनाची व्याख्या इतरांहून निराळी असून रूपकाच्या व्याख्येसारखी आहे.

४० व्यतिरेक—सर्वांत आढळतो.

४१ व्याजस्तुति— ,, ,,

४२ व्याजोक्ति—वामनानें मात्र सांगितली असून तिला इतर ग्रंथकार मायोक्ति म्हणतात असें त्यानें म्हटलें आहे.

४३ श्लिष्ट—हा अलंकार सर्वांनीं सांगितला आहे. वामन त्याला श्लेष म्हणतो.

४४ संसृष्टि—सर्वांनीं वर्णिली आहे. दंडी हिला संकीर्ण म्हणतो व संसृष्टि आणि संकर यांचा तींतच समावेश करितो. वामन तिची व्याप्ति कमी करीत असून उपमारूपक व उत्प्रेक्षावयव हे तिचे दोनच प्रकार मान्य करितो. संसृष्टि व संकर हीं उद्भट भिन्न मानितो.

४५ संकर—उद्भटानें मात्र हा वर्णिला आहे व त्याचे चार प्रकार सांगितले आहेत.

४६ समासोक्ति— हा सर्वांत आढळतो.

४७ समाहित—सर्वांनी हा अलंकार सांगितला आहे. पण दंडीचें समाहिताचें वर्णन उद्भटाच्याहून निराळें आहे. पुढील आलंकारिक याला समाधि म्हणतात. पण वामनाचा समाहित अलंकार दोहोंहून वेगळा आहे. जयमंगलाकाराच्या मतें भट्टीनें समाहिताचें म्हणून जें उदाहरण दिलें आहे तें मल्लिनाथाच्या मतें स्वभावोक्तीचें आहे.

४८ ससन्देह—दंडीशिवाय सर्वांनीं सांगितला आहे. दंडी याला संशयोपमा म्हणून उपमेंतच अन्तर्भाव करतो. वामन याला नुसता संदेह म्हणतो.

४९ सहोक्ति—हा सर्वांमध्ये आढळतो.

५० सूक्ष्म—दंडीनें मात्र हा अलंकार सांगितला आहे. पण भामहाच्या मतें हा अलंकार नव्हे.

५१ स्वभावोक्ति—दंडी, उद्भट आणि भामह यांनीं मात्र सांगितली आहे. पण भामहानें ती सांगितली आहे ती कित्येक ग्रंथकारांनीं हा अलंकार मानिला आहे आहे हें सांगण्यापुरतीच होय. दंडीनें हिला जाति असें दुसरें नांव दिलें असून भट्टीनें वार्तेंत तिचा अन्तर्भाव केला आहे.

५२ हेतु—भाट्टि आणि दंडी यांनीं हा सांगितला आहे. भामह त्याला अलंकार म्हणतच नाहीं. उद्भट त्याची काव्यलिंगांतच गणना करितो.

## १२ रुद्रटप्रणीत काव्यालंकार.

हा ग्रंथ काव्यमालेंत नमिसाधुकृत टीकेसह छापिलेला आहे. काव्यालंकार हा ग्रंथ फार विस्तृत असून त्याचे सोळा अध्याय आहेत व त्यांत संपूर्ण साहित्यशास्त्राचें समालोचन केलेलें आहे. त्यांत बहुतांशीं आर्यावृत्ताची योजना केलेली असून मधून मधून क्वचित् व विशेषतः अध्यायांच्या शेवटीं निराळी वृत्ते योजिलेलीं दिसतात. त्यांतील सर्व उदाहरणें रुद्रटाने स्वरचितच दिलेलीं आहेत. काव्यालंकाराची श्लोकसंख्या ७३४ आहे. पण १२ व्या अध्यायांत त्या श्लोकांशिवाय आणखी १४ श्लोक दिले असून त्यांत आठ प्रकारच्या नायिका व त्यांचे आणखी उपप्रकार वर्णिलेले आढळतात. हे श्लोक प्रक्षिप्त असावे असें काव्यमालेच्या विद्वान् संपादकांचें मत आहे. परंतु हें मत संपूर्णपणें बरोबर दिसत नाही. इ. स. ११०० ते १२५० ह्या काळामध्यें लिहिलेल्या भावप्रकाशन ग्रंथांत रुद्रटाचे म्हणून अष्ट नायिकांचे श्लोक उल्लिखित आहेत ते शृंगारतिलकांतून घेतलेले असावेत. पण हे चवदाही श्लोक प्रक्षिप्त आहेत असें वाटत नाही. ह्या चवदा श्लोकांनन्तर पांच आर्यांत अभिसारिका, खण्डिता, स्वाधीनपतिका, प्रोषितपतिका या चार नायिकांच्या व्याख्या रुद्रटाने दिल्या आहेत. तेव्हां बाकीच्या चार नायिकांच्या व्याख्या देणे जरूर दिसतें. म्हणून चवदा श्लोकांपैकीं कांहीं तरी प्रक्षिप्त नाहीत हें खास पण सर्वच श्लोक प्रमाण मानले तर चार नायिकांचें दोनदां वर्णन केल्याचा दोष येईल. तेव्हां आमचें असें मत आहे की रुद्रटालंकारांतील अष्ट नायिकांच्या वर्णनांतील कांही श्लोक गळाले तेव्हां कोणी तरी त्यांचेबद्दल श्लोक शृंगारतिलकावरून किंवा इतर ग्रंथावरून तयार करून रुद्रटालंकाराचे हस्तलिखित प्रतींत घातले. या सोळा अध्यायांत विषय आले आहेत ते असेः—पहिल्या अध्यायांत काव्याचें प्रयोजन व उद्देश, कवीला अवश्य असणारे गुण व त्यांच्या व्याख्या हे विषय आहेत. दुसऱ्यांत वक्रोक्ति, अनुप्रास, यमक, श्लेष आणि चित्र या पांच शब्दालंकारांचीं नांवें व वैदर्भी, पाञ्चाली, लाटी आणि गौडी या चार रीतींचीं लक्षणें सांगून प्राकृत, संस्कृत, मागध, पैशाची, शूरसेनी आणि अपभ्रंश या काव्यें रचिण्यासाठी योजिलेल्या सहा भाषांचा नामनिर्देश केला आहे व नंतर वक्रोक्ति आणि अनुप्रास या अलंकारांचीं लक्षणें, विभाग व उदाहरणें देऊन मधुरा, ललिता, प्रौढा, परुषा व भद्रा या अनुप्रासाच्या पांच वृत्तींचीं लक्षणे

सांगितलीं आहेत. तिसऱ्या अध्यायांत ५८ श्लोक मिळून यमक अलंकाराचें सविस्तर विवेचन केलें असून चवथ्यांत श्लेष व वर्ण, पद, लिंग, भाषा, प्रकृति, प्रत्यय, विभक्ति आणि वचन यांना अनुसरून त्याचे आठ भेद वर्णिले आहेत. पांचव्या अध्यायांत चित्रकाव्याचें विवेचन करून चक्रबन्ध, मुरजबन्ध, अर्धभ्रम, सर्वतोभद्र, मात्राच्युतक, प्रहेलिका इत्यादि बन्धांचें विवरण केलें आहे. सहाव्यांत पद आणि वाक्य यांचे दोष सांगून सातव्यांत वास्तव, औपम्य, अतिशय व श्लेष या अलंकारांना आधारभूत असलेल्या तत्त्वचतुष्टयाचें विवेचन व वास्तव या तत्त्वावर उभारलेल्या तेवीस अलंकारांची चर्चा केली आहे. आठव्यांत औपम्यविषयक एकवीस अलंकार वर्णिले असून नवव्यांत अतिशयावर उभारणी झालेल्या बारा अलंकारांच्या व्याख्या व दहाव्यांत शुद्धश्लेषसङ्कराचे दोन प्रकार यांच्या व्याख्या आल्या आहेत. अकराव्या अध्यायांत अर्थाचे दोष व उपमेचे चार दोष सांगितले असून बाराव्यांत दहा रस, संभोग व विप्रलंभ हे शृंगाराचे दोन प्रकार यांच्या व्याख्या, नायक व त्याचे सहचर यांचे गुण आणि नायक व नायिका यांचे भेद हे विषय आले आहेत. तेराव्या अध्यायांत संभोग शृंगाराचें विवेचन करून नायिकेची विशिष्ट प्रसंगीं व विशिष्ट स्थळीं कृति कशा प्रकारची असावी हें सांगितलें आहे. चवदाव्यांत विप्रलंभ शृंगाराचें स्वरूप वर्णून विप्रलंभाच्या दहा दशा व खंडित नायिकेचें प्रेम संपादण्याचे सहा उपाय म्हणजे साम दान भेद प्रणति उपेक्षा व प्रसंगभ्रंश यांचें विवेचन केलें आहे. पंधराव्या अध्यायांत वीर व इतर आठ रस यांचें स्वरूप सांगितलें आहे व सोळाव्यांत कथा, आख्यायिका इत्यादि विविध काव्यप्रकार व त्यांतील कथानकें आणि इतर लक्षणे यांचें वर्णन केलेलें आहे.

कांहीं निश्चित तत्त्वांना अनुसरून अलंकारांचे वर्गीकरण करण्याचा प्रयत्न रुद्रटानेंच प्रथम केलेला आढळतो. त्याचे वर्गीकरण वास्तव, औपम्य, आतिशय व श्लेष या तत्त्वांवर केलेले आहे. पण या पद्धतीचा काटेकोरपणें अवलंब केल्यामुळें एकच अलंकार एकदां एका तत्त्वानुसार मानिला असतां, पुनः तोच आणखी कांहीं तत्त्वांना अनुसरूनहि मानावा लागला आहे. उदाहरणार्थ सहोक्ति आणि समुच्चय हे अलंकार घेऊं. या दोन अलंकारांचे प्रत्येकी दोन प्रकार मानिले असून एक वास्तवानुसारी व दुसरा औपम्यानुसारी असे आहेत. तसाच प्रकार उत्प्रेक्षेचा झाला आहे. तिचा एक प्रकार औपम्यानुसारी तर दुसरा अतिशयानुसारी आहे.

भामहउद्भटादि आलंकारिकांनीं स्वतंत्रपणें वर्णिलेले कांहीं अलंकार रुद्रटानें तसे स्वतंत्र सांगितलेले नाहींत. उदाहरण, रुद्रटाने उपमेयोपमा आणि अनन्वय यांना उभयोपमा व अनन्वयोपमा अशीं नांवें देऊन उपमेचे प्रकार म्हणूनच मानिले आहेत ( अ. ७ श्लो. ९ व ११ ). रुद्रटापूर्वींच्या व नंतरच्या शास्त्रकारांनीं वर्णिलेले कित्येक अलंकार रुद्रटानें निराळ्या नांवांनीं सांगितलेले दिसतात. उदाहरण, भामह व मम्मट यांनीं ज्याला व्याजस्तुति म्हटलें आहे, त्याला रुद्रट व्याजश्लेष ( अ. १० श्लो. ११ ) म्हणतो, उद्भट व मम्मट यांचा उदात्ताचा दुसरा प्रकार रुद्रटानें अवसर ( ७, १०३ ) या नांवानें वर्णिला आहे, दंडी व मम्मट यांची स्वभावोक्ति म्हणजे रुद्रटाची जाति होय ( ७, ३० ), व मम्मटाने सांगितलेला अतिशयोक्तीचा चवथा प्रकार म्हणजे कार्यकारणांची उलटा पालट करून झालेला अलंकार हा रुद्रटानें पूर्व या नांवानें ( ९.३ ) दिला आहे. रुद्रटानें सांगितलेले कित्येक अलंकार इतर ग्रंथकार अलंकार म्हणून मानीत नाहींत. उदाहरणार्थ, रुद्रटाने ‘ हेतुमता सह हेतोरभिधानमभेदकृद्भवेद्यत्र ’ ( ७. ८२ ) अशी ज्याची व्याख्या दिली आहे तो हेतुनामक अलंकार मम्मटाच्या मतें अलंकारच नव्हे रुद्रटाने भाव नांवाचा अलंकार सांगितला असून त्याचे दोन प्रकार दिले आहेत ( अ. ७ श्लो. ३८ व ४० ) आणि स्पष्टीकरणार्थ ‘ग्रामतरुणं तरुण्या नववञ्जुलमञ्जरीसनाथकरम् । पश्यन्त्या भवति मुहुर्नितरां मलिना मुखच्छाया ॥ ’ आणि ‘एकाकिनी यदबला तरुणी तथाऽहमस्मिन्गृहे गृहपतिश्च गतो विदेशम् । किं याचसे तदिह वासमियं वराकी श्वश्रूर्ममान्धबधिरा ननु मूढ पान्थ ॥ ’ हीं पद्यें सांगितलीं आहेत. यांतील पहिलें पद्य मम्मटानें पहिल्या परिच्छेदांत व दुसरें लोचनकारानें ( पान ४५ ) उद्धृत केलें आहे. या दोहोंतहि एक प्रकारचा व्यंग्यार्थ असून तो वाच्यार्थापेक्षां गौणत्व पावलेला आहे, असें मम्मटाचें व लोचनकाराचें मत अस॰ ल्यामुळें त्यांत त्यांना अलंकार मानण्याचें कारण दिसत नाहीं. रुद्रटानें मत, साम्य, व पिहित असे आणखी अलंकारहि सांगितले आहेत, पण ते इतर प्राचीन ग्रंथकारांनीं मानिलेले नाहींत.

रुद्रटाच्या वैयक्तिक इतिहासासंबंधानें फारशी माहिती उपलब्ध नाहीं. त्याच्या नांवावरून पाहतां तो काश्मीरी असावा असें दिसतें. आपल्या ग्रंथाच्या आरंभीं त्यानें गणेश आणि गौरी यांना वंदन केलें असून शेवटीं भवानी, मुरारि व गजा॰

नन यांची स्तुति केली आहे.* काव्यालंकाराच्या पांचव्या अध्यांतील १२–१४ या आर्यावरील टीकेंत नमिसाधूनें म्हटलें आहे ' अत्र च चक्रे स्वनामाङ्कभूतोयं श्लोकः कविनान्तर्भावितो यथा–शतानन्दापराख्येन भट्टवामुकसूनुना । साधितं रुद्रटेनेदं सामाजा धीमता हितम् ॥ ' म्हणजे या चक्रबंधयुक्त रचनेंत कवीनें आपल्या नामादिकांचा उल्लेख करणारा श्लोक गुंफिला आहे. **शतानंदापराख्येन** इत्यादि श्लोकावरून असे दिसून येतें कीं, रुद्रटाच्या पित्याचें नांव भट्टवामुक असें होते, रुद्रटाला शतानंद असेंहि म्हणत व तो सामवेदी ब्राह्मण होता.$ रुद्रटानें कोणत्याहि ग्रंथकाराचा स्पष्ट नांवानें उल्लेख केलेला आढळत नाहीं. पण भरताचें नाट्यशास्त्र व मयूरकवीचें सूर्यशतक यांचा उल्लेख अनुक्रमे 'आचार्यैः'× ( अ. १२, ४ ) व **रोगाविमुक्ति** § ( १, ९ ) या शब्दांनीं केलेला असावा असें दिसतें. मयूरकवीनें सूर्याची स्तुति करून कुष्ठपरिहार केल्याची कथा आहे. याशिवाय इतरांच्या मतांचा मोघम उल्लेखहि केलेला आढळतो. उदाहरण, ' नामाख्यातनिपाता उपसर्गाश्चेति संमतं येषाम् । ' ( २, २ ) असा नमिसाधूच्या मतें मेधाविरुद्रादिकांच्या मतांचा निर्देश केला आहे.

उद्भटाप्रमाणें रुद्रट हाहि अलंकारसंप्रदायाचा पुरस्कर्ता मानिला पाहिजे. भरतानें प्रतिपादिलेली रसोपपत्ति त्याला अवगत होती व काव्यांत रस अवश्य असला

* अविरलविगलन्मदजलकपोलपालीनिलीनमधुपकुलः ।
उद्भिन्ननवश्मश्रुश्रेणिरिव **गणाधिपो** जयति ॥ १, १
सकलजगदेकशरणं प्रणम्य चरणाम्बुजद्वयं **गौर्याः** ॥ १, २
जयति जनमनिष्टादुद्धरन्ती **भवानी** जयति निजविभूतिव्याप्तविश्वो **मुरारिः** ।
जयति च गजवक्त्रः सोऽत्र यस्य प्रसादादुपशमति समस्तो विघ्नवर्गोपसर्गः ॥ १६,४२.

$ पांचव्या अध्यायांतील ६, ७, ८, ९, १०, ११, १२ व १३ या ८ श्लोकांमिळून रुद्रटानें चक्रबंध रचिला असून त्यांतील ४ थी, ८ वीं, १२ वी व १६ वीं अशीं अक्षरें घेतल्यास ' शतानन्दापराख्येन ' इत्यादि श्लोक सिद्ध होतो.

× रसनाद्रसत्वमेषां मधुरादीनामिवोक्तमाचार्यैः । १२. ४

§ नुत्वा तथाहि दुर्गां केचित्तीर्णाः सुदुस्तरां विपदम् ।
अपरे **रोगविमुक्तिं** वरमन्ये लेभिरेऽभिमतम् ॥ १. ९

पाहिजे† असें जरी त्यानें म्हटलें असलें तरी त्यानें अलंकारालाच एकंदरींत प्राधान्य दिलें आहे. रीतींनाहि तो विशेषसें महत्व देत नाहीं ही देखील त्याच्या संबंधानें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. रीतींचा त्यानें जातां जातां उल्लेख तरी केला आहे ( अ. २, ४–६; अ. १४, ३८; अ. १५, २० ) पण गुणांच्या व्याख्या व उदाहरणें त्यानें दिलेलीं नाहींत. विश्वनाथानें साहित्यदर्पणांत ( ९, २ ) वैदर्भी रीतीसंबंधानें रुद्रटाची म्हणून एक आर्या दिली आहे; पण ती काव्यालंकारांत सांपडत नाहीं.

रुद्रट केव्हां होऊन गेला हें बऱ्याच निश्चितपणें ठरवितां येतें. भामह व दण्डी यांनीं सांगितलेल्या अलंकारांपेक्षां रुद्रटानें आणखी कांहीं जास्ती अलंकार वर्णिले असून त्याची विवेचनपद्धति निश्चयात्मक आणि शास्त्रीय आहे. अर्थात् तो भामह व दंडी यांच्या नंतरचा होय हें उघड होतें. उलट दहाव्या दशकापासूनच्या ग्रंथकारांनीं त्याच्या ग्रंथांतून बरीच अवतरणें केलेलीं आढळत असल्यामुळें तो दहाव्या शतकापूर्वी होऊन गेला असला पाहिजे हेंहि स्पष्टच आहे. राजशेखरानें काव्यमीमांसेंत ( पान ३१ ) ‘ काकुवक्रोक्तिर्नाम शब्दालंकारोऽयमिति रुद्रटः ’ असा त्याचा नामतः उल्लेख केला असून त्याच्या काव्यालंकारांतून ( ३, ४ ) ‘ चक्रं दहतारं चक्रन्द हतारं ’ हें पद्य उद्धृत केलें आहे ( पान ५७ ). प्रतीहारेन्दुराजानें उद्भटावरील टीकेंत अनेक ठिकाणीं ( पान ११, ३१, ३४, ४२, ४३, ४९ इत्यादि ) रुद्रटाच्या काव्यालंकारांतून ( ८, ४०; ८, ८९; ८, ९५; ७, ३५; ७, ३६; १२, ४ ) अवतरणें घेतलीं आहेत. दशरूपावरील धनिककृत टीकेंत ( ४, ३५ ) रुद्रटाचें ‘ रसनाद्रसत्वमेषां ’ इत्यादि ( १२, ४ ) पद्य उद्धृत केलें आहे. ध्वन्यालोकावरील लोचनांत ( पान ४५ ) रुद्रटाची भाव अलंकाराची व्याख्या व त्याचें उदाहरण हीं घेतलेलीं दिसून येतात ( रुद्रट अ. ७, ३८–४१ ). मम्मटानें त्याचें नांवहि सांगितलें असून ( उल्लास ९ वामनाचार्य प्रत पान ५२१ ) हेतु, समुच्चय आणि व्यतिरेक या अलंकारांविषयींची त्याचीं मतें खोडण्याचा प्रयत्न केला आहे. म्हणून तो. इ. स. ९०० पेक्षां अर्वाचीन नाहीं. रुद्रटाला ध्वनिसंप्रदायाची वार्ता नसून त्याचें भामह व उद्भट या अलंकारवाद्यांशीं विशेष साधर्म्य आहे. बहुधा तो ध्वनिकारिकाकाराचा सम-

† तस्मात्तत्कर्तव्यं यत्नेन महीयसा रसैर्युक्तम् । १२. २.

कालीन किंवा फार तर त्याच्या जरा पूर्वीचा असून इ. स. ८०० पासून ८५० पर्यंत तो केव्हां तरी होऊन गेला असला पाहिजे.

याला उपोद्बलक दोन प्रमाणें मिळतात. शिशुपालवधावर वल्लभदेवाची टीका आहे. त्यांत सर्ग ४ श्लोक २१ वरील व्याख्यानांत आपण रुद्रटालंकारावर टीका केली असल्याचें वल्लभदेवाने सांगितलें आहे. त्याचप्रमाणें शिशुपालाच्या सर्ग २, ४४ येथें टीकेंत रुद्रटाचें नांव घेऊनच व सर्ग २, ८८ ( रुद्रट २, १ ) येथें नांव न घेतां रुद्रटाच्या मताचें अवतरण त्यानें केलें आहे ( काशीसंस्कृत सीरीज प्रत ). वल्लभदेवाचा नातू कय्यट याने आनंदवर्धनाच्या देवीशतकस्तोत्रावर गतकलि ४०७८ मध्ये ( इ. स. ९७७ ) टीका लिहिली तेव्हां वल्लभ हा निदान पन्नास वर्षे त्याहून प्राचीन असला पाहिजे. म्हणजे ९२५ च्या सुमारास वल्लभदेवानें रुद्रटालंकारावर टीका लिहिली. दुसरें प्रमाण वराहमिहिराच्या योगयात्रेवर उत्पलानें टीका लिहिली आहे तीत रुद्रटाच्या अनन्वयालंकाराची व्याख्या उल्लेखिली आहे ( रुद्रट ८, ११ ). उत्पलानें आपली बृहज्जातकावरील टीका शके ८८८ ( सन ९६६ ) मध्यें लिहिली ( BBRAS cat. vol I. p. 129 ).

रुद्रटाच्या काव्यालंकारावरील टीकाकार जो नमिसाधु त्याच्या संबंधानें थोडें सविस्तर विवेचन करणें अवश्य आहे. तो धर्मानें श्वेतांबर जैन असून शालिभद्र नामक गुरूचा शिष्य होता व त्यानें आपली टीका विक्रम शक ११२५ म्हणजे इ. स. १०६८–६९ या वर्षीं लिहिली इत्यादि वृत्त त्यानें स्वतःच टीकेच्या शेवटींच्या श्लोकांत सांगितलें आहे. * एका जुन्या हस्तलिखित प्रतींत ११२५ च्या जागीं ११७६ असें विक्रमशकवर्ष ( इ. स. १११९–२० ) दिलें आहे. तरी एकंदरींत नमिसाधु हा बराच जुना टीकाकार आहे. आपल्या पूर्वींच्या टीकाकारांच्या टीकांना धरून त्यानें आपली टीका लिहिली असल्याचें सांगितले असून प्रसंगीं रुद्रटाच्या शब्दांवरील दुसऱ्या स्पष्टीकरणाचाहि उल्लेख केला आहे. ‘ पूर्वमहामतिविरचितवृत्त्यनुसारेण किमपि रचयामि ’ असें त्यानें टीकेच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे व अ. २, १, ५, २३ इत्यादि ठिकाणीं ‘अन्ये तु’ या शब्दांनीं व

* सूरिर्भूरिगुणैकमान्दिरमिद श्रीशालिभद्राभिधः । तत्पादाम्बुजषट्पदेन नमिना... रचितं सट्टिपणं लघ्वदः ॥......पंचविंशतिसंयुक्तैरेकादशसमाशतैः ( ११२५ ) । विक्रमात्समतिक्रान्तैः प्रावृषीदं समर्थितम् ॥ ( नि. सा. प्रत )

' एतेषु...व्याख्यानान्तराण्यपि महामतिकृतानि दृष्टानि ' इत्यादि इतर टीकांचे उल्लेख केले आहेत. त्याची टीका थोडक्यांत मुद्देसूद असूनहि तींत बरींच अवतरणें घेतलेलीं आढळतात. त्यानें ज्या ग्रंथकारांचा किंवा ग्रंथांचा नामतः उल्लेख करून किंवा वचनें उद्धृत करून परामर्श घेतला आहे त्यांत अर्जुनचरित [ १६, ४ ], उद्भट ( ६, ३३ ), कादम्बरी, किरातार्जुनीय, छंदःशास्त्रकार जयदेव [ १, १८ ], तिलकमञ्जरी [ १६, ३ ], दण्डी, नाममाला, पाणिनिकृत पातालविजयमहाकाव्य [ २, ८ ], पिङ्गल, बृहत्कथा ( २, १० ), भरत, भर्तृहरि, भामह [ ८, ८४ ], माघकाव्य, मालतीमाधव ( ७, ३३ ), मृच्छकटिक ( ८, १ ), मेधाविरुद्र, मेघदूत, रत्नावली ( ७, ३३ ), वामन ( १, २०; ८, १० ), वेणीसंहार ( ७, ७३ ), शिशुपालवध, हरि ( २, १९ प्राकृत भाषेंतील साहित्यशास्त्रकार ), हर्षचरित इत्यादींचा समावेश होतो. रुद्रटाच्या ग्रंथावर आशाधरानें केलेली ( इ. स. १२३६ या वर्षीं रचिलेली ) व आणखी एक रसतरंगिणी नांवाची अशा टीका झालेल्या आहेत. रसतरंगिणीचा कर्ता हरिभट्टाचा पुत्र गोपालभट्ट आहे. शिशुपालवधावर टीका करणाऱ्या वल्लभदेवानें रुद्रटाच्या काव्यालंकारावर टीका लिहिली होती असें त्यानें आपल्या टीकेंत ( शिशुपाल० ४, २१ ) सांगितले आहे हें वर आलेंच आहे.

रुद्रटाच्या ग्रंथाबरोबर कोणी एक रुद्रभट्ट व त्याचा ग्रंथ शृंगारतिलक यांचा उल्लेख केला पाहिजे. रुद्रट व हा रुद्रभट्ट हे एकच कीं भिन्न या प्रश्नावर आज बरींच वर्षें मोठा वाद चाललेला आहे. वेबर, आफ्रेक्ट, बुल्हर, व पिशेल यांचें मत ते एकच होत असें असून पंडित दुर्गाप्रसाद व डॉ. याकोबी ( Z. D. M. G. vol 42 pp 423–435 ) यांच्या मतें ते भिन्न व्यक्ति होत. या प्रश्नासंबंधानें आम्हीं आमचें म्हणणें थोडक्यांत सांगतों. पिशेलनें शृंगारतिलकाची आवृत्ति छापिली असून निर्णयसागरांतील काव्यमालेंतहि तो ग्रंथ छापिलेला आहे. त्याचे तीन परिच्छेद आहेत. आरंभीं पशुपति म्हणजे शिव या देवतेला नमन करून प्रथम परिच्छेदांत नवरस, भाव, व नायक आणि नायिका यांचे निरनिराळे प्रकार या विषयांचें विवेचन केलें आहे. दुसऱ्या परिच्छेदांत विप्रलंभशृंगार, विप्रलंभावस्थेंतील दहा पायऱ्या व खंडिता नायिकेला पुनः वळविण्याचे सहा उपाय यांचें वर्णन आहे आणि तिसऱ्यांत इतर रस व कैशिकी, सात्वती, आरभटी व भारती या चार वृत्ति सांगितल्या आहेत. रसांचें

विवेचन काव्याला अनुलक्षून आपण केले आहे, पण भरताचे रसविवेचन नाट्याला अनुलक्षून आहे असें रुद्रभट्टानें सांगितलें आहे. तो म्हणतो, ' प्रायो नाट्यं प्रति प्रोक्ता भरताद्यैः रसस्थितिः । यथामति मयाप्येषा काव्यं प्रति निगद्यते ॥ " ( १,५ ). ग्रंथान्तींच्या पद्यांत त्यानें शृंगारतिलकाची स्तुति केली आहे; ती पद्यें अशीं: ' कान्या काव्यकथा कीदृग् वैदग्धी को रसागमः । किं गोष्ठीमंडनं हंत शृंगारतिलकं विना ॥ त्रिपुरवधादेव गतामुल्लासमुमां समस्तदेवनताम् । शृङ्गार-तिलकविधिना पुनरपि रुद्रः प्रसादयति ' ॥. यांतील दुसरी आर्या कित्येक हस्त-लिखित प्रतींत नाहीं. रुद्रभट्टानें त्रिपुरवधनामक एक ग्रंथ पूर्वी लिहिला असावा असा या दुसऱ्या आर्येतून कित्येकांनी अर्थ काढिला आहे. तींतील त्रिपुरवध, शृंगारतिलक व रुद्र हे शब्द श्लिष्ट म्हणजे द्वयर्थी आहेत हें उघड दिसतें. तेव्हां या आर्येचा दुसराहि अर्थ संभवतो. तो असा: त्रिपुरदाह नांवाच्या एका नाटकाचा प्रयोग भरतानें शिव व त्याचे गण यांच्यापुढें करून दाखविल्याची जी कथा आहे तिला अनुलक्षून त्रिपुरवध हा शब्द रुद्रटानें योजिला असावा, स्वतःच्या ग्रंथा-संबंधानें नसावा. त्रिपुरदाह नाटकाचा उल्लेख नाट्यशास्त्रांत ( ४.९ ) व दशरू-पावरील धनिकाच्या टीकेंत आला असून धनिकाचें वचन पूर्वी नाट्यशास्त्राच्या कालनिर्णयाच्या प्रसंगीं ( पान २१ ) दिलेंच आहे.

रुद्रभट्ट व रुद्रट हे एक असावे अशी शंका येण्याला शृङ्गारतिलकाच्या कांही हस्तलिखित प्रतींत कर्त्याचें नांव रुद्रट असें दिलें आहे हें एक दिसतें. इंडिया ऑफिस मधील संस्कृत हस्तलिखितांचा कॅटलॉग ( पा. ३२१ क्रमांक ११३१ ) व मद्राससरकार कडील संस्कृतहस्तलेखनामावली ( पा. ८६९७ क्रमांक १२९५५ ) यांत असें नांव आढळतें. सुभाषितावली सारख्या संग्रहात्मक ग्रंथांत सुद्धां या नांवांचा घोटाळा करून काव्यालंकारांतील पद्यें रुद्रट, रुद्र किंवा रुद्रभट्ट या नांवावर दिलेलीं आढळतात. उदाहरणार्थ, शार्ङ्ग-धरपद्धतींत ' एकाकिनी यदबला ' इत्यादि ( रुद्रट ७, ४१ ) व ' मलयानिल-ललनाल्लल० ' इत्यादि ( रुद्रट २, ३० ) हे श्लोक रुद्र व भट्टरुद्र यांचे म्हणून दिले आहेत ( क्रमांक ३७७३ व ३७८९ पहा ). क्रमांक ५७५ व ३४७३ हीं पद्यें रुद्रटाच्या नांवावर असून त्याच्या काव्यालंकारांत ती आहेत. तशींच क्रमांक ३५६७, ३५६८, ३५७९, ३६७०, ३६७५, ३७५४ हीं पद्यें शृङ्गार-तिलकांतलि असून तीं रुद्राच्या नांवावर दिलीं आहेत हेंहि ठीकच आहे. रसार्ण-

वसुधाकर ( पान ३० ) येथें ' ईर्ष्या कुलस्त्रीषु न नायकस्य...सर्वस्वमेतास्त-दहो स्मरस्य ' हा श्लोक ( शृंगारतिलक १.६९ ) रुद्रटाचा म्हणून दिला आहे. त्याचप्रमाणें कैशिकीवृत्तीबद्दल रुद्रटाचें म्हणून जें ( पान ८७ वर ) मत दिलें आहे तें ( शृंगारहास्यकरुणरसातिशयसिद्धये । एषा वृत्तिः प्रयत्नेन प्रयोज्या रसकोविदैः ॥ ३, ३९ ) शृंगारतिलकांतील आहे. त्याचप्रमाणें भावप्रकाशन ( पान ९५ ) या ग्रंथांत वेश्येसंबंधीं रुद्रटाचें म्हणून मत दिलें आहे ( निर्गुणेपि न विद्वेषो न रागोस्या गुणिन्यपि १.६२ वगैरे ) तें शृङ्गारतिलकांतील आहे. यावरून बाराव्या तेराव्या शतकापासून रुद्रट व रुद्रभट्ट यांचे नांवाचा घोटाळा होण्यास सुरवात झाली होती असें दिसतें. भावप्रकाशनांत शृंगारतिलकांतील श्लोक शब्दशः घेतल्याचें वर दाखविलें आहे म्हणून अष्ट नायिकांबद्दलचे श्लोक रुद्रटकाव्यालंकारावरून न घेतां रुद्राच्या शृङ्गारतिलकांतून घेतले आहेत असेंच मानणें सयुक्तिक दिसतें. शृंगारतिलकांत दिलेली उदाहरणें बहुतेक रुद्राचीं स्वतः-चींच असावींत असें दिसतें व या कारणास्तव कालनिर्णयाच्या कामीं त्यांचा उपयोग होण्यासारखा आहे. रुद्रटाच्या काव्यालंकारांतील पद्यें १० व्या शतकाच्या आरंभापासून वल्लभदेव, प्रतीहारेन्दुराज वगैरे ग्रंथकारांनीं उद्धृत केलेलीं आढळतात, पण त्यांनीं शृंगारतिलकांतील पद्यें घेतलेली आढळत नाहींत. तीं उध्दृत करणारे जुन्यांत जुने ग्रंथकार हेमचंद्र, भावप्रकाशनकार शारदातनय व विश्वनाथ हेच होत. हेमचंद्रानें ' यत् पाणिर्न निवारितो० ' इत्यादि व ' गाढा-लिंगनपीडितस्तनतटं ' इत्यादि हे शृंगारतिलकांतील श्लोक ( का. मा. पा. १२१ व १२७ ) घेतले आहेत ( हेम० पा. ३०४ व ३०५ ). याखेरीज शृङ्गारतिलकांतील पहिलाच श्लोक जो ' शृङ्गारी गिरिजानने...सतां भूतये ' त्याचा रसाचा स्वशब्दांनीं निर्देश करणें हा दोष होय असें सांगून उदाहरण म्हणून हेमचन्द्रानें आपल्या काव्यानुशासनांत उल्लेख केला आहे ( पान ११० ). यावरून शृङ्गारतिलक इ. स. ११०० पूर्वीं रचिला गेला होता हें उघड होतें.

रुद्रट व रुद्र या व्यक्ति एक कीं दोन या प्रश्नाच्या निर्णयार्थ जीं उलट सुलट प्रमाणें सांगण्यांत येतात त्यांचा विचार करितां असें दिसून येतें कीं या व्यक्ति भिन्न आहेत असें दाखविणारीं प्रमाणेंच बलवत्तर आहेत. तीं येथें संक्षेपानें सांगतों. रुद्रटानें १२, १३ व १४ या अध्यायांत जे विषय वर्णिले आहेत तेच विषय व बहुतेक तशाच शब्दांनीं शृङ्गारतिलकांत आले आहेत. शृङ्गारतिलकांत महत्वाचें

असें कांहीं अधिक म्हटलें तर उदाहरणासाठीं दिलेले श्लोक होत. आतां या दोन्ही ग्रंथांचा कर्ता जर एकच असेल तर एकाच ग्रंथकारानें तोच विषय बहुतेक त्याच शब्दांनीं दोन वेळां वर्णिला असें मानावें लागेल. पण हें विशेषसें संभवनीय दिसत नाहीं. शृङ्गारतिलकामध्यें कित्येक ठिकाणीं अधिक सविस्तर विवेचन केलेलें आहे हें खरें. उदाहरणार्थ, चार वृत्तींचें वर्णन, प्रणयाच्या दहा अवस्थांचीं लक्षणें, नायिकांचे उपप्रकार व त्यांचीं लक्षणें असे विषय शृङ्गारतिलकांत अधिक विस्तृत वर्णिले असून काव्यालंकाराचें वर्णन जरा संक्षिप्त आहे. पण इतर कांहीं विषयांसंबंधानें काव्यालंकारांतील विवेचन अधिक सविस्तर आहे. उदाहरण, रुद्रटाचीं १४ व्या अध्यायांतील २२, २३, २४ हीं पद्यें पहा. दुसरें महत्वाचें कारण असें आहे कीं, कांहीं सिद्धान्तांविषयीं काव्यालंकार व शृंगारतिलक यांचीं मतें परस्परविरोधी आहेत. महत्वाच्या विषयावर एका ग्रंथांत एक मत व दुसऱ्या ग्रंथांत दुसरें मत असा प्रकार एकाच कर्त्याच्या हातून कसा होईल? काव्यांत नऊ रस असतात असें शृंगारतिलकांत म्हटलें असून ( शृंगारहास्यकरुणा रौद्रवीरभयानकाः। बीभत्साद्भुतशान्ताश्च नव काव्ये रसाः स्मृताः ॥ १. ९ ) रुद्रटानें 'शृङ्गारवीरकरुणा बीभत्सभयानकाद्भुता हास्यः। रौद्रः शान्तः प्रेयानिति मन्तव्या रसाः सर्वे' ॥ ( १२. ३ ) असे दहा रस दिले आहेत. प्रेयान् रुद्रटानें सांगितला असून शृंगारतिलकांत तो गाळलेला आहे. रुद्रटानं मधुरा, प्रौढा, परुषा, ललिता व भद्रा अशा पांच वृत्ति सांगितल्या आहेत (२, १९) तर शृंगारतिलकांत (१. १९) कैशिकी, सात्वती, आरभटी व भारती या चार वृत्ति दिल्या त्यांचा केवळ नाट्यासंबंधानें विचार न करितां सामान्यतः काव्यासंबंधानें केला आहे. रुद्रटानें नायिकांचे भेद स्वीया, परकीया आणि वेश्या असे प्रथम केले असून पुनः निराळ्या दृष्टीनें अभिसारिका व खंडिता असे केले आहेत व स्वीया या प्रकाराचे स्वाधीनपतिका व प्रोषितपतिका असे दोन पोटभेद केले आहेत; पण शृंगारतिलकांत हे भेद एकत्र सांगितले असून ते आठ होत असें म्हटलें आहे ( काव्यमाला आवृत्ति पारि १. ७२, ७४ ). रुद्रटानें वेश्यांसंबंधानें केवळ निन्दात्मक वर्णन केलें असून ( अ. १२ पद्ये ३९, ४० ) शृंगारतिलकांत इतरांनीं त्यांच्या विरुद्ध केलेलीं निन्दात्मक विधानें योग्य म्हटलीं असलीं तरी त्यांच्याविषयीं समर्थनपरहि शब्द सांगितले आहेत. रुद्रट म्हणतो 'सर्वाङ्गना तु वेश्या सम्यगसौ लिप्सते धनं कामात्। निर्गुणगुणिनोस्तस्या न द्वेष्यो

न प्रियः कश्चित् ॥ गम्यं निरूप्य सा स्फुटमनुरक्तेवाभियुज्य रञ्जयति । आकृष्ट-सकलसारं क्रमेण निष्कासयत्येनम् ॥ '; शृङ्गारतिलकांत ( पारि. १. ६२-६९ ) ' सामान्यवनिता वेश्या ' इत्यादि वर्णन करून शेवटीं ' इर्ष्या कुलस्त्रीषु न नाय-कस्य निःशंककेलिर्न पराङ्गनासु । वेश्यासु चैतद्द्वितयं प्रसिद्धं सर्वस्वमेतास्तदहो स्मरस्य ॥ *' असा त्याचा समारोप केला आहे. या वर्णनांत ' निर्गुणेपि विद्वेषो न रागोस्या गुणिन्यपि । तत्स्वरूपमिदं प्रोक्तं...कैश्चिद्ब्रूमो वयं पुनः ' हे जे शब्द आहेत ( १, ६३ ) ते रुद्रटाला स्पष्ट लागू पडण्यासारखे आहेत. कारण तेथपर्यंतच्या वर्णनांत रुद्रटाचेच शब्द बहुतांशीं आढळतात! परकीया नायिकेच्या वर्णनांतील रुद्रटाचे शब्द ' साक्षाच्चित्रे स्वप्ने स्याद्दर्शनमेव-मिन्द्रजाले वा । देशे काले भङ्ग्या साधु तदाकर्णनं च स्यात् । ' (१२, ३१) असे असून शृङ्गारतिलकांत ' साक्षाच्चित्रे तथा स्वप्ने तस्य स्याद्दर्शनं त्रिधा । देशे काले च भङ्ग्यां च श्रवणं चास्य तद्यथा । ' ( १, ५१ ) असे आहेत, त्यांत भेद अगदीं थोडाच आहे. या थोड्याशा मतभिन्नतेशिवाय इतर गोष्टीत दोन्ही ग्रंथां-मध्यें विचारसादृश्यच काय पण शब्दसादृश्यहि चांगलें ठळकपणें दिसत असून तें केवळ एकाच विषयाचें विवेचन दोन्हीं ग्रंथांत आहे एवढ्यावर भागविण्यासारखें नाहीं. तेव्हां या सादृश्याचा उलगडा करावयाचा तर त्या दोन ग्रंथांतील एक कोणता तरी ग्रंथ दुसऱ्याच्या आधारें लिहिला आहे असेंच समजलें पाहिजे, दुसरा मार्ग दिसत नाहीं. वरील सर्व विवेचनाचा विचार करितां रुद्रटाच्या काव्यालंकाराच्या आधारेंच शृंगारतिलकाची रचना केली असावी असें आम्हांला वाटतें व तदनुसार रुद्रभट्ट रुद्रटाच्या मागून इ. स. ९०० ते ११०० पर्यंत केव्हांतरी होऊन गेला असावा असें आमचें मत आहे. रुद्रट व रुद्र भिन्न होते असें आम्ही प्रतिपादिलें आहे तोच अभिप्राय प्रो. दे यांनी आपल्या साहित्यशास्त्राच्या इतिहासांत व्यक्त केला आहे ( व्हॉ. १ पा. ८९-९५ ). परंतु भावप्रकाशन ग्रंथाच्या प्रस्तावनेंत संपादकांनीं ( पान ६८-७० ) येथें रुद्रभट्ट व रुद्रट एक होते असें दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. प्रो. शंकरन् ( The theories of Rasa and Dhvani ) यांनीं आमच्या मताचाच अनुवाद केला आहे ( पान ३२ ). है

* हा श्लोक रसार्णवसुधाकरांत वर सांगितल्याप्रमाणें व भावप्रकाशन पान ९६ येथें उद्धृत केला आहे.

दोघे भिन्न नव्हते असें मानण्याला जी प्रमाणें पुढें करण्यांत आलीं आहेत ती आम्हांला फुसकी वाटतात.

दशरूपकावरील टीकेंत धनिकनामक टीकाकाराने (४. ६०) 'उत्स्वप्नायितो यथा रुद्रस्य–निर्मग्नेन मयाऽम्भसि स्मरभरादाली समालिङ्गिता' इ. असा रुद्रटाच्या नांवावर श्लोक दिलेला आहे. पण तो उपलब्ध असलेल्या रुद्रटाच्या किंवा रुद्राच्या अशा कोणाच्याच ग्रंथांत सांपडत नाही. प्रतापरुद्रयशोभूषणांतहि रुद्र-भट्टाचीं म्हणून दोन अवतरणें (पा. ११ व पा. ३३४) घेतलीं आहेत;* पण तींहि उभय ग्रंथांत आढळत नाहींत. तेव्हां हा रुद्र निराळाच आहे कीं काय? तिलकमञ्जरींत त्रैलोक्यसुंदरीकथेचा कर्ता म्हणून जो रुद्र सांगितला आहे (पद्य ३५) तोच शृंगारतिलकाचाहि कर्ता कीं काय याचाहि निर्णय करितां येण्यासारखा दिसत नाहीं.

## १४ आनंदवर्धनप्रणीत ध्वन्यालोक.

ध्वन्यालोक हा ग्रंथ निर्णयसागर छापखान्याच्या काव्यमालेंत अंशतः सटीक छापिलेला आहे. टीका अभिनवगुप्तकृत लोचन नांवाची असून पहिल्या तीन उद्योतांवरच आहे. अलंकारशास्त्राच्या इतिहासांत ध्वन्यालोक हा एक अत्यंत महत्वाचा ग्रंथ होय. व्याकरणशास्त्राच्या इतिहासांत पाणिनीच्या अष्टाधायी सूत्रांचें जें महत्व किंवा वेदान्तशास्त्रांत वेदांतसूत्रांचें जें महत्व तेंच अलंकारशास्त्रांत ध्वन्यालोकाचें आहे असें म्हणतां येईल. या ग्रंथांत ग्रंथकारानें गाढ विद्वत्ता व खोल चिकित्सक बुद्धि प्रकट केलेली दिसून येते. त्याची भाषा स्पष्टार्थक व जोर-दार असून त्यावर पदोपदीं स्वतंत्र बुद्धीची मुद्रा उमटलेली आहे. ध्वनिकार हा अलंकारिकांच्या पद्धतीचा प्रस्थापक होय ('ध्वनिकृतामालंकारिकसरणिव्यव-स्थापकत्वात्') असें जें रसगंगाधरकार पंडितराज जगन्नाथानें त्यासंबंधानें म्हटलें आहे तें अगदीं सत्य आहे.

ध्वन्यालोकाची विभागणी कारिका, वृत्ति व उदाहरणें अशी त्रिविध असून प्रथम कारिका, नंतर त्या कारिकेचें स्पष्टीकरणात्मक विस्तृत गद्यमय विवेचन आणि पुढें उदाहरणें असा त्याचा क्रम आहे. कारिकांची संख्या छापलेल्या प्रतींत

---

* रुद्रभट्टेनापि कथितम् 'उदारचरितनिबंधना प्रबंधप्रतिष्ठा।' (पा. ११); तदुक्तं रुद्रभट्टेन 'यो हेतुः काव्यशोभायाः सोऽलंकारःप्रकीर्त्यते' इ. (पा. ३३४).

१२९ आहे. उदाहरणांपैकीं बहुतेक जुन्या कवींच्या काव्यांतूनच घेतलेलीं आहेत. ग्रंथाचीं चार प्रकरणें असून त्यांना उद्द्योत म्हणतात.

ध्वन्यालोक वाचावयास लागलें असतां प्रथम प्रश्न असा उत्पन्न होतो कीं त्यांतील कारिका, वृत्ति व उदाहरणें हे सर्व भाग एकाच ग्रंथकाराच्या हातचे आहेत कीं नाहीत ? वृत्ति व उदाहरणांची निवड हे भाग एकाच लेखकाच्या हातचे होत यांत संशय नाहीं. पण कारिकांचा कर्ता तोच वृत्तिकर्ता आहे कीं नाहीं याचा निर्णय करणें जरा बिकट झालें आहे. ध्वन्यालोकानंतर सुमारे दीडशें वर्षांनीं लिहिण्यांत आलेल्या त्यावरील लोचननामक टीकेच्या कर्त्यानें कारिकाकार व वृत्तिकार यांमध्यें भेद दाखविण्याचा बऱ्याच प्रसंगीं मोठा खटाटोप केला आहे. उदाहरणार्थ, पान ५९ वर लोचनकार म्हणतो 'अत एव **मूलकारिका** साक्षात्तन्निराकरणार्था न श्रूयते । **वृत्तिकृत्तु** निराकृतमपि प्रमेयसंख्यापूरणाय कण्ठेन तत्पक्षमनूद्य निराकरोति येऽपीत्यादिना।...तेनात्र प्रथमोद्द्योते ध्वनेःसामान्यलक्षणमेव **कारिकाकारेण** कृतम् । द्वितीयोद्द्योते **कारिकाकारो**ऽवान्तरविभागं विशेषलक्षणं च विदधदनुवादमुखेन मूलविभागं द्विविधं सूचितवान् । **तदाशयानुसारेण वृत्तिकृ**दत्रैवोद्द्योते मूलविभागमवोचत् । इ० '; पान ६० वर म्हटलें आहे ' न चैतन्मयोक्तमपि तु **कारिकाकाराभिप्रा**येणेत्याह तत्रेति ।...भवति मूलतो द्विभेदत्वं **कारिकाकारस्यापि** संमतमेवेति । '; पा. १२२ वर लोचनकार म्हणतो, 'एतत्तावत्त्रिभेदत्वं न **कारिकाकारेण** कृतं **वृत्तिकारेण** तु दर्शितम् । न चेदानी **वृत्तिकारो** भेदप्रकटनं करोति । ततश्चेदं कृतमिदं क्रियते इति कर्तृभेदे का सङ्गतिः ? '; आणखी १३०–१३१ या पानांवर तो म्हणतो, '**कारिकाकारेण** पूर्वं व्यतिरेक उक्तः । न च सर्वथा न कर्तव्योऽपि तु बीभत्सादौ कर्तव्य एवेति पश्चादन्वयः । **वृत्तिकारेण** तु अन्वयपूर्वको व्यतिरेक इति शैलीमनुसर्तुमन्वयः पूर्वमुपात्तः ' । वृत्तींतील ' प्रतिपादितमेवैषामालम्बनम् ' (पा. १३५) या शब्दांवरील टीकेंत लोचनकार म्हणतो, ' अस्म**न्मूलग्रंथकृता** इत्यर्थः' । तसेंच आणखी वृत्तींतील 'दर्शितमेवाग्रे' (पा. १३८) या शब्दांच्या स्पष्टीकरणांत लोचनकारानें 'दर्शितमेवेति **कारिकाकारेणेति** भूतप्रत्ययः ।' असें म्हटलें आहे. या शेवटच्या वाक्यांत ' दर्शितम् ' म्हणजे दाखविलें आहे असा जो शब्द पुढें येणाऱ्या विवेचनासंबंधानें योजिला आहे तो मूळ ग्रंथकाराचा असणें शक्य नाहीं, कारण मूळ ग्रंथकारानें ' दर्शयिष्यते ' असा भविष्यकालदर्श-

कच प्रयोग पुढें येणाऱ्या विषयासंबंधानें केला असता; पण कारिकाकार हा पूर्वीचा असल्यामुळे त्याच्या कारिका वृत्तिकारापुढें समग्र होत्या व त्यांत सर्व विषयाचें विवेचन यथावकाश केलें होतें हा अभिप्राय लक्षांत घेऊन वृत्तिलेखकानें कारिकांत पुढ येणाऱ्या विवेचनाविषयीं भूतकालदर्शक असा **दर्शितम्** शब्द योजिला असा लोचनकाराचा अभिप्राय आहे. या स्थलीं व पान ६० वरील ' हें मीच म्हणतों असें नाहीं पण कारिकाकाराचाही तोच अभिप्राय आहे ' असे जें वाक्य उद्धृत केले आहे त्यांत कारिकाकार व वृत्तिकार यांमधील भेद जसा ठळक रीतीनें टीकाकारानें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे तसाच इतर स्थलीं दाखविलेला नसला तरी आणखीहि पुष्कळ ठिकाणीं तसा कमी अधिक प्रमाणांत प्रयत्न केलेला लोचनांत दिसून येतो. पानें ४८, ७१, ८५, १०४, १०८, ११५ इत्यादि पाहिल्यास तशी स्थळें आढळून येतील. यासंबंधानें आणखी एक गोष्ट लक्षांत येण्यासारखी आहे. वृत्ति व उदाहरणें यांच्या कर्त्याला लोचनकार बहुशः **ग्रंथकृत्** म्हणतो व कारिकाकारासबंधानें लिहितांना मूलग्रंथकृत् किंवा मूलग्रथकार असें म्हणतो. उदाहरण ध्व पा. १३५ वरील उपरोक्त अवतरणांत ' अस्मत्मूलग्रंथकृता ' असा शब्द आढळतो. ' तथा चान्येन कृत एवात्र श्लोकः ' ( पा. ८ ) या शब्दांसंबंधानें ' ग्रंथकृत्समानकालभाविना मनोरथनाम्ना कविना ' व ' सहृदयानामानन्दः ' या विषयीं ( पा. ११ ) ' आनंद इति च ग्रंथकृतो नाम तेन स एव आनंदवर्धनाचार्य एतच्छास्त्रद्वारेण ' इ. ( पा. १२ ) असें लोचनकारानें म्हटलें आहे. याशिवाय ' समासोक्त्याक्षेपयोरेकमेवोदाहरणं व्यतरद्ग्रंथकृत् ' ( लो. पा. ३७ ), ' एवमभिप्रायद्वयमपि साधारणोक्त्या ग्रंथकृद्न्यरूपयत् ' ( पा. ३९ ), ' आहूतोऽपि सहायैः ' या पद्यासंबंधानें ' अतएव ग्रंथकारः सामान्येन ' इ. असे लोचनकारानें वृत्तिकाराला अनुलक्षून शब्द योजिलेले दिसून येतात. या सर्व उताऱ्यांचा विचार करितां लोचनकाराच्या मतें वृत्तीचा कर्ता आनंदवर्धन ( उपरोक्त 'आनंद इति च ग्रंथकृतो नाम ' इत्यादि पहा ) असून तो कारिकांच्या कर्त्याहून भिन्न होता असें दिसून येतें. तेव्हां आतां आपल्यापुढें प्रथम प्रश्न असा आहे कीं, हें लोचनकाराचें मत इतर प्राचीन ग्रंथकारांच्या एतद्विषयक अभिप्रायांशीं कितपत जुळतें आहे, व आनंदवर्धन हा जर ध्वनिकारिकांचा कर्ता नसून केवळ वृत्तिकार असेल तर कारिकाकाराचें नांव काय ?

या प्रश्नाची चर्चा करण्यापूर्वी ग्रंथाच्या नांवासंबंधानें थोडासा विचार करणें अवश्य आहे. या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रतींच्या शेवटीं समाप्तिदर्शक वाक्यांत बऱ्याच ठिकाणीं त्याचें नांव '**सहृदयालोक**' असें दिलें असून कित्येक ठिकाणीं '**काव्यालोक**' असेंहि आढळतें. लोचनटीकेच्या प्रास्ताविक पद्यांतील 'यत्किञ्चिदप्यनुरणन् स्फुटयामि **काव्यालोकं सुलोचन**नियोजनया जनस्य।' या तिसऱ्या पद्यांत लेखक टीकाविषयक ग्रंथाला 'काव्यालोक' या नांवानें उल्लेखीत आहे असें दिसून येतें. चवथ्या उद्द्योताच्या उपान्त्य पद्यांत 'काव्याख्येऽखिलसौख्यधाम्नि विबुधोद्याने ध्वनिर्दर्शितः' असे शब्द असून त्यांवरूनहि असें अनुमान होतें कीं मूळ ग्रंथाच्या नांवांत 'काव्य' हा शब्द असावा किंवा 'काव्य' हेंच त्यांचें नांव असावें आणि त्यावर आनंदवर्धनानें टीका लिहिली ( ग्रंथाचें नांव बहुधा काव्यध्वनि किंवा नुसते काव्य किंवा ध्वनि असे कांही असलें पाहिजे ). ध्वनिकारिकांत ( ३, ५३ ) कारिकांना **काव्यलक्षण** असें म्हटलें आहे तेव्हां त्यावरील वृत्तीला **काव्यालोक** किंवा **ध्वन्यालोक** असें नांव येणें स्वाभाविक आहे. याप्रमाणें काव्यालोक किंवा ध्वन्यालोक नांवाचें स्पष्टीकरण असें होते. पण **सहृदयालोक** असें जें दुसरेंहि नांव अनेक वेळां येतें तें त्याला कां मिळालें याचा उलगडा करणें मात्र इतकें सोपें नाहीं. प्रो. सोवनी यांनीं ब्रिटिश रॉयल ए. सो. च्या १९१० च्या इतिवृत्तांत ( पा. १६४-१६७ ) छापलेल्या आपल्या लेखांत ध्वनिकारिकाकाराचें नांव सहृदय असावें असा तर्क केला आहे. सहृदयालोक हें ग्रंथनाम व लोचनकाराच्या प्रास्ताविक पद्यांतील 'सरस्वत्यास्तत्त्वं कविसहृदयाख्यं विजयताद्।' असा सहृदयाचा आणखी उल्लेख यांवर प्रो. सोवनींनीं आपला तर्क उभारिला आहे. त्यांचा हा तर्क शेवटी कदाचित् खरा ठरेल. पण त्यांनीं त्यासाठी पुढें केलेलीं प्रमाणें मात्र अगदींच दुबेल आहेत. याहून भक्कम प्रमाणे मिळाल्याखेरीज त्यांच्या अनुमानाला मान्यता येणें कठीण आहे. प्रदीप, प्रकाश इत्यादि नांवाप्रमाणें आलोक हें वृत्तिरूप किंवा टीकात्मक ग्रंथाचें नांव आहे असें मानिल्यास सहृदयालोक यांतील सहृदय हें ग्रंथकाराचें नांव न ठरतां ग्रंथाचेंच ठरेल. म्हणजे त्यावरून सहृदयालोकांतील सहृदय हा ध्वनिकारिकांचा कर्ता होता असें निष्पन्न होणार नाहीं. 'सरस्वत्यास्तत्त्वं' इत्यादिकांतील सहृदयशब्द कारिकाकाराचें नांव सहृदय होतें असें ध्वनित करण्यासारखा

आहे खरा, पण त्या शब्दाचा स्पष्टार्थ म्हटला तर ‘ सरस्वतीचें तत्त्वच असे जे कवि व रसिक ( सहृदयलोक ) त्यांचा विजय असो ’ एवढाच आहे. ध्वन्यालोकांतील शेवटच्या पद्यावरून पाहतां आनंदवर्धन हा स्वतःला ‘ परिपक्व बुद्धीच्या पुरुषांच्या मनांत सुप्तावस्थेत असलेल्या खऱ्या काव्यतत्त्वाचा पहिला आविष्कर्ता ’ अशी पदवी घेत असल्याचें दिसून येतें; तो म्हणतो ‘ सत्काव्यतत्त्वविषयं स्फुरितप्रसुप्तकल्पं मनःसु परिपक्वधियां यदासीत् । तद्व्याकरोत्सहृदयोदयलाभहेतोरानन्दवर्धन इति प्रथिताभिधानः ’ ॥. तात्पर्य सहृदय नांवाचा कोणी तरी ध्वनिकारिकांचा कर्ता होता असें सिद्ध करावयासाठीं आतांपर्यंत पुढें आलेलीं प्रमाणे अगदीं अपुरीं आहेत.

पण आमच्या मतें याविषयीं अधिक प्रबल प्रमाणे असून त्याचा विद्वानांनी करावा तसा उपयोग करून घेतलेला दिसत नाहीं. लोचनाचे निदान दोन पिढ्यांपूर्वी रचण्यांत आलेल्या मुकुलकृत अभिधावृत्तिमातृकानामक ग्रंथांत असें स्पष्ट म्हटलें आहे की ‘ लक्षणामार्गावगाहित्वं तु ध्वनेः **सहृदयैर्नूतनतयोपवर्णितस्य** विद्यत इति दिशमुन्मीलयितुमिदमत्रोक्तम् ’। (पा. २१) म्हणजे सहृदय नांवाच्या सन्मान्य ग्रंथकारानें नवीन तत्व म्हणून उद्घाटित केलेला जो ध्वनि तो एकंदरींत लक्षणेच्या टापूंतच पडतो. तसेंच (पा. १९ व २०) आणखी ‘ तथाहि तत्र विवक्षितान्यपरता **सहृदयैः** काव्यवर्त्मनि निरूपिता । ’ व ‘ यद्यपि चोपमेयपरत्वेन उपमानस्योपादानादेवंविधे विषयेऽत्यन्ततिरस्कृतवाच्यता **सहृदयै**रंगीक्रियते तथापि क्रियायोगनिबन्धनलक्षणावसरे तावद्वाच्यस्योपमानत्वेनाङ्गीकृतत्वादतिरस्कृतवाच्यतापि भवति । ’ असाहि मुकुलानें ध्वनिकारिकांतील मतांचा उपन्यास सहृदयाच्या नांवानें केलेला आहे. मुकुलाच्या या विधानावरून असें दिसते की, तो आपला ग्रंथ लिहीत असतां ( इ. स. ९२५ पासून ९४० पर्यंत ) ध्वनिसंप्रदाय नुकताच नवीन मत म्हणून पुढें आला असून सहृदय नांवाच्या पंडितानें त्याचें उद्घाटन केलेलें होतें. मुकुलाचा शिष्य प्रतीहारेन्दुराज यानेंहि उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रहावरील लघुवृत्तिनामक टीकेंत (पा. ७९) ‘ननु यत्र काव्ये सहृदयहृदयाह्लादिनः प्रधानभूतस्य स्वशब्दव्यापारास्पृष्टत्वेन प्रतीयमानैकरूपस्यार्थाभिव्यक्तिहेतुः काव्यजीवितभूतः **कैश्चित्सहृदयैर्ध्वनिर्नाम** व्यञ्ज-

कत्वभेदात्मा काव्यधर्मोऽभिहितः।' असें म्हटलें आहे. या * उताऱ्यांवरून एवढे स्पष्ट सिद्ध होतें कीं सहृदय हें ध्वनिसंबंधाची कल्पना व्यवस्थित रीतीनें मांडणाऱ्या ग्रंथकाराचें नांव तरी होतें, किंवा त्याच्या अनुयायांनीं त्याला ती पदवी म्हणून दिली असून तिच्यावरून तो प्रसिद्धीस आला; यांतहि दुसरा पक्ष अधिक संभवनीय वाटतो.

याप्रमाणें ध्वन्यालोक या ग्रंथाच्या नांवाशी संबंध असलेल्या बाबतींचा विचार झाला. पण ध्वनिकारिकांचा कर्ता आनंदवर्धनच होय असें ठरविण्याच्या कामीं मात्र मोठी अडचण उभी रहाते. ती अडचण अशी. राजशेखरानें काव्यमीमांसेत (पा. १५) 'प्रतिभाव्युत्पत्त्योः प्रतिभा श्रेयसी इत्यानन्दः। सा हि कवेरव्युत्पत्तिकृतं दोषमशेषमाच्छादयति। तत्राह—अव्युत्पत्तिकृतो दोषः शक्त्या संव्रियते कवेः। यस्त्वशक्तिकृतस्तस्य झगित्येवावभासते।' हा आनन्दाच्या नांवावर राजशेखरानें उद्धृत केलेला श्लोक परिकरश्लोक म्हणून ध्वन्यालोकात (पा. १३७) आढळतो. म्हणजे इ. स. ९०० च्या सुमारास आनंदवर्धनाची ध्वन्यालोकांतील वृत्तिकार म्हणून प्रसिद्धि होती असें दिसतें. आणखीं, जह्लणाच्या सूक्तिमुक्तावलीत राजशेखराच्या नांवावर दिलेल्या एका श्लोकात आनन्दवर्धन हा ध्वनिसंप्रदायाचा संस्थापक म्हणून सांगितला आहे (रॉ. ए. सो. मुंबई शाखा जर्नल व्हाल्यूम १७ पा. ५७ पहा). तो श्लोक असा—'ध्वनिनाऽतिगभीरेण काव्यतत्त्वनिवेशिना। आनन्दवर्धनः कस्य नासीदानन्दवर्धनः॥'. प्रतीहारेन्दुराजाचें **सहृदया**विषयी जें वचन वर उद्धृत केलें आहे त्याच्यापुढें लगेच त्यानें आणखीं, ध्वनीचा अलंकारांत समावेश होतो असें आपलें मत दिलें असून वस्तु, अलंकार व रस हे जे ध्वनीचे भेद त्यांचें परीक्षण त्यानें केलें आहे व तदनुसार ध्वन्यालोकांतील या ध्वनिभेदांचीं उदाहरणें म्हणजे अलंकारांचीं उदाहरणेच होत असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे (पा. ७९–८५). या त्याच्या विवेचनांत ध्वन्यालोकांतील वृत्ति सहृदयाची होती असें दर्शविणारे

---

* वरील तिन्ही उताऱ्यांत 'सहृदयैः' या तृतीयान्त शब्दाचा नेहमींचा अर्थ (काव्यमर्मज्ञ लोक) घेऊन भागणार नाहीं हे स्पष्ट आहे. जर कदाचित् कारिकाकार व वृत्तिकार एकच असतील तर 'सहृदयैः' हा शब्द आनन्दवर्धनाला लाविला आहे इतकेंच फार तर म्हणतां येईल.

कित्येक शब्द आले आहेत. उदाहरण, ( १ ) 'तथाहि प्रतीयमानरूपस्य वस्तुत्रैविध्यं तैरुक्तं ( तैः=सहृदयैः ) वस्तुमात्रालंकाररसादिभेदेन, तत्र वस्तुमात्रं तावत्प्रतीयते यथा चक्राभिघातप्रसभाज्ञयैव ' इ. ( ध्व. पा. ८९ पहा; ( २ ) वाच्यशक्त्याश्रयं ( व्यञ्जकत्वं ) तु रसादिवस्तुमात्रालंकाराभिव्यक्तिहेतुत्वात्त्रिविधम् । तत्र यत्तावद्वाचकशक्त्याश्रयं व्यङ्ग्यभूतालकारैकनियतं शब्दशक्तिमूलानुरणनरूपव्यङ्ग्यतया सहृदयैर्व्यञ्जकत्वमुक्तं ' सर्वैकशरणमक्षयम् ' इत्यादौ, तत्र शब्दशक्त्या ये प्रतीयन्ते विरोधादयोऽलङ्कारास्तत्संस्कृतस्वभावं वाच्यमवगम्यते । अतस्तत्र वाच्यस्य विवक्षैव ' ( पा. ८३ ). या अवतरणांतील ' सर्वैकशरण ' इत्यादि पद्य आनंदवर्धनाने स्वतःचें म्हणून दिले आहे हे लक्षांत ठेविले पाहिजे; ( ३ ) अत एव च सहृदयैर्यत्र वाच्यस्य विवक्षितत्वं तत्रैव वस्त्वलंकारयोः प्रतीयमानयोर्वाच्येन सह क्रमव्यवहारः प्रवर्तितोऽर्थशक्तिमूलानुरणनरूपव्यङ्ग्यो ध्वनिरित्युक्तं नतु वाच्यविवक्षायामपि ( वाच्याविवक्षा० ? ) । यत्र च वाच्यस्याविवक्षा पूर्वमुक्ता रामोस्मीति सुवर्णपुष्पामिति च तत्र वयमधिकारापेतप्रस्तुतार्थानुबन्धिवस्तूपानिबन्धादप्रस्तुतप्रशंसाभेदत्वमेव न्याय्यं मन्यामहे ' ( पा. ८४ ). या अवतरणांतील ' रामोस्मि ' व ' सुवर्ण ' हीं दोन्हीं पद्यें ध्वन्यालोकांत ( वृत्तींत ) अविवक्षितवाच्यध्वनीची उदाहरणें म्हणून दिलीं आहेत ( पा. ६१ व ४९ ). कुन्तकप्रणीत वक्रोक्तिजीवितांत ' ताला जाअन्ति गुणा...कमलाई ' इत्यादि आनंदवर्धनाचें पद्य ( ध्व. पा. ६२ ) रूढिशब्दवक्रतेचें उदाहरण म्हणून दिलें असून ' ध्वनिकारेण व्यङ्ग्यव्यञ्जकभावोऽत्र सुतरां समर्थितः किं पौनरुक्त्येन ' अशी टीपहि त्यावर जोडिली आहे. म्हणजे वक्रोक्तिजीवितकाराच्या मतें आनंदवर्धन हाच ध्वनिकार होय.

लोचनकाराचा बहुतेक समकालीन असा जो व्यक्तिविवेककार महिमभट्ट त्यानेंहि कारिकाकार व वृत्तिकार यांत भेद केलेला दिसत नाही. व्यक्तिविवेकांत आरंभीच ( पा. १ ) 'यत्रार्थः शब्दो वा' ही ध्वन्यालोकांतील ( पा. ३३ ) कारिका ध्वनिकारांची म्हणून उद्धृत केली असून पुढें ( पा. ११ ) वृत्तींतील कित्येक उतारे ध्वनिकाराचे म्हणूनच दिले आहेत; उदाहरण ' तथा चाह ध्वनिकारः " सारूपो ह्यर्थः " ' ( ध्व. पा. २३९ ); ' पुनः स एवाह " नहि व्यङ्ग्ये प्रतीयमाने वाच्यबुद्धिर्दूरीभवति । " ' ( ध्व. पा. १९० ); 'नहि विभावानुभावव्यभिचारिण एव ' ( ध्व. पा. १९३ ). महिमभट्ट आणखी म्हणतो ( पा. १६ ) ' अथार्थ-

शब्देनोभयमपि सङ्गृहीतं तस्योभयार्थविषयत्वेनेष्टत्वात् । यदाह—अर्थः सहृदयश्लाघ्यः...स्मृतौ ( ध्वनिकारिका १. २ ) इति । सत्यम् । किन्तु तमर्थमिति तच्छब्देनानन्तर्यात् प्रतीयमानस्यार्थस्य परामर्शे सति पारिशेष्याद्**र्थो वाच्यविशेष इति स्वयं विवृतत्वा**च्चार्थशब्दो वाच्यविषय एव विज्ञायते'. 'यत्रार्थः शब्दो वा' इत्यादि ( ध्व पा. ३३ ) कारिकेवरील 'यत्रार्थो वाच्यविशेषः' इत्यादि वृत्ति कारिकाकाराचीच होय असें व्यक्तिविवेकांत स्पष्ट म्हटलें आहे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तसेंच आणखीहि कित्येक ठिकाणी व्यक्तिविवेकांत ( पा. २९, ३४ इ. ) ध्वनिकारिकाकार आणि वृत्तिकार या दोघांनाहि ध्वनिकार म्हणून उल्लेखिलें आहे. क्षेमेन्द्राच्या औचित्यविचारचर्चेत ( कारिका १८ ) ध्वन्यालोकांतील ' विरोधी वा ऽविरोधी वा रसोऽङ्गिनि रसान्तरे ।...विरोधिता ॥' ( ३, २४ ) ही कारिका उद्धृत केली असून ती आनंदवर्धनाच्या नांवावर दिली आहे, तर हेमचंद्राच्या काव्यशासनावरील विवेक नामक त्याच्या टीकेत ( पान २६ ) ' प्रतीयमानं पुनरन्यदेव ' इत्यादि ध्वनिकारिका ( १, ४ ) आनंदवर्धनाची म्हणून म्हटली असून पुढें ( पान ११३ व २३५ ) ध्वनिकारिकांतील तिसऱ्या उद्द्योतांतील ३० व ३९ या कारिका ध्वनिकार या मोघम नांवावर दिल्या आहेत. साहित्यदर्पणकार विश्वनाथानेंहि ध्वनिकारिकांपैकीं पहिली कारिका व दुसऱ्या उद्द्यो, तांतील १२ वी कारिका ध्वनिकार किंवा ध्वनिकृत् या नांवावर दिल्या असून 'नहि कवेरितिवृत्तमात्रनिर्वाहेण' इत्यादि वृत्ति ( ध्वन्या. पा. १५८ ) सुद्धां ध्वनिकाराची म्हणूनच दिली आहे याप्रमाणें त्यातल्यात्यांत जुन्या म्हणजे ध्वन्यालोकानंतर एक दोन शतकांतच होऊन गेलेल्या ग्रंथकारांचा ध्वनिकारिकाकार व वृत्तिकार यांच्या व्यक्तितादात्म्यासंबंधानें मतभेद दिसून येतो. पुढील ग्रंथांतील याविषयींचे उल्लेख देण्याचें कारणच नाहीं; कारण त्यांचे म्हणणें प्राचीन ग्रंथकारांच्या मानानें कमीच विश्वसनीय असणार.

याप्रमाणें एकीकडे मुकुलभट्ट व लोचनकार आणि दुसरीकडे प्रतीहारेन्दुराज, महिमभट्ट व क्षेमेन्द्र यांच्यामध्यें मतभेद दिसून येत असल्यामुळें ध्वनिकारिका व वृत्ति यांचा कर्ता एकच कीं भिन्न या प्रश्नाविषयीं निश्चित मत देणें कठीण झालें आहे. लोचनाच्या पूर्वी **चंद्रिका** नांवाची एक टीका ध्वन्यालोकावर झाली होती. ती व ध्वन्यालोकाचे सिद्धान्त खोडून काढणाऱ्या भट्टनायकाचा **हृदयदर्पण** हा ग्रन्थ

या दोहोंवरून प्रस्तुत प्रश्नावर अधिक प्रकाश पडण्याचा संभव आहे. पण अद्यापि हे दोन्ही ग्रंथ नांवानेंच प्रसिद्ध असून प्रत्यक्ष उपलब्ध झालेले नाहींत. पण त्यांच्या अभावी लोचनांतील (पा. १२३) एका स्थलाचा नीट अर्थ लाविल्यास कारिकाकार व वृत्तिकार हे भिन्न होते असा चंद्रिकाकाराचाहि अभिप्राय असल्याचें दिसून येईल. लोचनांतील हे स्थल पूर्वीं एकदां उद्धृत केलेंच आहे ('एतत्तावत्त्रिभेदत्वं न कारिकाकारेण' इ. वर पान १३३ येथे). एकंदर विचार करितां प्रस्तुत परिस्थितीत आमचें याविषयीं जरा भीत * भीतच झालेले मत असे आहे कीं, लोचनकाराचे

---

* आमचेच असे मत आहे असे नाही. प्रो. दे. (साहित्यशास्त्राचा इतिहास व्हाल्यूम १ पा. १०८–११५) यांनीही हेच मत प्रतिपादिलें आहे. अलिकडे प्रसिद्ध झालेल्या 'अभिनवभारती' या टीकेमुळें मात्र नवीनच अडचण उत्पन्न झाली आहे. ही टीका अभिनवगुप्तानें ध्वन्यालोकावरील टीका लिहिल्यानंतर लिहिली असे त्यानेंच अभिनवभारतीत (पा. ३४४ येथे) सांगितले आहे (स्वशब्दानाभिधेयत्वं हि रसादीनां ध्वनिकारादिभिर्दर्शितम्। तच्च मदीयादेव तद्विवरणात् सहृदयालोकलोचनादवधारणीयम्). ह्या अभिनवभारतींत (पा. २९५ येथे) 'तत एवोक्तं शृंगारी चेत्कविरित्यानन्दवर्धनाचार्येण' असें म्हटले आहे. हे शब्द ध्वन्यालोकवृत्तीत (२२२) आहेत. प्रो. शंकरन् यांनी आपल्या पुस्तकांत (The theories of Rasa and Dhvani) पा. ५१ येथे अजून न छापलेल्या अभिनवभारतींतील दोन उतारे दिले आहेत त्यांवरून अभिनवगुप्त आनन्दवर्धनालाच कारिकाकार समजत होता असे दिसतें. त्यापैकी एक उल्लेख असा आहे, "एतदेवोपजीव्यानन्दवर्धनाचार्येणोक्तं 'सुप्तिङ्वचनेत्यादि' ". सुप्तिङ्वचन ही ध्वन्यालोकांतील कारिका (३ १६) आहे या अभिनवभारतीतील दोन उल्लेखांवरून व आम्ही वर दिलेल्या कुन्तक, क्षेमेन्द्र इत्यादिकांच्या ग्रंथांवरून प्रो. शंकरन् यांनीं कारिकाकार व वृत्तिकार एकच होत असे ठरविलें आहे व लोचनांतिल त्या दोहोंतील केलेला फरक विचारांत घेऊं नये असें म्हटलें आहे. आमचें मत आहे कीं, अभिनवगुप्ताच्या दोन टीकांत परस्परविरोधी मतें आहेत तेव्हां लोचन लिहितांना जें त्यांचें मत होतें ते त्यानें पुढें अभिनवभारतीत लिहितांना बदलिलें. पण पहिलें मत खोटें कां हें तो कोठें सांगत नाहीं.

म्हणणें बरोबर असून प्रतीहारेन्दुराज, महिमभट्ट, क्षेमेन्द्र इत्यादि ग्रंथकारांनाच ध्वन्यालोकाच्या कर्तृत्वासंबंधानें खरा इतिहास अवगत नव्हता. सहृदय हें कारिकाकाराचें नांव किंवा पदवी असावी व आनंदवर्धन हा त्या कारिकाकाराचा शिष्य असून उभयतांचा अगदीं निकट संबंध असावा असें दिसतें. या त्यांच्या अतिनिकट संबंधामुळें लवकरच ध्वनिकारिका व वृत्ति यांच्या कर्तृत्वासंबंधानें घोटाळा उत्पन्न झाला असावा. ध्वन्यालोकांत या गुरुशिष्यांच्या निकट संबंधाच्या अस्पष्ट खुणा दिसून येतात. पहिल्याच कारिकेंतील 'सहृदयमनःप्रीतये' या शब्दावरील वृत्तींत 'रामायणमहाभारतप्रभृतिनि लक्ष्ये सर्वत्र प्रसिद्धव्यवहारं लक्षयतां **सहृदयानामानन्दो** मनसि लभतां प्रतिष्ठामिति प्रकाश्यते' असें त्याचे स्पष्टीकरण केलें आहे. यांत प्रीति शब्दाला आनंद असा पर्याय शब्द देऊन हर्ष किंवा प्रेम आणि वृत्तिकार आनंदवर्धन असा जो दुहेरी अर्थ साधिला आहे तो साभिप्राय दिसतो. तसें धरिल्यास 'सहृदयांच्या म्हणजे रसिकांच्या मनांत आनंदाला अर्थात् हर्षाला स्थैर्य मिळो' असा एक अर्थ व 'सहृदयांच्या म्हणजे आमच्या त्या नांवाच्या गुरूंच्या मनांत आनंदवर्धनाला म्हणजे या वृत्तिलेखकाला माननीय स्थान मिळो' असा दुसरा अर्थ त्या वृत्तिवाक्यांतून काढितां येईल. असाच प्रकार ध्वन्यालोकांतील वृत्तीच्या अंतिम श्लोकांतील 'सहृदयोदयलाभहेतोः' या शब्दाचाहि दिसतो. म्हणजे त्यांतून 'सहृदय म्हणजे रसिक पुरुष उत्पन्न होणे हा जो लाभ त्याच्यासाठीं' अथवा 'सहृदयनामक गुरूच्या कीर्तीची वृद्धि व्हावी यासाठीं' असा त्याचा दुहेरी अर्थ करितां येईल. **सहृदय** व त्याचा पर्याय **सचेतस्** हे दोन्ही शब्द कारिका, वृत्ति व लोचन यांत मिळून पांच पन्नास वेळां तरी आलेले आहेत. 'सहृदयमनःप्रीतये' (१. १), 'अर्थः सहृदयश्लाघ्यः' (१, २), 'तद्वत्सचेतसां सोर्थः' (१. १२), 'व्युत्पन्नानां सचेतसाम्' (२. १४), 'विधातव्या सहृदयैर्न तत्र ध्वनियोजना' (३. ४०) अशा कारिका आहेत. वृत्तींतहि हे शब्द पुष्कळच वेळां आलेले आहेत. ध्वन्यालोक पानें ३, ७, १०, १५, ३४, ५९, ८०, ८४, १३१, १५९, १६०, १८२, २३३, इत्यादि ठिकाणीं ('तस्य **सहृदय**जनमनःप्रकाशमानस्य,' 'न च तत्समयांतःपातिनः **सहृदयान्**कांश्चित्', 'तदलीक**सहृदय**त्वभावनामुकुलितलोचनैर्नृत्यते,' 'ध्वनेस्तत्त्वं गिरामगोचरं **सहृदय**हृदयसंवेद्यमेव,' '**सहृदय**लोचनामृतं तत्त्वान्तरं तद्वदेव सोर्थः', '**सहृदय**हृदयाल्हादकारि काव्यतत्त्वम्' इ.) तो आढळतो. लोचनकारानेंहि (ध्व. पानें ३,

७, ११, १२, २४, ४५, ५७, १०५, २११ इ.) तो अनेक वेळां योजिला आहे. ध्वन्यालोकांत (पा. १६०) सहृदयत्वाच्या अर्थाचा खल केलेला असून लोचनकारानें सहृदय म्हणजे ' येषां काव्यानुशीलनाभ्यासवशाद्विशदीभूते मनोमुकुरे वर्णनीयतन्मयीभवनयोग्यता ते हृदयसंवादभाजः सहृदयाः ' अशी व्याख्या एका ठिकाणीं दिली आहे (पा. ११) व दुसऱ्या ठिकाणीं (पा. ५७) ' हृदयसंवादापरपर्यायसहृदयत्वपरवशीकृततया ' असा तिचा अनुवाद केला आहे. लोचनकारानें (पा. १२) आनंदवर्धनासंबंधानें ' सहृदयचक्रवर्ती खल्वयं ग्रंथकृदिति भावः ' असा गौरवपर उल्लेख केलेलाहि लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ध्वन्यालोककाराने सहृदय या शब्दाचा यथास्थित वारंवार उपयोग करून रसमर्मज्ञतेच्या बाबतींत सहृदयालाच सर्वस्वीं प्रमाणत्व दिल्यामुळें कदाचित् ध्वनीच्या कल्पनेच्या पुरस्कर्त्या ध्वनिकारिकाकाराला **सहृदय** म्हणजे रसमर्मज्ञ अशी गुणोत्कर्षसूचक पदवी रसिक पंडितांनीं दिली असेल, असा या बाबतींत तर्क केल्यास तो अगदींच अयोग्य होईल असें नाहीं.

आनंदवर्धनाच्या पूर्वींच काव्यशास्त्रांतील ध्वनिकल्पनेचा उदय झालेला असावा असें म्हणण्याला आनंदवर्धनाच्या शब्दांतहि थोडें गमक मिळतें. त्यानें (पा. ९) पूर्वींच्या कोणा ग्रंथकाराचा ' यस्मिन्नस्ति न वस्तु किंचन ' इत्यादि जो श्लोक उद्धृत केला आहे त्यांत ' ज्यांत कांहीं अलंकार नाहींत, कांहीं वक्रोक्ति नाहीं असल्या काव्याला डौलानें ध्वनियुक्त काव्य म्हणणाऱ्या मूर्खाला ध्वनि म्हणजे काय असें कोणा शहाण्यानें विचारल्यास तो काय उत्तर देईल कोण जाणे ' अशी ध्वनीच्या कल्पनेची थट्टा केली आहे. हा श्लोक आनंदवर्धनाचा समकालीन असलेल्या मनोरथनामक कोणा ग्रंथकाराचा आहे असें अभिनवगुप्तानें लोचनांत म्हटलें आहे (' ग्रंथकृत्समानकालभाविना मनोरथनाम्ना कविना ' । पा. ८). राजतरंगिणीच्या चवथ्या तरंगांत मनोरथाचा उल्लेख आला आहे (श्लो. ४९७, ६७१, 'मानी मनोरथो मंत्री परं परिजहार तम् ।). सुभाषितावलींत कित्येक श्लोक (५१, ५८, ४४०) मनोरथाचे म्हणून दिले आहेत. काश्मीरच्या जयापीड राजाच्या राजवटींत उदयास आलेला मनोरथ हाच आनंदवर्धनाचा समकालीन मनोरथ असेल तर ध्वनिकारिकांची रचना इ. स. ८०० पासून ८२५ पर्यंत केव्हां तरी झाली असें म्हणावें लागेल. पण बहुधा हे मनोरथ भिन्नच असावे

किंवा आनंदवर्धनाला मनोरथाचा * समकालीन म्हणण्यांत लोचनकाराचा कांहीं वृथा समज झाला असावा असें वाटतें.

ध्वनिकारानें ध्वनिकल्पना पूर्वीचीच आहे असें ' काव्यस्यात्मा ध्वनिरिति बुधैर्यः समाम्नातपूर्वः ' असें पहिल्या श्लोकांत म्हटलें असून ध्वन्यालोकांत ' परम्परया यः समाम्नातः ' असा त्याचा अनुवाद केला आहे व त्याचे स्पष्टीकरण करितांना लोचनकारानें ' विनाऽपि विशिष्टपुस्तकेषु विवेचनादित्यभिप्रायः ' ( पा. ३ ) असें म्हणून ध्वनिकल्पनेचें उद्घाटन कोणत्याहि ग्रंथांत पद्धतशीर केलेलें नव्हतें असें सुचविलें आहे. ध्वन्यालोकांत ध्वनीची कल्पना व तद्विषयक परिभाषा वैयाकरणांच्या स्फोटाच्या कल्पनेवरून सुचलेली आहे असें म्हटलें असून ('प्रथमे हि विद्वांसो वैयाकरणाः । व्याकरणमूलत्वात्सर्वविद्यानाम् । ते च श्रूयमाणेषु वर्णेषु ध्वनिरिति व्यवहरन्ति । तथैवान्यैस्तन्मतानुसारिभिः सूरिभिः काव्यतत्त्वार्थ-दर्शिभिर्वाच्यवाचकसंमिश्रः शब्दात्मा काव्यमिति व्यपदेश्यो व्यञ्जकत्वसाम्याद्ध्वनि-रित्युक्तः । ' ( पा. ४७-४८ ), ' परिनिश्चितनिरपभ्रंशशब्दब्रह्मणां विपश्चितां मतमाश्रित्यैव प्रवृत्तोऽयं ध्वनिव्यवहार इति तैः सह किं विरोधाविरोधौ चिन्त्येते ।' ( पा. १९९ ) असा तद्विषयक उल्लेख दोन ठिकाणीं केलेला आहे. स्फोटाची कल्पना पाणिनीहूनहि प्राचीन दिसते, कारण ' अवङ्स्फोटायनस्य ' या सूत्रांत ( अष्टाध्यायी ६, १, १२३ ) पाणिनीनें स्फोटायन नामक पूर्व वैयाकरणाचा उल्लेख केलेला आहे. भर्तृहरीच्या वाक्यपदीयांत ( १,४४ पासून ) स्फोटविषयक सिद्धान्ताचें उद्घाटन सविस्तर केलें आहे. ' ध्वन्यालोक ' हा ग्रंथ लिहिण्याचा हेतु येन केन प्रकारेण दुसऱ्यांच्या मताचें खंडन करून ध्वनीचें अस्तित्व सिद्ध करावें असा नसून काव्याचें वास्तविक कार्य व त्याचा उद्देश म्हणजे व्यङ्ग्य होय व त्या व्यङ्ग्याला रसाचें स्वरूप येऊं शकतें असें दाखवावें हा आहे. तसेंच केवळ वृत्तकथन एवढाच जर एक उद्देश कवीचा असेल तर त्याच्या हातून अनौचित्याचे

---

*प्रो. दे यांच्या 'साहित्यशास्त्राचा इतिहास' या ग्रंथांत ( व्हा. १ पा. ११२-११३ ) याची चर्चा केली असून त्यांचेंहि मत आमचे सारखें दिसतें. मद्रास येथील ' जर्नल ऑफ ओरिएन्टल रिसर्च ' या त्रैमासिकांत ( व्हा. २ पान ४४-४८ ) थोडी कालाची ओढाताण करून ते एकच आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे.

अनेक दोष घडतील हेंहि दाखविण्याचा उद्देश हा ग्रंथ लिहिण्यांत आहे, असें ध्वन्यालोकांत सांगितलें आहे. आनंदवर्धन म्हणतो, ‘ अत एव चेतिवृत्तमात्रवर्णनप्राधान्येऽङ्गाङ्गिभावरहितरसभावनिबंधने च कवीनामेवंविधानि स्खलितानि भवन्ति रसादिरूपव्यङ्ग्यतात्पर्यमेवैषां युक्तमिति यत्नोऽस्माभिरारब्धो न ध्वनिप्रतिपादनमात्राभिनिवेशेन ’। ( पा. १६३ )

ध्वन्यालोकांत प्रतिपादिलेल्या विषयाची यथायोग्य कल्पना थोडक्यांत देणे दूरापास्त आहे. यास्तव त्यांची रूपरेखा मात्र येथे देतों. **उद्द्योत पहिला**-ध्वनीविषयीं निरनिराळ्या ग्रंथकारांचीं निरनिराळीं मतें आहेत. कांहीच्या मतें ध्वनि अशी वस्तुच कांहीं नाहीं. कांही जण त्याचा लक्षणा नांवाच्या शब्दशक्तीत अन्तर्भाव करितात. कित्येक म्हणतात की ध्वनीचे लक्षण करणे अशक्य असून, तो केवळ रसिकांना मनानेच जाणतां येण्यासारखा असल्यामुळें त्याचे वर्णन शब्दांनी करतां येण्यासारखें नाही. काव्यांत वाच्य म्हणजे स्पष्ट किंवा उघड आणि प्रतीयमान म्हणजे सूचित होणारा असे दोन अर्थ असतात. वाच्यार्थ हा अलंकाराच्या रूपाने दिसत असून सर्वांना अवगतच आहे. पण प्रतीयमान किंवा सूचित अर्थ हा कांही वेगळाच असून तो एकंदर वाक्यांतून निघत असतो. एखाद्या सुंदर स्त्रीचे सौदर्य तिच्या हस्तपादादि पृथक् अवयवांत आहे असे म्हणतां येत नाहीं, तर ते सर्व मिळून स्वतंत्रपणेच प्रत्ययाला येतें. तसाच प्रकार प्रतीयमान अर्थाचा आहे. हा प्रतीयमान अर्थ वस्तु, अलंकार आणि रस असा तीन प्रकारचा असून त्या प्रत्येक प्रकाराचे आणखी उपप्रकारहि आहेत. केवळ व्याकरण व कोश यांच्या अभ्यासाने प्रतीयमान अर्थाची जाणीव होण्यासारखी नाहीं; काव्यतत्त्व जाणणाऱ्यांनाच त्याची ओळख पटूं शकते. काव्यांत व्यङ्ग्य अर्थच जेव्हां प्रधान असतो, तेव्हां त्या काव्याला ध्वनिकाव्य म्हणतात. समासोक्ति, आक्षेप, पर्यायोक्त इत्यादि अलंकारांत प्रतीयमान अर्थ असतो, पण त्यांत वाच्यार्थाचें प्राबल्य असल्यामुळे त्यांना ध्वनि म्हणतां येत नाही. **अविवक्षितवाच्य** आणि **विवक्षितान्यपरवाच्य** असे ध्वनीचे दोन प्रकार आहेत. अविवक्षितवाच्य म्हणजे ज्यांत वाच्य अर्थ हा विवक्षित म्हणजे उद्दिष्ट नाहीं किंवा जशाचा तसा घ्यावयाचा नसतो तो व विवक्षितान्यपरवाच्य म्हणजे ज्यांत वाच्य अर्थ विवक्षित असून आणखी दुसराहि अर्थ सूचित असतो तो. ध्वनि हा भक्ति किंवा लक्षणा या शब्दशक्तीहून भिन्न आहे व त्याची व्याख्या करितां येत नाहीं असेंहि नाहीं. ध्वनीचें

लक्षण करितां येऊन त्याचीं उदाहरणेंहि देतां येतात. **उद्द्योत दुसरा**–अविवक्षितवाच्यनामक ध्वनिभेदाचे **अर्थान्तरसंक्रमित** आणि **अत्यन्ततिरस्कृतवाच्य** असे दोन पोटभेद करितां येतात. 'तदा जायन्ते गुणा यदा ते सहृदयैर्गृह्यन्ते । रविकिरणानुगृहीतानि भवन्ति कमलानि कमलानि '॥ हें अर्थान्तरसंक्रमिताचें उदाहरण असून 'रविसंक्रान्तसौभाग्यस्तुषारावृतमंडलः । निश्वासान्ध इवादर्शश्चन्द्रमा न प्रकाशते '॥ ह्यांतील 'अन्ध' हा शब्द अत्यन्ततिरस्कृतवाच्याचे उदाहरण होय. गुणाचें कौतुक रसिकांनीं केलें म्हणजे गुणांनां गुणत्व येतें या म्हणण्याच्या समर्थनार्थ रविकिरणांमुळें प्रफुल्लित झालेल्या कमलांनाच कमलत्व येतें असे म्हणतांना दुसऱ्या कमल शब्दावरून सौंदर्य, सुवास आदिकरून गुणसमुच्चयाचा बोध प्राधान्ये करून होतो, पण कमल हा सामान्य अर्थ अगदींच डोळ्यापुढून जात नाही म्हणून हे अर्थान्तरसंक्रमिताचे उदाहरण होय. हेमन्त ऋतूंतील चंद्राचे वर्णन करिताना त्याने आपलें सौभाग्य सूर्याला दिले व त्याचें स्वतःचे बिंब तुषारांनीं झांकून गेलें, त्यामुळे तोंडाची वाफ सोडिल्यानें अंध झालेल्या आरशाप्रमाणें तो प्रकाशरहित झाला आहे असें जे म्हटलें आहे त्यांत अध हा शब्द अत्यन्ततिरस्कृतवाच्य असा आहे. अंध याचा सरळ अर्थ ज्याला दिसत नाही तो. पण आरसा हा निर्जीव असल्यामुळें त्याला या अर्थानें तो मुळीच लावितां येत नाही व त्यावरून मलिन झालेला असा अर्थ बोधित होतो, म्हणजे वाच्य अर्थाचा उद्दिष्ट अर्थानं सर्वथा लोप केलेला असल्यामुळे हें अत्यन्ततिरस्कृतवाच्याचं उदाहरण होय. विवक्षितान्यपरवाच्य या पोटभेदाचे आणखीअसंलक्ष्यक्रमव्यङ्ग्य आणि **संलक्ष्यक्रमव्यङ्ग्य** असे उपप्रकार होतात. रस, भाव, रसाभास, भावाभास व भावप्रशम यांच्या योगाने असंलक्ष्यक्रमव्यङ्ग्याची सिद्धि होते. या प्रकारामध्ये रसभावादिकांचे प्राधान्य असतें; पण जेव्हां हे रस, भाव इत्यादिक गौण पद पावतात आणि एकंदर वाक्याचा प्रधान अर्थ त्यांच्याहून निराळा असतो तेव्हां रसवत् भाव इत्यादि अलंकार सिद्ध होतात असें ध्वनिकाराचें मत आहे. उपमादि अलंकार व माधुर्यादि गुण यांच्यांत भेद आहे. रस, भाव इत्यादि स्वरूपांतील तात्पर्यात्मक अर्थाच्या आधारानें असणारे ते गुण व वाच्य अर्थ व त्याचे वाचक शब्द या अंगांच्या आश्रयानें असणारे ते अलंकार होत. माधुर्य हा रस शृङ्गाराच्या आश्रयानें दिसणारा असून विप्रलम्भ शृङ्गार व करुण यांत माधुर्याचें आर्द्रतेंत रूपान्तर होतें. ओजस् हा गुण रौद्र आदिकरून रसाला

धरून असतो, व प्रसाद गुण सर्वच रसांना अवश्य आहे. अलंकारांपैकीं अनुप्रास आणि यमक हे शृङ्गार रसांत अनिष्ट होत, विशेषत विप्रलंभ शृंगारांत ते अगदींच अनर्थक होतलि. रूपक व पर्यायोक्त हे अलंकार हे शृङ्गाररसाच्या परितोषाला साहाय्यक व अनुकूल होतात अशीं उदाहरणें; विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीचा दुसरा पोट प्रकार जो संलक्ष्यक्रमव्यङ्ग्य तोहि शब्दशक्तिमूल व अर्थशक्तिमूल असा द्विविध आहे. त्यांतील शब्दशक्तिमूल हा प्रकार शब्दशक्तीमुळें जेव्हां अलंकार स्पष्ट न करितां सूचित केलेला असतो तेव्हां घडतो. श्लेषालंकारापासून हा ध्वनिप्रकार भिन्न आहे. कारण श्लेषांत शब्दांचे दोन्ही अर्थ वाच्य अर्थच असतात. अर्थशक्तिमूल ध्वनि हा स्पष्ट वर्णन नसतांना अर्थाच्या शक्तीमुळें जेव्हां दुसरी वस्तु व्यक्त होते तेव्हां घडतो. याचें उदाहरण 'एवंवादिनि देवर्षौ पार्श्वे पितुरधोमुखी । लीलाकमलपत्राणि गणयामास पार्वती ' । ( कुमारसं. ६.८४ ) हें होय. यांत कमलाचीं पानें मोजण्याच्या वर्णनावरून पार्वतीच्या मनांत उत्पन्न झालेला लज्जा हा शृंगाराचा व्यभिचारिभाव सूचित झालेला आहे. हा अर्थशक्तिमूल प्रकार असंलक्ष्यक्रमव्यङ्ग्य ध्वनीहून निराळा आहे. कारण असंलक्ष्यक्रमव्यङ्ग्य प्रकारांत विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव यांच्या स्पष्ट निर्देशानें रसोत्पत्ति होते व शब्दशक्तिमूल ध्वनींत हे भावादिक सूचित झालेले असतात. अर्थशक्तिमूल ध्वनीचेहि आणखी **वस्तु** आणि **अलंकार** असे उपभेद असून वस्तूचे **प्रौढोक्तिनिष्पन्न व स्वतःसम्भवी** असे उपोपभेद आहेत. ( विस्तार भयास्तव या सर्व भेदांची उदाहरणें व त्यांचें स्पष्टीकरण हीं येथें दिलीं नाहींत.) **उद्द्योत तिसरा**—दुसऱ्या उद्द्योतांत ध्वनीचे वर्गीकरण व्यङ्ग्य अर्थाला अनुलक्षून केलें होतें. या उद्द्योतांत तेंच व्यञ्जकाला अनुलक्षून केले आहे. त्यांतील अविवक्षितवाच्याच्या दोन्ही पोटभेदांचे पदप्रकाश्य व वाक्यप्रकाश्य असे प्रतिपोटभेद असून मेघदूतांतील ' कः सन्नद्धे विरहविधुरां त्वय्युपेक्षेत जायां ' हें पदप्रकाश्याचें व 'या निशा सर्व भूतानां ' इत्यादि वाक्यप्रकाश्याचें उदाहरण होय. विवक्षितान्यपरवाच्य ध्वनीच्या संलक्ष्यक्रमव्यङ्ग्य नामक भेदांतहि हेच दोन पोटभेद आहेत. असंलक्ष्यक्रमव्यङ्ग्याचा परिपोष वर्ण, पद, वाक्य, संघटना व प्रबंध यांच्या योगानें होतो. वर्ण म्हणजे मृदु कठोरादि अक्षरें; पद म्हणजे शब्द. संघटना म्हणजे शब्दरचना, ही तीन प्रकारची आहे; असमासा, मध्यसमासा व दीर्घसमासा. संघटना गुणांचा आश्रय करून

रस, भाव इत्यादि व्यक्त करिते. ती वक्ता, अर्थ, विषय, रस यांना अनुरूप असावी. तशी ती असेल तरच रसोत्पत्ति होऊन ती टिकून रहाते. निरनिराळे अलंकार निरनिराळ्या रसांना पोषक होतात. अतिशयोक्ति सामान्यतः सर्व रसांना अनुकूल असते. काव्याच्या वस्तूचा म्हणजे कथानकाचा रसाशीं संबंध असतो. रसपरिपोषाला विरोधी असा कथाभाग टाळावा. कथानक जुन्या इतिहासादिक प्रसिद्ध ग्रंथांतून घेतलें असलें तरी त्यांतहि इष्ट रसाला अनुकूल असे प्रसंग कालिदासानें घातल्याप्रमाणें घालावे. असंलक्ष्यक्रमव्यङ्गय ध्वनि विशिष्ट विभक्ति-प्रत्यय, क्रियापदप्रत्यय, कृत्तद्धितप्रत्यय, समास इत्यादिकांच्या योगानेंहि व्यक्त होऊं शकतो. ' न्यक्कारो ह्ययमेव मे यदरयः ' इत्यादि श्लोकांत या सर्वांची उदाहरणें आहेत. रसपरिपोषाला विरोधी अशा कांहीं गोष्टी असतात. उदाहरणार्थ, एका रसाचा परिपोष चालला असतां दुसऱ्या रसाचे भाव, अनुभाव इत्यादि मध्येंच आणणें. शांत ( भक्ति ) रसांत शृंगाराचे भाव आणण्यानें रसहानि होते. प्रस्तुत रसाशीं संबद्ध नसलेल्या गोष्टीचें लांबलचक वर्णन करणें, रसपरिपोष चालला असतां मध्येंच वर्णनाला खंड पाडणें, किंवा एकदमच त्याची शेवटची पायरी गांठणें, एकदां रसपरिपोष झाला असतां त्याचीच पुनरुक्ति करणें, अनुचित वृत्तीचा स्वीकार, इत्यादि गोष्टींहि रसहानिकारक असल्यामुळें त्या टाळाव्या. काव्यांत एकच रस प्रामुख्यानें असून इतर गौण असावे. वाच्यार्थ आणि गम्यार्थ असे अर्थाचे दोन भिन्न प्रकार आहेत. गुणवृत्ति हीं व्यङ्गयार्थाहून भिन्न आहे. व्यंग्यव्यञ्जकभाव म्हणजे अनुमान नव्हे. व्यङ्गय अर्थापेक्षां वाच्यार्थच ज्यांत रमणीय असतो असा दुसरा काव्य प्रकार आहे, त्याला गुणीभूतव्यङ्गय असें म्हणतात. ' लावण्यसिन्धुरपरैव हि केयमत्र ' इत्यादि श्लोक त्याचें उदाहरण होय. काव्याचा तिसरा प्रकार म्हणजे चित्रकाव्य होय. त्याचे शब्दचित्र व वाच्यचित्र असे दोन भेद आहेत. यमकादि शब्दालंकारांनीं शब्दचित्र होतें व उत्प्रेक्षाद्यलंकारांनीं वाच्यचित्र होतें. व्यङ्गय अर्थ व्यक्त करण्याचा किंवा रसपरिपोष करण्याचा कवीचा उद्देश नसेल तर चित्रकाव्याची निष्पत्ति होते. काव्याच्या या तीन भेदांच्या मिश्रणानें आणखी पुष्कळ पोटभेद होतात. ध्वनिदृष्टीनें काव्य-तत्त्वाचें प्रतिपादन करण्याची ज्यांना शक्ति नाहीं अशांनीं वैदर्भी, गौडी, पाञ्चाली या रीतींचें प्रतिपादन केलें आहे. हें रीतिप्रतिपादन ध्वनीची अर्धवट कल्पना त्यांना आली होती याचेंच द्योतक होय. उपनागरिकादि वृत्तींचाहि असाच प्रकार

असून रीति व वृत्ति या दोन्ही ध्वनिरूप काव्यलक्षणाचें यथोचित ज्ञान झाल्यास आपोआपच ज्ञात होतात. **चवथा उद्द्योत**—कवींच्या प्रतिभेला ध्वनीच्या व गुणीभूतव्यङ्ग्याच्या मार्गाने संचार करण्यास मोकळा अवसर मिळतो. एका कवीनें एका प्रकारें वर्णिलेला विषय दुसऱ्या प्रतिभाशाली कवीनें निराळ्या रीतीनें वर्णिल्यास नवा वाटतो. कवीनें एका काव्यांत एकाच रसावर मुख्यत्वें भर द्यावा. उदाहरणार्थ रामायणांत करुणरस प्रधान आहे व शास्त्र आणि काव्य या दोन्ही स्वरूपांनीं युक्त असलेल्या महाभारतांत शांतरसाचें प्राधान्य कवीला अभिप्रेत आहे. काव्याचा प्रान्त आजवर पुष्कळांनीं आक्रमिला असला तरी तो अनन्त आहे हें उपरोक्त विवेचनावरून दिसून येईल. रस, भाव, रसाभास, भावाभास, रसशान्ति इत्यादि रूपांनी काव्ये अनन्त होऊं शकतील व पूर्वीं वर्णिलेले विषयहि विविध रसादिकांमुळें नवे नवे भासतात यांची अनेक उदाहरणें आहेत. पण कवीला प्रतिभा मात्र पाहिजे. भिन्नकालीन व भिन्नदेशीय प्रतिभाशाली कवींच्या काव्यांत कांहीं सादृश्यहि असू शकेल. हें सादृश्य बिंबप्रतिबिंबभावरूप, वस्तुचित्रसंबंधरूप किंवा दोन मनुष्यांच्या शरीरांतील सादृश्यासारखें असेल. पहिला प्रकार चांगल्या कवीनें टाळावा, दुसराहि टाळण्याचा प्रयत्न केल्यास बरें, पण तिसरा प्रकार टाळण्याचें मुळींच कारण नाही. तो रमणीयच होय.

ध्वन्यालोकांत रामायण व महाभारताचे उल्लेख अनेक ठिकाणीं आहेत. उद्द्योत १ कारिका ५ मध्यें आदिकवीचा म्हणजे वाल्मीकीचा उल्लेख करून ' शोकः श्लोकत्वमागतः ' हे शब्दहि बालकाण्डांतून ( स. २. ४० ) घेतले आहेत व त्यांतील ' मा निषाद प्रतिष्ठां त्वम् ' इत्यादि प्रसिद्ध श्लोकहि वृत्तींत दिला आहे. ' इदानीमलक्ष्यक्रमव्यङ्ग्यो ध्वनिः प्रबन्धात्मा रामायणमहाभारतादौ प्रकाशमानः प्रसिद्ध एव' ( उ ३, का. ९ वरील वृत्ति ), 'यथा च गृध्रगोमायुसंवादादौ महाभारते संग्रामादयः पुनः पुनरभिहिता अपि नवनवाः प्रकाशन्ते ' ( ४,५ ) या ठिकाणीं त्यांतील विषयांचा सामान्य किंवा विशिष्ट निर्देश केला आहे. महाभारतांतील अनुक्रमणिकाध्याय ( ' सोनुक्रमण्यां सर्व एवानुक्रान्तः । ' इ. ) व गीता ( 'मोक्षस्य च भगवत्प्राप्त्युपायत्वेन मुख्यतया गीतादिषु प्रदर्शितत्वात् ') यांतूनहि अवतरणें घेतलेलीं आहेत. याशिवाय त्यांत पुढील ग्रंथ व ग्रंथकारांचीं नांवें आढळतात:—आनन्दवर्धनाचें स्वतःचें अर्जुनचरितनामक

काव्य ( पा. १४८, १७६ ), अमरुक, उद्भट ( पा. ९६, १०८ ), कादम्बरी, हर्षचरित, कालिदास, तापसवत्सराजनामक नाटक ( पा. १५१ ), धर्मकीर्ति, नागानन्द, बाणभट्ट, भरत ( पा. १४६, १६३, १८१ ), भामह ( पा. ३९, २०७ ), मधुमथनविजय ( पा. १५२ ), रत्नावली ( १५० ), रामाभ्युदय ( १३३ ), आनंदवर्धनकृत प्राकृत **विषमबाणलीला** ( पा. ६२, १५२, २४१ ), वेणीसंहार, हरिविजय नांवाच्या प्राकृत काव्याचा कर्ता सर्वसेन ( पा. १४८ ), सातवाहन ( ' ननु नागलोकगमनादयः सातवाहनप्रभृतीनां श्रूयन्ते '। पा. १४५ ), सेतुकाव्य ( ८७ ), हरिविजय ( १२७, १४८ ), हरिवंश ( ' अयं च निगूढरमणीयोर्थो महाभारतावसाने हरिवंशवर्णनेन समाप्तिं विदधता तेनैव कविवेधसा कृष्णद्वैपायनेन सम्यक्स्फुटीकृतः ' । पा. २३९ ). ध्वन्यालोकांत गाथासप्तशती, मनोरथ, शाकुन्तल मेघदूतादि कालिदासाचे ग्रंथ, शिशुपालवध, सूर्यशतक, कादम्बरी, हर्षचरित, इत्यादिकांतलि उतारे घेतलेले असून आनंदवर्धनानें स्वतःचीं संस्कृत प्राकृत पद्येहि उदाहरणासाठीं अनेकवार उद्धृत केली आहेत. ' यथा ममैव ' असें म्हणून ' श्लाघ्याशेषतनुं सुदर्शनकरः ' इ. ( पा. ९६ ), 'सर्वैकशरणमक्षयमधीशमीशम्' इत्यादि ( पा. १०१ ), 'लावण्यकान्तिपरिपूरित ' इ. ( पा. ११० ), ' अमी ये दृश्यन्ते ' इ. ( पा. २१८ ), 'या व्यापारवती' ( पा. २२७ ), ' वहुमम इन्ति भणिन्तऊ' ( मममम इति भणतो ) इत्यादि प्राकृत पद्य ( पा. २४३ ) अशीं दिलीं असून, कांही ठिकाणीं ' परिकर श्लोकश्चात्र ' किंवा ' इति परिकरश्लोकाः ' असें म्हणून कांहीं श्लोक दिले आहेत ( पा. १२९, १३७, १४७, १६३ ). या परिकरश्लोकांत वृत्तींत केलेलें स्पष्टीकरण थोडक्यांत दिलेलें असतें. परिकर याचा अर्थ लोचनकारानें ' परिकरार्थं कारिकार्थस्याधिकावापं कर्तुं श्लोकः परिकरश्लोकः ' ( पा. ३४ ) असा केला आहे. कारिकेंतील अर्थ थोडा अधिक विस्तार करून स्पष्ट करणारा श्लोक म्हणजे परिकरश्लोक. परिकराचा हा अर्थ ' व्याकरणस्य शरीरं परिनिष्ठितशास्त्रकार्यमेतावत् । शिष्टः परिकरबंधः क्रियतेस्य ग्रंथकारेण ' या वचनांतहि दिसून येतो ( काशिकावृत्तीच्या हस्तलिखित प्रतीविषयीं डॉ. पीटरसनचा अभिप्राय, रॉ. ए. सो. मुंबई शाखा ग्रंथ १६ अधिकांक पा. ३१ ). आनंदवर्धनानें पा. २२१ वर ' तदिदमुक्तम् ' असें म्हणून दोन पद्यें उद्धृत केलीं असून तीं आनन्दवर्धनाचींच होत असें लोचनकारानें ' मयैवेत्यर्थः ' या शब्दांनीं दर्शविलें आहे.

तसेंच ( पा. २३३ ) आणखी एक पद्य ' तदिदमुक्तम् ' असें म्हणून दिलें आहे व तें काव्यमालेंत जाड्या अक्षरांनीं छापून कारिकारूप होय असें दाखविलें आहे. पण तें चूक आहे. कारण त्यावरहि ' उक्तमिति संग्रहार्थं मयैवेत्यर्थः ' अशी लोचनकाराची टीप असल्यामुळें तें आनंदवर्धनाचें स्वतःचेंच असून कारिकांपैकीं नव्हे. पा. २२२ वर ' अपारे काव्यसंसारे कविरेव प्रजापतिः ' व ' शृंगारी चेत्कविः काव्ये जातं रसमयं जगत् ' इत्यादि सुप्रसिद्ध पद्यें ' तथा चेदमुच्यते ' या अवतरणसूचक शब्दांनी उद्धृत केलेलीं आहेत. पण तीं आनंदवर्धनाचीं स्वतःचीं आहेत असें येथे लोचनकार कांही सांगत नाहीं. * पान २२२ वर 'तदयमत्र संग्रहः' असे म्हणून ' यस्मिन्रसो वा भावो वा ' व 'काव्याद्ध्वनिर्ध्वनेर्व्यङ्ग्यं ' इत्यादि दोन पद्यें दिलीं आहेत, त्यांत पूर्वीं केलेल्या विवेचनाचें सार आलें आहे.

आनंदवर्धनाचा काल बऱ्याच निश्चितपणें ठरवितां येतो. राजतरंगिणीत ( ५, ३४ ) ' मुक्ताकणः शिवस्वामी कविरानन्दवर्धनः । प्रथां रत्नाकरश्चागात्साम्राज्येऽवन्तिवर्मणः ॥' असा त्याचा उल्लेख केलेला असून त्यावरून आनंदवर्धन हा काश्मीरच्या अवन्तिवर्मा नांवाच्या राजाच्या राजवटीत उदयास आला असें समजून येतें. या अवन्तिवर्म्याचा काळ इ. स. ८५५ पासून ८८३ असा ठरतो. हा काळ अवान्तर प्रमाणांवरून ठरणाऱ्या काळाशीं जुळता आहे. आनंदवर्धनाने उद्भटाच्या ग्रंथातील अवतरणें घेतलीं असल्यामुळें तो उद्भटाच्या मागूनचा म्हणजे इ. स. ८०० नंतरचा असला पाहिजे व राजशेखरानें काव्यमीमांसेत ध्वन्यालोकांतील अवतरणें घेतली असल्यामुळें तो राजशेखराच्या पूर्वीचा उघडच ठरतो. राजशेखराचा काळ इ. स. ९०० च्या सुमाराचा आहे हें पुढे दाखविण्यांत येईल. तात्पर्य आनंवदर्धनाचा प्रसिद्धिकाल इ. स. ८४० पासून ८७० पर्यंत धरावयास हरकत नाहीं. जयंतभट्टाच्या न्यायमञ्जरी या ग्रंथांत ध्वन्यालोककर्त्तीतील " स च कदाचिद्वाच्ये विधिरूपे प्रतिषेधरूपः यथा ' भम धम्मिअ वीसत्थो० ' " ( पान १६ ) या शब्दांची थट्टा केलेली आहे. 'यमन्यं पंडितंमन्यः प्रपेदे कंचन ध्वनिम् । विधेर्निषेधावगतिर्विधिबुद्धिर्निषेधतः । यथा भम धम्मिअ

---

* परंतु वरतीं ( पान १२० येथे ) दाखविल्याप्रमाणें अभिनवभारतींत ' शृंगारी चेत् ' हेंच पद्य आनंदवर्धनाचेच आहे असे सांगितलें आहे.

वसित्थो मास्म पान्थ गृहं विश । मानान्तरपरिच्छेद्यवस्तुरूपोपदेशिनाम् । शब्दानामेव सामर्थ्यं तत्र तत्र तथा तथा । अथवा नेदृशी चर्चा कविभिः सह शोभते । ' ( विजयानगर प्रत पान ४८ ). जयंतभट्ट हा इ. स. ९०० च्या सुमारासच झाला.

राजतरंगिणींतील उपरोक्त श्लोकांत जे दुसरे ग्रंथकार सांगितले आहेत, त्यांतील रत्नाकर हा हरविजय नामक महाकाव्याचा कर्ता असून त्यानें तें काव्य बाल बृहस्पतीच्या राजवटीत लिहिल्याचें स्वतःच सांगितलें आहे. शिवस्वामी हा देखील कवि असून त्याचे कित्येक श्लोक सुभाषितावलीत उद्धृत केलेले आहेत. मनोरथ हा आनदवर्धनाचा समकालीन कवि असल्याविषयींचें लोचनकाराचे मत पूर्वी दिलें आहेच. अर्जुनचरित, ध्वन्यालोक व विषमबाणलीला* यांशिवाय आनंदवर्धनाचे आणखीहि ग्रंथ आहेत ध्वन्यालोकानंतर त्याने धर्मकीर्ति या बौद्ध ग्रंथकाराच्या **प्रमाणविनिश्चय** या ग्रंथावर धर्मोत्तमा नांवाची टीका लिहिलेली दिसते. ध्वन्यालोकांत त्यानें ' यत्त्वनिर्देश्यं सर्वलक्षणविषये बौद्धानां प्रसिद्धं तत्तन्मतपरीक्षायां ग्रंथान्तरे निरूपयिष्यामः । ' ( ध्व. पा. २३३ ) असा त्या टीकेचा उल्लेख केला असून त्यावर लोचनकारानें ' विनिश्चयटीकायां धर्मोत्तमायां या विवृत्तिरमुना ग्रंथकृता कृता तत्रैव तद्व्याख्यातम् ' असें स्पष्टीकरण केलें आहे. देवीशतक नांवाचे त्यानें केलेलें स्तोत्रहि आहे व त्यांत यमक, भाषाश्लेष ( म्हणजे अक्षरें तींच पण संस्कृत, मागधी, शौरसेनी इत्यादि निरनिराळ्या भाषांनुसार अर्थ निराळा होईल अशीं पद्यें ), गोमूत्रिका व इतर चित्रबंध यांची रेलचेल केली आहे.

---

* विषमबाणलीला हा ग्रंथ प्राकृतांत असून व्यंग्यार्थाच्या अपेक्षेशिवायही शुद्ध वाच्यार्थ अवस्थाभेद, देशभेद, कालभेद यांमुळे अनंत प्रकाराने रमणीय स्वरूपांत कवींना वर्णितां येतो व तशा प्रकारचें वर्णन पुनरुक्तिदोषरहित व नवीन नवीन चमत्कृतींनी युक्त असें होतें हें या ग्रंथांत दाखविलें आहे असें ध्वन्यालोकांत ( पान २४१ ) सांगितलें असून त्यांतील एक आर्या उदाहरणार्थ उद्धृत केली आहे ' ण अ ताण घडइ ओही ण ते दीसंति कह वि पुनरुत्ता । जे विब्भमा पिआणं अत्था वा सुकविवाणीणम् ॥' ( न च तेषां घटतेऽवधिर्न ते दृश्यन्ते कथमपि पुनरुक्ताः । ये विभ्रमाः प्रियाणां अर्था वा सुकविवाणीनाम् ). ही आर्या वल्लभदेवानें शिशुपालवधावरील टीकेंत ( २. ७२ ) उद्धृत केली आहे.

त्यांतील १०१ या पद्यावरून त्याच्या पित्याचें नांव नोण होते व आनंदवर्धनानें हे स्तोत्र विषमबाणलीला व अर्जुनचरित या ग्रंथानंतर लिहिलें असें दिसतें; ‘ येनानन्दकथायां त्रिदशानन्दे च लालिता वाणी । तेन सुदुष्करमेतत्स्तोत्रं देव्याः कृतं भक्त्या ’ ॥ असें त्यानें म्हटले आहे. देवीशतकावर कय्यटाची टीका आहे. कय्यट हा चंद्रादित्याचा पुत्र व वल्लभदेवाचा नातू असून त्यानें ती टीका गतकलि ४०७८ म्हणजे इ. स. ९७७ या वर्षी भीमगुप्त राजाच्या राजवटींत लिहिली. या शिवाय आनंदवर्धनाचा तत्त्वालोक नांवाचा आणखी एक ग्रंथ असावा असें दिसतें. काव्यमालेंत छापिलेल्या ध्वन्यालोकांत लोचनटीका तीन उद्योतांवरच आहे, पण कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या वाङ्मयवृत्तांत ( क्रमांक ९ ) मध्यें ( Journal of the Department of Letters No. IX ) डॉ. सुशीलकुमार दे यांनीं चवथ्या उद्द्योतावरील लोचन टीकाहि मद्रास येथें मिळालेल्या दोन हस्तलिखितांवरून तयार करून छापिली आहे. तींत तत्त्वालोकाचा उल्लेख असून, ध्वन्यालोकांत ( पा. २४३ ) ‘ वहुमह इन्ति भणिन्तउ ’ इत्यादि जें पद्य आहे तें आनंदवर्धनाचेंच असून सैंधवभाषेंतील म्हणजे जुन्या सिंधी भाषेंतील आहे असें म्हटले आहे. तत्त्वालोकांत शास्त्रनय व काव्यनय यांमधील संबंधाची चर्चा केली आहे असेंहि त्या टीकेत सांगितलें आहे.

ध्वन्यालोकावरील लोचननामक ज्या टीकेचा वर वारंवार निर्देश केला आहे ती अभिनवगुप्त नांवाच्या महाविद्वान् काश्मीरी पंडिताची आहे. त्या टीकेला हस्तलिखितांत **सहृदयालोकलोचन**, **ध्वन्या**लोकलोचन, काव्यालोकलोचन अशी भिन्न भिन्न रूपांचीं नावें दिलेली आढळतात. या टीकेला कित्येक जण **आलोचन** असें म्हणतात, पण तें चूक असून लोचन हेंच तिचें नांव होय. पहिल्या व तिसऱ्या उद्योताच्या शेवटीं ‘ किं **लोचनं विनालोको** भाति चंद्रिकयापि हि । तेनाभिनवगुप्तोऽत्र लोचनोन्मीलनं व्यधात् ’ ॥ असें पद्य आलें असून विश्वनाथ आदिकरून पुढील ग्रंथकार अभिनवगुप्ताला लोचनकार या नांवानेच उल्लेखितात. अभिनवगुप्ताची ही टीका साहित्यशास्त्राच्या इतिहासांत फार महत्वाची असून व्याकरणशास्त्रांत जें पतंजलीच्या महाभाष्याला किंवा वेदान्तशास्त्रांत जें शांकरभाष्याला स्थान आहे, तेंच लोचनाला साहित्यशास्त्रांत दिलें पाहिजे. अभिनवगुप्त हा गाढ तत्त्वज्ञ, अत्यंत मार्मिक चिकित्सक व मोठा कवि

होता. त्याची ही टीका मूल ध्वन्यालोकापेक्षांहि विद्वत्तापूर्ण व त्यामुळें आकलन करण्यास कठीण अशी कित्येक स्थळीं झाली आहे. त्यानें कारिका व वृत्ति यांतील पाठभेदांचीहि चर्चा केली आहे. उदाहरण, उद्योतकारिका ५१ येथें 'इत्युक्तलक्षणो यो' याठिकाणीं 'इत्युक्तलक्षणोऽयं' असा दुसरा पाठ असल्याचें त्यानें सांगितलें आहे. ध्वन्यालोकांत निर्दिष्ट केलेल्या ग्रंथांशिवाय व ग्रंथकारांशिवाय, लोचनांत आणखीहि कित्येक ग्रंथ व ग्रंथकार यांचीं नांवें आलीं असून त्यांत पुढील नांवें आढळतात:—इन्दुराज (अनेक ठिकाणीं), उत्पल (पा. ३०), भट्टजयन्तकृत कादम्बरीकथासार (१४२), भट्टतौतकृत काव्यकौतुक (१७८), कुमारिलभट्ट (१८८), चंद्रिकाकार (१७८), तन्त्रालोक (१९), तापसवत्सराज (१५०–१५१ यांत त्या नाटकाच्या सहाहि अंकांची रूपरेखा दिली आहे), भट्टतौत (२९), दण्डी (१४१), प्रभाकर-दर्शन (१८८), वाक्यपदीयाचा कर्ता भर्तृहरि (४७), भागुरि (१७५), मनोरथ, विवरणकृत् (४०), रामाभ्युदयाचा कर्ता यशोवर्म (१४८), वत्स-राजचरित (१६२), वामन (८, १०, १८०), स्वप्नवासवदत्ता नाटक (१५२), हृदयदर्पण (२७, २८, ६३). उदाहरणाठीं त्यानें स्वतःचे श्लोकहि वारंवार उद्धृत केले आहेत (पा. ३६, ४०, ४३, ७५, ९४, ११७, १७९). त्यांतील कित्येक (पा. ७५, १७९) त्याच्या एका स्तोत्रांतील होत (ममैव स्तोत्रे) असें त्यानें म्हटलें आहे. भट्टतौत हा त्याचा गुरु असुन त्याच्या काव्य-कौतुक नांवाच्या ग्रंथावर अभिनवगुप्तानें विवरण नांवाची टीका लिहिली आहे (पा. १७८). तंत्रालोक नांवाचा ग्रंथ लिहिल्यानंतर त्यानें ही ध्वन्यालोकावरील लोचन टीका लिहिली असें त्याच्या 'तदुत्तीर्णत्वे तु सर्व परमेश्वराद्वयं ब्रह्मेत्यस्म-च्छास्त्रानुसरणेन विदितं तन्त्रालोकग्रथं विचारयतेत्यास्ताम्।' (पा. १९) या वाक्यावरून समजून येतें. त्यानें केलेल्या नाट्यशास्त्रावरील 'अभिनवभारती' या विस्तृत व अत्यंत विद्वत्तापूर्ण टीकेचा वरती उल्लेख केलाच आहे. ही टीका त्यानें लोचनानंतर लिहिली असें अभिनवभारतीतच सांगितलें आहे. भरतनाट्य-शास्त्राच्या पहिल्या सात अध्यायांवरील टीका छापून प्रसिद्ध झाली आहे त्यावरून अभिनवगुप्ताचें नाट्यशास्त्राचें ज्ञान किती खोल व वैदग्ध्यपूर्ण होतें याचें अनुमान करितां येतें. या पुस्तकांतील ग्रंथ व ग्रंथकार यांची माहिती थोडक्यांत आम्हीं एका लेखांत संगृहीत केली आहे ( Gleanings from the

Abhninavabhārati in the Prof. Pathak commemoration volume ). ह्या पुस्तकांतील रसवादासंबंधाच्या भिन्न मतांचा ऊहापोह पुढे दुसऱ्या भागांत आम्ही करणार आहों.

अभिनवगुप्त हा मोठा प्रचंड ग्रंथकार होता. प्रस्तुत त्याचे विसांहून अधिक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. काश्मीरीय शैव मतावर त्याचे अनेक ग्रंथ आहेत. परात्रिंशिकाविवरण नांवाच्या त्याच्या ग्रंथांत त्याने आपली कुळकथा दिली आहे, तीवरून तो वराहगुप्ताचा नातू व चुखलचा मुलगा होता आणि मनोरथगुप्त हा त्याचा धाकटा भाऊ होता असें दिसून येतें ( डॉ. बुल्हरचें काश्मीर ग्रंथसंशोधन वृत्त पा. १५७ ). अभिनवगुप्ताचे गुरु बरेच असावेत असे दिसते. भट्टेन्दुराज हा त्यांतील एक गुरु असून त्याचा उल्लेख लोचनांत आला आहे ( भट्टेन्दुराजचरणाब्जकृताधिवासहृद्यश्रुतोऽभिनवगुप्तपदाभिधोऽहम्' पा. १ ) व त्याची अनेक पद्येहि उदाहरणें म्हणून लोचनांत घेतलेली आहेत ( २५, ४३, ११६, १६०, २०७, २२३ ). २२३ पानावरील पद्य प्राकृत गाथा आहे ( तद्गाथा यथा भट्टेन्दुराजस्य–लड्घिअगअणा इ. ), भट्टेन्दुराजाची अभिनवगुप्ताने लोचनांत एका ठिकाणी ( पा. १६० ) ' यथा वाऽस्मदुपाध्यायस्य विद्वत्कविसहृदयचक्रवर्तिनो भट्टेन्दुराजस्य ' अशी मोठी स्तुति केली आहे तीवरून तो उत्तम कवि-जाडा पंडित व मार्मिक टीकाकार होता असें दिसते. * अभिनवगुप्ताची भगवद्गीतेवर टीका असून तींत त्यानें आपला गुरु भट्टेन्दुराज हा कात्यायनगोत्री असून सौचुकाचा नातू व भूतिराजाचा पुत्र होता असे सांगितलें आहे ( बुल्हरचे का. ग्रं. वृत्त पा. ११८ ). लोचन टीकेंत ध्वन्यालोकांतील कित्येक शब्दांविषयींचीं व त्यांतील उदाहरणांविषयीची भट्टेन्दुराजाची मतें सांगितलेली आहेत. ' स्वेच्छा, केसरिणः ' इत्यादि ध्वन्यालोकांतील प्रास्ताविक श्लोकावरील लोचनांत (पा. २) म्हटलें आहे ' एवं वस्त्वलंकाररसभेदेन त्रिधा ध्वनिरत्र श्लोकेऽस्मद्गुरुभिर्व्या-

---

* अभिनवभारती ( व्हा. १ पान २८७ व पान ३०६ ) येथें इन्दुराजासंबंधाचे उल्लेख अतिशय आदरपूर्ण आहेत. ' अनुभवप्राधान्यं यथा शुद्धसारस्वतप्रवाहपवित्रसकलवाङ्मयमहार्णवपूर्णभावसंपादनाद् ( नद्विज० ? ) द्विजराजस्येन्दुराजस्य–यद्विश्रम्य इति', यथा कवीन्दोर्भट्टेन्दुराजस्य ' उपपरिसरं गादावर्याः ' इति।

ख्यात: '. तसेंच आणखीहि ' सर्वथाऽहङ्कारादिषु व्यङ्ग्यं वाच्ये गुणीभवति इति नः साध्यमित्यत्राशयोत्र ग्रन्थेऽस्मद्गुरुभिर्निरूपितः '। ( पा. ३७ ), ' प्रीत्यात्मा च रसस्तदेव नाट्यं नाट्य एव च वेद इत्यस्मदुपाध्यायः । ' (पा. १४९), " अस्मद्गुरवस्त्वाहुः ' अत्रोच्यते इत्यनेनेदमुच्यते ।' इ." ( पा. १८३ ), ' अस्मदुपाध्यायस्तु हृद्यतमानि पुष्पाणि अमुके गृहाण गृहाणेत्युच्चैस्तारस्वरेणादरातिशयार्थं प्रयच्छता ' ( पा. २१४ ), असें त्यानें गुरुच्या मताचे उल्लेख केले आहेत, त्यावरून भट्टेन्दुराजानें अभिनवगुप्ताला ध्वन्यालोक पढविला असावा किंवा त्यावर टीका लिहिली असावी असे वाटतें. कित्येक ठिकाणीं अभिनवगुप्तानें गुरूच्या मताहून भिन्न असलेलें आपलें मत सांगितलें आहे. पा. २१४ वरील ' प्रयच्छतोच्चैः ' इत्यादि श्लोकावरील लोचन पहा. त्यांत ' अस्मदुपाध्यायस्तु ' असें म्हणून गुरूचे मत देण्यापूर्वी त्यानें स्वतःचा अर्थ ' कान्तया स्वयं ग्रहीतुमशक्यत्वाद्याचितानि इत्यर्थः । ' असा दिला आहे. आतां पुढें प्रश्न असा येतो की, उद्भटाचा टीकाकार प्रतीहारेन्दुराज व हा भट्टेन्दुराज हे एकच कीं भिन्न ? प्रतीहारेन्दुराजाची कुळकथा समजत नाही. पण त्याला ध्वनिकल्पना मान्य नव्हती हें पूर्वी सांगितलेंच आहे. ध्वनीचा अन्तर्भाव त्याने अलंकारांतच केला आहे. हा भट्टेन्दुराज तर ध्वनि मान्य करीत असून ध्वन्यालोकाचे पाठहि त्यानें अभिनवगुप्ताला दिले होते. * यास्तव ते एक नसावेत असेंच म्हणावें लागतें. हेच मत प्रो. शंकरन् यांनी आपल्या ग्रंथांत प्रतिपादिले आहे ( पा. ९५ ). प्रतीहारेन्दुराज हा कोंकण ( म्हणजे तो स्वतः किंवा त्याचा वंश मूळचा कोंकणांतील ) असून ग्रंथरचनाकाली काश्मीरांत राहात होता. त्याच्या नांवांतील प्रतीहार शब्द संशय उत्पन्न करणारा आहे. तो शब्द गुर्जर नांवाच्या अनार्य जातीला लावीत असत ( इं. अँ सन १९१९ पा. १३२ पहा ). प्रतीहार याचा सामान्य अर्थ ' द्वार ' किंवा ' द्वारपाल ' आहे पण तो शब्द इन्दुराजाचे नांवांत काय अर्थ दाखवितो तें सांगणें कठीण आहे. इन्दुराजाचा ' लोचन ' व ' अभिनवभारती '

---

* ध्वन्यालोकांतील सिद्धान्त मान्य नसूनहि तो ग्रंथ गुरु या नात्यानें अभिनवगुप्ताला इन्दुराजानें शिकविला असणें शक्य आहे. परंतु इन्दुराजाचीं ध्वन्यालोकावरील व्याख्यानें म्हणून जीं लोचनांत निर्दिष्ट केलीं आहेत त्यावरून तो ध्वन्यालोकाचा अनुयायी होता असें दिसतें.

मिळून पांच पंचवीस वेळां उल्लेख आला आहे. पण त्यांत चुकून सुद्धां त्याला कोठें ' प्रतीहारेन्दुराज ' म्हटलेलें नाहीं हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे. भट्टेन्दुराज व प्रतीहारेन्दुराज हे दोघेहि अलंकारशास्त्रांत निष्णात होते व दोघेहि जवळ जवळ एकाच काळीं होऊन गेले हेंहि खरें. पण वरील कारणास्तव त्यांना भिन्न मानणेंच योग्य दिसतें. तथापि कित्येकांच्या मतें ते एक असावें असें दिसतें. अलंकार-सर्वस्वावरील टीकेंत समुद्रबंध यानें प्रतीहारेन्दुराजाला भट्टेन्दुराज अशा नांवानें उल्लेखून दोघांचें ऐक्य सुचविलें आहे ( अलं. स. त्रिवेन्द्रम् प्रत पा. १३० ). तो म्हणतो, ' भट्टेन्दुराजेन प्रीणितप्रणयीत्यादि अप्रस्तुतप्रशंसोदाहरणे...भट्टोद्भट-ग्रंथे व्याख्यातम् '. ' प्रीणितप्रणयि ' इत्यादि पद्य भामहाच्या काव्यालंकारांत आलें असून ( ३, २९ ) त्याचा प्रतीहारेन्दुराजानें लघुवृत्तींत ( पा. ३४ ) संबंध आणिला आहे. असो. भट्टतौत हा अभिनवगुप्ताचा दुसरा गुरु असून त्याचा उल्लेख लोचनांत ( पा. २९, १७८ ) ' यदुक्तमस्मदुपाध्यायभट्टतौतेन ', ' स चायमस्म-दुपाध्यायभट्टतौतेन काव्यकौतुके...बहुतरकृतनिर्णयः पूर्वपक्षसिद्धान्तः ।' *असा केलेला आहे. भट्टतौतानें काव्यकौतुक हा ग्रंथ लिहिला. ग्रंथकारांच्या नामावलीत पूर्वीं सांगितलेला उत्पल हा अभिनवगुप्ताचा परमगुरु असून त्याचा प्रत्यभिज्ञा-शास्त्रावर ग्रंथ आहे. लोचनांत त्या विषयीं 'यदुक्तमस्मत्परमगुरुभिः श्रीमदुत्पल-पादैः ' असा उल्लेख आहे ( पा. ३० ). अभिनवाचा शैव विद्येंतील गुरु लक्ष्मण-गुप्त कोणी होता असें समजतें ( बुल्हरचें काश्मीरग्रंथवृत्त पा. १५९ ).

---

* वरतीं इन्दुराजासंबंधाने अवतरणें दिलीं आहेत त्यांत जेथें मोघम ' अस्म-द्गुरवः' किंवा 'अस्मदुपाध्यायाः' असे शब्द आले आहेत त्याठिकाणी इंदुराजाऐ-वजीं भट्टतौताचा उल्लेख केलेला असणें शक्य आहे. अभिनवभारतींत प्रास्ताविक चवथ्या श्लोकांत ' सद्विप्रतौतवदनोदितनाट्यवेदतत्त्वार्थमर्थिजनवाञ्छितसिद्धि-हेतोः । माहेश्वराभिनवगुप्तपदप्रतिष्ठः संक्षिप्तवृत्तिविधिना विशदीकरोति ' ह्या श्लोकांत नाट्यवेदाचा भट्टतौत याचे वदनांतून ऐकिलेला अर्थ मी विशद करितों असें म्हटलें आहे. अभिनवभारतींतही अनेक ठिकाणीं माझे गुरु ( अस्मदुपा-ध्यायकृते काव्यकौतुके ' पान ३७, 'यदाहुः काव्यकौतुके' पान २९१ ) यांच्या काव्यकौतुक ग्रंथांत अमुक सांगितलें आहे असा उल्लेख आला आहे. भट्टतौत यांचा उल्लेख स्वतंत्रपणें अभिनवभारतींत पान १८७ व ३१० येथेंही आला आहे.

तन्त्रालोक ( आह्निक १२ श्लोक २५ ) या ग्रंथांत ' उवाचोत्पलदेवश्च श्रीमानस्मद्गुरोर्गुरुः ' असें म्हटलें आहे. काश्मीरीयशैवसिद्धांताची ( प्रत्यभिज्ञाशास्त्राची ) गुरुपरंपरा वसुगुप्त-सोमानंद-उत्पल-लक्ष्मणगुप्त-अभिनवगुप्त अशी आहे. तन्त्रालोकांतील ( आह्निक १० श्लोक २८७ ) श्लोकावरून ' सुमतिनाथ ' हा अभिनवगुप्ताचा परमगुरु होता असें जयरथ ( टीकाकार ) म्हणतो.

अभिनवगुप्ताचा ग्रंथव्यवसायकाल इ. स. ९९० पासून १०२० पर्यंत होता. त्याचा **प्रत्यभिज्ञाविमर्शिनी** नांवाचा प्रत्यभिज्ञाशास्त्रावरील सविस्तर टीकाग्रंथ ( बृहती वृत्ति ) लौकिक शक ९० व गतकलि ४११५ ( इ. स. १०१५ ) या वर्षीं लिहिलेला आहे, ' इति नवतितमेऽस्मिन् वत्सरेऽन्त्ये युगांशे तिथिशशिजलधिस्थे मार्गशीर्षावसाने ' ( बुल्हरचें काश्मीरवृत्त पा. १५९ ), आणि त्याचें भैरवस्तोत्र लौकिकशक ६८ म्हणजे इ. स. ९९३ या वर्षांतील आहे ( बुल्हर काश्मीरग्रंथवृत्त पा. १६२ ).

अभिनवगुप्ताच्या लोचनापूर्वीं ध्वन्यालोकावर चंद्रिका नांवाची टीका असून ती अभिनवगुप्ताच्याच कोणा पूर्वजानें केलेली होती. लोचनांत तिचा अनेक ठिकाणी उल्लेख असून तिच्यावर जोराची प्रतिकूल टीका केली आहे. लोचनकार एका ठिकाणीं म्हणतो ' चन्द्रिकाकारस्तु पठितमनुपठतीति न्यायेन गजनिमीलिकया व्याचचक्षे तस्य तस्य शब्दस्य फलं तद्वा फलं वाच्यव्यङ्ग्यप्रतीत्यात्मकं तस्य घटना निष्पादना यतोऽनन्यसाध्या शब्दव्यापारैकजन्येति । न चात्रार्थसतत्त्वं व्याख्यानेन किञ्चिदुत्पश्याम इत्यलं **पूर्ववंश्यैः** सह विवादेन बहुना । ' ( ध्व. पा. १८५ ). ' तत्र तु शब्दस्य क्रियापौर्वापर्य......रसादौ न प्रतीयते ' या ध्वन्यालोकांतील शब्दांचें आपलें स्पष्टीकरण दिल्यावर अभिनवगुप्तानें चंद्रिकाकाराच्या टीकेंतील तद्विषयक उतारा घेऊन त्यांत कांही अर्थ नाहीं असा अभिप्राय प्रकट केला आहे. आणखी एका ठिकाणीं ( पा. १७८ ) ' आधिकारिकत्वेन तु शान्तो रसो निबद्धव्य इति चंद्रिकाकारः । तच्चेहास्माभिर्न पर्यालोचितम् । प्रसङ्गान्तरात् । ' असा तिचा उल्लेख केला आहे यांत प्रतिपादिलेला पूर्वपक्ष माणिक्यचंद्राच्या काव्यप्रकाशसङ्केतांत ( म्हैसूर प्रत पा. १०१ ) व सोमेश्वराच्या काव्यादर्शांत उद्धृत केलेला आहे. १ ल्या व ३ ऱ्या उद्द्योतांच्या शेवटीं ' किं लोचनं विनालोको भाति चन्द्रिकयाऽपि हि ' असा जो

श्लोक लोचनांत आहे त्यांत आलोक, चन्द्रिका व लोचन हे सर्व शब्द द्व्यर्थी योजिलेले आहेत; आलोक म्हणजे प्रकाश व ध्वनिकारिकांवरील वृत्ति, चंद्रिका म्हणजे चंद्रप्रकाश व ध्वन्यालोकावरील टीका. असो: या उपरोक्त स्थलांशिवाय आणखीहि कित्येक ठिकाणीं अभिनवगुप्तानें जुन्या टीकेंतील कित्येक अवतरणें घेतलीं असून त्यांच्या शेवटीं 'इत्यलं पूर्ववंश्यैः सह विवादेन' असे शब्द घालून त्यांत प्रतिपादिलेल्या मतांना अमान्यता दर्शविली आहे. पा. १२३ वर तो म्हणतो, 'यस्तु व्याचष्टे......इत्यलं निजपूर्वजसगोत्रैः साकं विवादेन'; पा. १७४ वरहि 'अन्यस्तु व्याचष्टे–एतच्चापेक्षिकमित्यादि ग्रंथो......इत्यलं पूर्ववंश्यैः सह बहुना संलापेन' असे शब्द आले असून, पा. २१५ वर 'यत्तु त्रिष्वपि लोकेषु प्रतीयमानस्यैव रसाङ्गत्वं व्याचष्टे स्म स देवं विक्रीय तद्यात्रोत्सवमकार्षीत् ।......इत्यलं पूर्ववंश्यैः सह विवादेन ।' असे म्हटलेले आहे. हे सर्व टोमणे चंद्रिका टीकेला उद्देशूनच मारिलेले असावे असे शेवटीच्या शब्दांवरून दिसते. चंद्रिकेचा उल्लेख महिमभट्टानेंहि व्यक्तिविवेकांत आरंभीं केला आहे (प्रास्ताविक पद्य ५ वें). या शिवाय लोचनांत 'अन्यः', 'कश्चित्' या शब्दांनी आणखी कित्येक टीकांचे उल्लेख कित्येक स्थलीं केलेले असून ध्वन्यालोकांतील शब्दांचे किंवा उदाहरणासाठीं दिलेल्या पद्यांचे त्यांनी केलेले अर्थ सांगितले आहेत, पण त्यांच्या कर्त्यांचीं नांवें दिलेलीं नाहीत व त्यांच्या शेवटीं 'इत्यलं पूर्ववंश्यैः सह विवादेन' असे शब्दहि नाहीत. हे दुसरे अर्थ कांहीं ठिकाणीं चंद्रिकेंतील असावे व कांहीं ठिकाणीं भट्टनायकाचे असावे. अशीं उदाहरणें ध्वन्यालोकाच्या ७, ९, २० या पानांवर (यस्तु ध्वनिव्याख्यानोद्यतस्तात्पर्यशक्तिमेव......स नास्माकं हृदयमावर्जयति), तसेंच २२, ३६ या पानांवर (यस्तु व्याचष्टे......स प्रकृतार्थमेव ग्रन्थार्थमत्यजत्) व १२४, १३६, १४०, १४३, १५७, १७३, २०१, २०५, २०७ याहि पानांवर असून त्यांत बहुधा चंद्रिकेचाच संबंध असावा व पा. ५७ (यत्तु वाक्यभेदः स्यादिति केनचिदुक्तं तदसत्), १३१, २०८, २१२ यांतील कटाक्ष भट्टनायकासारख्या स्वतंत्र ग्रंथकारांच्या मतांवर असावा असें वाटतें.

# १५ राजशेखराची काव्यमीमांसा.

राजशेखरकृत काव्यमीमांसा हा ग्रंथ गायकवाड सरकारच्या पौरस्त्य ग्रंथमालेत छापिलेला आहे. हा ग्रंथ अपूर्व आहे, पण त्यांत रस, गुण अथवा अलंकार यांचें विवेचन प्रत्यक्ष न करितां कवींना मार्गदर्शक होतील अशा व्यावहारिक सूचनाच केलेल्या आहेत. त्याचे अठरा अध्याय केलेले असून त्यांत पुढील विषय आले आहेत:—**पहिला** अध्याय शास्त्रसंग्रह नांवाचा आहे व त्यांत शिवापासून ब्रह्मादिकांना काव्यमीमांसेचे ज्ञान कसें मिळालें आणि ब्रह्मदेवापासून गुरुपरंपरेने निरनिराळ्या अठरा ग्रंथकारांनीं काव्यमीमांसेच्या अठरा भागाचें विवेचन कसें कसें केलें तें सांगून शेवटीं यायावरीय कुलांतील राजशेखरानें त्या अठरा ग्रंथकार मुनींच्या मतांचा संग्रह कसा केला याचें वर्णन केलें आहे. शास्त्रनिर्देश नांवाचा दुसऱ्या अध्यायांत वाङ्मयाचें वर्गीकरण केले आहे. वाङ्मयाचे शास्त्र व काव्य असे दोन भेद आहेत. पुनः शास्त्र हें अपौरुषेय व पौरुषेय असें द्विविध आहे. चार वेद, चार उपवेद, व सहा वेदांगें मिळून अपौरुषेय शास्त्रीय वाङ्मय होतें. यायावरीयाच्या मते अलंकार हे सातवें वेदांगच होय. पौरुषेय शास्त्रीय वाङ्मयांत पुराणें, आन्वीक्षिकीविद्या, पूर्व व उत्तर या दोन मीमांसा, अठरा स्मृति व विद्या यांचा समावेश होतो. विद्यास्थाने कोणी चवदा म्हणतात, तर कोणी अठरा म्हणतात. विद्या कोणी एक, कोणी दोन, कोणी तीन किंवा चार म्हणतात. साहित्यविद्या ही पांचवी विद्या होय असे यायावरीयाचे मत आहे अशा आशयाचें विवेचन करून नंतर या अध्यायांत सूत्र, भाष्य, वृत्ति, टीका, पञ्जिका, कारिका, इत्यादि शब्दांचें अर्थ दिले आहेत. तिसऱ्या अध्यायाला काव्यपुरुषोत्पत्ति असें नांव दिलें असून सरस्वतीपासून काव्यपुरुषाचा कसा जन्म झाला हें सांगितलें आहे. सारस्वतेयाचें वर्णन 'शब्दार्थौ ते शरीरम्, संस्कृतं मुखम्, प्राकृतं बाहुः, जघनमपभ्रंशः, पैशाचं पादौ, उरो मिश्रम्। समःप्रसन्नो मधुर उदार ओजस्वी चासि। उक्तिचणं च ते वचो रस आत्मा, रोमाणि च्छन्दांसि, प्रश्नोत्तरप्रवह्लिकादिकं च वाक्केलिः, अनुप्रासोपमादयश्च त्वामलकुर्वन्ति।' (पा. ६) असें केलें आहे. नंतर काव्यपुरुष व साहित्यविद्यावधू यांचा वत्सगुल्मनगरांत विवाह झाला असें सांगून त्याचें वर्णन केलें आहे. वत्सगुल्म हें वऱ्हाडांतील सांप्रतचें वासिम गांव असावें.

चवथ्या अध्यायाला पदवाक्यविवेक असें नांव आहे. प्रथम कवीला अत्यवश्य गुण कोणते पाहिजेत याचा विचार आला असून यायावरीयाच्या मतें शक्ति हेंच काव्याचें कारण म्हणजे काव्यहेतु होय व तिच्यापासूनच प्रतिभा व व्युत्पत्ति यांचा उद्भव होतो, पण इतरांच्या मतें कवि व्हावयाला समाधि म्हणजे चित्तैकाग्र्य व अभ्यास यांची आवश्यकता आहे असें म्हटलें आहे. नंतर कवींचें वर्गीकरण दिलें आहे. पांचवा अध्याय काव्यपाककल्प या नांवाचा आहे त्यांत प्रथम व्युत्पत्तीचा अर्थ दिला असून शास्त्रकवि व उभयकवि हे कवींचे मुख्य भेद आणि त्यांचे पोटभेद, कवीच्या दहा अवस्था, आणि पाक शब्दाचे निरनिराळे अर्थ यांचें विवेचन केलें आहे. सहाव्या पदवाक्यविवेक नामक अध्यायांत सुप्, समास, तद्धित, कृत् आणि तिङ् या पांच शब्दवृत्ति, वाक्यलक्षण, वैभक्त, शक्त व शक्तिविभक्तिमय अशी वाक्याची त्रिविध अर्थप्रदर्शक शक्ति, वाक्याचे दहा प्रकार, आणि ' गुणवदलंकृतं च वाक्यमेव काव्यम् ' हें काव्य-लक्षण, असे विषय प्रतिपादिले आहेत. सातव्या अध्यायाचें नांव पाठप्रतिष्ठा असें असून, काव्यांत देव अप्सरा पिशाच इत्यादिकांच्या तोंडीं घालण्यास योग्य अशी भाषा व वाक्यसरणी, वैदर्भी गौडीया व पाञ्चाली या तीन रीति, दोन प्रकारच्या काकु ( साकांक्ष व निराकांक्ष ) त्यांचे पोटभेद व त्यांची उदाहरणें, भरत खंडां-तील निरनिराळ्या लोकांची उच्चारपद्धति, व ते बोलत असलेल्या निरनिराळ्या भाषा, या विषयांची चर्चा केली आहे. आठव्यांत काव्यविषय कोठून घ्यावयाचे ( काव्यार्थयोनयः ) ते सांगितलें आहे. हे आधार बारा प्रकारचे आहेत; श्रुति, स्मृति, इतिहास, पुराण, प्रमाणविद्या, समयविद्या, अर्थशास्त्र नाट्यशास्त्र व कामशास्त्र ही राजसिद्धान्तत्रयी, लोक, विरचना आणि प्रकीर्णक. कवीनें आपल्या कल्पनेनेंच सर्वस्वी रचिलेली कथा, किंवा अर्धवट तशी रचिलेली कथा म्हणजे विरचना होय ( ' कविमनीषानिर्मितं कथातन्त्रमर्धमात्रं वा विरचना ' अशी विरचनेची व्याख्या आहे ). या बारांच्या जोडीला यायावरीयानें आणखी चार आधार सांगितले आहेत. नवव्यांत अर्थव्याप्ति हा विषय आहे. वर्ण्यविषय दिव्य, दिव्यमानुष, मानुष, पातालीय, मर्त्यपातालीय, दिव्यपातालीय व दिव्यमर्त्य पातालीय इतक्या प्रकारचा असावा व त्याचें स्थान कोणतेंहि असले तरी विषय रसयुक्त असला पाहिजे ( रसवत एव निबन्धो युक्तो न नीरसस्येति आपराजितिः।

आमिति यायावरीयः ); वर्ण्यविषय एका स्वतंत्र पद्यांत प्रबंधांत गोवलेला असावा. असल्या पद्याचे किंवा प्रबंधाचे प्रकार पांच असतात. दहाव्या अध्यायांत कविचर्या व राजचर्या हे विषय आहेत. नामधातुपारायण, अभिधानकोश, छंदोविचिति आणि अलंकार या मुख्य काव्यविद्या असून चौसष्ट कला म्हणजे उपविद्या होत; देशवार्ता, विदग्धवाद, लोकयात्रा, विद्वद्गोष्ठी इत्यादिकांमुळें काव्य निर्माण होतें; कवि व्हावयाचें तर शरीरशुद्धि, वाक्शुद्धि व विचारशुद्धि यांची जोड अवश्य केली पाहिजे; इत्यादि विवरण केल्यावर कवीचें वसतिगृह, त्याचा परिवार व लेखनसाहित्य यांचें वर्णन या प्रकरणांत केलें असून कवीनें अहोरात्राचे आठ भाग करावे व प्रत्येक भागातील आपलें योग्य कर्तव्य ठरवून ठेवावें, स्त्रियांनींही काव्य करावें, कवींची परीक्षा घेण्यासाठीं राजांनी सभागृहें बांधावीं, शास्त्रपारंगत व काव्यपटु विद्वानाची परीक्षा करण्यासाठीं मोठमोठ्या नगरांत सभा स्थापन कराव्या अशा सूचनाहि केल्या आहेत. अकरापासून तेरापर्यंतच्या अध्यायांत कवीला पूर्वीच्या ग्रंथकारांच्या ग्रंथातून शब्द आणि विचार यांची उसनवारी कोठपर्यंत करावयास हरकत नाही याचा विचार आला असून चौदापासून सोळापर्यंतच्या अध्यायांत देश, वृक्ष, झुडपे, फुले, इत्यादिकासंबंधी कविसमय म्हणजे कवींचे संकेत काय काय आहेत ते सांगितले आहेत, तसेंच हास्य, कीर्ति इत्यादि भावांना स्पृश्य किंवा दृश्य स्वरूप कल्पून त्यांचे शुभ्रादिवर्ण सांगण्याचा जो काव्य संकेत आहे, त्यासंबंधाने विवेचन केले आहे. सतराव्यात देशविभागांचें वर्णन असून निरनिराळे प्रांत नद्या, पर्वत हे भरतवर्षाच्या चार दिशाना कसे पसरले आहेत व त्या त्या प्रांतांत कोणत्या विशिष्ट गोष्टी उत्पन्न होतात, तसेंच त्यांतील विविध लोकांचा वर्ण कसा असतो या गोष्टी वर्णिल्या आहे. अठराव्याला कालविभाग असें नांव आहे; त्यांत ऋतु, वारे, फुलें, पक्षी इत्यादिकांचें विवेचन करून निरनिराळ्या ऋतूंत अनुरूप अशी वागणूक कशी ठेवावी हे सांगितलें आहे.

काव्यमीमांसेंतील या विषयनामावलीवरून हा ग्रंथ म्हणजे अनेक प्रकारच्या विषयांच्या माहितीची खाणच होय असें म्हणावयास हरकत नाहीं. प्रस्तुत छापून प्रसिद्ध झालेली जी काव्यमीमांसा आहे, ती ग्रंथकारानें योजिलेल्या समग्र ग्रंथाचा केवळ अंश आहे असें राजशेखराच्या ‘ तमौपनिषदके वक्ष्यामः ’ ( पा. ११ ) म्हणजे हा विषय औपनिषद प्रकरणांत आम्हीं सांगणार आहों,

या शब्दांवरून दिसून येते. केशवमिश्राच्या अलंकारशेखरांत अकराव्या मरीचीच्या शेवटीं राजशेखराचीं म्हणून दोन पद्यें आहेत, पण तीं उपलब्ध काव्यमीमांसेत सांपडत नाहींत, यावरूनहि वरील तर्काला बळकटी येते. त्या दोन पद्यांतील एक ' अलंकारशिरोरत्नं सर्वस्वं काव्यसंपदाम् । उपमा कविवंशस्य मातैवेति मतिर्मम ॥ ' असें आहे. राजशेखराचा हा ग्रंथ कौटिल्याच्या अर्थशास्त्राच्या धर्तीवर लिहिला असून त्याची भाषासरणी जरा बोजड वाटली तरी एकंदरींत जोरदार आहे. पूर्वींच्या ग्रंथकारांची अनेक पद्यें त्याने उद्धृत केली असून त्यांत कालिदास, अमरुशतक, किरातार्जुनीय, कादम्बरी, मालतीमाधव, वेणीसंहार, शिशुपालवध, सूर्यशतक, हयग्रीववध इत्यादि ग्रंथ व ग्रथकार आले आहेत. त्यानें स्वतःच्या इतर ग्रंथांतूनहि पद्यें घेतली आहेत. अलंकारशास्त्रावरील अनेक ग्रंथकारांची मतें त्यानें सांगितली असून त्यांतील कित्येक ग्रंथकार काव्यमीमांसेतील उल्लेखांवरूनच माहीत झाले आहेत. ग्रंथकारांच्या नांवात अवन्तिसुंदरी, आनंद, आपराजिति, उद्भट, कालिदास, द्रौहिणि, भरत, मङ्गल, रुद्रट, वाक्पतिराज, वामन, श्यामदेव, सुरानन्द अशी नांवे आढळतात. त्याने सांगितलेली कित्येक मते आचार्यांची म्हणून सांगितली आहेत. पण हे आचार्य कोण हे सागणं कठीण आहे. स्वतःचीं मतें राजशेखरानें यायावरीयाचीं म्हणून दिली आहेत. पुढील साहित्य ग्रंथकारांनीं काव्यमीमांसेतून फारशीं अवतरणे घेतलेली आढळत नाहींत. हेमचंद्र आणि वाग्भट यांनी मात्र त्या ग्रंथातून पुष्कळ वचनें उद्धृत केली असून शेवटच्या दोन प्रकरणांतून तीं विशेषतः घेतलीं आहेत. म्हैसूर येथे छापिलेल्या काव्यप्रकाशावरील काव्यप्रकाशसंकेतनामक माणिक्यचंद्रकृत टीकेत ' अभिप्रायवान्पाठधर्मः काकुः स नालंकारी स्यादिति यायावरीयः ' हे काव्यमीमांसेतील ( पा. ३१ ) वाक्य घेतलेलें असून हेमचंद्राने काव्यनुशासनांत ( पा. २३५ ) व सोमेश्वरानें काव्यप्रकाशावरील काव्यादर्शनामक टीकेंतहि तें घेतलें आहे. राजशेखरानें आपल्या ग्रंथांत कांहीं महत्त्वाची ऐतिहासिक व ग्रंथविषयक माहिती दिली आहे. मेधाविरुद्र व कुमारदास हे कवि जन्मांध होते असें त्यानें सांगितले असून ( का. मी. पा. १२) मगधांतील शिशुनाग, शूरसेन देशांतील कुविन्द, कुन्तलदेशांतील सातवाहन, आणि उज्जयिनीच्या साहसांक इत्यादि राजांनी आपल्या प्रांतांना कित्येक चम-

त्कारिक नियम लागू केले होते असें म्हटलें आहे हे नियम म्हणजे उच्चारावयास कठीण अशीं आठ अक्षरें राजवाड्यांत कोणी उच्चारूं नयेत, कर्णकठोर लागणारी जोडाक्षरें बोलतांना टाळावीं, तसेंच बोलावयाचें तर एक सर्व प्राकृतांत बोलावें किंवा एक सर्व संस्कृतांत बोलावें अशा प्रकारचे होते ( का. मी. पान ५० ). वासुदेव, सातवाहन, शूद्रक, व साहसाङ्क हे राजे विद्येचे मोठे पुरस्कर्ते होते. कालिदास, मेण्ठ, अमर, रूपसूर ( ? ), भारवि, चन्द्रगुप्त या कवींची परीक्षा उज्जयिनी येथें घेण्यांत आली होती; व उपवर्ष, वर्ष, पाणिनि, पिङ्गल, व्याडि, वररुचि आणि पतञ्जलि यांची चांचणी पाटलिपुत्र येथे करण्यांत आली होती; अशाहि गोष्टी त्यानें सांगून ठेविल्या आहेत. त्याला प्राकृत भाषांची मोठी आवड असून ( का. मी. पानें ३४, ५१ ) निरनिराळ्या प्रांतांतील विविध प्राकृतांचा त्यानें उल्लेख केलेला आहे. उदाहरणार्थ ( पा. ५१ ) अवन्ती, पारियात्र व दशपुर येथे पैशाची भाषेचा प्रभाव होता असें त्यानें सांगितलें आहे. त्याच्या ग्रंथांत तत्कालीन चाली रीति, पोशाख, उत्सव इत्यादींची माहिती विपुल आहे व एकंदरीनें त्या काळाचे लोक चैनी व विलासी असून भरतवर्षाच्या नैतिक व इतर बाबतीतील अधःपाताला त्यावेळींही बरीच सुरवात झाली होती असें त्याचे ग्रंथावरून दिसते.

राजशेखराचा व्यक्तिगत इतिहास थोडासा मिळत असून डॉ. कोनौच्या कर्पूरमंजरीच्या प्रस्तावनेंत व रा. दलाल यांच्या काव्यमीमांसेच्या प्रस्तावनेंत तो दिला आहे. राजशेखर हा महाराष्ट्राचा रहिवाशी होता असें दिसतें. बालरामायण नांवाच्या नाटकांत त्यानें **अकालजलद्** नांवाच्या पुरुषापासून आपण चवथे पुरुष आहो असें सांगितलें असून त्या अकालजलदाला **महाराष्ट्रचूडामणि** असे म्हटलें आहे. त्याच्या पित्याचें नांव दुर्दुक व मातेचें शीलवती असें होतें. आपल्या अंगी असलेल्या काव्यशक्तीविषयीं त्याला पूर्ण विश्वास असून बालरामायणांत तर त्याने स्वतःला वाल्मीकीचा अवतार म्हटलें आहे ( बा. रा. १, १६ ). महामंत्रिपुत्र व रघुकुलांतील निर्भय किंवा महेन्द्रपाल नांवाच्या राजाचा उपाध्याय अथवा गुरु असेंहि त्याचें वर्णन आढळतें ( बा. रा. १. ५ व १, १८; कर्पूरमंजरी १. ५ व १. ९ ). त्याची पत्नी अवन्तिसुंदरी नांवाची चाहुआण ( चव्हाण ) कुलांतील कन्या होती व तिच्याच इच्छेवरून कर्पूर-

मंजरी हें राजशेखराचें नाटक रंगभूमीवर आलें ( १, ११ ). या गोष्टीवरून असें दिसतें कीं राजशेखरानें सुशिक्षित अशा क्षत्रिय तरुणीशी विवाह केला होता. काव्यमीमांसेंत (पा. २०, ४६, ५७) अवन्तिसुंदरीचीं मतें सांगितलीं आहेत. कर्पूरमंजरींत राजशेखराला बालकवि व कविराज अशीहि नावें दिलेलीं आढळतात. **प्रचण्डपाण्डव** किंवा **बालभारत** या नाटकांत राजशेखरानें **निर्भय**राजाचा पुत्र महीपालदेव या राजाचा उल्लेख केला आहे. तो किंवा त्याचे पूर्वज मूळस्थान सोडून कनोज येथें गेले असावे असें दिसतें. कारण बालभारताचा प्रयोग महोदय येथें म्हणजे कान्यकुब्ज देशांत झाल्याचें वर्णन आहे. काव्यमीमांसेंत (पा ९४) राजशेखरानें दिशा सांगावयाच्या त्या कनोजला अनुलक्षून सांगाव्या ( तत्रापि महोदयं मूलमवधीकृत्येति यायावरीयः ) असें म्हटलें आहे. विद्धशालभञ्जिका, कर्पूरमंजरी, बालरामायण, व बालभारत किंवा प्रचण्ड पाण्डव अशीं चार नाटकें, काव्यमीमांसा हा साहित्यशास्त्रावरील ग्रंथ व हरविलास नांवाचें महाकाव्य इतके ग्रंथ त्यानें रचिलेले प्रसिद्ध आहेत. बालरामायणांत (१, १२) सहा प्रबंध आपण रचिल्याचें त्यानें स्वतःच सांगितलें आहे. हेमचंद्राच्या **विवेकांत**हि (पा. ३३५) हरविलासकाव्य राजशेखरानें रचिलें असेंच म्हटलें आहे. काव्यमीमांसेंत **भुवनकोश** नांवाचा भूगोलवर्णनात्मक ग्रंथहि आपण रचिला असल्याचा निर्देश त्यानें केला आहे. राजशेखराचे म्हणून जे श्लोक सुभाषितावलीसारख्या ग्रंथांत कविगुणवर्णनपर म्हणून घेतलेले आढळतात ते बहुधा याच राजशेखराचे असावे.

राजशेखर इ. स. दहाव्या शतकाच्या पहिल्या चरणांत होऊन गेला. इं. अँटिक्वरी ग्रंथांक १६ पा. १७५–१७८; ग्रंथांक ३४, पा. १७७ व एपिग्रॅफिआ इंडिका १. १६२ इ. यांतील लेखांवरून, महेन्द्रपाल किंवा निर्भयनरेन्द्र यांच्या उत्कर्षकालांत इ. स. ९०२ व ९०७ हीं वर्षें येतात व त्याचा पुत्र महीपाल याच्या राजवटींत इ. स. ९१७ हें वर्ष येतें असें दिसून येतें. हे राजे राजशेखराचे समकालीन होते हे वर आलेंच आहे. या कालाला प्रत्यन्तर प्रमाण पाहिजे असल्यास तेंहि पुढील ग्रंथकारांनी घेतलेल्या त्याच्या ग्रंथांतील अवतरणांवरून मिळतें. त्यानें स्वतः उद्भट व आनंदवर्धन यांच्या ग्रंथांतील अवतरणें घेतलीं आहेत म्हणून तो त्यांच्या मागूनचा, व त्याच्या ग्रंथांतील उतारे **यशस्तिलक, तिलकमञ्जरी** व **महिमभट्टाचा**

**व्यक्तिविवेक** यांत घेतलेले असल्यामुळें तो त्या ग्रंथाच्या पूर्वींचा हें उघड होतें. यशस्तिलक हा ग्रंथ इ. स. ९५९–६० च्या सुमारास रचिलेला आहे. तिलकमञ्जरी इ. स. १००० च्या सुमाराची असून ' समाधिगुणशालिन्यः प्रसन्नपरिपक्त्रिमाः । यायावरकवेर्वाचो मुनीनामिव वृत्तयः ॥ ' ( पद्य ३३ ) असा तीत यायावराचा म्हणजे राजशेखराचा गौरवपर उल्लेख आहे. महिमभट्टाचा काळ इ. स. अकराव्या शतकाच्या मध्याजवळचा आहे हें पुढें त्याच्या वर्णनाच्या वेळीं दाखविण्यांत येईलच.*

## १६ मुकुलभट्टप्रणीत अभिधावृत्तिमातृका

हा ग्रंथ लहान असून निर्णयसागर छापखान्यांत छापिलेला आहे. याचा निर्देश जातां जातां तरी करणें अवश्य आहे. त्यांत अवघ्या १५ कारिका असून त्यांवर ग्रंथकाराची स्वतःची वृत्ति आहे. मुख्य व लाक्षणिक या शब्दांच्या दोन प्रकारच्या अर्थाचें विवरण त्यांत केलें असून लक्षणेचें विवेचन सविस्तर केलें आहे व तिचे पोटभेद उदाहरणांसह सांगितले आहेत. भट्टमुकुलाला आनन्दवर्धनाचार्यांचा ध्वनिसिद्धान्त मान्य होता असें दिसतें व तें मत त्याला संमत होते म्हणून त्याने फक्त अभिधा आणि लक्षणा ह्या दोन वृत्तींचें विवेचन केले ( व्यंजनेचे केले नाहीं ) असें त्याच्या ग्रंथाच्या शेवटच्या वाक्यावरून दिसते ' एवं भूतायां प्रमाणैरप्रतिपन्नायां हि सामग्र्यामुपपत्तिमनपेक्ष्यापि समुदयमाना प्रतीतिः केन निह्नोतुं शक्यत इति सिद्धमभिधा-तात्पर्य-लक्षणाव्यापारातिरिक्तं ध्वननम् । **तच्चान्यत्र** विस्तरेण विचारितमिति संक्षेपेणेहोक्तमिति । '. काव्यप्रकाशासारख्या पुढील ग्रंथांतील लक्षणेचें विवेचन या अभिधावृत्तिमातृकेला अनुसरूनच केलेलं आढळतें. उद्भट ( पा. १४ 'साम्यरूपाविवक्षायाम्' इ., उद्भट ३,४४ ), कुमारिलभट्ट ( पा. ११ तदुक्तं भट्टकुमारिलेन ' निरूढा लक्षणाः काश्चित् इ. ), ध्वन्यालोक ( पा. ११, १३ ' स्निग्धश्यामल ' इ., ध्व. लो. पा. ६१, 'प्राप्तश्रीरेष' इ., ध्व. लो. पा. १०९ ), भर्तृमित्र ( पा. १७ "आचार्यभर्तृमित्रेण प्रदर्शितम् ' अभिधेयेन सम्बन्धात्......लक्षणा पञ्चधा मता ॥ इति श्लोकेन ), महाभाष्य ( पा. ४,५ चतुष्टयी हि शब्दानां प्रवृत्तिर्भगवता महाभाष्यकारेणोपव-

---

* Festgabe Jacobi या निबन्धमालेंत डॉ. नोबेल यांनीं काव्यमीमांसेचें विवेचन केलें आहे ( पान १६९--१७९ )

र्णिता; गुणक्रियाशब्दसंज्ञिव्यक्तीनामेव तत्तदुपाधिनिबन्धनभेदजुषामेकाकारतावगतिनिबन्धनत्वं न तु जातेरिति भगवतो महाभाष्यकारस्याभिमतम् । ), विज्जका ( पा. १२ 'दृष्टिं हे प्रतिवेशिनि ' इ. ), वाक्यपदीय ( पा. ५ यदुक्तं वाक्यपदीये–' न हि गौः स्वरूपेण गौर्नाप्यगौः, गोत्वाभिसबंधात्तु गौः " इति ), शबरस्वामी ( पा. १० यदुक्तमाचार्यशबरस्वामिना, ' कथं पुनः परशब्दः परत्र वर्तते । स्वार्थाभिधानेनेति ब्रूमः ' । इति ) हे ग्रंथ व ग्रंथकार यांचे उल्लेख मुकुलानें नांवानें किंवा त्यांतील अवतरणें घेऊन केले आहेत. मुकुलभट्ट भट्टकल्लटाचा मुलगा असून प्रतीहारेन्दुराजाचा गुरु होता. भट्टकल्लट हा काश्मीरच्या अवन्तिवर्मराजाच्या वेळीं ( इ. स. ८५५–८८३ ) उदयास आला. त्याच्यासंबंधानें राजतरंगिणीकार म्हणतो, ' अनुग्रहाय लोकानां भट्टाः श्रीकल्लटादयः । अवंतिवर्मणः काले सिद्धा भुवमवातरन् ' ॥ ( ५,६६ ). कल्लटाचा पुत्र मुकुल अर्थात् दहाव्या शतकाच्या प्रथम चरणांत उदयास आला असें ठरतें. माणिक्यचंद्रानें काव्यप्रकाशसङ्केत नामक काव्यप्रकाशावरील आपल्या टीकेंत मुकुलाच्या अभिधावृत्तिमातृकेंतून बरींच अवतरणें घेतलीं आहेत.

## १७ भट्टतौतकृत काव्यकौतुक

ध्वन्यालोकाच्या वर्णनांत त्याच्यावरील लोचन टीकेचा विचार करितांना लोचनकार अभिनवगुप्ताच्या अनेक गुरूंत **भट्टतौत** नांवाचा एक गुरु होता व त्यानें **काव्यकौतुक** नांवाचा ग्रंथ लिहिल्याचा लोचनांत उल्लेख आहे (पा. २९) हें सांगितलेंच आहे ( पान १३६ येथें ). त्याचप्रमाणें अभिनवभारतींतही भट्टतौत ( किंवा तोत ) याच्या अनेक मतांचा उल्लेख केलेला आहे हें वर सांगितलेंच आहे. काव्यकौतुकावर विवरण नांवाची लोचनकाराची टीकाहि आहे ( लोचन पा. १७८ ). शांतरस हा मोक्षप्रद असल्यामुळें सर्व रसांत श्रेष्ठ होय असा भट्टतौताच एक सिद्धान्त होता. त्याचा दुसरा सिद्धान्त ' नायकस्य कवेः श्रोतुः समानोनुभवस्ततः ' म्हणजे काव्याचा नायक, त्याचा कर्ता व तें ऐकणारा रसिक या सर्वांना एकसारखाच अनुभव येतो असा होता ( लोचन पा. २९ ). भट्टतौताचा आणखी सिद्धान्त होता कीं काव्याचा विषय श्रोत्याला किंवा वाचकाला इतका आत्मसात् झाला कीं तो विषय प्रत्यक्ष पुढें असल्याची त्याला संवेदना झाली म्हणजे रसोदय होतो असें अभिनवभारतींत ( पान २९१–२९२ येथें )

सांगितलें असून काव्यकौतुकांतील दीड श्लोकही तेथें उद्धृत केला आहे " काव्यार्थविषये हि प्रत्यक्षकल्पसंवेदनोदये रसोदय इत्युपाध्यायाः । यदाहुः काव्यकौतुके ' प्रयोगत्वमनापन्ने काव्ये नास्वादसम्भवः इति, ' ' वर्णनोत्कलिकाभोगप्रौढोक्त्या सम्यगर्पिताः । उद्यानकान्ताचन्द्राद्या भावाः प्रत्यक्षवत्स्फुटाः ॥ ' इति '. ' प्रज्ञा नवनवोन्मेषशालिनी प्रतिभा मता । ' म्हणजे नित्य नवीन कल्पनांना प्रसवून शोभायमान होणारी बुद्धि म्हणजे प्रतिभा अशी त्याची प्रतिभेची व्याख्या **औचित्यविचारचर्चेंत** क्षेमेन्द्राने उद्धृत केली आहे ( औ. वि. च. कारिका ३५ ). हेमचन्द्रानें काव्यानुशासनांत भट्टतौताची तीन पद्यें दिलीं आहेत तीं अशीं:

**' नानृषिः कविरित्युक्तमृषिश्च किल दर्शनात् ।**
**विचित्रभावधर्मांशतत्त्वप्रख्या च दर्शनम् ॥**
**स तत्त्वदर्शनादेव शास्त्रेषु पठितः कविः ।**
**दर्शनाद्वर्णनाच्चाथ रूढा लोके कविश्रुतिः ॥**
**तथाहि दर्शने स्वच्छे नित्येऽप्यादिकवेर्मुनिः ( नेः ? ) ।**
**नोदिता कविता लोके यावज्जाता न वर्णना ॥ '**

सोमेश्वरानेंहि काव्यप्रकाशावरील टीकेंत हे श्लोक दिले आहेत. माणिक्यचंद्रानें काव्यप्रकाशसङ्केतांत भट्टतौताचें म्हणून वचन दिलें आहे तें असें:—

**' प्रज्ञा नवनवोन्मेषशालिनी प्रतिभा मता ।**
**तदनुप्राणनाजीवद्वर्णनानिपुणः कविः ।**
**तस्य कर्म स्मृतं काव्यम् ' इ०** ( म्हैसूर प्रत पा. ७ )

हेमचंद्रानें हें वचन दिलें आहे ( का. शा. पान ३ ) पण तें कोणाचें तें सांगितलेले नाहीं. महिमभट्टाच्या व्यक्तिविवेकाच्या व्याख्येंत ( पा. १३ ) "अनेन कवेः कर्म काव्यमिति काव्यकौतुकविहितां काव्यस्य शब्दव्युत्पत्तिं कविमूलकाव्यत्वप्रतिपादिकां दर्शयति तत्र ह्युक्तं ' तस्य कर्म स्मृतं काव्यम् ' इति ॥ ". ' अनुकरणरूपो रसः ' असें शङ्कुकनामक साहित्यशास्त्रकाराचें जें मत आहे तें भट्टतौताला मान्य नाहीं असें हेमचंद्रानें विवेकनामक टीकाग्रंथांत सांगितलें आहे ( विवेक पा. ५९ ). हीच गोष्ट अभिनवभारती पान ३७ येथें स्पष्ट केली आहे ' तस्मादनियतानुकारो नाट्यमित्यपि न भ्रमितव्यम् । अस्मदुपाध्यायकृते काव्यकौतुकेप्ययमेवाभिप्रायो मन्तव्यो न त्वनियतानुकारोपि । तेनानुव्यवसाय-

विशेषविषयिकार्य नाट्यम् । '. त्याचप्रमाणें पान २७५ येथें शङ्कुकाच्या मताचा भट्टतोतानें खरपूस समाचार घेतल्याचें निवेदन केलें आहे. माणिक्यचंद्र ( पा. ६९ ) व सोमेश्वर यांनींहि तसेंच म्हटलें आहे. भट्टतौत हा इ. स. ९६० पासून ९९० पर्यंतच्या सुमारास उदयास आलेला असून त्याची ध्वन्यालोकावरील टीकाकार जो अभिनवगुप्त त्याच्यावर मोठी छाप बसलेली आढळून येते. काव्यकौतुक हा त्याचा ग्रंथ अद्यापि अप्रसिद्धच आहे. तो उपलब्ध झाल्यास साहित्यशास्त्रविषयक वाङ्मयांत फार महत्वाची भर पडल्यासारखी होईल.

## १८ भट्टनायकप्रणीत हृदयदर्पण

हा ग्रंथ छापिलेला नाहीं व त्याची हस्तलिखित प्रतहि उपलब्ध नाही. इतर ग्रंथांतील त्याच्या उल्लेखांवरूनच त्याचें अस्तित्व दिसून येतें. भरताच्या ' विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः ' या नाट्यशास्त्रांतील सूत्राचे विविध अर्थ ज्या चार ग्रंथकारांच्या ग्रंथांतून काव्यप्रकाशकार मम्मटाने उद्धृत केले आहेत, त्यांतील भट्टनायक हा एक आहे ( वामनाचार्य प्रत पा. ९० उल्लास ४ ). रसाविषयीं भट्टनायकाचें मत ' न ताटस्थ्येन नात्मगतत्वेन रसः प्रतीयते नोत्पद्यते नाभिव्यज्यते अपि तु काव्यनाटये चाभिधातो द्वितीयेन विभावादिसाधारणीकरणात्मना भावकत्वव्यापारेण भाव्यमानः स्थायी सत्त्वोद्रेकप्रकाशानन्दमयसंविद्विश्रांतिसतत्त्वेन भोगेन भुज्यत इति भट्टनायकः ' । या उताऱ्यावरून कळून येते. त्याच्या रसविषयक मताचें याहून सविस्तर आविष्करण अभिनवगुप्ताच्या लोचनांत ( पा. ६७–६८ ) व अभिनवभारतीत ( पा. २७८–२८६ ) पहावयास मिळते. * त्याच्या म्हणण्याचा भावार्थ असा—काव्य अथवा नाटक यांत उपयो

---

* अभिनवभारतीतील भट्टनायकाचे मत थोडक्यांत खाली देत आहो. "भट्टनायकस्त्वाह रसो न प्रतीयते नोत्पद्यते नाभिव्यज्यते । स्वगतत्वेन हि प्रतीतौ करुणे दुःखित्वं स्यात् न च सा प्रतीतिर्युक्ता । सीतादेरविभावत्वात् स्वकान्तास्मृत्यसंवेदनात् ।......तस्मात् काव्ये दोषाभावगुणालंकारमयत्वलक्षणेन नाटये चतुर्विधाभिनयरूपेण निबिडनिजमोहसङ्कटतानिवारणकारिणा विभावादिसाधारणीकरणात्मनाभिधातो द्वितीयेनांशेन भावकत्वव्यापारेण भाव्यमानो रसोनुभवस्मृत्यादिविलक्षणेन रजस्तमोनुवेधवैचित्र्यबलाद् हृदि विस्तारविकासलक्षणेन सत्त्वोद्रेकप्रकाशानन्दमयनिजसंविद्विश्रान्तिविलक्षणेन परब्रह्मास्वादसविधेन भोगेन परं भुज्यत इति ।".

जिलेल्या शब्दांचीं अभिधा, भावना व भोगीकृति अशीं तीन कार्यें असतात. भोगीकृतीला रसचर्वणा किंवा भोग असेंहि म्हणतात. अभिधा म्हणजे सरळ दिसणारा अर्थ; हें कार्य काव्यांत दिसतें तसें शास्त्रांतहि असतें. भावनेमुळें रसोद्दीपन करणाऱ्या नायिका इत्यादि गोष्टी म्हणजे विभाव त्या व्यक्तिस्वरूप बाजूला ठेवून सामान्य रूपानें म्हणजे साध्वी पतिव्रता सुंदर स्त्री अशा रूपानें मनोभूमिकेवर उभ्या रहातात. तिसरा व्यापार जो भोगीकृति किंवा भोग तो त्यापुढें येतो व त्यामुळें वाचक, श्रोता किंवा प्रेक्षक याला स्वतःला कांहीं अनुभव येऊं लागतो. हा अनुभव ब्रह्मानंदाप्रमाणें केवळ स्वसंवेद्य असून त्याचें वर्णन शब्दांनीं करितां येत नाहीं. या अनुभवामुळें तो सहृदय वाचक किंवा प्रेक्षक क्षणमात्र स्वतःला विसरून वर्ण्य विषयांशीं तादात्म्य पावतो. हाच रसानुभव होय. या विषयासंबंधानें भट्टनायकाच्या म्हणून पुढील कारिका हेमचंद्र ( विवेक पा. ६१ ) व जयरथ ( अलंकारसर्वस्वविवरण पा. ९ ) यांनी दिल्या आहेत:—

‘ अभिधा भावना चान्या तद्भोगीकृतिरेव च ।
अभिधाधामतां याते शब्दार्थालंकृती ततः ॥
भावनाभाव्य एषोऽपि शृंगारादिगणो मतः ।
तद्भोगीकृतिरूपेण व्याप्यते सिद्धिमान्नरः ॥ ’*

भट्टनायकानें हृदयदर्पण ग्रंथ लिहिला असें अनेक प्रमाणांवरून दिसून येतें. अभिनवभारतींत नाटयशास्त्राच्या पहिल्या श्लोकावरील ( प्रणम्य शिरसा देवौ पितामहमहेश्वरौ । नाटयशास्त्रं प्रवक्ष्यामि ब्रह्मणा यदुदाहृतम् ॥ ) टीकेंत भट्टनायकाचें अद्वैतवेदान्तपर व्याख्यान देऊन तें व्याख्यान हृदयदर्पणांत त्यानें अंगिकारिलें आहे असें सांगून त्याचा पहिला श्लोक ( किंवा प्रास्ताविक श्लोकांतील एक ) उद्धृत केला आहे. ज्याप्रमाणें कल्पनामात्रसार असें कविनिबद्ध रामरावणादिचारित अद्भुत असें भासतें व तसे भासूनहि पुरुषार्थ सिद्ध करितें त्याप्रमाणें हें नामरूपात्मक विश्व श्रवणमननादिकांच्या योगानें परमपुरुषार्थसाधन होतें म्हणून श्लोकांत शान्तरस सूचित आहे व हेंच या शास्त्राचें ( नाटय० ) परमप्रयोजन होय असें भट्टनायकाचें मत आहे व तेंच त्यानें आपल्या हृदयदर्पणांत ‘ नमस्त्रैलोक्यनिर्माणकवये शम्भवे यतः । प्रतिक्षणं जगन्नाटयप्रयोगरसिको जनः ॥ ’ या श्लोकांत ग्रथित केलें आहे ( अभिनवभारती पा. ४, ५ ). लोचनांत भट्टनायकाचीं कित्येक

* हे दोन्ही श्लोक अभिनवभारतींत आहेत ( पा. २७९ )

पद्यें दिलीं असून त्यांत शास्त्र व आख्यान एका बाजूला व काव्य दुसऱ्या बाजूला घेऊन त्यांतील भेद दर्शविला आहे, ती अशी.—

'शब्दप्राधान्यमाश्रित्य तत्र शास्त्रं पृथग्विदुः।
अर्थतत्त्वेन युक्तं तु वदन्त्याख्यानमेतयोः॥
द्वयोर्गुणत्वे व्यापारप्राधान्ये काव्यधीर्भवेत्॥

( लोचन पा. २७ ). हीं पद्ये हेमचंद्राने ( का शा. पा. ३ ) हृदयदर्पणांतील म्हणून दिलीं आहेत. अलंकारसर्वस्वांत ( पा. ९ ) भट्टनायकाचें मत संक्षेपानें सांगितले आहे. तो म्हणतो, 'भट्टनायकेन तु व्यङ्ग्यव्यापारस्य प्रौढोक्त्याभ्युपगतस्य काव्यांशत्वं ब्रुवता न्यग्भावितशब्दार्थस्वरूपस्य व्यापारस्यैव प्राधान्यमुक्तम् । तत्राप्यभिधाभावकत्वलक्षणव्यापारद्वयोत्तीर्णो रसचर्वणात्मा भोगापरपर्यायो व्यापारः प्राधान्येन विश्रान्तिस्थानतयाऽङ्गीकृतः।' ( त्रिवेन्द्रम् सं. ग्रं. मा. ). हें मत सागतांना जयरथ या अलंकारसर्वस्वावरील टीकाकारानें ते हृदयदर्पणकाराचें म्हणून सांगितलें आहे ( का. मा. 'यद्यपि वक्रोक्तिजीवित-हृदयदर्पणकारावपि ध्वनिकारानन्तरभाविनावेव'। पा. १२ ). व्यक्तिविवेककार महिमभट्ट म्हणतो कीं, हृदयदर्पण न पहातांच ध्वन्यालोकाच्या खंडनार्थ आपण आपला ग्रंथ रचिला, 'सहसा यशोभिसर्तुं समुद्यताऽदृष्टदर्पणा मम धीः। स्वालंकारविकल्पप्रकल्पने वेत्ति कथमिवावद्यम्'॥ ( त्रिवेन्द्रम् सं. ग्रं. मा. पान १ ). यांत अभिसर्तुम् म्हणजे अभिसारिके प्रमाणें इष्ट स्थळीं जावयासाठीं व दर्पण म्हणजे आरसा ( व हृदयर्पण ग्रंथ ) असे अर्थ गर्भित आहेत. यावर रुय्यक आपल्या टीकेंत म्हणतो, 'दर्पणो हृदयदर्पणाख्यो ध्वनिध्वंसग्रन्थोऽपि' ( पा. १ ). या वरून भट्टनायकाने हृदयदर्पण हा ग्रंथ ध्वनिकल्पनेचें खंडन करण्याच्या हेतूनें लिहिला होता असे अनुमान होते. ध्वन्यालोकांतील 'भम धम्मिअ ( पा. १६ ) इत्यादि उदाहरणावरील भट्टनायकाच्या विरोधी टीकेचा लोचनकारानें ( पा. १६ ) उल्लेख केला असून ती बद्दल शेवटीं त्याला टोमणाहि मारिला आहे ( पा. २० ) तो म्हणतो 'किं च वस्तुध्वनिं दूषयता रसध्वनिस्तदनुग्राहकः समर्थ्यत इति सुष्ठुतरां ध्वनिध्वंसोऽयम्'। या ठिकाणीं वस्तुध्वनि नाहीं असा दोष काढून रसध्वनि या वाक्यांत आहे असें या श्लोकाचें जें व्याख्यान भट्टनायकाने केले ( लोचन पान १९ पहा ) तें ध्वनिकल्पनेचें चांगलेंच खंडन म्हणावयाचें. ध्वन्या-

लोकाशीं भट्टनायकाचा जो मोठा विरोध आहे तो ध्वनि हा लक्षणातीत असून स्वसंवेद्य आहे असें मानण्यांत आहे. म्हणजे ध्वनिकारिकांत 'ध्वनितत्त्व वर्णनातीत आहे असें कित्येक म्हणतात' ( केचिद्वाचां स्थितमविषयते तत्त्वमूचुस्तदीयम् । ) या शब्दांनीं व ध्वन्यालोकांत 'केचित्पुनर्लक्षणकरणशालीनबुद्धयो ध्वनेस्तत्त्वं गिरामगोचरं सहृदयहृदयसंवेद्यमेव समाख्यातवन्तः' या शब्दांनीं ज्यांचा उल्लेख केला आहे त्यांच्या संप्रदायाचा भट्टनायक हा अनुयायी होता असें ठरतें. त्याच्या मतें काव्याचा आत्मा म्हणजे रसचर्वणा हीच होय. ध्वनि हा काव्याचा आत्मा हें तत्त्व तो मुळींच मान्य करीत नाहीं .'ध्वनिर्नामापरो योऽपि व्यापारो व्यञ्जनात्मकः । तस्य सिद्धेऽपि भेदे स्यात्काव्याङ्गत्वं न रूपिता' ( लोचन पा. ११, १५; जयरथ पा. ९ ). भट्टनायक व हृदयदर्पण यांचे उल्लेख बहुधा खंडनासाठीं लोचनकारानें अनेक ठिकाणीं केले आहेत. पूर्वीं दिलेल्या शिवाय आणखी उल्लेख आहेत ते असेः—'काव्ये रसयिता सर्वो न बोद्धा न नियोगभाक् (पा. १२), "यत्त्वाह भट्टनायकः–'अहमित्यभिनयविशेषेणात्मदशावेदनाच्छाब्दमेतदपि'। (पा. २१); "एतदेवोक्तं हृदयदर्पणे 'यावत्पूर्णो न चैतेन तावन्नैवैवम्' इति' (पा. २७); "तेनैतन्निरवकाशं यदुक्तं हृदयदर्पणे 'सर्वत्र तर्हि काव्यव्यवहारः स्यात्'। (पा. ३८); 'यदाह भट्टनायकः "वाग्धेनुर्दुग्ध एकं हि रसं यल्लाभतृष्णया । तेन नास्य समः स स्याद् दुह्यते योगिभिर्हि यः"।' (पा. २९); 'तेन यद्भट्टनायकेन द्विवचनं दूषितं तद्गजनिमीलिकयैव ।' (पा. ३३). यांतील द्विवचनाचा संबंध 'व्यङ्क्तः' या ध्वनिकारिकेतील (१, १३) पदाशीं आहे व लोचनकाराच्या या वाक्यावर महिमभट्टानें व्यक्तिविवेकांत विरोधी टीका केली आहे (व्य. वि. पान १९ 'अत्र केचिद्विद्वन्मानिनो.........इति यदाहुस्तद्भ्रान्तिमात्रमूलं न तत्त्वमिति अलमवस्तुनिर्बंधेन'); "भट्टनायकेन तु यदुक्तं–'इवशब्दयोगाद्गौणताप्यत्र न काचित् तच्छ्लोकार्थमपरामृश्य"। (पा. ६३ 'निश्वासान्ध इवादर्शः' यावरील टीका); यत्तु हृदयदर्पणे उक्तम्–'ह हा हेति संरंभार्थोयं चमत्कार इति' (पा. ६३, स्निग्धश्यामल इत्यादि पद्यावरील टीका). या उताऱ्यांवरून असें दिसून येईल कीं हृदयदर्पण हा ग्रंथ गद्यपद्यात्मक असून साहित्यशास्त्रविषयक एका सिद्धान्ताची स्थापना करावी व ध्वन्यालोकांतील मताचें खंडन करावें या हेतूनें रचिलेला होता. भट्टनायक हा अद्वैतवेदान्ती असावा असें वर म्हटलेंच

आहे व त्यानें जैमिनिसूत्रांवर ग्रंथ लिहिला असावा किंवा त्यांचा त्यानें खोल अभ्यास केला असावा असें लोचनांतील पान ६३ वरील त्याला मारलेल्या टोमण्यावरून वाटतें 'भट्टनायकेन तु यदुक्तम् । इवशब्दयोगाद्गौणताप्यत्र न काचिदिति । तच्छ्लोकार्थमपरामृश्य । आदर्शचन्द्रमसोर्हि सादृश्यमिवशब्दो द्योतयति ( निःश्वासान्ध इवादर्शश्चन्द्रमा न प्रकाशते ' या ओळीत )। निश्वासान्ध इति चादर्शविशेषणम् । इवशब्दस्यान्धार्थत्वेन योजने आदर्शश्चन्द्रमा इति उदाहरणं भवेत् । योजनं चैतदिवशब्दस्य क्लिष्टम् । न च निःश्वासेनान्ध इवादर्शः स इव चन्द्र इति कल्पना युक्ता । जैमिनीयसूत्रे ह्येवं योज्यते न काव्येपीत्यलम् । '. माणिक्यचद्राने काव्यप्रकाशावरील सङ्केतांत ( पा. १४७ ) लोल्लट, शङ्कुक व भट्टनायक त्याचें वर्णन देणारे श्लोक दिले आहेत ते असे-' न वेत्ति तस्य गांभीर्य गिरितुङ्गोऽपि लोल्लटः । तत्तस्य रसपाथोधेः कथं जानातु शङ्कुकः ॥ भोगे रत्यादिभावानां भोगं स्वस्योचितं ब्रुवन् । सर्वथा रससर्वस्वमभाङ्क्षीद्भट्टनायकः । '. महिमभट्टाच्या व्यक्तिविवेकाच्या टीकेंत ( पा. १३ ) " हृदयदर्पणे च तत्कर्ता च कविः प्रोक्तो भेदेऽपि हि तदस्ति यत्' इति काव्यमूलं कवित्वं प्रतिपादितम् । " असा हृदयदर्पणाचा निर्देश केला आहे. भट्टनायकाच्या मताचा अनुवाद दशरूपकाची टीका व भावप्रकाशन यांतही केलेला आहे.

भट्टनायकाचा उदयकाल ध्वन्यालोकानंतर आणि लोचनापूर्वी म्हणजे इ. स. ९०० पासून १००० पर्यंतच्या काळांत केव्हां तरी होता. त्याच्या विषयी लोचनकारानें वैयक्तिक कटु शब्द योजिले आहेत, यावरून तो ध्वन्यालोकापेक्षां लोचनाच्याच अधिक जवळचा असावा असे अनुमान होतें. तो अभिनवगुप्ताचा समकालीन किंवा जरा पूर्वीचा असेल तर राजतरंगिणीत ( ५, ५९ ) ' द्विजस्तयोर्नायकाख्यो गौरीशसुरसद्मनोः । चातुर्विद्यः कृतस्तेन वाग्देवीकुलमन्दिरम् ॥ ' असा ज्या भट्टनायकाचा उल्लेख आहे, त्याहून हा हृदयदर्पणकार भट्टनायक निराळा असला पाहिजे. कारण राजतरंगिणींतील भट्टनायक काश्मीरच्या शंकरवर्म्याच्या राजवटींत म्हणजे इ. स. ८८३ पासून ९०२ पर्यंत होऊन गेलेला आहे. तथापि या संबंधानें निश्चित मत देणें कठीण × वाटतें.

---

× मद्रास येथलि 'जर्नल ऑफ ओरिएन्टल रिसर्च' व्हा. १ पान २६७-२७६ येथें ' भट्टनायकाचे अवशिष्ट ' यावर प्रो. टी. आर. चिंतामणि यांचा अलीकडे लेख आला आहे तो पहावा.

# १९ वक्रोक्तिजीवित*

ह्या साहित्यशास्त्रावरील महत्वाचा ग्रंथ कुंतकानें रचिलेला आहे. ग्रंथकाराचें नांव कुंतल व कुंतलक असेंहि आढळते. आजवर तो इतर ग्रंथकारांनीं त्यांतून घेतलेल्या अवतरणांच्या द्वाराच माहीत होता. त्याची हस्तलिखित प्रत मद्रास येथें असून तिच्यावरून केलेली प्रत डॉ. बेलवलकर यांच्याकडून आम्हांला मिळाली व तीवरून त्या ग्रंथाचें वर्णन आम्हीं केलें आहे. आम्हांला मिळालेली प्रतहि अपुरी व ठिकठिकाणीं गलितशब्द अशी होती तथापि ग्रंथाचें स्वरूप समजण्यास अडचण पडण्याइतकी ती वाईट नव्हती.

इतर साहित्यग्रंथांप्रमाणेंच वक्रोक्तिजीविताचेहि कारिका, वृत्ति व उदाहरणें असे तीन भाग असूत उदाहरणे बहुतेक पूर्वींच्या ग्रंथांतून घेतलेलीं आहेत. या ग्रंथाचे उन्मेष नांवाचे पांच भाग असावे असें वाटतें. आमच्या प्रतींत चवथ्या उन्मेषाचे जवळ जवळ शेवटापर्यंतचा भाग आहे. मद्रास येथील प्रतीतहि अर्थात् एवढाच भाग आहे. या ग्रंथांतील कारिका वृत्ति व उदाहरणें यांची निवड या सर्वांचा कर्ता कुंतकच होय ही गोष्ट अनेक प्रमाणांवरून दिसून येते. व्यक्तिविवेकांत (पा. २८) 'शब्दार्थौ सहितौ...तद्विदाल्हादकारिणि' इत्यादि पद्य देऊन वक्रोक्ति ह्राच काव्याचा आत्मा असे कित्येक जण म्हणतात असें सांगितलें आहे (शास्त्रादिप्रसिद्धशब्दार्थोपनिबन्धव्यतिरेकि यद्वैचित्र्यं तन्मात्रलक्षणं वक्रत्वं नाम काव्यस्य जीवितमिति सहृदयमानिनः केचिदाचक्षते), तसेंच पुढे (पा. ३७) 'संरंभः करिकीटमेघशकलोद्देशेन सिंहस्य यः' इत्यादि श्लोक देऊन त्यांतील बरेच

* आमचा मूळ ग्रंथ लिहून झाल्यावर 'वक्रोक्तिजीविता'चे दोन उन्मेष प्रो. सुशिलकुमार दे यांनीं कलकत्ता येथें १९२३ सालीं छापिले आहेत (कलकत्ता ओरिएन्टल सीरीज) व त्याला विस्तृत प्रस्तावना ही त्यांनीं लिहिली आहे. आम्हीं ज्या मद्रासच्या हस्तलिखिताची प्रत मिळविली त्यावरूनच प्रो. दे ह्यांनीं दोन उन्मेष छापिले आहेत. वक्रोक्तिजीविताचे पांच उन्मेष असावे असें आम्हीं अनुमान केलें होतें तें प्रो. रामकृष्ण कवि यांनीं प्रो. दे यांस या हस्तलिखित मूळ प्रतीबद्दल जें पत्र लिहिलें त्यावरून खरें ठरतें (प्रो. दे यांची प्रस्तावना पान ५ टीप ८ पहा).

दोष दाखविल्यावर ' काव्यकाञ्चनकषाश्ममानिना कुन्तकेन निजकाव्यलक्ष्माणि । यस्य सर्वनिरवद्यतोदिता श्लोक एष स निदर्शितो मया । ' ( काव्यसुवर्णाचा निकष आपण आहों अशी घमेंड बाळगणाऱ्या कुंतकानें सर्वथैव निर्दोष म्हणून आपल्या काव्यलक्षणांत सांगितलेला हा श्लोक किती सदोष आहे हें मी दाखवून दिलें आहे ) असा उपसंहार केला आहे. हे दोन्ही श्लोक व ' शास्त्रादिप्रसिद्ध..... व्यतिरेकि ' हे शब्द वक्रोक्तिजीवितांत असून दुसरा उत्तम काव्याचें उदाहरण म्हणून दिलेला आहे ( दे यांची आवृत्ति पा. ७, १४, १७ ). यावरून दिसून येतें कीं, वक्रोक्तिजीवितांतील लक्षणें ( लक्ष्म ) सांगणाऱ्या कारिका व उदाहरणांची निवड हीं महिमभट्टाच्या मतें कुंतकाचींच होत. महिमभट्ट हा कुंतकानंतर लवकरच झालेला आहे हें पुढें दाखविण्यांत येईल. व्यक्तिविवेकावरलि टीकेंत (पा. १६) ' अयं श्लोको वक्रोक्तिजीविते वितत्य व्याख्यात इति तत एवावधार्यः' असे ' संरभः ' इत्यादि श्लोकाविषयीं लिहिलें आहे, त्यावरून व्याख्यारूप वृत्ति व श्लोक हे वक्रोक्तिजीविताचेच भाग होत असें त्या टीकाकाराचें मत दिसून येतें. एकावलि ग्रंथांत 'एतेन यत्र कुंतकेन भक्तावंताभावितो ध्वनिस्तदपि प्रत्याख्यातम्' असें म्हटले आहे ( पा. ५१ ). सोमेश्वरानें काव्यप्रकाशटीकेंत कुन्तकाची (कुन्तक?) म्हणून दोन पद्यें दिलीं आहेत, व ती दोन्ही वक्रोक्तिजीविताच्या प्रतीत सांपडतात. माणिक्यचद्रानें (पा.४०-४१) " 'तरन्तीवाङ्गानि स्खलदमललावण्यजलधौ ' इत्यत्र सादृश्योपचारमूचे यथा चोपचारस्तथा वक्रोक्तिजीवितग्रंथाज्ज्ञेयः ।" असा वक्रोक्तिजीविताचा उल्लेख केला असून ' तरन्तीवाङ्गनि ' हें पद्य उपचारवक्रतेचें उदाहरण म्हणून वक्रोक्तिजीवितांत आलें आहे व त्यावर ' अत्र...चेतनपदार्थसंभावि सादृश्योपचारात्ताऽण्यतरलतरुणीगात्राणां तरणमुत्प्रेक्षितम् ' असें स्पष्टीकरण त्यांत केलें आहे. ( प्रो. दे. प्रत पान ९९ ). वृत्ति व कारिका या कुंतकाच्याच होत या विषयीं अंतःप्रमाणहि आहे तें असें की, पहिल्या उन्मेषाच्या १४ कारिकांनंतर पंधरावीला आरंभ करण्यापूर्वी ' अन्यच्चाभ्युपगम्यापि ब्रूमः ' ( दे. प्रत पा. २३ ) असा प्रथमपुरुषी प्रयोग करून पुढील कारिका दिली आहे. १६ व्या कारिकेसंबंधानेंहि पुनः ' प्रकृतमनुसरामः ' व आणखी तिसऱ्या उन्मेषांत ( ७ वी कारिका ) ' वदामहे ' असे प्रथमपुरुषीं प्रयोग आहेत. पहिल्या व दुसऱ्या उन्मेषांत शेवटीं ' इति राजानककुंतलविरचिते वक्रोक्तिजीविते काव्यालंकारे प्रथमोन्मेषः ' व 'इति श्रीकुंतलविरचिते वक्रोक्तिजीविते द्वितीय

उन्मेषः ' असे उपसंहारात्मक शब्द आहेत. हा ग्रंथ अद्यापि समग्र छापिलेला नसल्यामुळें त्याचें सार येथें थोडेसें विस्तारपूर्वक देऊं.

उन्मेष पहिला—कविमुखरूपी नाट्यमंदिरांत लास्य करणाऱ्या वाग्देवीला नमन करून ग्रंथकारानें काव्यालंकार नामक ग्रंथाला प्रारंभ केला आहे. लोकोत्तर चमत्कृति उत्पन्न करणारे जें वैचित्र्य तद्विषयक सिद्धान्त प्रस्थापित करण्यासाठीं हा ग्रंथ रचिला असून त्यांत प्रारंभीं ग्रंथनाम व वर्ण्यविषय हे सांगितले आहेत. काव्यरचना ही धर्मादि पुरुषार्थांच्या प्राप्तीचें साधन असून हृदयाला आल्हादहि देणारी आहे. व्यवहारी पुरुषांना व्यवहाराचें रम्यत्व उत्तम काव्यावरूनच कळून येतें. कारण त्यांत नवीन नवीन प्रकारचें त्या त्या प्रसंगाला व त्या भूमिकेला अनुरूप असे औचित्य वर्णिलेले असते. काव्यामृताच्या आस्वादानें जो चमत्कृतिजनक असा मनावर परिणाम घडून येतो तो चारी पुरुषार्थांचीं जी फळें त्यांच्या भोगाने होणाऱ्या आनंदापेक्षांहि श्रेष्ठ आहे. शास्त्रें कडू औषधासारखीं होत; ती रोग हरण करितात, पण घेण्याला रुचकर नसतात; पण काव्य हें अमृतासारखे म्हणजे ध्यावयाला गोड आणि अविवेकरूपी रोगाचा नाश करणारें असें असते. अलंकार व अलंकार्य यांचा पृथक् विचार करून काव्यचिकित्सा करावयाची आहे. वस्तुतः या दोन गोष्टी अलग असत नाहींत म्हणजे अलंकारयुक्त जें असतें तेंच काव्य होऊं शकतें. पण विवेचनाच्या सोईसाठीं त्यांचा पृथक् विचार करावयाचा एवढेच.* रसिकांच्या मनाला आल्हाद उत्पन्न होईल अशी रचना करून कवीनें कुशलतेनें योजिलेले शब्द व त्यांचे अर्थ यांच्या संयोगानें काव्य होतें. सालंकृत शब्द आणि अर्थ मिळून काव्य होतें;

---

* १ वन्दे कवीन्द्रवक्त्रेन्दुलास्यमंदिरनर्तकीम् । देवीं सूक्तिपरिस्पंदसुन्दराभिनयोज्ज्वलाम् ॥ २ काव्यस्यायमलंकारः कोऽप्यपूर्वो विधीयते । ३ लोकोत्तरचमत्कारकारिवैचित्र्यसिद्धये । ४ धर्मादिसाधनोपायः सुकुमारक्रमोदितः । काव्यबंधोऽभिजातानां हृदयाल्हादकारकः ॥ ५ व्यवहारपरिस्पन्दसौंदर्य व्यवहारिभिः । सत्काव्याधिगमादेव नूतनौचित्यमाप्यते ॥ ६ कटुकौषधवच्छास्त्रमविद्याव्याधिनाशनम् । आल्हाद्यमृतवत्काव्यमविवेकगदापहम् ॥ ७ सालंकारस्य काव्यता । ८ शब्दार्थौ सहितौ वक्रकविव्यापारशालिनि । बन्धे व्यवस्थितौ काव्यं तद्विदाल्हादकारिणि ॥. भामह ( १.१६ ) म्हणतो ' शब्दार्थौ सहितौ काव्यं '.

म्हणून अलंकार हे काव्यावर चढविले असतात असें म्हणणें बरोबर नाहीं; × कारण तसें म्हटल्यानें अलंकारांवांचून काव्य असूं शकतें असें मान्य केल्यासारखें होतें. ' ततोरुणपरिस्पन्दमदक्लितवपुः शशी । दध्रे कामपरिक्षामकामिनीगण्ड-पाण्डुताम् ' ॥ हें पद्य काव्याचें उदाहरण होय ( हे पद्य काव्यमीमांसा, काव्य-प्रकाश, हेमचंद्राचें काव्यानुशासन यांतहि उद्धृत केलेलें आहे ). वक्रोक्तीचे कार्य ' शब्दो विवक्षितार्थैकवाचकोन्येषु सत्स्वपि । अर्थः सहृदयाल्हादकारी स्वस्पन्द-सुंदरः ॥ उभावेतावलंकार्यौ तयोः पुनरलंकृतिः । **वक्रोक्तिरेव वैदग्ध्यभङ्गी-भणितिरुच्यते** ॥' * असें आहे. इष्ट अर्थ व्यक्त करणारा शब्द व स्वभावतः रमणीय व रसिकमनमोहक असा अर्थ यांना अलंकृत करणारें जें कुशल व चमत्कृतिजनक वर्णन त्यालाच वक्रोक्ति म्हणतात. या संबंधानें वक्रोक्तिजीवि-ताच्या वृत्तींत ' वक्रोक्तिः प्रसिद्धाभिधानव्यतिरेकिणी विचित्राभिधा वैदग्ध्यं कवि-कौशलं तस्य भंगी विच्छित्तिः । ' असें म्हटलें आहे. नित्याच्या सामान्यवर्णन-रीतीहून वेगळी व तीहून वरिष्ठ पदवीची जी चमत्कृतिपूर्ण वर्णनपद्धति कवि-कौशल्यामुळें रमणीय होते, ती वक्रोक्ति होय. सामान्य पद्धतीपेक्षां वेगळ्या प्रकारची ती असल्यामुळे तिला वक्र उक्ति असें सार्थ नांव देण्यांत आलें आहे. रसिकांच्या मनाला आनंद देणाऱ्या काव्याचे उदाहरण ' तामभ्यगच्छद्रुदिता-नुसारी मुनिः कुशेध्माहरणाय यातः । निषादविद्धाण्डजदर्शनोत्थः श्लोकत्व-मापद्यत यस्य शोकः ॥ ( रघु. १४, ७० ) हा कालिदासाचा श्लोक होय. यांत वाल्मीकिऋषींचें नांव प्रत्यक्ष न सांगतां ' पारध्यानें बाणानें विद्ध केलेला पक्षी पाहून उत्पन्न झालेला ज्याचा शोक काव्यरूपानें परिणत झाला ' या शब्दांनीं तें सुचविलें असून तो दयार्द्र अंतःकरणाचा होता हेंहि दर्शविलें आहे. रसिकांच्या मनाला आनंद न देणाऱ्या काव्याचें उदाहरण ' सद्यः पुरीपरिसरेण शिरीषमृद्वी सीता जवात्त्रिचतुराणि पदानि गत्वा ॥ गन्तव्यमद्य कियदित्यसकृद् ब्रुवाणा रामाश्रुणः कृतवती प्रथमावतारम् ॥ ( बालरामायण ६, ३४ ) ' हे होय. यांत

---

× सालंकारस्यालंकरणसहितस्य सकलनिरस्तावयवस्य सतः समुदायस्य काव्यता कविकर्मत्वम् । तेन अलंकृतस्य काव्यत्वमिति स्थितिः, न पुनः काव्यस्यालंकार-योग इति ।

* यांतील शेवटची ओळ जयरथानें अलंकारसर्वस्वाच्या टीकेंत ( पा. ८ ) उद्धृत केली आहे.

अति सुकुमार अशा सीतेनें चार दोन पावलें गेल्यावर पुनः पुनः 'आतां आणखी किती जावयाचें आहे' असें विचारिल्यामुळें ही दमली असली तरी चालण्या-शिवाय गत्यन्तर नाहीं असें होऊन रामाला वाईट वाटलें व त्याच्या डोळ्यांतून अश्रु आले हें वर्णन सीतेच्या निश्चयाला जुळणारें नाहीं, व त्यांतील 'असकृत्' म्हणजे पुनः पुनः या शब्दाचें स्वारस्य नाहीं, कारण सीतेनें एकदां तसें म्हटल्या नेंहि रामाच्या डोळ्यांतून अश्रु येणें स्वाभाविक होतें. स्वभावोक्ति हा अलंकार समजण्यांत अर्थ नाहीं. स्वभावोक्तीलाच अलंकार समजलें तर मग अलंकृत करावयाचें ते काय ? आणि मग दुसरे अलंकार असल्यास सङ्कर किंवा संसृष्टि ही ठेवलेलीच.* व्याख्येंत 'शब्दार्थौ सहितौ' असे जे शब्द आलेले आहेत (१, ८) त्यांतील शब्द व अर्थ यांचा विचार केल्यावर 'सहितौ' पदाचे स्पष्टीकरण केलें आहे. शब्द व अर्थ संयुक्त असतील तरच त्यांच्यामुळें ज्ञान स्फुरतें, × ही गोष्ट प्रसिद्ध असल्यामुळें 'सहितौ' या शब्दाची व्याख्येत वस्तुतः जरूरी नाहीं असें वाटेल. पण या ठिकाणीं साहित्य किंवा संयोग याचा अर्थ 'साहित्यमनयोः शोभा-शालितां प्रति काप्यसौ । अन्यूनातिरिक्तत्वमनोहारिण्यवस्थितिः ।' (१,१८) असा आहे. शब्दार्थांचें साहचर्य रमणीय व चमत्कृतिजनक असेल तर तें या व्याख्येंत अभिप्रेत आहे. हें साहचर्य वाचकाचे दुसऱ्या वाचकाशी व वाच्यांचं दुसऱ्या वाच्याशीं असे पाहिजे, वाचकाचे दुसऱ्या वाच्याशी किंवा वाच्याचें दुसऱ्या वाचकाशी असें नसावें. $ सुकुमार आदिकरून मार्गांनी व सुंदर माधुर्यादि गुणांनी मंडित आणि वक्रतेच्या अतिशयाने युक्त अशी अलंकाराची ठेवण आणि

* अलंकारकृतां येषां स्वभावोक्तिरलंकृतिः । अलंकार्यतया तेषां किमन्यद-वतिष्ठते ॥ (१, १२) शरीरं चेदलंकारः किमलंकुरुते परम् । आत्मैव नात्मनः स्कन्धं क्वचिदप्यधिरोहति ॥ १४ स्पष्टे सर्वत्र संसृष्टिरस्पष्टे सङ्करस्ततः । अलंकारान्तराणां च विषयो नावशिष्यते ॥ १६ ॥

× शब्दार्थौ सहितावेव प्रतीतौ स्फुरतः सदा । सहिताविति तावेव किमपूर्वं विधीयते ॥ (१, १७)

$ तत्र वाचकस्य वाचकान्तरेण वाच्यस्य वाच्यान्तरेण साहित्यमभिप्रेतम् ।... ननु च वाचकस्य वाच्यान्तरेण वाच्यस्य वाचकान्तरेण कथं न साहित्यमिति चेन्न । क्रमव्युत्क्रमे प्रयोजनाभावादसमन्वयाच्च । (वृत्ति)

उपनागरिकादि वृत्ति व औचित्य यांनी मनोहर झालेला रसपरिपोष हीं ज्या वर्णनांत एकमेकांशीं चढाओढ करून रसिकांच्या मनाला परम आल्हाद देतात, त्या अपूर्व वर्णनाला साहित्य म्हणावें असा निष्कर्ष काढिलेला आहे. ' मार्गानुगुण्यसुभगो माधुर्यादिगुणोदयः । अलंकरणविन्यासो वक्रतातिशयान्वितः । वृत्त्यौचित्यमनोहारिरसानां परिपोषणम् । स्पर्धया विद्यते यत्र यथास्वमुभयोरपि ॥ सा काप्यवस्थितिस्तद्विदाह्लादैकनिबन्धनम् । पदादिवाक्यनिस्यंदसारः साहित्यमुच्यते ॥ '. यांत ' वक्रता ' शब्दाचा अर्थ ' वक्रत्वं प्रसिद्धप्रस्थानव्यतिरेकि वैचित्र्यम् ' म्हणजे सामान्य व्यवहारांतील किंवा शास्त्रादिकांतील चालू पद्धतीहून वेगळ्या प्रकारची चमत्कृतिजनक पद्धति असा केलेला आहे. हें जे कविकृत वक्रत्व त्याचे वर्णविन्यासवक्रत्व, पदपूर्वार्धवक्रत्व, प्रत्ययवक्रत्व, वाक्यवक्रत्व, प्रकरणवक्रत्व व प्रबन्धवक्रत्व असे सहा प्रकार आहेत. ÷ ' वर्णविन्यासवक्रत्वं पदपूर्वार्धवक्रता । वक्रतायाः परोऽप्यस्ति प्रकारः प्रत्ययाश्रयः ॥ ( १, २० ) वाक्यस्य वक्रभावोऽन्यो विद्यते यः सहस्रधा । यत्रालंकारवर्गोसौ सर्वोप्यन्तर्भविष्यति ॥ २१॥ वक्रभावः प्रकरणे प्रबन्धेप्यस्ति तादृशः । उच्यते सहजाहार्यसौकुमार्यमनोहरः ।' ॥ २२. यांतील २१ वा श्लोक समुद्रबन्धानें रुय्यकाच्या अलंकारसर्वस्वावरील टीकेंत उद्धृत केला आहे. वर्णविन्यासवक्रता म्हणजे अनुप्रासादिशब्दालंकार, पदपूर्वार्ध० म्हणजे नामविभक्तिप्रत्ययान्त किंवा क्रियाप्रत्ययान्त शब्दाचें जें मूळ रूप अर्थात् नामादि प्रातिपादिक किंवा धातु त्यांतील वैचित्र्य होय. + या साही प्रकारांचे आणखी पुष्कळ पोट प्रकार आहेत, त्यांत वाक्यवक्रतेंत सर्व अर्थालंकारांचा समावेश होतो. तात्पर्य वक्रोक्ति हा काव्याचा आत्मा होय. वक्रोक्तीमुळें काव्याला काव्यत्व येतें. पण कवीच्या अंगीं अवश्य तीं प्रतिभा व कल्पनाशक्ति असल्याविना वक्रोक्ति उदयास येत नसल्यामुळें काव्यांत कविव्यापाराला म्हणजे कवीच्या प्रतिभेला प्राधान्य दिलें पाहिजे. वर जो वैचित्र्य शब्द आला आहे, त्याचें स्पष्टीकरण असें: ' विचित्रो यत्र वक्रोक्तिवैचित्र्यं जीवितायते । परिस्फुरति यस्यान्तः सा काऽप्यतिशयान्विता ॥ ( १, २७ ). वक्रोक्तीमुळें आलेली चम-

---

÷ कविव्यापारवक्रत्वप्रकाराः संभवन्ति षट् । प्रत्येकं बहवो भेदास्तेषां विच्छित्तिशोभिनः ॥ [ १, १९ ] + पदस्य सुबन्ततिङन्तरूपस्य पूर्वार्धं प्रातिपादिकं धातुलक्षणं वा तस्य वक्रता वक्रभावो विन्यासवैचित्र्यम् ।

स्कृति हें ज्याचें जीवित व ज्याला अलौकिक अतिशयोक्तीमुळें शोभा आली आहे असें वर्णन म्हणजे विचित्र होय. या विचित्राचे माधुर्य, प्रसाद ( सोपी व सुसंबद्ध शब्दांनीं केलेली वाक्यरचना ), ओज, लावण्य व आभिजात्य असे विशिष्ट गुण असतात. ' अत्रालुप्तविसर्गान्तैः पदैः प्रोतैः परस्परम् । ह्रस्वैः संयोगपूर्वैश्च लावण्यमतिरिच्यते ' । ( १, ३१ ) व ' यन्नातिकोमलच्छायं नातिकाठिन्यमुद्वहत् । आभिजात्यं मनोहारि तदत्र प्रौढिनिर्मितम् ॥ ( १,३२ ) अशीं लावण्य व आभिजात्य यांचीं लक्षणें होत. * यांतील लावण्याचें लक्षण सोमेश्वरानें काव्यप्रकाशावरील टीकेंत घेतलें आहे. कुन्तकानें वैचित्र्यमार्ग, सुकुमारमार्ग व सौकुमार्यवैचित्र्यसंवलित मार्ग असे तीन मार्ग सांगितले असून तिसऱ्या मिश्र मार्गाला ' मध्यम ' असेंहि म्हटलें आहे: ' मार्गोसौ मध्यमो नाम नानारुचिमनोहरः । स्पर्धया यत्र वर्धन्ते मार्गद्वितयसंपदः ॥ '. या तिन्ही मार्गांचे औचित्य व सौभाग्य असे सामान्य गुण आहेत.

**उन्मेष दुसरा**—या उन्मेषांत प्रथम वक्रतेच्या पहिल्या प्रकाराचा म्हणजे वर्णविन्यासवक्रतेचा सविस्तर ऊहापोह केलेला आहे. पूर्वींच्या अलंकारकारकांनीं ज्यांना अनुप्रासादिक अलंकार म्हटलें आहे त्यांचा कुन्तकाच्या वर्णविन्यासवक्रतेंत अन्तर्भाव होतो. असें त्याच्या ' एको द्वौ बहवो वर्णा बध्यमानाः पुनः पुनः । स्वल्पान्तरा त्रिधा सोक्ता वर्णविन्यासवक्रता ॥ वर्णान्तयोगिनः स्पर्शा द्विरुक्तास्तनलादयः । रेफादिभिश्च संयुक्ताः प्रस्तुतौचित्यशोभिनः ॥ ' या व्याख्येवरून दिसून येईल. ' भग्नैलावल्लरीकास्तरलितकदलीस्तंबताांबूलजम्बूजंबीरास्तालतालीतरलतरलतालासका यस्य जह्नुः । ' इत्यादि पद्य या वक्रतेचें एक उदाहरण म्हणून दिलेलें आहे. ' प्रथममरुणच्छायस्तावत्ततः कनकप्रभः ' इत्यादि उदाहरणहि याच वक्रताप्रकाराचें म्हणून दिलें असून तें काव्यप्रकाशाच्या ६ व्या उच्छ्वासांत शब्दचित्राचें उदाहरण म्हणून उद्धृत केलेलें आहे. कुन्तकाच्या मतें एकाच पद्यांत बरेच अलंकार गुंतविणें हें चांगले नाहीं. वर्णविन्यासवक्रता ' नातिनिर्बंधविहिता नाप्यपेशलभूषिता । पूर्वावृत्तपरित्यागनूतनावर्तनोज्ज्वला ' अशी असावी, म्हणजे तींत आग्रहानें पुनः पुनः तेच वर्ण आणूं नयेत तर ते ओघानें आलेले असावे व त्यामुळें रचना सुंदर झालेली

---

* या सर्व गुणादिकांचीं उदाहरणें येथें विस्तारभयास्तव दिलीं नाहींत.

असावी. या संदर्भात कुन्तकानें ' अलंकारस्य कवयो यत्रालंकरणान्तरम् । असंतुष्टा निबध्नन्ति हारादेर्मणिबंधवत् ॥ ' हा श्लोक दिला असून तो व्यक्तिविवेकाच्या टीकाकारानें वक्रोक्तिजीवितांतील म्हणून उद्धृत केला आहे. उद्भटादि प्राचीन आलंकारिकांनीं सांगितलेल्या उपनागरिकादि वृत्ति म्हणजे वर्णविन्यासवक्रताच होत असें कुन्तक म्हणतो, ' वर्णच्छायानुसारेण गुणमार्गानुवर्तिनी । वृत्तिवैचित्र्ययुक्तेति **सैव प्रोक्ता चिरन्तनैः** । '. यमक हा वर्णविन्यासवक्रतेचाच एक स्थानविशिष्ट ( नियतस्थानशोभि ) प्रकार होय, ' यमको नाम कोप्यस्याः प्रकारः परिदृश्यते । स तु शोभान्तराभावादिह नातिप्रतन्यते ॥ ' ( २,७ ). वर्णविन्यासवक्रतेनंतर पदपूर्वार्धवक्रतेचा विचार आला असून तिचे रूढिवाचित्र्यवक्रतादि प्रकार सांगितलेले आहेत. रूढि म्हणजे प्रसिद्ध अर्थानें योजिलेले शब्द. ' यत्र रूढेरसंभाव्यधर्माध्यारोपगर्भता । सद्धर्मातिशयारोपगर्भत्वं वा प्रतीयते । लोकोत्तरतिरस्कारश्लाघ्योत्कर्षाभिधित्सया । वाच्यस्य सोच्यते काऽपि रूढिवैचित्र्यवक्रता ॥ ' ( २,८–९ ) अशी या वक्रताप्रकाराची व्याख्या असून त्याचे दोन पोट प्रकार आहेत, असंभाव्यधर्माध्यारोपगर्भ व सद्धर्मातिशयारोपगर्भ. ' ताला जाअन्ति ' ( तदा जायन्ते गुणाः ) इत्यादि व ' रामोऽस्मि सर्वं सहे ' ही पहिल्या प्रकारचीं उदाहरणे असून ' ततः प्रहस्याह पुनः पुरंदरं ' ( रघुवंश ३,५१ ) इत्यादि व ' रामोऽसौ भुवनेषु विक्रमगुणैः प्राप्तः प्रसिद्धिं पराम् ' । ( बालरामायण १, ३६ ) इत्यादि दुसऱ्या प्रकाराचीं होत. यांतील पहिल्याची उदाहरणें ध्वन्यालोकांत ( पा. ६२, ६१ ) ' रामोऽसौ ' हें काव्यप्रकाशांत ( ४ था उल्लास ) अशीं उद्धृत केलीं आहेत. यांतील ' ततः प्रहस्य ' इत्यादि श्लोकांच्या ' न खल्वनिर्जित्य रघुं कृती भवान् ' या चरणांतील ' रघु ' शब्द महत्वाचा असून त्यावरून अप्रतिहत प्रभावत्वाचा बोध होतो. × **पर्यायवक्रता** हा पदपूर्वार्धवक्रतेचा आणखी पोट प्रकार असून ' अभिधेयान्तरतमस्तस्यातिशयपोषकः । रम्यच्छायान्तरस्पर्शात्तदलङ्कर्तुमीश्वरः ॥ २, १० ॥ स्वयं विशेषणेनापि स्वच्छायोत्कर्षपेशलः । पर्यायस्तेन वैचित्र्यं पदपर्यायवक्रता ॥ ११ ॥" अशी त्याची व्याख्या केली आहे. पर्याय म्हणजे तोच अर्थ दर्शविणारा दुसरा 'शब्द ( पर्यायप्रधानः शब्दः पर्यायः ) या

× मल्लिनाथानेंहि यावर ' रघुमित्यनेनात्मनो दुर्जयत्वं सूचितम् ' अशी टीप घातली आहे.

प्रकारांत सामान्य प्रसिद्ध शब्दाच्या जागीं त्याचा विशिष्ट गुणदर्शक दुसरा शब्द योजिलेला असतो. 'नानुयोक्तुमनृतं त्वमिष्यसे कस्तपस्विविशिखेषु चादरः । सन्ति भूभृति हि नः शराः परे ये पराक्रमवसूनि वज्रिणः ॥ ' ( किरात १३, ५८ ). हा श्लोक पर्यायवक्रतेचें उदाहरण होय. यांत इन्द्रवाचक अनेक शब्दांपैकीं वज्रिन् शब्दाचा प्रयोग अर्थपोषक आहे. पदपूर्वार्धवक्रतेचा उपचारवक्रता म्हणून आणखी एक विशेष महत्वाचा प्रकार आहे, त्याची व्याख्या अशी:—' यत्र दूरान्तरेऽन्यस्मात् सामान्यमुपचर्यते । लेशेनापि भवत्कांचिद्वक्तुमुद्रिक्तवृत्तिताम् ॥ यन्मूला सरसोल्लेखा रूपकादिरलंकृतिः । उपचारप्रधानासौ वक्रता काचिदुच्यते॥'* ( २,१३–१४ ). उपचार म्हणजे लक्षणा. या प्रकारांत इष्ट अर्थ दर्शविण्यासाठीं त्याचा साक्षाद्वाचक शब्द न योजितां किंचित् साम्य असलेला दुसरा शब्द योजून अर्थाला विशेष रम्यत्व आणिलें असतें. ' स्निग्धश्यामलकांतिलिप्तावियतः ' ( महानाटक ५,७ ), ' गच्छन्तीनां रमणवसतिं' ( मेघदूत ३७ ), ' गगनं च मत्तमेघम् ' इत्यादि या प्रकाराचीं उदाहरणें होत. यातील स्निग्ध, सूचिभेद्य ( सूचिभेद्यैस्तमोभिः ) व मत्त हे, कान्ति तम व मेघ यांना लाविलेले शब्द वास्तविक वाच्यार्थानें नसून उपचारानें किंवा लक्षणेनें होत. ' स्निग्धश्यामल ' व 'गगनं च' हे श्लोक ध्वन्यालोकांत अर्थान्तरसंक्रमितवाच्य व अत्यन्ततिरस्कृतवाच्य या ध्वनिप्रकाराचीं उदाहरणें म्हणून दिलेले आहेत. त्यावरून कुन्तकाचें मत साररूपानें देतांना अलंकारसर्वस्वकारानें 'उपचारवक्रतादिभिः समस्तो ध्वनिप्रपंचः स्वीकृतः' म्हणजे अशा रीतीनें ध्वनिकाराचें म्हणणें कुन्तकानें सर्व मान्य केलें आहे अशी टीप मारली असून जयरथानेंहि 'गगनं च मत्तमेघं' या कुन्तकानें दिलेल्या पद्याचा उल्लेख करून ' अत्र मदनिरहंकारत्वे औपचारिके इति उपचारवक्रतादीनामपि ग्रहणम् ' असें म्हटलें आहे ( मेघाला लाविलेले मद व निरहंकारत्व हे गुण लाक्षणिक असल्यामुळें उपचारवक्रतेचा स्वीकार केलेला आहे ). पदपूर्वार्धवक्रतेचे विशेषणवक्रता व संवृतिवक्रता असे आणखी दोन प्रकार सांगितले आहेत. ' विशेषणस्य माहात्म्यात् क्रियायाः कारकस्य वा । यत्रोल्लसति लावण्यं सा विशेषणवक्रता ' ॥ ( १५ ) अशी पहिल्याची व्याख्या व ' शुचिशीतलचंद्रिकाप्लुताश्चिरनिःशब्दमनोहरा दिशः । प्रशमस्य मनोभवस्य वा

---

* हे श्लोक जयरथानें अलंकारसर्वस्वाच्या टीकेंत घेतले आहेत ( पा. ८ ).

हृदि तस्याप्यथ हेतुतां ययुः ' ॥ हें त्याचें उदाहरण होय. यांत विशेषणाच्या शर्कामुळें क्रिया किंवा कारक यांचें रम्यत्व खुलून दिसतें. ' यत्तु संव्रियते वस्तु वैचित्र्यस्य विवक्षया । सर्वनामादिभिः कैश्चित्सोक्ता संवृतिवक्रता ' ॥ ( १६ ) ही दुसऱ्याची व्याख्या व ' निवार्यतामालि किमप्ययं बटुः ' ( कुमार ५,८३ ) हें त्याचें उदाहरण होय. पदपूर्वार्धवक्रतेचे वृत्तिवैचित्र्यवक्रता, भाववैचित्र्य-वक्रता, लिंगवैचित्र्यवक्रता असे आणखी पोटभेद सांगितले आहेत नंतर प्रत्ययवक्रतेचे कर्त्रन्तरङ्गविचित्रता, क्रियावैचित्र्यवक्रता, कालवैचित्र्यवक्रता, कारकवैचित्र्यवक्रता, संख्यावैचित्र्यवक्रता, पुरुषवैचित्र्यवक्रता, उपग्रहवैचित्र्यवक्रता असे अनेक पोटभेद सांगितले आहेत. त्यांतील लिंगवैचित्र्याचें ' त्वं रक्षसा भीरु यतोपनीता तं मार्गमेताः कृपया लता मे । अदर्शयन्वक्तुमशक्नुवत्यः शाखा-भिरावर्जितपल्लवाभिः । ' ( रघु १३,२४ ) हें उदाहरण होय. यांत रावणानें ज्या मार्गानें सीतेला पळवून नेलें तो मार्ग दाखविणारे वृक्ष नसून लता होत्या असें म्हटल्यानें विशेष रमणीयत्व उत्पन्न झालें आहे. ' वयं तत्त्वान्वेषान्मधुकर हतास्त्वं खलु कृती ' ( शाकु. १ ) हें संख्यावक्रतेचें उदाहरण होय. यांत ' अहं ' न म्हणतां ' वयं ' हें वचन योजिल्यानें रमणीयत्व आलें आहे. उप-ग्रहवैचित्र्यांत उपग्रह म्हणजे ' धातूनां लक्षणानुसारेण नियतपदाश्रयः प्रयोगः ' असा अर्थ दिला असून ' तस्यापरेष्वपि मृगेषु शरान्मुमुक्षोः कर्णान्तमेत्य बिभिदे निबिडोऽपि मुष्टिः । ' ( रघु ९,५९ ) हें उपग्रहवैचित्र्याचें उदाहरण सांगितलें आहे. उपग्रह म्हणजे धातूचा विशिष्टपदीं उपयोग. या उदाहरणांत भिद् धातूचें **बिभिदे** हें आत्मनेपदी रूप कर्मकर्तृकत्व दाखवीत असल्यामुळें चमत्कृतिजनक झालें आहे. 'बिभिदे' म्हणजे आपोआप फुटली.

**तिसरा उन्मेष**—या उन्मेषांत वाक्यवैचित्र्यवक्रतेचा विचार केलेला आहे व त्यासाठीं प्रथम वस्तुवक्रतेचें विवेचन केलें आहे. वस्तुवक्रता म्हणजे काव्यविषयाचा रमणीयपणा. वस्तु किंवा काव्यविषय **सहज किंवा आहार्य** असा असूं शकतो, म्हणजे तो मूळचाच रमणीय असेल किंवा कविप्रतिभेनें त्याला रम्यत्व आणिलेलें असेल ( कविशक्तिव्युत्पत्तिपरिपाकप्रौढ ). तिसऱ्या व चौथ्या उन्मेषांतील कारिका स्वतंत्रपणें या प्रतींत लिहिलेल्या नसून त्यांतील शब्द मात्र वृत्तींत घेतले आहेत; पण त्या शब्दांवरून मूळ कारिकांची जुळणी

करणें कित्येक ठिकाणीं कठीण झालें आहे. 'उदारस्वपरिस्पन्दसुन्दरत्वेन वर्तनम् वस्तुनो वक्रशब्दैकगोचरत्वेन वक्रता'। असा सहज व आहार्य यांतील भेद सांगितला आहे व 'अस्याः सर्गविधौ प्रजापतिरभूच्चंद्रो नु कान्तिप्रदः'। इत्यादि श्लोक ( विक्रमोर्वशीय १, १० ) या दोन्ही वस्तुप्रकारांचें उत्कृष्ट मिश्रण कसें असतें याचें उदाहरण म्हणून दिला आहे. रसादिकांचा उपयोग काव्यांत केल्यानें रमणीयत्व कसें उत्पन्न करितां येतें हें सांगून योग्य ते रस व भाव इत्यादिकांच्या परिपोषानें काव्य रम्य कसें करावें हेंहि दाखविलें आहे. त्यांत 'तिष्ठेत्कोपवशात्' ( विक्रमोर्वशीय ४, ९ ) हा श्लोक व तापसवत्सराज नाटकांतील दुसऱ्या अंकांतील वत्सराजाचे दुःखालाप, हें अनुक्रमें विप्रलंभशृंगार व करुण यांचीं उदाहरणें म्हणून दिले आहेत. 'चूताङ्कुरास्वादकषायकंठः पुंस्कोकिलो यन्मधुरं चुकूज' ( कुमार. ३, ३२ ) आणि 'इदमसुलभवस्तु' ( विक्रमोर्वशीय २, ६ ) हीं उदाहरणें चेतन व अचेतन वस्तूंच्या वर्णनांत रसोद्दीपनाचें सामर्थ्य कसें असतें व त्यामुळें सौन्दर्य कसें होतें हें दाखविण्यासाठीं दिलीं आहेत ( चेतनस्वरूपं रसोद्दीपनसामर्थ्यबंधुरम्, अचेतनानां स्वरूपं रसोद्दीपनसामर्थ्यबंधुरम् ). याच प्रकरणांत रसवत्, प्रेयः, ऊर्जस्वि, समाहित, उदात्त हे पूर्व ग्रंथकारांनीं सांगितलेले अलंकार, खरोखर अलंकार आहेत काय याचा ऊहापोह करून ते अलंकार नव्हत तर अलंकार्य होत असा निर्णय दिला आहे. * 'रसवद्दर्शितस्पष्टशृंगारादिरसं' ( भामह ३, ६ ), 'रसवद्रससंश्रयात्', रसवद्रसपेशलम् ( काव्यादर्श २, २७५ ) इत्यादि रसवत् अलंकाराच्या अनेक लक्षणांचे दोष दाखवितांना कुंतक म्हणजे 'दर्शिताः स्पष्टाः अस्पष्टाश्च शृंगारादयो यत्रेति व्याख्याने काव्यव्यतिरिक्तो न कश्चिदन्यः समासार्थभूतः स लक्ष्यते योऽसावलंकारः।...यदपि रसवद्रससंश्रयात् इति कैश्चिल्लक्षणमकारि तदपि न सम्यक् समाधायितामधितिष्ठति। तथाहि रसः संश्रयो यस्यासौ रससंश्रयः तस्मात् कारणादसौ रसवदलंकारः संपद्यते। तथापि वक्तव्यमेव कोसौ रसव्यतिरेकवृत्तिरन्यः पदार्थः। काव्यमेवेति चेत्तदापि पूर्वमेव प्रत्युक्तम्। तस्य स्वात्मेति क्रियाविरोधादलंकारत्वानुपपत्तेः।......रसपेशलमिति पाठे न किंचिदत्रातिरिच्यते।'. रस-

---

* अलंकारो रसवत्...। स्वरूपादतिरिक्तस्यापरस्याप्रतिभासनात् ॥ ऊर्जस्व्युदात्ताभिधयोः पौर्वापर्यप्रणीतयोः। अलंकरणयोस्तद्वद्भूषणत्वं न विद्यते ॥.

वत् अलंकार जर रसामुळेंच उत्पन्न होत असेल तर त्यांत अलंकारपणा कसा येऊं शकेल, कारण रस हाच मुळीं काव्याचा आत्मा, आपण आपलाच अलंकार हें म्हणणें जुळत नाहीं, यास्तव रसवत् अलंकारांत रसाहून भिन्न असें कांहीं नसल्यामुळें तो स्वतः काव्य होय. काव्याचा अलंकार नव्हे. उद्भट, वामन आणि दंडी यांच्या ऊर्जस्वि अलंकाराच्या लक्षणांत व उदाहरणांतहि त्यानें अशाच प्रकारें दोष दाखविला आहे. त्याच्यामतें रसवत् अलंकार म्हणावयाचा तर ' रसेन वर्तते तुल्यम् ' असें त्याचें लक्षण केलें पाहिजे, म्हणजे त्यांत खरा रस नसून रसाचा आभास असावा. अशा रसवत् अलंकाराचीं उदाहरणें ' उपोढरागेण विलोलतारकं ' ( ध्वन्यालोक पा. ३५ ), ' चलापांगां दृष्टिं स्पृशसि ' ( शाकुंतल १, २१ ), ' ऐन्द्रं धनुः पांडुपयोधरेण शरद्दधानार्द्रनखक्षताभम् । प्रमोदयन्ती सकलंकमिन्दुं तापं रवेरभ्यधिकं चकार ' ॥ ( सा. द. १० ) हीं कुंतकाच्या मतें योग्य होत. भामहानें जी दीपकाची तीन प्रकारची व्याख्या दिली आहे तीहि त्यानें दोषयुक्त ठरविली असून भामहाचीं उदाहरणें सांगितल्यावर ' अन्तर्गतोपमा धर्माः ' हे उद्भटानें सांगितलेले अधिक शब्द त्या व्याख्येंत घातले असतां ती योग्य होते असें म्हटलें आहे. उद्भटाला कुंतकानें **अभियुक्ततरैः** म्हणजे अत्यंत विद्वान या विशेषणानें मान दिला आहे. खऱ्या दीपकाचें त्याचें उदाहरण 'असारं संसारं......विधातुं व्यवसितः' ( मालतीमाधव अंक ५ ) हें होय. स्पष्टीकरणार्थ तो म्हणतो ' अत्र विधातुं व्यवसितः कर्ता संसारादीनामसारत्वप्रभृतीन्धर्मानुद्द्योतयन् दीपकालंकारमवाप्तवान् '. यानंतर कुंतकानें रूपक, अप्रस्तुतप्रशंसा, पर्यायोक्त, व्याजस्तुति, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति या व आणखीहि दहावीस अलंकारांच्या लक्षणांचें परीक्षण करून स्वतःच्या दृष्टीनें त्याचें स्पष्टीकरण केलें आहे. ' लिम्पतीव तमोङ्गानि ' हा श्लोक उत्प्रेक्षेचें उदाहरण म्हणूनच त्यानें दिला असून त्यावर ' अत्र दण्डिना विहितमिति न पुनर्विधीयते ' म्हणजे दंडीनें याचा विचार केल्यामुळें आम्हीं पुनः तो करीत नाहीं अशी टीप मारली आहे. **परिवृत्ति** अलंकाराच्या विचारांत ' शस्त्रप्रहारं ददता भुजेन तव भूभुजाम् । चिरार्जितं हृतं तेषां यशः कुमुदपाण्डुरम् ॥ ' हें दंडीचें उदाहरण ( का. द. २, ३५६ ) त्यानें दिलें असून ' तथा च लक्षणकारेणात्रैवोदाहरणं दर्शितम्' असें त्यासंबंधानें म्हटलें आहे. याप्रमाणें कुंतकानें तिसऱ्या उन्मेषांत ' सकल

साहित्यसर्वस्वकल्पवाक्यवक्रताप्रकारप्रकाशन ' केलें आहे ( चवथ्या उन्मेषाची प्रस्तावना ).

**उन्मेष चवथा**—या उन्मेषांत प्रकरणवक्रता म्हणजे काव्याच्या विशेष भागांतील किंवा प्रसंगाची वक्रता व प्रबंधवक्रता म्हणजे सर्व ग्रंथांतील वक्रता यांचा विचार आला असून पांचव्यांत प्रबन्धवक्रतेचा विषय पुरा केला असावा असा तर्क होतो. प्रकरणवक्रतेचीं उदाहरणें म्हणून ' किं वस्तु विद्वन् गुरवे प्रदेयं ', ' स त्वं प्रशस्ते महिते मदीये......यावद्यते साधयितुं तवार्थम् ' इत्यादि रघुवंशाच्या पंचम सर्गातील कित्येक श्लोक दिले असून त्यांना ' कुबेरं प्रति सामन्तसंभावनया जयाध्यवसायः कामपि सहृदयहृदयाल्हादकारितां प्रतिपद्यते ' ( कुबेराला मांडलिक मानून जिंकण्याचा रघूचा निश्चय रसिकांना आल्हाद देणारा झाला आहे ) अशी टीप जोडली आहे. शाकुन्तलांतील दुर्वासाच्या शापाची कथाहि प्रकरणवक्रतेचें सुंदर उदाहरण होय. या वक्रतेचें आणखी उदाहरण रघुवंशांतील ( सर्ग ९ ) दशरथाच्या मृगया प्रकरणाचें दिलें असून त्यालाहि ' दशरथेन राज्ञा स्थविरान्धतपस्विबालवधो व्यधीयतेति एकवाक्यशक्यप्रतिपादनः पुनरयमप्यर्थः परमार्थसरससरस्वतीसर्वस्वायमानप्रतिभाविधानकलेशेन तादृश्या प्रकरणविच्छित्त्या विस्फारितश्चेतनचमत्कारकरणतामधितिष्ठति । ' (एका वाक्यांत सांगण्यासारखी गोष्ट प्रतिभेच्या बलानें विशेष रमणीय करून विस्तारानें सांगितली असल्यामुळें मनाला चमत्कार वाटूं लागतो ) असें स्पष्टीकरण जोडलें आहे. ' प्रधानवस्तुनिष्पत्त्यै वस्त्वंतरविचित्रता । यत्रोल्लसति सोल्लेखा सापराप्यस्य वक्रता ' ।। मुख्य कथानकाच्या परिपोषार्थ दुसरें रम्य कथानक जेथें खुलवून सांगितलें असतें तो प्रकरणवक्रतेचा दुसरा प्रकार होय. मुद्राराक्षसाच्या सहाव्या अंकांतील ' ततः प्रविशति रज्जुहस्तः पुरुषः ' या वाक्यापासून चालू झालेला प्रसंग हा अशा प्रकरणवक्रतेचें उदाहरण होय. ' इतिवृत्तान्यथावृत्तरससंपदपेक्षया । रसान्तरेण रम्येण यत्र निर्वहणं भवेत् ।। ...कथामूर्तेरामूलोन्मीलितश्रियः । विनेयानन्दनिष्पत्त्यै सा प्रबन्धस्य वक्रता ।। ' असें प्रबंधवक्रतेचें लक्षण दिलें आहे. रामायण व महाभारत हीं प्रबंधवक्रतेचीं उदाहरणें होत. हीं उदाहरणें सांगतांना ' रामायणमहाभारतयोश्च शांताङ्गित्वं पूर्वसूरिभिरेव निरूपितम् ' ( रामायण व महाभारत हे प्रबंध शांतरसमय म्हणून पूर्वा-

चार्यांनीं सांगितले आहेत ) हे कुंतकाचे शब्द ध्वन्यालोकाला अनुलक्षून असावेत* ( ध्व. लो. पानें २३७–२३८ ). प्रबंधवक्रतेचा आणखी एक प्रकार सांगितला असून त्याचें वर्णन 'त्रैलोक्याभिनवोल्लेखनायकोत्कर्षपोषिणा । इतिहासैकदेशेन प्रबन्धस्य समापनम् ॥ तदुत्तरकथावर्तिविरसत्वजिहासया । कुर्वीत यत्र सुकविः सा विचित्राऽस्य वक्रता ' ॥ असें केलें आहे. इतिहासांतील एखाद्या प्रसंगाच्या वर्णनानें जगप्रसिद्ध नायकाच्या उत्कर्षाचा परिपोष करून त्याच्या उत्तर आयुष्यांतील विरस प्रसंग ज्यांत टाळिलेले असतात तो हा प्रकार असून त्याचें उदाहरण किरातार्जुनीय काव्य हें दिलें आहे. कुंतकाच्या मतें मोठे कवि आपली प्रतिभाशक्ति काव्याचें नांव ठेवण्यांतहि दाखवूं शकतात. तो म्हणतो 'आस्तां वस्तुषु वैदग्ध्यं काव्ये कामपि वक्रताम् । प्रधानसंविधानाङ्कनाम्नाऽपि कुरुते कविः ॥'. अभिज्ञानशाकुन्तल, मुद्राराक्षस, प्रतिमानिरुद्ध, मायापुष्पक, कृत्यारावण, इत्यादि हीं अशा चमत्कृतिजनक नांवांचीं उदाहरणें होत. कथाभाग एकच असला तरी कवीच्या प्रतिभेनें काव्याला सर्वस्वी भिन्नत्व येऊं शकतें. कुंतक म्हणतो 'कथोन्मेषे समानेऽपि वपुषीव च निर्गुणैः ( ( णे ? ) । प्रबन्धाः प्राणिन इव भासन्ते हि पृथक् पृथक् ॥ ' मनुष्यांचीं शरीरे सामान्यतः सारखीं असलीं तरी तीं मनुष्यें जशी एकमेकांपासून भिन्न असतात, तसाच प्रकार प्रबंधांचाहि आहे.

ध्वनि किंवा व्यङ्गय हा काव्याचा आत्मा होय व त्या नात्यानें त्याचें स्वतंत्र अस्तित्व मानिलें पाहिजे ही कल्पना वक्रोक्तिजीवितकाराला मान्य नाहीं. ध्वनीचा अन्तर्भाव तो आपल्या सर्वगामी वक्रोक्तींतच करितो. अर्थात् सामान्यवाक्यपद्धतीहून भिन्न व तीहून उच्च अशा जातीच्या वर्णनशक्तीला काव्याचा आत्मा असें तो मानितो. म्हणजे ध्वनीला भाक्त मानणाऱ्या संप्रदायासारखेंच कुंतकाचें मत आहे.

वक्रोक्तिजीवित हा साहित्यग्रंथ अत्यंत मूल्यवान् असून तो जो अगदीं पडल्यासारखा झाला आहे, त्या स्थितींतून त्याला बाहेर काढणें अवश्य आहे. वक्रोक्ति म्हणजे नित्याच्या भाषासरणीहून वेगळ्या प्रकारची चमत्कृतिजनक भाषासरणी हीच काव्याचा आत्मा होय हें जें वक्रोक्तिजीवितांचें मूलभूत तत्त्व त्या संबंधानें कोणाचें कांहीं मत असलें किंवा त्याच्या कर्त्यानें योजिलेल्या पारि-

*महाभारतेऽपि...शान्तो रसश्च मुख्यतया विवक्षाविषयत्वेन सूचितः ।

भाषिक संज्ञा कितीहि विक्षिप्त वाटल्या तरी त्या ग्रंथांत एकंदरींत विद्वत्तेची तीव्र कुशाग्रता स्पष्टपणें दिसत असून कल्पनासौन्दर्य सर्वत्र भरलेलें आढळतें. त्यांतील उदाहरणांची निवड मार्मिक असून तीं विस्तृत अशा काव्यक्षेत्रांतून उचललेलीं आहेत. वर जी या ग्रंथाची रूपरेखा दिली आहे तींत स्थलाभावास्तव सुप्रसिद्ध अशाच उदाहरणांचा उल्लेख केला आहे. त्यांत कालिदासाचीं उदाहरणें विशेषतः दिसत असलीं, तरी तेवढ्यावरून कुन्तकाचा भर कालिदासावरच आहे असें मानण्याचें कारण नाहीं. वक्रोक्तिजीवितांतील उदाहरणांची संख्या पांच शेंच्या वर आहे व तीं अनेक ग्रंथांतून घेतलेलीं आहेत. त्यांतील कारिका सरळ व स्पष्ट शब्दांनीं गुंफिल्या असून वृत्तीची भाषासरणी मधुर व प्रमाणबद्ध आहे व तींत विद्वत्तापूर्ण व गंभीर भाषाशैलीचे सर्व उच्च गुण दृष्टीस पडतात. भामह आणि दण्डी यांच्या ग्रंथांतून त्यानें पुष्कळ अवतरणें घेतलीं असून उद्भटाच्या काव्यालंकारसारसंग्रहांतून त्यांच्या खालोखाल घेतलीं आहेत. पण यांपैकीं कोणाचाच अनुवाद तो अंधपणें करीत नसून प्रसंगोपात्त सर्वांवरहि त्यानें टीकास्त्र चालविलेलें आढळून येतें. उदाहरणार्थ, त्यानें भामहाचें त्रिप्रकार दीपक व ऊर्जस्वि अलंकाराविषयींचें विवेचन हीं सदोष ठरविलीं आहेत. तो म्हणतो, 'कैश्चिदुदाहरणमेव व्यक्तत्वाल्लक्षणं मन्यमान्यैस्तदेव प्रदर्शितं यथा "ऊर्जस्वि कर्णेन यथा पार्थाय पुनरागतः। द्विः संदधाति किं कर्णः शल्येत्यहिरपाकृतः" ॥ (भामह ३, ७). भामहानें ऊर्जस्वि अलंकाराचें लक्षण न देतां नुसतें 'पार्थाय' इत्यादि उदाहरण मात्र दिलें आहे त्याला अनुलक्षून कुंतकाची टीका आहे. आशीः हा अलंकार मानणाऱ्या दंडिप्रभृतींना त्यानें दोष दिला असून 'भण तरुणि रमणमंदिर' व 'अननुरणन्मणिमेखल' या रुद्रटाच्या सुप्रसिद्ध पद्यांसंबंधानें (रुद्रट २, २२-२३,) तो म्हणतो 'प्रतिभादारिद्र्यदैन्याद‌तिस्वल्पसुभाषितेन कविना वर्णसावर्ण्यरम्यतामात्रमत्रोदितं न पुनर्वाच्यवैचित्र्यकणिका काचिदस्तीति' या पद्यांत प्रतिभेच्या दारिद्र्यामुळें कवीनें केवळ वर्णसादृश्यानें गोडपणा आणण्याचा प्रयत्न केला आहे पण त्यांत अर्थाचा रम्यपणा कणभरहि नाहीं, असें म्हणून हीं पद्यें ग्राम्य होत (अतिग्राम्येयमुक्तिः) अशी त्यावर त्यानें टीप मारिली आहे., आनंदवर्धनाच्या वृत्तींतील 'स्वेच्छाकेसरिण......नखाः' हें पद्य क्रियावैचित्र्याचें उत्तम उदाहरण म्हणून कुंतकानें घेतलें आहे.

अनेक ग्रंथांतील पद्यें कुन्तकानें उद्धृत केलीं आहेत हें पूर्वीं सांगितलेंच आहे. उत्तररामचरित, उदात्तराघव ( यांत लक्ष्मण मृगरूपी मारीचाच्या मागें प्रथम गेला असें दाखविलें आहे ), उद्भट, कालिदास, किरातार्जुनीय, कुमारसंभव, कृत्यारावण, छलितराम, तापसवत्सराज ( या नाटकांत उत्तरोत्तर अंकांत करुण-रसाचा रमणीय परिपोष होत गेला आहे ), दण्डी, ध्वनिकार, नागानन्द, पाण्ड-वाभ्युदय, पुष्पदूषितक, प्रतिमानिरुद्ध, बालरामायण, भट्टबाण, भरत, भवभूति, भामह, मञ्जीर ( हा मध्यममार्गानुसारी कवि होता ), महाभारत, मातृगुप्त ( मध्यममार्गी कवि ), मायापुष्पक, मालतीमाधव, मुद्राराक्षस, मेघदूत, रघुवंश, राजशेखर, रामचरित, रामानन्द, रामाभ्युदय, रामायण, रुद्रट, विक्रमोर्वशीय, वीरचरित, वेणीसंहार, शाकुन्तल, शिशुपालवध, सर्वसेन ( सुकुमारमार्गी कवि ), सेतुप्रबंधनाटक, हयग्रीववध, हर्षचरित ( चंद्रोदयाचीं मनोहर वर्णनें यांत आहेत), अशीं त्यानें उल्लेखिलेल्या ग्रंथांचीं व ग्रंथकारांचीं नांवें आहेत. आम्हांला मिळालेल्या प्रतींत अनेक ठिकाणीं गळलेले भाग असून प्रतलेखकानें ‘ अत्र ग्रंथपातः ’ असें म्हणून तीं स्थळें दाखविली आहेत. कित्येक ठिकाणीं अंतरश्लोक किंवा अनन्तरश्लोक म्हणून कांहीं कारिका त्यांत आल्या आहेत. अन्तरश्लोक हा शब्द महिमभट्टाच्या व्यक्तिविवेकांतहि ( पानें ४६, ५४, ५५, इत्यादि ) आला असून हेमचंद्रानें आपल्या विवेकांत त्याचा अर्थ ‘ अन्तरे मध्ये वक्तव्यशेषाभिधायकौ श्लोकौ अंतरश्लोकौ ’ असा दिला आहे.

वक्रोक्तिजीवितकारानें ध्वनिकार, रुद्रट व बालरामायण यांचा उल्लेख केलेला असल्यामुळें तो त्यांच्या नंतर म्हणजे दहाव्या शतकाच्या पहिल्या चरणानंतर झालेला असला पाहिजे. अर्थात अलंकारसर्वस्वाचा टीकाकार जो जयरथ त्यानें ‘ यद्यपि वक्रोक्तिजीवितहृदयदर्पणकारावपि ध्वनिकारानंतरभाविनावेव तथापि तौ चिरंतनमतानुयायिनावेवेति तन्मतं ’ ( अलं. स. पा. १२ ) म्हणजे कुंतक व भट्टनायक हे ध्वनिकारानंतरचे असले तरी ते प्राचीन मताचे अनुयायी होत असें जें अलंकारसर्वस्वकाराचें मत दिलें आहे तें योग्यच आहे. महिमभट्टानें व्यक्तिविवेकांत वक्रोक्तिजीवितावर टीकाप्रहार केले आहेत ( व्य. वि. पानें २८ ३७, ५८ ) आणि अलंकारसर्वस्वांत त्यांतील सिद्धान्ताचें सार दिलें आहे. महिमभट्टानें कुंतकासंबंधानें लिहितांना [ पा. २८ ] ‘ सहृदयमानिनः केचिदा-

चक्षते ' असे जे शब्द घातले आहेत त्यावरून कुंतक हा त्याचा समकालीन किंवा जरासा वडील असावा असें दिसतें. लोचनकारासंबंधानेंहि महिमभट्ट असेंच म्हणतो [ व्य वि. पा. १९ अत्र केचिद्विद्वन्मानिनः......यदाहुः ]. लोचनकारानें मात्र वक्रोक्तिजीविताचा मुळींच उल्लेख केलेला नाहीं. हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. यावरून लोचनकार अभिनवगुप्त कुन्तकाचा समकालीन असला पाहिजे असें दिसतें. असें असल्यास कुंतकाचा उत्कर्षकाळ इ. स. ९२५ पासून १०२५ पर्यंत केव्हां तरी असावा व तो बहुधा दहाव्या शतकाच्या अंतालाच लागून असावा असें वाटते.

## २० धनंजयप्रणीत दशरूपक

हा ग्रंथ कलकत्ता येथें बिब्लिऑथिका इन्दिका सीरीजमध्यें व पण्डित जीवानंद यांनीं छापिला आहे. ह्याचें इंग्रजी भाषांतर टीपा व विस्तृत प्रस्तावनेसह डॉ. हास यांनीं अमेरिकेत कोलम्बिया युनिव्हर्सिटीच्या इन्डोइराणियन सीरीजमध्यें छापलें आहे. धनिककृत **अवलोक** नांवाची टीका त्या सर्व आवृत्त्यांत आढळते. पुढील वर्णनांत आम्हीं निर्णयसागर प्रतीचा उपयोग केला आहे. दशरूपक ग्रंथांत नाटक या विषयाचाच विचार केलेला असल्यामुळें त्यांत **रसा**विषयींचा जो भाग आहे तेवढ्यापुरता येथें त्याचा परामर्श घ्यावयाचा आहे. त्याचे प्रकाश नांवाचे चार भाग असून कारिका संख्या ३०० आहे. पहिल्या प्रकाशांत रूपकाचे म्हणजे नाटकाचे दहा प्रकार, पांच संधि व त्याचीं अंगें; विष्कंभक, चूलिका, अंकास्य, अंकावतार, प्रवेशक इत्यादि नाटकभागांची लक्षणे यांचें विवेचन केलें आहे. दुसऱ्या प्रकाशांत नायक व नायिका यांचे अनेक प्रकार, त्यांचीं लक्षणें, मित्र, चार वृत्ती व त्यांचीं अंगें यांचें वर्णन करून तिसऱ्यांत नाटकाला आरंभ कसा करावा, प्रस्तावना कशी असावी, नाटकाचे दहा प्रकार कोणकोणत्या अंगांनी युक्त असावे या विषयीं व्यावहारिक सूचना केल्या आहेत व चवथ्या प्रकाशांत रसाविषयींच्या कल्पनेचा सविस्तर ऊहापोह केला आहे. धनिकाची टीका विद्वत्तापूर्ण असून तींत भरपूर अवतरणें देऊन स्पष्टीकरण केलें आहे. धनिकानें तीनशेंच्या वर पद्यें उद्धृत केली असून त्यांतील सुमारें वीस त्याचीं स्वतःचीं आहेत. त्याच्या स्वतःच्या पद्यांतील चार पद्यें प्राकृतहि आहेत. धनिकानें **काव्यनिर्णय** नांवाचा ग्रंथ रचिला असावा असें ' यथाऽवोचाम काव्यनिर्णये ' या त्याच्या शब्दांवरून

( ४,३७ ) दिसून येतें. या काव्यनिर्णयांतील सात श्लोकहि त्यानें उद्धृत केले आहेत. त्यांत ध्वन्यालोकांतील 'भम धम्मिअ' हें उदाहरण दिलें असून 'ध्वनि' म्हणजे तात्पर्यार्थाहून दुसरें कांहीं नाहीं असें सांगितलें आहे. त्याचीं मतें सामान्यतः भट्टनायकाच्या मताशीं जुळतीं असावीं असें त्याच्या 'अतो न रसादीनां काव्येन सह व्यङ्ग्यव्यञ्जकभावः किं तर्हि भाव्यभावकसंबंधः। काव्यं हि भावकम्। भाव्या रसादयः।' या शब्दांवरून अनुमान होतें ( नि. सा पा. ९६ ). रामायण, बृहत्कथा या सारख्या ग्रंथांतून काव्यवस्तु घ्यावें असें दशरूपककाराचें म्हणणें आहे. धनञ्जय सांगतो 'इत्याद्यशेषमिह वस्तुविभेदजातं रामायणादि च विभाव्य बृहत्कथां च । आसूत्रयेत्तदनु नेतृरसानुगुण्याच्चित्रां कथामुचितचारुवचःप्रपञ्चैः।' ( १,६८ ). हाच श्लोक 'भावप्रकाशन' ह्या ग्रंथांत सातव्या अधिकाराच्या शेवटीं ( पान २५० ) आला आहे. दशरूपकावरील धनिकाच्या टीकेंत वेणीसंहार, मालतीमाधव, शाकुन्तल, कुमारसंभव, महावीरचरित, उत्तररामचरित, रत्नावली, अमरुशतक, माघकाव्य, मेघदूत, रघुवंश, छलितराम, पाण्डवानन्द, बृहत्कथा, पद्मगुप्त, उदात्तराघव, मालविकाग्निमित्र, रुद्र, वाक्पतिराज किंवा मुञ्ज, भर्तृहरि, हनुमन्नाटक, कर्पूरमंजरी, भोजप्रबंध, किरातकाव्य, विद्धशालभञ्जिका, अशीं ग्रंथ व ग्रंथकार यांचीं नांवें व त्यांच्या ग्रंथांतील पद्यें आढळतात. रुद्रटांच्या काव्यालंकारांतील 'रसनाद्रसत्वमेषां' ( १२,४ ) हा श्लोक नांव न घेतां अवलोकांत ( ४,३५ ) येथे उद्धृत केलेला आहे.

दशरूपांतील कारिकांचा कर्ता धनञ्जय विष्णूचा पुत्र व मुञ्जाच्या सभेंतील एक सभासद होता. धनिक हाहि विष्णूचा पुत्र होता व म्हणून तो धनंजयाचा भाऊ असावा असें दिसतें. *प्रो. याकोबी यांच्या मतें धनिक व धनञ्जय हे एकच होत व त्याचें मुख्य कारण अवलोकाचे प्रारंभीं मंगलाचरण श्लोक नाहीं. परंतु कांहीं हस्तलिखितांत मंगलाचरण श्लोक सांपडतो. शिवाय दोन्हीं नांवें भिन्न असल्यामुळें तादात्म्य मानतां येत नाहीं. कारिकांची रचना मुंजाच्या राजवटींत झाली, व त्यां राजवटींतील इ. स. ९७४, ९७५, ९७८, ९९१, ९९४ या

---

* डॉ. हास यांचे मत आमचे प्रमाणेंच आहे ( दशरूपकाच्या भाषांतराची प्रस्तावना पान ३४ ).

वर्षांचे निर्देश प्राचीन लेखांत दिसून येतात ( एपिग्राफिआ इंदिका ग्रंथ १ पान २३५, ग्रंथ २ पा. १८०, इंडि. अँटि. ग्रंथ ४ पा. ५१ ). शेवटचा लेख धनिकाचा पुत्र वसन्ताचार्य याला दिलेल्या दानाविषयीं आहे. मुंजाचा वध चालुक्य तैलपदेव यानें इ. स. ९९७ च्या सुमारास केला असें दिसतें ( इंडियन ॲटिक्वरी व्हा. १२, २७०, व्हा. १६, १८ व २३ ). अमितगति याचा सुभाषितरत्नसंदोह मुञ्ज विद्यमान असतांना विक्रमसंवत् १०५० या वर्षीं रचिलेला आहे ( इं. ॲ. ग्रं. १४ पा. १५९ ). धनिकानें आपली टीका पुढें कांहीं काळानें लिहिली असें दिसतें. कारण त्यानें पद्मगुप्ताच्या नवसाहसाङ्कचरितांतून अवतरण घेतलें असून तो ग्रंथ मुञ्जानंतर सिंहासनावर आलेल्या सिन्धुराजाच्या वेळीं रचिलेला आहे. × अर्जुनवर्मदेवानें अमरुशतकाच्या टीकेंत धनञ्जयाचीं वचनें उद्धृत केलीं असून साहित्यदर्पणांत ‘ न चातिरसतो वस्तु दूरं विच्छिन्नतां नयेत् ’ ही दशरूपांतील कारिका ( द. रू. ३, ३२ ) धनिकाची म्हणून म्हटली आहे ( सा. द. ६, ६४, ), पण ती अर्थात् धनञ्जयाची आहे.

## २१ राजानकमहिमभट्टकृत व्यक्तिविवेक

हा ग्रंथ त्रिवेन्द्रं संस्कृतग्रंथमालेंत महामहोपाध्याय गणपतिशास्त्री यांनीं छापिला असून शेवटीं एक अपुरी टीकाहि जोडिली आहे. ही टीका दुसऱ्या विमर्शाच्या अर्धापर्यंतच असून तिचा कर्ता रुय्यक असावा असा गणपतिशास्त्री यांचा तर्क होता. ध्वन्यालोकांत उद्घाटित केलेली ध्वनिकल्पना हाणून पाडण्यासाठी महिमाने व्यक्तिविवेक लिहिला. अभिधा व लक्षणा या दोन शब्दशक्तींशिवाय आणखी व्यञ्जना नांवाची तिसरी शक्ति शब्दाला असते व तिच्या योगानें प्रतीयमान म्हणजे ध्वनित अर्थाचा बोध होतो हा जो ध्वन्यालोकांतील प्रमुख सिद्धान्तपक्ष त्यावरच मुळीं माहिमभट्टाचा कटाक्ष आहे. महिमभट्टाचें स्वतःचें मत असें आहे कीं शब्दाला अभिधा ही एकच शक्ति असते व प्रतीयमान अर्थाचा जो बोध होतो तो वाच्य अर्थावरून अनुमानानें होतो; शब्द व अर्थ यांत व्यंग्यव्यञ्जकभाव मानण्याचें कारण नाहीं. “वाच्यस्तदनुमितो वा

---

× उदाहरणार्थ दशरूपकावलोकांत ( २. ४० मोट्टायिताची व्याख्या पान ५५ ) ‘ चित्रवर्तिन्यपि नृपे तत्त्वावेशेन चेतसि । व्रीडार्धवलितं चक्रे मुखेन्दुमवशैव सा ॥ ’ हा श्लोक नवसाहसांक. ६. ४२ हा आहे.

यत्रार्थोऽर्थान्तरं प्रकाशयति । संबंधतः कुतश्चित्सा काव्यानुमितिरित्युक्ता ॥ इति । एतच्चानुमानस्यैव लक्षणं नान्यस्य । यदुक्तं 'त्रिरूपलिंगाख्यानं परार्थानुमानम्' इति । केवलं संज्ञाभेदः । **काव्यस्यात्मनि संज्ञिनि** रसादिरूपे न कस्यचिद्विमतिः । संज्ञायां सा केवलमेषापि व्यक्त्ययोगतोस्य कुतः ।" ( व्यक्तिविवेक पा. २२ ) असें महिमभट्टाचें म्हणणें असून रस हा काव्याचा आत्मा आहे हें म्हणणे त्याला अमान्य नाहीं. ध्वन्यालोकाशीं या गोष्टींत त्याचा अर्थात् मतभेद नाहीं. शरीरांत जसा प्राण, तशी ध्वनि किंवा व्यंग्याचे बाबतींत व्यञ्जना वृत्ति होय म्हणून व्यक्तीचा किंवा व्यञ्जनावृत्तीचा इतका ऊहापोह केला; पण ध्वन्यालोकांत इतर ज्या गोष्टी आहेत त्यांबद्दल प्रायः मतभेद नसल्यामुळें त्यांचा प्रपंच केला नाहीं ( प्राणभूता ध्वनेर्व्यक्तिरिति सैव विवेचिता । यत्त्वन्यत्तत्र विमतिः प्रायो नास्तीत्युपेक्षितम् ' ॥ ). महिमभट्टानें प्रतिपादिलेलें मत त्यानेंच प्रथम पुढें आणिलेलें नसून ध्वन्यालोकांत आधींच त्या मताचा पूर्वपक्षरूपानें निर्देश करून त्याला उत्तर देण्याचा प्रयत्न केलेला आहे ( ध्व. लो. पा. २०१–२०४ ). ध्वन्यालोकांत म्हटलें आहे, ' अस्त्यभिसंधानावसरे व्यंजकत्वं शब्दानां गमकत्वं तच्च लिंगत्वमतश्च व्यङ्ग्यप्रतीतिर्लिङ्गप्रतीतिरेवेति लिङ्गलिङ्गिभाव एव तेषां व्यङ्ग्यव्यंजकभावो नापरः कश्चित्......न पुनरयं परमार्थो यद् व्यञ्जकत्वं लिंगत्वमेव सर्वत्र व्यङ्ग्यप्रतीतिश्च लिंगप्रतीतिरेवेति ।......तस्माल्लिंगिप्रतीतिरेव सर्वत्र व्यङ्ग्यप्रतीतिरिति न शक्यते वक्तुम् । '. वाचक शब्द व उद्दिष्ट व्यंग्यार्थ यांमध्यें व्यंजकव्यंग्यभाव न मानतां लिंगलिंगिभाव मानून व्यंजना म्हणजे अनुमानच होय असें म्हणणें सर्वत्रच लागू पडतें असें नाहीं, असें म्हणून ध्वनिकारानें व्यंजकव्यंग्यभाव व तदनुसार ध्वनि प्रस्थापित केला आहे. पण महिमभट्ट व्यंजनेला लक्षणेंतच गोंवितो व त्यामुळें भक्तिवादी ( म्हणजे उपचार व लक्षणा वादी ) यांच्या म्हणण्याचा त्यानें सविस्तर अनुवाद केला आहे आणि व्यंजकत्व हें ' भक्ति ' हून भिन्न नाहीं असें स्थापित केलें आहे ( ध्व. लो. पा. ५१, ५५, १९१–१९७ पहा ).

व्यक्तिविवेकाचे तीन भाग असून त्यांना विमर्श म्हटलें आहे. पहिल्या विमर्शाच्या पहिल्या श्लोकांत ' अनुमानान्तर्भावं सर्वस्यैव ध्वनेः प्रकाशयितुम् । व्यक्तिविवेकं कुरुते प्रणम्य महिमा परां वाचम् ॥ ' अशी प्रतिज्ञा ग्रंथकारानें केली आहे.

सर्व प्रकारे ध्वनीचा अन्तर्भाव अनुमानांत होतो हा सिद्धांत प्रस्थापित करण्याचा ग्रंथाचा हेतु होय. प्रथम ध्वनीची ' यत्रार्थः शब्दो वा तमर्थमुपसर्जनीकृत-स्वार्थौ । व्यङ्क्तः काव्याविशेषः स ध्वनिरिति सूरिभिः कथितः ॥ ' ( ध्व. कारिका १, १३ ) ही व्याख्या देऊन तिचे दोष दाखविले आहेत आणि ते दोष काढून टाकिल्यास ती व्याख्या अनुमानालाच लागू पडते असें म्हटलें आहे. महिमभट्टाचा ध्वनीच्या उपरोक्त व्याख्येवर पहिला आक्षेप असा आहे कीं अर्थ या शब्दाला उपसर्जनीकृतात्मत्व हें विशेषण लावणें युक्त नाहीं. दुसरा आक्षेप त्या लक्षणांत **शब्द** या शब्दाचा प्रयोग करावयास नको होता असा आहे, कारण शब्दाला स्वतःचा अर्थ ( स्वार्थाभिधान ) दाखविण्यापलीकडे कांहीं कामच ( व्यापार ) नसतें. तिसरा आक्षेप **वा** या अव्ययासंबंधानें आहे. **काव्यविशेष** या समासांतील **विशेष** या शब्दावरहि त्याचा आक्षेप आहे. कारण कोणतेंहि काव्य झालें तरी त्यांत रस हा आत्मत्वानें असला पाहिजे असें ध्वनिकाराचेंच मत आहे ( ध्व. लो. पा. २५६ ). सूरिभिः हा शब्दहि महिमभट्टाच्या मतें अनवश्यक आहे. असे एकंदर १० दोष त्यानें दाखविले आहेत. तो म्हणतो, ' अर्थस्य विशिष्टत्वं शब्दः सविशेषणस्तदः पुंस्त्वम् । द्विवचनवाशब्दौ च व्यक्तिर्ध्वनिनाम काव्य-वैशिष्ट्यम् । वचनं च कथनकर्तुः कथिता ध्वनिलक्ष्मणीति दश दोषाः ॥ ' ( पा. २२ ). त्याच्या स्वतःच्या म्हणण्याचें तात्पर्य ' सर्व एव हि शब्दो व्यवहारः साध्यसाधनभावगर्भतया प्रायेणानुमानरूपोऽभ्युपगन्तव्यः, तस्य परप्रवृत्तिनिवृत्तिनिबन्धनत्वात् तयोश्च संप्रत्ययासंप्रत्ययात्मनोरन्यथाकर्तुमशक्यत्वतः । ' ( पा. ३ ) असें आहे. सर्व प्रकारचा शब्द व्यवहार साध्यसाधन-भावगर्भ असल्यामुळें त्याला प्रायः अनुमानाचेंच स्वरूप आहे असें समजलें पाहिजे; कारण त्याचा उद्देश दुसऱ्याच्या ठिकाणीं चांगल्या विषयीं प्रवृत्ति व वाइटाविषयीं निवृत्ति उत्पन्न करण्याचा असून ती प्रवृत्ति किंवा निवृत्ति मनाची खात्री करून दिल्यानें किंवा न दिल्यानें उत्पन्न होते व मग ती बदलणें अशक्य होतें. कार्यकारणभावाचें ज्ञान करून दिल्याशिवाय नुसत्या शब्दानें कोणाचा विश्वास उत्पन्न होत नाही. आणखी त्यानें ' अर्थोऽपि **द्विविधो वाच्योऽनुमेयश्च** । तत्र शब्दव्यापारविषयो वाच्यः । स एव मुख्य उच्यते । ......तत एव तदनुमिताद्वा लिंगभूताद्यदर्थान्तरमनुमीयते सोऽनुमेयः । स च त्रिविधः, वस्तुमात्रमलंकारा रसादयश्चेति । तत्राद्यौ वाच्यावपि सम्भवतः ।

अन्यस्तु अनुमेय एवेति वक्ष्यते ।' ( पा. ७ ) असाहि आपला पक्ष मांडिला आहे. अर्थ वाच्य आणि अनुमेय असा दोन प्रकारचा असतो, शब्दाचा उच्चार ऐकल्याने जो प्रथम मनांत येतो तो वाच्य व नंतर प्रयत्नानें कार्यकारणभाव लक्षांत आणून जो ओळखिला जातो तो अनुमेय. अनुमेय अर्थ हा वस्तु अलंकार किंवा रसादि या स्वरूपाचा असतो. वस्तु व अलंकार हे वाच्यार्थानेंहि होतात. पण रस मात्र अनुमानानेंच उत्पन्न होतो. अशा रीतीनें महिमभट्टाच्या मते वाच्य व अनुमेय हेच दोन प्रकारचे अर्थ शब्दाला असल्यामुळें, ज्याला इतर ग्रंथकार लक्षणा म्हणतात त्या शब्दशक्तीचा अन्तर्भाव त्यानें अनुमानांतच केला आहे हें दिसून येईल. ‘ सुवर्णपुष्पां पृथिवीं चिन्वंति पुरुषास्त्रयः ’ हें जें अविवक्षितवाच्यध्वनीचें उदाहरण दिलें आहे (ध्व. ला. पा. ४९ ) त्यांत, तसेंच ‘ पत्युः शिरश्चंद्रकलामनेन ’ ( ध्व. पा. २१३ ), ‘ एवंवादिनि देवर्षौ ’ ( ध्व. पा. १०२ ) इत्यादि श्लोकांत जो व्यङ्गय अर्थ म्हणून म्हटला आहे तो महिमभट्टाच्या मतें वस्तुतः अनुमित अर्थच होय. तो म्हणतो, ‘ अत्र हि सर्वत्र सुलभा विभूतयः शूरादीनामित्ययमर्थोऽनुमीयत इत्येतद्वितनिष्यते ’ ( व्य. वि. पा. ९ ). वाच्य अर्थ आणि प्रतीयमान अर्थ यांमध्यें लिगलिगिभाव असल्यामुळें वाच्यावरून प्रतीयमानापर्यंत येण्याची प्रक्रिया म्हणजे अनुमानच होय. ‘ वाच्यप्रतीयमानयोर्वक्ष्यमाणक्रमेण लिंगलिंगिभावस्य समर्थनात् सर्वस्यैव ध्वनेरनुमानान्तर्भावः समन्वितो भवति तस्य च तदपेक्षया महाविषयत्वात् । ’ ( व्य. वि. पा. १२ ) असें त्याचें म्हणणें असून त्यासंबंधानें त्यानें ‘ साररूपो ह्यर्थः स्वशब्दानभिधेयत्वेन प्रकाशितः सुतरां शोभामावहति ’ ( ध्व. लो. पा. २३९ ) या धन्यालोकांतील शब्दांवरच मुख्य भर दिला आहे. मुख्य तात्पर्यार्थ शब्दांच्या वाच्यार्थावर अवलंबून न ठेवितां सूचित केला असेल तरच तो अधिक रमणीय होतो असें ध्वन्यालोकाचें प्रतिपादन आहेच. ध्वन्यालोकांत दिलेल्या ध्वनीच्या अनेक उदाहरणांमध्यें दाखविलेला तात्पर्यभूत व्यंग्यार्थ हा वाच्यार्थावरून सरळ सुचलेला असा नसून वाच्यार्थ व व्यंग्यार्थ यांमध्यें अनुमानाच्या एक दोन पायऱ्या ओलांडाव्या लागतात, असें महिमभट्ट म्हणतो. उदाहरण ‘वाणिजक हस्तिदंताःकुतोऽस्माकं’ इत्यादि उदाहरणांत दोन अनुमानांनीं उद्दिष्ट अर्थ मिळतो असें त्यानें दाखविलें आहे. ‘ गौर्वाहीकः ’ ( वाहीक हा बैल आहे ) या वाक्यांत तात्पर्यार्थाची प्राप्ति अनुमानानेंच होते. कारण वाहीक व

बैल हे वास्तविकरीत्या एक असणें शक्य नसल्यामुळें, त्यांच्यामध्यें समान धर्म आहेत असें अनुमान त्यांच्या एकत्वाच्या विधानावरून आपण काढितों. महिमभट्ट म्हणतो 'तस्माद्योयं वाहीकादौ गवादिसाधर्म्यावगमः स तत्त्वारोपान्यथानुपपत्तिपरिकल्पितोऽनुमानस्यैव विषयः न शब्दव्यापारस्येति स्थितम्' (पा. २४). 'गंगायां घोषः' या वाक्यालाहि हाच कोटिक्रम लागतो. ध्वनिकारिकांतलिच शब्द थोड्या वळणानें घेऊन ध्वनि म्हणजे भक्तिच होय असें त्यानें प्रतिपादिलें आहे. 'भक्त्या बिभर्ति चैकत्वं रूपभेदादयं ध्वनिः । न च नाव्याप्त्यतिव्याप्त्योरभावाल्लक्ष्यते तया ॥ सुवर्णपुष्पामित्यादौ न चाव्याप्तिः प्रसज्यते । यतः पदार्थवाक्यार्थभेदाद् भक्तिर्द्विधोदिता ॥ अतस्मिंस्तत्समारोपो भक्तेर्लक्षणमिष्यते । अर्थान्तरप्रतीत्यर्थः प्रकारः सोऽपि शस्यते' ॥ (व्य. वि. पा. २६, ध्वनिकारिका १,१७ पहा). शब्दाची एकच व्यापक वृत्ति असून तीच वाच्य व व्यंग्य दर्शविते असें म्हणून बाणाच्या उदाहरणानें तसें प्रतिपादणाऱ्या भट्टप्रभाकरादिकांच्या मतांशीं महिमभट्टानें विरोध दाखविला आहे. बळकट धनुष्यावरून सोडलेला बाण जसा शत्रूच्या अंगावरील वस्त्र प्रथम फाडितो, मग अंगांत घुसतो व शेवटीं त्याचा जीव घेतो, तोच प्रकार शब्दाचा आहे, म्हणजे कवीनें एकदां शब्द योजिला कीं तो आपला वाच्यार्थ प्रथम दाखवितो आणि मग दुसरा अर्थ दाखवितो; तेव्हां दुसरा अर्थ दाखविणारी त्याची वृत्ति दुसरी निराळी आहे असें म्हणतां येत नाहीं; कारण बाणाच्या उदाहरणांत त्याची एकच शक्ति सारीं कामें करिते, प्रत्येक कामाला निरनिराळी शक्ति लागत नाहीं, असें प्राभाकरमीमांसकांचे मत आहे (पान २७-२८). वक्रोक्तिजीवितकाराचेंहि त्यानें खंडन केलें असून, कवीनें योजिलेल्या चमत्कृतिजनक शब्दांवरून सूचित होणारा अर्थ जर त्यांच्या सरळ वाच्यार्थाहून निराळा असेल तर वक्रोक्तीचाहि ध्वनीप्रमाणें अनुमानांतच अन्तर्भाव करावा लागतो (व्य. वि. पा. २८ ह्या ठिकाणीं 'शब्दार्थौ सहितौ वक्रकविव्यापारशालिनि' ही वक्रोक्तिजीवितांतील कारिका उद्धृत करून तिचें परीक्षण केलें आहे). अभिधा ही एकच अर्थद्योतक शक्ति शब्दाला आहे, दुसरी नाहीं असें त्याचें ठाम मत आहे 'नापि शब्दस्याभिधाव्यतिरेकेण व्यापारान्तरमुपपद्यते येनार्थान्तरं प्रत्याययेत् व्यक्तेरनुपपत्तेः सम्बन्धान्तरस्य चासिद्धेः ।' (व्य. वि. पा. २९). ध्वनिकारानें सामान्यतः काव्याचें लक्षण दिलें नसून त्याच्या ध्वनि व गुणीभूतव्यंग्य या दोन प्रकारांचा मात्र सविस्तर विचार केला

आहे असें म्हणून महिमभट्टानें त्याचा या अप्रयोजकपणाबद्दल उपहास केला आहे. तो म्हणतो 'किं च काव्यस्य स्वरूपं व्युत्पादयितुकामेन मतिमता तल्लक्षणमेव सामान्येनाख्यातव्यम्... यत्तु तदनाख्यायैव तयोः प्रधानेतरभावकल्पनेन प्रकार-द्वयमुक्तं तदप्रयोजकमेव ।' (पा. ३२). अविवक्षितवाच्य आणि विवक्षि-तान्यपरवाच्य या ध्वनिकारानें योजिलेल्या संज्ञांतहि महिमभट्टानें दोष दाखविला असून अविवक्षितवाच्याची म्हणून दिलेली 'अग्निर्माणवकः' यासारखी उदाहरणें भक्तीचीं उदाहरणें होत आणि जर एखादा अर्थ विवक्षित म्हणजे प्रधान असेल तर तो अन्यपर असणार नाहीं, म्हणून विवक्षितान्यपरवाच्य ही संज्ञाच विसंगत आहे असें म्हटलें आहे. 'किं चेदं विवक्षितान्यपरवाच्यत्वं घटते ?' (पा. ३५)

याप्रमाणें ध्वनिकाराच्या ध्वनिलक्षणाचे खंडन पहिल्या विमर्शात केल्यावर दुसऱ्या विमर्शात अनौचित्य दोषाचा विचार केला आहे. अनौचित्य अर्थविषय व शब्दविषय असें दोन प्रकारचें असूं शकतें. अर्थविषयक अनौचित्य हे विभाव, अनुभाव व व्यभिचारिभाव यांचा विनियोग अयोग्य रीतीनें करून रसाचा आविर्भाव करण्याचा प्रयत्न केल्याने घडून येतें. त्याला अन्तरंग अनौचित्य असेंहि म्हटलें असून पूर्व ग्रंथकारांनी त्याचा विचार केला असल्यामुळें महिमभट्टानें तो केलेला नाही. शब्दविषय अनौचित्य म्हणचे बहिरंग अनौचित्य असून त्याचे विधेयाविमर्श, प्रक्रमभेद, क्रमभेद, पौनरुक्त्य आणि वाच्यावचन असे पांच प्रकार दिसून येतात. सगळया दुसऱ्या विमर्शामध्यें (व्य. वि. पाने ३७-११२) या पांच दोषांचे सोदाहरण विवेचन केलें असून प्रसंगोपात्त इतर विषयाचीहि चर्चा केलेली आहे. त्यांतील विधेयाविमर्श या पहिल्या प्रकाराचा खल ३७ पासून ५८ पर्यंतच्या पानांत आला आहे. 'संरम्भः करिकीटमेघशकलोद्देशेन सिंहस्य यः सर्वस्यैव स जातिमात्रनियतो हेवाकलेशः किल । इत्याशाद्विरदक्षयांबुदघटाब-न्धेऽप्यसंरब्धवान् योऽसौ कुत्र चमत्कृतेरतिशयं यात्वंबिकाकेसरी ॥' हा श्लोक वक्रोक्तिजीवितकाराने निर्दोष काव्याचे उदाहरण म्हणून दिला आहे. महिमभट्टानें प्रथम तोच घेऊन त्यांत विधेयाविमर्श दोष तीन वेळ घडला आहे असें दाखविलें आहे. विधेय म्हणजे प्रतिपादावयाचा मुख्य अर्थ त्याचा अविमर्श म्हणजे अनादर किंवा हेळसाड हा दोष उपरोक्त श्लोकात प्रथम 'असंरब्धवान्' या समासांत घडला आहे, कारण नकाराचें प्राधान्य इष्ट असता समासामुळें

त्या पदांत त्याला गौणत्व आलें आहे. दुसरें उदाहरण, 'योऽसौ' यांतील 'यः' या संबंधी सर्वनामाच्या जोडीला 'सः' हें दर्शक सर्वनाम वस्तुतः पाहिजे ( यत्तदोर्नित्यमभिसम्बन्धः )' पण या श्लोकांत ते नाही. तिसरें उदाहरण ' अंबिकाकेसरी '; कवीला अंबिका ही दैवत म्हणून मुख्यतः वर्ण्य असल्यामुळें तिचें नांव समासांत गौणस्थानीं देणें अनुचित होय. हे दोष दूर करावयाचे तर हा श्लोक ' उद्योगः करिकीट...किल । इत्याशा...बन्धेऽपि नोद्युक्तवान् योऽसौ...रतिशयं गौर्या हरिर्यातु सः ॥' असा असावा ( पा. ५७ ). विधेयाविमर्श दोषासंबंधानं महिमभट्टाने आपले मत ' तदिदमत्र तात्पर्यं यत्कथंचिदपि प्रधानतया विवक्षितं न तन्नियमेनेतरेण सह समासमर्हतीति । इतरच्च विशेष्यमन्यद्वास्तु न तत्र नियमः ।' असें थोडक्यांत सांगितलें आहे. हा नियम ज्यांत पाळिलेला आहे व ज्यांत मोडिलेला आहे अशी दोन्ही प्रकारचीं बरींच उदाहरणें घेऊन नियमभंगाच्या उदाहरणांत नियमपालनासाठीं कसे पाठभेद करणें अवश्य आहे हे महिमभट्टानें सुचविलें आहे. ' सूर्याचन्द्रमसौ यस्य मातामहपितामहौ ' ( विक्रमो. ४,३८ ), 'उपपन्नं ननु शिवं सप्तस्वंगेषु यस्य मे । दैवीनां मानुषीणां च प्रतिकर्ता त्वमापदाम् ॥ ' ( रघु. १,६० ), ' अंगराज, सेनापते, द्रोणोपहासिन् ' इ० ( वेणीसं. ३ ), रामस्य पाणिरसि दुर्वहगर्भखिन्नसीताविवासनपटोः करुणा कुतस्ते । ' ( उत्त. च. २ ) हीं उदाहरणे नियमपालनाचीं म्हणून दिलेलीं आहेत; ' आसमुद्रक्षितीशानाम् ' ( रघु. १ ) यांत ' आसमुद्रात् ' असा पाठ पाहिजे; 'पृथ्वि स्थिरा भव...देवः करोति हरकार्मुकमाततज्यम् ' ( बालरामायण १,४८ ) यांत धनुष्य शंकराचें आहे ही मुख्य गोष्ट सांगावयाची असल्यामुळें ' देवो धनुः पुररिपोर्विदधात्यधिज्यम् । ' असा पाठ योग्य होईल. अशीं त्याने नियमभंगाची उदाहरणे सांगितली आहेत. प्रक्रमभेद या दुसऱ्या दोषाचे विवेचन ५८ पासून ६६ या पानांत आहे. प्रक्रमभेद हा शब्दांच्या अनुचितपणाचाच एक प्रकार आहे. त्याचे प्रकृतिप्रक्रमभेद, प्रत्ययप्रक्रमभेद इत्यादि अनेक प्रकार होतात. या दोषामुळें रसहानि होते. महिमभट्ट म्हणतो ' प्रक्रमभेदोऽपि शब्दानौचित्यमेव । स हि यथाप्रक्रममेकरसप्रवृत्तायाः प्रतिपत्तिप्रतीतेरुत्खात इव परिस्खलनखेददायी रसभंगाय पर्यवस्यति ।...स चायमनन्तप्रकारः संभवति । प्रकृतिप्रत्ययपर्यायादीनां तद्विषयभावाभिमतानामानन्त्यात् । ' ( पा. ५८ )...' यथोद्देशं हि

प्रतिनिर्देशोऽस्य विषयः ' । ( पा. ५९ ). ' ते हिमालयमामन्त्र्य पुनः प्रेक्ष्य च शूलिनम् । सिद्ध चास्मै निवेद्यार्थ तद्विसृष्टाः खमुद्ययुः । ' ( कु. सं. ६,९४ ) हें या प्रक्रमभेदाचे उदाहरण होय. यांत एकदां ' अस्मै ' हें सर्वनाम शंकरासंबंधानें योजिल्यामुळें ' **तद्विसृष्टाः** ' यांतील ' तत् ' च्या ठिकाणी सुद्धां ' इदम् 'चेच रूप पाहिजे. दुसरें उदाहरण ' उदन्वच्छन्ना भूः स च निधिरपां योजनशतम् ' इत्यादि होय ( भर्तृहरि ). या ठिकाणी एका समुद्राचें वर्णन करितांना एकदां ' उदन्वत् ' व नंतर ' अपां निधिः ' असे निराळे शब्द घातल्यामुळे प्रकृतिप्रक्रमाचा भंग झाला आहे व तो दूर करावयाचा तर ' भिता भूः पत्याऽपां स च पतिरपां योजनशतम् ' असा कांही तरी पाठ घेतला पाहिजे. ' गाहन्तां महिषा निपानसलिलम् ' इत्यादि कालिदासीय श्लोकहि ( शा. २,६ ) याच दोषाचे उदाहरण होय. यांतील तिसऱ्या चरणांत जो कर्मणि प्रयोग ( क्रियतां वराहततिभिर्मुस्ताक्षतिः ) आला आहे, तो इतर चरणांतील कर्तरिप्रयोगांशी विसंगत असल्यामुळें ' कुर्वन्त्वस्तभियो वराहततयो मुस्ताक्षतिम् ' असा पाठ घेतल्यास मूळांतील कारकशक्तिप्रक्रमभेद दूर होईल. या प्रक्रमभेदाच्या प्रकारांत कर्तृप्रक्रमभेद मात्र दोष होत नाही, तर तो गुणच ठरतो ' अयं जनः प्रष्टुमनास्तपोधने' इत्यादि श्लोकांत ( कु सं. ५ ) ' अहं 'च्या जागीं 'अयं जनः ' घातल्यानें दोष न घडतां काव्याला रम्यताच आली आहे. या पुढें तिसरा दोष क्रमभेद हा आला असून तो ६६–६९ या पानांत वर्णिला आहे. ' कला च सा कान्तिमती कलावतस्त्वमस्य लोकस्य च नेत्रकौमुदी ' ( कु. सं. ५,७१ ) यांत दुसरें ' च ' हें अव्यय ' त्वम् 'च्या पुढें लगेच यावयास पाहिजे होतें, ते पुढें दोन शब्द गेल्यामुळे क्रमाचा भेद झाला आहे. पौनरुक्त्यदोष ६९–८४ या पानांत आला आहे. केवळ शब्दपुनरुक्ति झाली तरी जर त्या दोन्ही ठिकाणीं अर्थ भिन्न असतील तर, हा दोष होत नाहीं. उदाहरण, ' हसति हसति स्वामिन्युच्चै रुदन्त्यपि रोदिति' यांत हसति शब्द दोन वेळां आला असला तरी एकदां तृतीय पुरुषाचे एकवचन म्हणून व दुसऱ्यानें सप्तमीचें एकवचन म्हणून आल्यामुळें पौनरुक्त्य दोष होत नाहीं. फार काय पण पुनः तोच शब्द त्याच अर्थानें योजिला असून तात्पर्यार्थ जर निराळा असेल तरीहि पौनरुक्त्य दोष नाही. उदाहरण, 'वक्रायन्ते नदीनां सितकुसुमधराः शक्रसंकाशकाशाः काशाभा भान्ति तासां नवपुलिनगता श्रीनदीहंसहंसाः' ॥ ( वामनकृत काव्या. सू. वृत्ति ४,१,१० ).

यांत पुनरुक्ति हा दोष नसून लाटानुप्रास नांवाचा अलंकारच आहे. पौनरुक्त्य दोष शब्दपुनरुक्तीनें घडतो तसा अर्थपुनरुक्तीनेंहि घडतो. अर्थपौनरुक्त्याची उदाहरणें 'त्वगुत्तरासंगवतीमधीतिनीम्' (कु. सं. ५,१६), 'सहसा विदधीत न क्रियाम्' (किराता० २,३०) इत्यादि होत. 'त्वगुत्तरा.' यांत 'वत्' हा प्रत्यय निष्कारण आहे कारण बहुव्रीहि समासामुळें 'वत्' चा अर्थ दर्शविला जातोच. 'सहसा विदधीत' या श्लोकांत पहिल्या चरणांतील अर्थच पुनः 'अविवेकः परमापदां पदम्' या दुसऱ्या चरणांत आला आहे. 'बिसकिसलयच्छेदपाथेयवन्तः' (मेघ.) व 'यदा यदा हि धर्मस्य' (गीता, ४,७) हीहि याच प्रकारांची अनुक्रमें उदाहरणें होत. 'धर्मस्य ग्लानिः' व 'अधर्मस्य अभ्युत्थानम्' यांत अर्थभेद नाहीं. पुनरुक्तासंबंधानें महिमभट्टाचें म्हणणे 'न च सामर्थ्य सिद्धेऽर्थे शब्दप्रयोगमाद्रियन्ते सत्कवयः' (पा. ७७), 'सा (प्रतीतिः) च यावद्भिरुपजायते तावतामेव प्रयोगो युक्तो नातिरिक्तानाम्' (पा. ७८) अर्थोत्पत्ति पूर्वीच झाली असतां आणखी स्पष्ट शब्द घालून ती करणें हे सत्कविसंमत नाही, तसेच अर्थोत्पत्तीला जेवढे शब्द अवश्य असतील त्यांहून अधिक मुळीच घालूं नये. पण यावर महिमभट्टाचे टीकाकारानें म्हटलें आहे 'न हीदं वाक्यं लक्षणशास्त्रं येन मात्रालाघवं चिन्त्यते' (पा. ४४); काव्य म्हणजे कांहीं व्याकरण नव्हे, तर त्यांत कानामात्रेचीहि काटकसर काढावयाची। वरकरणी तोच अर्थ पुनः आला तर जर दुसऱ्यावेळीं कांहीं विशिष्ट अर्थबोधास्तव तो आला असेल तर पौनरुक्त्याचा दोष होत नाहीं. उदाहरण 'कुर्यां हरस्यापि पिनाकपाणेः' (कु. सं. ३,१०) यांत हर व पिनाकपाणि हे एकच असले तरी पिनाकपाणि सार्थ विशेषण म्हणून योजिल्यामुळें पुनरुक्तिदोष होत नाही. पांचवा प्रकार जो वाच्यावचन त्याचे विवेचन पानें ८४-१०९ यांत आलें आहे. 'कमलमनम्भासि, कमले कुवलये' इत्यादि या दोषाचें उदाहरण होय. यांत 'कमले'च्या जागी 'तस्मिंश्च' असें सर्वनाम पाहिजे होतें. कारण पहिलें कमल व दुसरें कमल हीं एकाच वस्तूचीं बोधक आहेत. एक अलंकार सहज होत असतां तो टाळून दुसरा करणें हाहि महिमाच्या मतें वाच्यावचन दोषच होय 'यत्रान्यस्यालंकारस्य विषयेऽलंकारान्तरनिबंधः सोऽपि वाच्यावचनं दोषः'। (पा. ८६). याचें उदाहरण 'भैरवाचार्यस्तु दूरादेव दृष्ट्वा राजानं शशिनमिव जलनिधिश्चचाल।' (हर्षचरित ३,२०) यांत 'राजानम्' शब्दावरून 'शशिनं'

चे कार्य होणारे असल्यामुळें येथे श्लेषालंकाराला योग्य अवसर आहे, उपमेला नाहीं. पण कवीनें श्लेष टाळून उपमा साधिली आहे. श्लेषासंबंधानें महिमभट्ट म्हणतो, 'तस्मादर्थान्तरव्यक्तिहेतौ कस्मिंश्च नासति । यः श्लेषबन्धनिर्बंधः क्लेशायैव कवेरसौ ॥' ( पा. ८९ ). दुसरा अर्थ निष्पन्न करणारें कांहींहि कारण उपस्थित नसतांना श्लेषासाठी श्लेष साधणें हे क्लेशकारक होय, व तेणे-करून वाच्यावचन दोष उत्पन्न होतो. 'सर्वैकशरणमक्षयमधीशमीशं' इत्यादि आनंदवर्धनकृत पद्यांत ( ध्व. लो. पा. १०१ ) महिमानें हाच वाच्या-वचन दोष काढिला आहे. ध्वन्यालोकांत शब्दशक्तिमूल ध्वनीची म्हणून जीं उदाहरणें दिली आहेत त्यांतील बऱ्याच पद्यांत हा दोष दाखविण्याचा त्यानें प्रयत्न केला असून शेवटीं असले दोष मोठमोठया कवींच्याहि लक्षांत आले नाहींत असा त्यांवर आक्षेप घेतला आहे. 'उमावृषाङ्कौ शरजन्मना यथा' ( रघु० ३, २३ ) व 'काव्यस्यात्मा ध्वनिरिति' ही पहिली ध्वनिका-रिका ही उदाहरणें या बाबतीत तो देतो. 'उमावृषाङ्कौ' या श्लोकांत पौनरुक्त्य, प्रक्रमभेद, व अवाच्यवचन हे तीन्ही दोष आहेत असे तो म्हणतो. * 'काव्य स्यात्मा' या श्लोकांतहि 'इति' शब्द 'आत्मा' शब्दापुढेंच पाहिजे होता तो नाही म्हणून प्रक्रमभेद, 'बुधैः' व 'पूर्वम्' हे शब्द नको असतां घातले म्हणून पौनरुक्त्य ( कारण ध्वनि हा ग्रंथकाराला स्वतःच संमत असल्यामुळें तो कोणी सांगितला हे 'बुधैः सारख्या शब्दानें सांगण्याचें प्रयोजन नाहीं व **समाम्नात** या भूतकालवाचक शब्दावरून भूतकालाचा बोध होत असल्यामुळें 'पूर्व' शब्द अनवश्यक ठरतो ) इत्यादि दोष त्यानें दाखविले आहेत व शेवटीं हे दोष टाकून ते पद्य कसें बनवितां येईल हें सांगितले आहे. तें पद्य असें— 'काव्यस्यात्मेत्यमलमतिभिर्यो ध्वनिर्नाम गीतस्तस्याभावं जगदुरपरे भक्तिरित्येव-मन्ये ॥ केचिद्वाचामविषय इति प्रस्फुरत्तत्त्वमन्तस्तेन ब्रूम. सहृदयजनप्रीतये तत्स्वरूपम् ॥' ( पा. ११२ )

**तिसऱ्या विमर्शांत** ध्वनीच्या सर्व प्रकारांचा अनुमानांत अन्तर्भाव कसा होतो हें दाखविण्यासाठीं ध्वन्यालोकांतील सुमारें ४० श्लोक घेऊन त्यांची

---

* सुजन्मना तेन सुतेन तावुभौ ननन्दतुः सा च विशांपतिश्च सः ॥ असें पाठा-न्तर महिमभट्टानें दोष टाळण्यासाठी सुचविले आहे.

चर्चा केली आहे. प्रथमच ' भ्रम धार्मिक, विश्रब्धः स शुनकोद्य मारितस्तेन । गोदानदीकच्छकुहरवासिना दृप्तसिंहेन ॥ ' हें पद्य घेऊन त्यांतून निष्पन्न होणारा अंतिम अर्थ वाच्यार्थावरून निघणारें अनुमानच होय असें दाखविलें आहे. ' योऽसौ भ्रमणविधौ हेतुभावेन दृप्तपञ्चाननव्यापारस्तत्रोपात्तः स एव विमृश्यमानः परंपरया धार्मिकस्य तन्निषेधे पर्यवस्यति तयोर्बाध्यबाधकभावेनावस्थानात् ' । ( पान ११३ ). या रानांत मोकळेपणें फिर, असे धार्मिकाला सांगतांना एका दांडग्या सिहानें त्या क्रूर कुत्र्याला मारून टाकिलें आहे हे कारण दिलें आहे. पण हें कारण वस्तुतः मोकळेपणें रानांत फिरण्याचें नसून सिंहाच्या भतीनें फिरणें बंद करण्याचें आहे. म्हणजे मोकळेपणे फिरणें व कुत्र्याला सिंहानें मारून टाकिलें असणें या गोष्टीत बाध्यबाधकसंबंध असल्यामुळें ' फिरूं नको ' असा निषेध अनुमित होतो. अशा रीतीनें सर्व उदाहरणांचे स्पष्टीकरण केलेलें आहे. रसासंबंधानेंहि तो म्हणतो कीं त्याचा प्रत्यय सुद्धां अनुमानांतच अन्तर्भूत होतो ' याऽपि विभावादिभ्यो रसानां प्रतीतिः सानुमान एवान्तर्भावमर्हति । विभावानुभावव्यभिचारिप्रतीतिर्हि रसादिप्रतीतेः साधनमिष्यते । ' ( पा. ११९ ). विभावादिकांचा प्रत्यय हा रसांच्या प्रत्ययाचें कारण होय असें म्हणून शेवटीं त्यानें ' तदेवं सर्वस्यैव ध्वनेरनुमानान्तर्भावाभ्युपगमः श्रेयानिति ' म्हणजे ' या प्रमाणें सगळया ध्वनीचा अनुमानांत अन्तर्भाव होतो असें मानणें युक्त होय ' असा निष्कर्ष काढिला आहे.

राजानक या पदवीवरून महिमभट्ट हा काश्मीरचा रहाणारा होता हे उघड होतें. व्यक्तिविवेकाच्या उपसंहारश्लोकांत त्याने आपल्या पित्याचें **श्रीधैर्य** व गुरूचें **श्यामल** अशी नांवे दिली आहेत. श्यामलाला त्यानें महाकवि म्हटलें आहे. क्षेमेन्द्रानें सुवृत्ततिलक व औचित्यविचारचर्चा या दोन्ही ग्रंथांत श्यामलाचीं पद्यें घेतलेलीं आहेत. हा श्यामल व पादताडितक भाणाचा कर्ता श्यामिलक एकच असावे असें वाटतें. कारण क्षेमेन्द्रानें या श्यामलाचीं म्हणून उद्धृत केलेलीं पद्यें त्या भाणांत आढळतात. प्रो. रामकृष्ण कवि यांनीं पादताडितक भाणाची आवृत्ति काढिली आहे. महिमभट्टानें आपला व्यक्तिविवेक आपल्या नातवांसाठीं लिहिला व हे नातू त्याच्या भीमनामक मुलाचे मुलगे होते असें दिसतें ' आधातुं व्युत्पत्तिं नप्तॄणां क्षेमयोग्यभाजानाम् । सत्सु प्रथितनयानां

भीमस्यामितगुणस्य तनयानाम् ॥ ' असें त्यानें या विषयीं उपसंहारांत म्हटलें आहे. या श्लोकांतील ' क्षेमयोगभाजानाम् ' हे पद बहुधा श्लिष्ट म्हणजे द्व्यर्थ असावें व क्षेम योग आणि भाज ही त्याच्या नातवांची नांवें असावीं असा तर्क होतो ' इत्यादि प्रतिभातत्त्वमस्माभिरुपपादितम् । **शास्त्रे तत्त्वोक्तिकोशाख्ये** इति नेह प्रपंचितम् । ' या दुसऱ्या विमर्शांतील ( पा. १०८ ) श्लोकावरून महिमभट्टानें **तत्त्वोक्तिकोश** नांवाचा दुसरा ग्रंथही साहित्यशास्त्रावर ( विशेषतः प्रतिभातत्त्वावर ) लिहिला होता असें दिसून येतें व्यक्तिविवेक हा ग्रंथ अलंकारशास्त्राचें भूषण असून आजवर इतका अप्रसिद्ध राहिला हें आश्चर्य होय. ह्या अप्रसिद्धीतून त्याला वर काढून नित्य अभ्यासांत आणणें योग्य होईल. त्यांत उत्तम युक्तिवाद, विस्तृत वाचन, तर्कशुद्ध विचारसरणी, चखोट चिकित्सापद्धति व खोल निरीक्षणशक्ति दिसून येतात. पुढें झालेल्या आलंकारिकांमध्यें त्याला कोणी चांगलासा अनुयायी मिळाला नाहीं व आनंदवर्धनाशींच त्यानें स्पर्धा केल्यामुळें त्याच्या श्रमाचें व बुद्धिमत्तेचें कौतुक झालेलें नाहीं. मोठमोठया कवींच्या ग्रंथकारांच्या चुका काढून त्यांच्यावर टीकास्त्र सोडण्यांत जें त्यानें धाडस केलें त्याची निष्कृति करून विरोधक टीकांचें मूळ नाहींसें करण्यासाठीं ' स्वकृतिष्वयन्त्रितः कथमनुशिष्यादन्यमयमिति न वाच्यम् । वारयति भिषगपथ्यादितरान् स्वयमाचरन्नपि ' आपण स्वतः चुका करीत असतां लोकांना उपदेश कशाला करावा असें म्हणूं नये; वैद्य स्वतः कुपथ्य करीत असला तरी रोग्यांनीं तें करूं नये असें त्याला सांगतां येतंच कां नाहीं, असें त्यानें म्हटलें आहे. तथापि एकंदरींत तो अभिमानी असून त्याचा आत्मविश्वास मोठा होता असें दिसून येतें. तो एका ठिकाणीं म्हणतो ( पा. ९७ ) ' अत्रोदाहरणप्रत्युदाहरणप्रतीत्योर्यदन्तरं तन्मतिमतामेवावभासते, अन्येषां तु शपथप्रत्येयमेव '. दुसऱ्या एका ठिकाणीं तो म्हणतो, ' ता एता दोषजातयो महाकवीनामपि दुर्लक्षा इत्यवसीयन्ते' ( पा. १०९ ). रस हा सुद्धां अनुमेय वस्तुच होय असें म्हणण्यांत त्यानें शङ्कुकाचा अनुवाद केला असावा असें दिसतें. साहित्यदर्पणकारानें ( ५, ४ ) त्याचीं मतें सविस्तर सांगून त्यांचें खंडन केलें आहे. एकावलीकारानेंहि तसेंच केलेलें आढळतें ( पा. ३२ ). महिमभट्टानें पाणिनीचीं मतें आचार्यांचीं म्हणून अनेकवार उद्धृत केलीं आहेत [ पा. ५५ ]. पर्युदास आणि प्रसज्यप्रतिषेध या विषयांवर मोठी विद्वत्तापूर्ण चर्चा त्यानें केली

आहे ( पानें ३८-३९ ) व पुष्कळ वेळां ' तदुक्तम् ', ' यदाहुः ' इत्यादि प्रस्तावनापूर्वक इतर ग्रंथकारांचीं मते उद्धृत केली आहेत ( पा. ६, ७, ८२ इ. ). संग्रहश्लोक किंवा संग्रहार्या या नांवानें त्याने कित्येक पदें ठिकठिकाणीं दिलीं असून त्यांत पूर्वीच्या गद्यांतील विवेचनाचें सार सांगितलें असतें [ पानें ६, १४, १८, २२, २३, २६, ३२, ३४, ३५, ५६, इ. ]. यांतील कित्येक स्थळीं एकाद्या विषयावरील पूर्वपक्ष व उत्तरपक्ष असे दोन्ही दिलेले असतात. उदाहरण, तिसऱ्या विमर्शात ( पा. १२४-१२५ ) ' ननु ' शब्दानें पूर्वपक्ष करून ' उच्यते ' शब्दाने सिद्धान्त पक्ष मांडिला आहे. हे संग्रहश्लोक सारे त्याचेच आहेत. याशिवाय अन्तरश्लोक किंवा अन्तरार्या म्हणून काहीं पद्ये कित्येक ठिकाणी ( पा. ९७, १०९, ११०, १३६ इ. ) त्यानें दिलीं आहेत. संग्रहश्लोकांत पूर्व चर्चेचें सार दिलेलें असतें तर अन्तरश्लोकांत त्या चर्चेला भर घातलेली असते; अंतरश्लोकांतील कित्येक त्याचे असावेत व कित्येक दुसऱ्यांचेहि असावेत ( पा. ९७ अनुवाद्यमनुक्त्वैव न विधेयमुदीरयेत् । ', 'विधेयोद्देशभावोऽयम् ' इ. श्लोक अवतरणें दिसतात ). अलंकारांची चर्चा करितांना कांहीं स्थळीं त्यानें कारिका दिल्या असून त्यांना संग्रहश्लोक किंवा अन्तरश्लोक असें म्हटलेलें नाही ( पा. ७४, ७६, ७७, १०८ ). या कारिका बहुधा त्याच्याच असाव्या. कालिदास, भरत, भारवि व ध्वन्यालोक यांतून त्यानें पुष्कळच अवतरणें घेतली आहेत. उत्तररामचरित, उद्भट, चंद्रिका, बालरामायण, भल्लट, भामह, माघ, रत्नावली, लोचन, वक्रोक्तिजीवित, वामन, वेणीसंहार, विद्धशालभंजिका, हर्षचरित यांतीलहि उतारे त्यानें घेतले असून हृदयदर्पणाचा उल्लेख केला आहे.

व्यक्तिविवेकांतील मतांचें सार रुय्यकानें अलंकारसर्वस्वांत दिलेलें असल्यामुळें महिमभट्ट इ. स. ११०० च्या पूर्वी होऊन गेलेला असला पाहिजे व तो स्वतः बालरामायणांतील उतारे घेणारा व वक्रोक्तिजीवित आणि लोचन यांच्यावर * टीका करणारा असल्यामुळे तो सन १००० नंतरचा असला पाहिजे असें उघड होतें. मम्मटानें पांचव्या उल्लासातील चर्चेत महिमभट्टाचें नांव घेतलें नसलें, तरी

---

* ' व्यङ्क्त इति द्विवचनेनेदमाह-यद्यप्यविवक्षितवाच्ये......विकल्पाभिधानं प्राधान्याभिप्रायेण ' ( व्यक्तिविवेक पा. १९ ). हे शब्द अक्षरशः लोचनांतलि आहेत ( पा. ३३ ).

त्याच्या व्यक्तिविवेकांतील सिद्धान्ताचेच खंडन केलें आहे असें सरस्वतीतीर्थादि काव्यप्रकाशावरील टीकाकारांचें म्हणणें आहे. 'ननु वाच्यादसंबद्धं तावन्न प्रतीयते' येथपासूनच्या काव्यप्रकाशांतील ( उल्लास ५ पा. २५२ वामनाचार्यप्रत ) विवेचनांतील शब्द व्यक्तिविवेकांतील ( पा. १५ व १११ ) तद्विषयक विवेचनाला अगदीं धरून आहेत. ७ व्या उल्लासांतहि काव्यप्रकाशकारानें दोषविवेचन करतांना व्यक्तिविवेकाला धरूनच ते केलेलें दिसते. वस्तुस्थिति तशीच असेल तर महिमभट्टाचा उदयकाल इ. स. १०२० पासून १०६० पर्यंत असला पाहिजे.

व्यक्तिविवेकावरील प्रसिद्ध झालेली टीका अपुरी आहे ही खेदाची गोष्ट होय. या टीकेच्या कर्त्याचे नांव उपलब्ध भागांत आढळत नाही. पण अलंकारसर्वस्वांतील वृत्तीचा कर्ता हाच त्या टीकेचा कर्ता असावा असा तर्क करण्यास जागा आहे. त्या टीकेंत एका ठिकाणीं ( पा. ४४ ) टीकाकारानें हर्षचरितवार्तिक व दुसऱ्या एका ठिकाणी ( पा. ३२ ) साहित्यमीमांसा व नाटकमीमांसा असे ग्रंथ आपण लिहिल्याचा उल्लेख केला आहे. तो म्हणतो, 'अस्य च विधेयाविमर्शस्यानन्तेतरप्रसिद्धलक्ष्यपातित्वेनास्माभि**र्नाटकमीमांसायां साहित्यमीमांसायां च** तेषु तेषु स्थानेषु प्रपंचः प्रदर्शितः,' 'एतदस्माभि**र्हर्षचरितवार्तिके** विस्तृत्य प्रतिपादितम्'. अलंकारसर्वस्वांत ( पा. ६१ ) यांतील हर्षचरितवार्तिक व साहित्यमीमांसा यांचा उल्लेख असून ते आपणच लिहिले असल्याचें ग्रंथकारानें सांगितले आहे. तो म्हणतो 'एषा च समस्तोपमाप्रतिपादकविषयेऽपि **हर्षचरितवार्तिके साहित्यमीमांसायां च** तेषु तेषु प्रदेशेषूदाहृता'. सर्वस्वाचा टीकाकार जयरथ यानें अलंकारसर्वस्ववृत्तिकाराची व्यक्तिविवेकावर टीका असल्याचें सांगितले आहे ( अ. स. पान १३ काव्यमाला ). 'तदेतत्कुशाग्रधिषणैः......नेह प्रतन्यते' ( पा. १३ ) या अलंकारसर्वस्वांतील शब्दांचे स्पष्टीकरण जयरथाने 'वाच्यस्य प्रतीयमानेन तादात्म्य–तदुत्पत्त्यभावादि नेह प्रतन्यत इति **व्यक्तिविवेकविचारे मया एवैतद्वितत्य निर्णीत**मिति भावः' असें केलें आहे. व्यक्तिविवेकावरील ही टीका विद्वत्तापूर्ण आहे; पण मूळग्रंथकार व टीकाकार यांचे विषयासंबंधाने भिन्न मत असल्यामुळे टीकेंत कित्येक ठिकाणीं मूळग्रंथकाराचा बराच समाचार घेतलेला आढळतो. हा टीकाकार ध्वन्यालोकाचा कट्टा अनुयायी आहे. 'ध्वनिकारस्य वचोविवेचनं नः' या

व्यक्तिविवेकांतील प्रास्ताविक पद्यासंबंधानें हा टीकाकार म्हणतो, ' यथास्थित-पाठे तु ध्वनिकारस्येति वचःशब्दान्वितमिष्यमाणं प्राधान्याद्विवेचनशब्दान्वितं प्रतीयते । एतच्चास्य साहित्याविचारदुर्निरूपकस्य प्रमुख एव स्खलितमिति महान् प्रमादः । '. महिमभट्टाच्या अभिमानासंबंधानेंहि टीकाकारानें त्याच्यावर झोड उठविली आहे. तो एका ठिकाणी ( पा. ४१ ) म्हणतो, ' तदेतस्य विश्वमगण-नीयं मन्यमानस्य स्वात्मनः सर्वोत्कर्षशालिताख्यापनमिति ' जगाला तुच्छ मानणारा हा ग्रंथकार आपला सर्वश्रेष्ठपणा असा मिरवीत आहे. दुसऱ्या ठिकाणीं ( पा. ४४ ) ' ग्रंथकारो हेवाकितयैव दूषणमदात् ' ग्रंथकारानें हेवाकीपणामुळेंच दोष काढिला आहे, असें त्यानें म्हटलें आहे. पण महिमभट्टाची वास्तविक योग्य-ताहि हा टीकाकार जाणत आहे असें त्याने त्याला एक दोन ठिकाणीं 'महामति' असें म्हटलें आहे, त्यावरून दिसून येते ( पा. १५, १६ ). या टीकेंत टीका-कारानें स्वतःचेहि कित्येक संग्रहश्लोक दिले आहेत ( पा. ३ व १२ ). त्यांतील ' गुणीकृतात्मतार्थस्य न प्रतीतावुपायता । नाचारुत्वमपि त्वर्थैर्बौद्धैरनुपकार्यता ॥' हा श्लोक महिमभट्टाच्या ' उक्तं गुणीकृतात्मत्वं ' ( पा. २ ) या श्लोकाला उत्तर असून, ' वाचो गुणीकृतार्थत्वं व्यङ्ग्यमर्थं प्रति स्थितम् । तदर्थं तदुपादानादुद-कार्थं दृतेरिव ' । हा ' वाचो गुणीकृतार्थत्वं न संभवति जातुचित् ' इत्यादि मूळांतील ( पा. १४ ) श्लोकाला उत्तर आहे. या टीकाकाराने पूर्वीच्या टीका-कारांचा ' केचित् ' ( पा. ३२ ) या शब्दानें उल्लेख केला आहे. ' हेम्नो भार-शतानि ' हा सुप्रसिद्ध असा हर्ष व बाण यांविषयींचा श्लोक त्यानें उद्धृत केला असून भर्तृमेण्ठ या ग्रंथकारासंबंधाचाहि तसाच एक श्लोक दिला आहे ( पा. २० ). **बृहती** नांवाचा ग्रंथ आपण लिहिणार असल्याचाहि त्याने उल्लेख केला आहे ( पा. ४५ ). अक्षपाद, दण्डी ( पा. ४७ दाण्डो ग्रंथः धर्मकीर्तिकृत वार्तिक ( पा. ३४ ), उद्भट, वक्रोक्तिजीवित, वामन, परिमल ( पा. ५३ ), सौगताः ( पा. ४१ ) यांची वचनें आधारास्तव त्याने घेतलीं आहेत. मूळांतील पाठांचीहि त्याने कित्येक ठिकाणी चर्चा केली आहे ( पा. ३३, ३५, ५१. ), त्यांत एका ठिकाणीं ' रूपकस्य विषये उपमाया यथा ' ( व्य. वि. पान ८६ ) हा भाग प्राक्षिप्त वाटतो असें म्हटलें आहे. अलंकारसर्वस्ववृत्तिकार म्हणजेच हा टीका-कार असल्यामुळें त्याचा उदयकाल इ. स. ११५० च्या सुमारास असला पाहिजे.

## २२ भोजकृत सरस्वतीकंठाभरण

सरस्वतीकंठाभरण हा भोजकृत साहित्य ग्रंथ बऱ्याच ठिकाणी छापिलेला आहे. निर्णयसागरमधीलहि काव्यमालेंत तो अर्धवट प्रसिद्ध झालेला आहे. *

आम्ही पुढे दिलेले उल्लेख काशीप्रतीला अनुसरून आहेत. सरस्वतीकंठाभरण ग्रंथ फार विस्तृत आहे. त्याचे पांच परिच्छेद असून पहिल्या परिच्छेदांत पदविषयक १६ दोष, तसेच वाक्यविषयक व वाक्यार्थविषयक असे प्रत्येकीं १६ दोष, व शब्दांचे आणि वाक्यार्थाचे असे प्रत्येकीं २४ गुण यांची चर्चा आली आहे. दुसऱ्या परिच्छेदांत चोवीस शब्दालंकारांचे वर्णन असून तिसऱ्यांत जाति, विभावना, हेतु, अहेतु, सूक्ष्म, उत्तर, विरोध, संभव, अन्योन्य, परिवृत्ति, निदर्शन, भेद, समाहित, भ्रांति, वितर्क, मीलित, स्मृति, भाव, प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, आगम, अर्थापत्ति आणि अभाव या चोवीस अर्थालंकारांची लक्षणे उदाहरणांसह दिली आहेत. चवथ्या परिच्छेदांत शब्दार्थालंकारांचें विवेचन असून, उपमा, रूपक, साम्य, संशय, अपह्नुति, समाधि, समासोक्ति, अप्रस्तुतप्रशंसा, तुल्ययोगिता, लेश, सहोक्ति, समुच्चय, आक्षेप, अर्थान्तरन्यास, विशेषोक्ति, परिकर, दीपक, क्रम, पर्याय, अतिशयोक्ति, श्लेष, भाविक व संसृष्टि अशा २४ अलंकारांचें वर्णन आले आहे पांचव्या परिच्छेदांत रस, भाव, नायक, नायिका व त्यांचे भेद आणि विशिष्ट लक्षणे, मुख प्रतिमुखादि पंच संधि व भारती आदिकरून चार वृत्ति यांचा विचार केलेला आहे.

भोजानें आपल्या या ग्रंथांत दंडीच्या काव्यादर्शामधून पुष्कळच उतारे घेतले असून अशा श्लोकांची संख्या सुमार दोनशें भरेल. सरस्वतीकंठाभरणाचें इतर ग्रंथकारांचे कालनिर्णय करण्याच्या कामी मोठें महत्त्व आहे; कारण त्यांत पूर्वीच्या ग्रंथांतलि सुमार १५०० पद्ये उदाहरणांसाठी उद्धृत केलेली आहेत. कांहीं वर्षांपूर्वी हे महत्व विशेषच होतें; कारण त्यावेळी वामनाचें काव्यालंकार-

---

* आम्ही हा ग्रंथ लिहिल्यानंतर १९२५ सालीं निर्णयसागरनें संपूर्ण सरस्वतीकंठाभरण ग्रंथ छापून प्रसिद्ध केला आहे. त्यांत पहिल्या तीन परिच्छेदांवर रत्नेश्वराची दर्पण टीका, व चवथ्या परिच्छेदावर जगद्धराची टीका दिलेली आहे. पांचव्या परिच्छेदावर कोणतीच टीका दिलेली नाही. बरुआ यांचे प्रतींतहि फक्त तीन परिच्छेदांवरची रत्नेश्वराची टीका आहे.

सूत्र आदिकरून भोजपूर्व प्राचीन ग्रंथ प्रसिद्ध नव्हते. पण आतां तें सूत्र, ध्वन्यालोक, त्यावरील लोचनटीका इत्यादि पूर्वीचे विस्तृत ग्रंथ उपलब्ध झाल्या मुळे त्याप्रमाणांत सरस्वतीकंठाभरणाचें महत्त्व कमी झालें आहे. भोजानें कालिदास व भवभूति यांच्या ग्रंथांतील उतारे पदोपदी घेतले आहेत. अभिधान-माला, बाण, भट्टि, भरत, भामह, भारवि, महाभारत, रत्नावली, राजशेखर, रामायण, रुद्रट, विक्रांतशूद्रकनाटक, वेणीसंहार, शिशुपालवध यांतूनहि मधून मधून कांही अवतरणे केलीं आहेत. त्याचे सिद्धांत कित्येक बाबतीत चमत्कारिक दिसतात व त्याच्या विवेचनांत सर्वत्र एक प्रकारची प्रमाणबद्ध समतोल मांडणी आढळून येते. उदाहरण, दोष व गुण यांचे वर्गीकरण घेऊं. पदाचे, दोष १६, तर वाक्याचेहि सोळाच दोष त्यानें सांगितले आहेत. शब्दाचे गुण २४, तर वाक्यार्थाचेहि २४ च. रीती सहा प्रकारच्या, तर वृत्ति व मुद्राहि सहाच प्रकारच्या. उपमा, आक्षेप, समासोक्ति, अपह्नुति व इतर कित्येक अलंकार शब्द व अर्थ दोघांचे होत असे त्यांचे म्हणणे असून त्याच्या मतांशीं जुळतें असें दुसऱ्या कुणाचे मत नाहींच म्हटले तरी चालेल. हे त्याचे मत अग्नि-पुराणाला मात्र धरून आहे ( अ. ३४४ ). त्यानें रीतीला शब्दालंकार मानिले असून तिचे वैदर्भी, पाञ्चाली, गौडीया, आवन्तिका, लाटीया व मागधी असे सहा भेद सांगितले आहेत. पूर्वमीमांसेंत मानिलेली सहाहि प्रमाणे त्यानें अलंकारपदवीला चढविलीं आहेत. पूर्व ग्रंथकारांना अनुसरून रससंख्या त्यानें आठ सांगितली आहे खरी, पण त्यांचें विवरण करण्याच्या त्याच्या पद्धतीवरून पहातां शृङ्गार हा एकच रस होय असे त्याचें मत दिसते व 'राजा भोज यानें शृङ्गार हा एकच रस होय असें शृङ्गारप्रकाशामध्ये प्रतिपादिलें आहे' असे जें विधान एकावलीकारानें केले आहे ( एका. पा. ९८ ) त्याचाहि या अनुमानाशीं चांगला मेळ पडतो. एकावलीकार विद्याधर म्हणतो, 'राजा तु शृङ्गारमेकमेव शृङ्गारप्रकाशे रसमुररीचकार' आणि हा राजा म्हणजे भोज होय असे त्याच्या तरलानामक टीकेच्या कर्त्यानें सांगितले आहे. 'भोजराजमतमाह राजा तु इति'. रत्नापणकार कुमारस्वामीनेहि ( प्रतापरुद्र. पा. २२१) शृङ्गारप्रकाशाचे म्हणून तेंच मत दिले आहे, तो म्हणतो, 'शृङ्गार एक एव रस इति शृङ्गारप्रकाशकारः'. मन्दारमरन्दचम्पूमध्यें ( बिन्दु ९ पा. १०७ ) सुद्धां तसेंच म्हटलेलें आढळतें; 'अथ भोजनृपादीना मतमत्र प्रकाश्यते। रसो वै स इति श्रुत्या रस एकः

प्रकीर्तितः ॥ अतो रसः स्याच्छृङ्गार एक एवेतरे तु न । धर्मार्थकाममोक्षाख्या भेदेन स चतुर्विधः ॥' तो ( म्हणजे परम पुरुष ) रसच आहे असें श्रुतीनेंच* सांगितलें असून तो शृंङ्गार होय व धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे त्याचे चार भेद आहेत. भोजाचा आणखी एक चमत्कारिक सिद्धान्त म्हणजे गुण आणि रस हेहि अलंकारच होत असा आहे. ' काव्यशोभाकरान् धर्मान् ' ( काव्यादर्श २, १-२ ) हें दण्डीचें वचन सांगून त्यावर त्याने ' तत्र काव्यशोभाकरानित्यनेन श्लेषोपमावद्गुणरसभावतदाभासप्रशमादीनप्यनुगृह्णाति ' अशी टीप दिली आहे ( परिच्छेद ५ पा. १८२ ). भोजाच्या या विशिष्ट मतांचा निर्देश जुन्यांत मोडणाऱ्या ग्रंथकारांनी केलेला आढळतो. काव्यप्रकाशसंकेतांत माणिक्यचंद्रानें भोज व कण्ठाभरण या दोन्ही नांवाचा अनेकवार उल्लेख केलेला आहे ( पाने ३००, ३३२, ३३८, ३३९ इ. ). पा ४६९ वर तो म्हणतो ' श्रीभोजेन जैमिन्युक्तषट्प्रमाणानि सम्भवश्चालंकारतयोक्तानि '. ' जातिगतिरीतिवृत्तिच्छाया... शय्यापीति वाक्ये...संभवप्रत्यक्षागमोपमानार्थापत्त्यभावलक्षणाश्चार्थालंकारा ये भोजराजेन प्रतिपादिताः ' असा भोजाचा मताचा निर्देश हेमचंद्रानेंहि काव्यानुशासनविवेकांत केला आहे ( पा. २९५ ). अलंकारसर्वस्वाच्या टीकेत जयरथाने भोजाचें संकर व संसृष्टि विषयक मत ' श्रीभोजदेवेन पुनर्भेदस्य स्फुटास्फुटत्वमाश्रित्य नानालंकारसंकरः संसृष्टिरिति संकीर्णमात्राभिप्रायेण संसृष्टयाख्य एक एवालंकार उक्तः ' असे दिले आहे. भोज हा संकर अलंकार मानीत नसून एक संसृष्टि मात्र मानितो असें तो म्हणतो. भावप्रकाशन या ग्रंथांत शृंगारप्रकाचा उल्लेख केला असून त्याचा सारांश व मते जागोजाग दिलेलीं आहेत; उक्ताङ्गानां चतुःषष्टिः षोढा चैषां प्रयोजनम् । एतान्युक्तानि शृङ्गारप्रकाशे भोजभूभृता ॥ भावप्रकाशन ( पान २१३ ) व भावप्रकाशन पान १२, १९४, २१९, २४२, २४५, २५१ पहा. रसार्णवसुधाकरांतही अनेकवेळां भोजाचा उल्लेख आहे व त्याला नुसतेंच ' राजा ' असे कांही ठिकाणीं म्हटले आहे ( पान ५२, ५७, ६९, १४९, १६८, 'प्रेयोरसवादिना महाराजेन' पा. १९० ). भावप्रकाशाच्या प्रस्तावनेत व प्रो. शंकरन् यांच्या ग्रंथांत शृंगारप्रकाशाची माहिती आहे.

---

* 'रसो वै सः । रसं ह्येवायं लब्ध्वानन्दी भवति ' हे वाक्य तैत्तिरीयोपनिषदांत ( ब्रह्मानन्दवल्ली अनुवाक ७ ) आहे.

भोजाच्या ' शृंगारप्रकाश ' या ग्रंथाची हस्तलिखित प्रत आतां मिळाली असून ती मद्रास सरकारी हस्तलिखितसंग्रहांत आहे ( vide report of the working of the peripatetic party of the Govt Oriental mss Library 1916-19 ). हा ग्रंथ अलंकारशास्त्रावरील सर्व ग्रंथांत मोठा असून ( ३२ अक्षरांचा समूह म्हणजे एक श्लोक ह्या हिशेबानें ) त्याची ३०००० श्लोकसंख्या आहे. ह्या ग्रंथाचे ३६ प्रकाश आहेत. पहिल्या सहा प्रकाशांत काव्यलक्षण, १२ प्रकारचे शब्द व अर्थ यांचें विवेचन आहे. ७-८ यांत शब्द व अर्थ यांच्या अभिधादि बारा धर्मांचें विवेचन आहे. नवव्यांत दोषाभाव व गुण यांचा विचार असून दहाव्यांत अलंकार व रीति यांचें सोदाहरण विवेचन आहे. ११ व्यांत त्यानें आपली रसाची उपपत्ति मांडून महाकाव्याची व्याख्या दिली आहे. बाराव्यांत रूपकाचीं ६४ अंगें, १३ ते १७ यांत रस, भाव, आलंबन व उद्दीपन विभाव, अनुभाव यांचा ऊहापोह आहे. १८-२१ यांत शृंगाराचे चार प्रकार ( धर्म, अर्थ, काम, मोक्ष ) यांचें विवरण आहे व २२-३६ यांत विप्रलम्भ व संभोग शृंगार यांचे अनेक भेद, उपभेद वर्णिले असून ग्रंथाच्या शेवटी सरस्वतीकण्ठाभरणाचे शेवटी जे दोन श्लोक आहेत तेच दिले आहेत.

हा मराठी निबंध छापावयास दिल्यानंतर शृङ्गारप्रकाशाचे २२-२४ प्रकाश श्री यदुगिरि यतिराजस्वामी ( रामानुज मठ, मेलकोट, म्हैसूर ) यांच्या आश्रयानें रा. ए. रंगास्वामी सरस्वती यांनी प्रसिद्ध केलेले पहाण्यास मिळाले. ह्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत ३६ प्रकाशांचा सारांशही दिलेला आहे. शृंगार हा अहंकारविशेष आहे, शृंगारवीरकरुणाद्भुतरौद्रहास्यबीभत्सवत्सलभयानकशान्त असे दहा रस कांही बुद्धिमान पुरुषांनीं सांगितले परंतु शृंगार असा एकच रस आमचे मतानें आहे, वीरादि रस आहेत अशी जी प्रसिद्धि आहे ती वडावर यक्ष आहे या प्रसिद्धीप्रमाणेंच आहे व ती लोक गतानुगतिक असल्यामुळें झाली आहे, ती दूर करण्यासाठी हा परिश्रम आम्हीं करीत आहों, रत्यादीचा प्रकर्ष म्हणजे रस अशी जर कल्पना केली तर हर्षादिकांना रस कां म्हणूं नये, हर्षादिकांना जर स्थायिभाव म्हणावयाचें नाहीं तर भय हास शोक क्रोध यांना स्थायिभाव कां म्हणावें व हर्षादिकांशी तुलना करितां ते असे किती जास्त वेळ टिकतात इत्यादि मते प्रास्ताविक श्लोकांतच सांगितली आहेत ( आत्मस्थितं गुणविशेषमहं-

कृतस्य शृंगारमाहुरिह जीवितमात्मयोनेः । तस्यात्मशक्तिरसनीतया रसत्वं युक्तस्य येन रसिकोयमिति प्रवादः ॥...वीराद्भुतादिषु च येह रसप्रसिद्धिः सिद्धा कुतोपि वटयक्षवदाविभाति । लोके गतानुगतिकत्ववशादुपेतामेतां निवर्तयितुमेष परिश्रमो नः ॥). २२ व्या प्रकाशांत अनुरागाचे ६४ प्रकार (अभिलाष, आकांक्षा, अपेक्षा, उत्कण्ठा इत्यादि) सोदाहरण वर्णिले आहेत. अभिलाषाचें उदाहरण शाकुन्तलातील ' अनाघ्रातं पुष्पं ' हे दिले आहे. या प्रकाशात बहुतेक उदाहरणें प्राकृतांत आहेत. ह्या ६४ प्रकाराचे प्रत्येकीं अष्ट प्रकार संभवतात. बरीचशी उदाहरणें कालिदास व भवभूति यांचे ग्रंथांतील आहेत. प्रकाशानुरागाच्या २४ प्रकारांत पुनर्भूविषयक प्रकाशानुरागाचे उदाहरण म्हणून ' के वैकटानितम्बेन गिरां गुम्फेन रञ्जिताः । निन्दन्ति निजकान्तानां न मौग्ध्यमधुरं वचः ॥ ' दिलें आहे. यावरून विकटनितम्बा या नांवाची कवयित्री पुनर्विवाहित होती असें सूचित होतें. या प्रकाशांत प्रच्छन्नानुरागाचेही चोवीस प्रकार सांगून त्यांची उदाहरणे दिली आहेत. कृत्रिमानुरागाचीं व अकृत्रिमानुरागाचींही प्रत्येकी चोवीस उदाहरणे दिलीं आहेत. तेविसाव्या प्रकाशांत शृङ्गाराचे दोन विभाग संभोग व विप्रलम्भ असे करून त्या प्रत्येकाचे पुनः चार भेद केले आहेत. संम्भोगशृंगाराचे पुनः स्वांगनाविषय, परांगनाविषय, सामान्याविषय इत्यादि बारा उपभेद करून विप्रलम्भाचेही तितकेच उपभेद सांगून त्यांची सर्वांची उदाहरणें दिली आहेत. चोविसाव्या प्रकाशांत विप्रलम्भाचें सविस्तर विवेचन आहे. विप्रलम्भशृंगाराचे उत्तम (परस्परानुरागे उत्तमः), मध्यम ( नायिकानुरागे मध्यमः ), ( कनिष्ठ ( नायकानुरागे कनिष्ठः ) असे तीन प्रकार वर्णून प्रथमानुराग, मान, प्रवास, व करुण असे विप्रलम्भशृङ्गाराचे चार भेद सांगून त्यांच्या व्याख्या, त्यांचे पोटभेद, व उदाहरणें ह्यांनी हा प्रकाश भरला आहे. ह्या प्रकाशांत व्याकरण प्रक्रियेच्या साहाय्यानें विप्रलम्भाची उदाहरणें प्रकृति, प्रत्यय, उपसर्ग, कर्ता, लिङादिकाल इत्यादि दिलेली आहेत. एकंदर शृङ्गारप्रकाश ह्या ग्रथांत अनेक ग्रंथ व ग्रंथकार याची अवतरणे असल्यामुळे हा ग्रंथ कालनिर्णयाचे बाबतीत महत्वाचा आहे. २२-२४ ह्या प्रकाशांत उषाहारण, कादंबरी कुमारसंभव, नागानन्द, तापसवत्सराज, महाभाष्य, मालतीमाधव, मेघदूत, हरिविजय ह्या ग्रंथांचीं नांवें आहेत. या तीन प्रकाशांतच सुमारें ४७०१ पद्यें उदाहरणें म्हणून दिलीं आहेत. यावरून सर्व ग्रंथांत किती अवतरणें असतील याची कल्पना होईल.

भोजाच्या नांवावर अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत धर्मशास्त्रावर भोजकृत ग्रंथ असून त्यांतील मतें याज्ञवल्क्य स्मृतीच्या मिताक्षरा टीकेंत व दायभाग नामक टीकेंत धारेश्वर या नांवानें उद्धृत केलीं आहेत. पातंजलयोगसूत्रावरील राजमार्तण्ड नामक टीकेंत 'शब्दानामनुशासनं विदधता पातञ्जले कुर्वता वृत्ति राजमृगांकसंज्ञकमपि व्यातन्वता वैद्यके । वाक्चेतोवपुषां मलः फणभृतांभर्त्रेव येनोद्धृतस्तस्य श्रीरणरंगमल्लनृपतेर्वाचो जयन्त्युज्ज्वलाः ॥' असा श्लोक प्रस्तावनेत दिला असून त्यांत भोजानें व्याकरण, योग, वैद्यक इत्यादि विषयांवर ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख आहे. त्याच्या धर्मशास्त्रावरील ग्रंथांसाठीं आमचें 'धर्मशास्त्राचा इतिहास' (पान २७५-२७९) हें पुस्तक पहावें. राजमृगाङ्क नांवाचा ज्योतिःशास्त्रावरील भोजकृत करणग्रंथ असून त्यांत गणितासाठीं आरंभवर्ष शके ९६४ म्हणजे सन १०४२–३ हे घेतलें असल्यामुळे त्या ग्रंथाचा रचनाकाल सन १०४२–४३ च्या सुमारास असला पाहिजे असें दिसतें. दाक्षिणेच्या प्राचीन इतिहासांत ( पान ६० ) डॉ. भाण्डारकर यांनीं भोजाचा उत्कर्षकाल इ. स. ११ व्या शतकाचें पूर्वार्ध होय असेंच अनुमान काढिलें आहे. पण विक्रमांकदेवचरिताच्या प्रस्तावनेंत डॉ. बुल्हरनें तो काळ जरा अलीकडे आणिला आहे. डॉ. बुल्हरनें आपल्या अनुमानाला दोन आधार घेतले. राजतरंगिणींत ( ७, २५९ ) 'स च भोजनरेन्द्रश्च दानोत्कर्षेण विश्रुतौ । सूरी तस्मिन्क्षणे तुल्यौ द्वावास्तां कविबान्धवौ ।' असा जो भोजाचा संबंध दिला आहे तो सन १०६२ नंतरच्या काळाला लागू पडतो असें डॉ. बुल्हरचें मत आहे. त्या वेळीं कलश हा काश्मीरचा रा.ा झाला होता. दुसरा आधार सरस्वतीकण्ठाभरणांत चौरपञ्चाशिकेंतून घेतलेला एक श्लोक होय. बुल्हरच्या मतें चौरपञ्चाशिका बिल्हणानें लिहिली व तदनुसार त्यानें उपरोक्त कालनिर्णय केला. पण पहिल्या आधारासंबंधानें बुल्हरचें मत आग्रहाचें दिसतें. 'तस्मिन्क्षणे' या राजतरंगिणीतील शब्दांवर त्यानें निष्कारण फार भर दिला आहे. त्यांतील 'सः' म्हणजे तो हा शब्द टीकाकाराच्या मतें अनंत नामक राजाला उद्देशून आहे हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे. शिवाय चौरपंचाशिकेचा कर्ता कोण हा प्रश्न अद्यापि वादग्रस्तच आहे भोजप्रबंधांतील वर्णनाप्रमाणें पाहिल्यास भोजानें ५५ वर्षें राज्य केलें. त्याचा चुलता जो मुंज त्याचा तैलपानें वध केला तो सन ९९४ पासून ९९७

पर्यंत केव्हांतरी केला. मुंजाच्या मागून त्याचा भाऊ सिंधुराज अथवा सिन्धुल हा राज्यावर आला. त्याला नवसाहसाङ्क असेहि म्हटलेलें आहे. भोजाच्या मागून राजा झालेला जो जयसिंह त्याच्या राजवटींतील संवत् १११२ म्हणजे सन १०५५-५६ या वर्षांतील एक कोरींव लेख असून त्यावरून भोजाच्या कालाचा निर्णय निश्चित होतो. एपिग्रॅफिआ इंदिका ग्रंथ ३ पा. ४६-५० यांत तो लेख आला असून त्यावरून भोजराजा सन १०५५ या वर्षी विद्यमान नव्हता हें उघड होतें. त्यानें पुष्कळ वर्षें राज्य केल्याचें प्रसिद्ध असून त्याच्या राजवटींतील संवत् १०७८ म्हणजे सन १०२१ या वर्षीचा लेख उपलब्ध झालेला आहे. हा लेख इंडियन अँटिक्वरि ग्रंथ ६ पान ५३ वर आला आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां भोजराजा सन १००५च्या सुमारास राज्यावर आलेला असून सन १०५५ पूर्वीं त्याची राजवट संपली असली पाहिजे. म्हणजे सरस्वतीकंठाभरणाचा रचनाकाल १०१५ पासून १०५५ पर्यंतच्या अवधींतील असून बहुधा त्याच्या उत्तरार्धांत म्हणजे भोजाच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं तो रचिला असे धरिलें तरी तो काळ इ. स. १०३० पासून १०५० पर्यंत केव्हांचा तरी असावा असें ठरतें. सरस्वतीकंठाभरणांतील एका श्लोकांत मुञ्जराजाची स्तुति आली आहे ती अशी ' सौजन्याम्बुनिधे...श्रीमन्मुञ्ज किमित्यमुं जनमुपस्प्रष्टुं दृशा नार्हसि ॥ ' ( परि. १ पा. ६१ ) धारप्रशस्तीमध्यें अर्जुनवर्म्याला भोजाचा अवतार म्हटलें असून अर्जुनवर्म्याच्या राजवटींतील सन १२११, १२१२, १२१५ हीं वर्षें निश्चित झालेली आहेत ( एपिग्रॅफिआ इंदिका ग्रंथ ८ पा. ९६ पहा ). मुञ्जाचींच उत्पलराज, अमोघववर्ष, पृथ्वीवल्लभ, श्रीवल्लभ अशी नांवें होतीं. त्याचे मागून सिन्धुराज आला त्याला नवसाहसाङ्क व कुमारनारायण असेंहि म्हणत ( नवसाहसाङ्कचरित १५९ ). नवसाहसाङ्कचरितांत ( सर्ग ११ ) त्यानें अनेक वर्षें लढाया मारल्याचा उल्लेख आहे. म्हणून त्यानें कांहीं वर्षें तरी राज्य केलें असलें पाहिजे. नवसाहसाङ्कचरितांत परमारवंश हा ' परमार ' ( शत्रूंना मारणारा ) नांवाचा जो योद्धा विश्वामित्राच्या सैन्यांचा धुव्वा उडविण्यासाठीं वसिष्ठानें वैतानाग्नीपासून निर्माण केला त्याचेपासून झाला असें सांगून ( सर्ग ११,७१ ) त्यांत प्रथम ' उपेन्द्र ' राजा झाला, नंतर वैरिसिंह, नंतर सीयक, सीयकाचा ज्येष्ठ पुत्र वाक्पतिराज व कनिष्ठ सिन्धुराज अशी माहिती दिली आहे.

सरस्वतीकंठाभरणावर रत्नदर्पण नांवाची महामहोपाध्याय रत्नेश्वराची टीका आहे. ही टीका रत्नेश्वरानें तीरहूतच्या रामसिंहदेव नामक राजाच्या सांगण्यावरून लिहिली. रत्नेश्वराचा उदयकाल १४ व्या शतकांतील आहे. रत्नदर्पण तिसऱ्या परिच्छेदापर्यंतच प्रसिद्ध आहे ही टीका विद्वत्तापूर्ण असून तींत आनन्दवर्धन, काव्यप्रकाश, चंद्रगोमिन्, राजशेखर, रुद्रट, लोचनकार, शृङ्गारप्रकाश, या ग्रंथांतील उतारे घेतलेले आहेत. रत्नेश्वराने काव्यप्रकाशावरहि टीका लिहिल्याचें सांगितलें आहे. ' हा तो जोज्जलदेउ नैव मदनः साक्षादयं भूतले ' ( परि. १ पा. १०६ ) या श्लोकावरील टीकेत टीकाकारानें ' हा तो ' हे शब्द मराठी असून ' अयं सः ' या अर्थाचे होत असें म्हटले आहे. *

## २३ क्षेमेन्द्रकृत औचित्यविचारचर्चा व कविकण्ठाभरण

क्षेमेन्द्र हा काश्मीरनिवासी पंडित असून प्रचंड ग्रंथकार होता व त्यानें अनेक विषयावर ग्रंथलेखन केले आहे. भारतमञ्जरी, बृहत्कथामञ्जरी, व दुसरे सुमार चाळीस ग्रंथ त्याच्या नांवावर प्रसिद्ध आहेत. राजतरंगिणीत ( १, १३ ) त्याच्या नृपावलि किंवा राजावलि नांवाच्या ग्रंथाचाहि उल्लेख आहे, पण तो ग्रंथ अद्यापि उपलब्ध नाहीं. काव्यचिकित्साशास्त्रासंबंधाने त्याचे कार्य फारसे विस्तृत नसून त्याचा अलंकारशास्त्राच्या वाढीवर विशेष परिणाम झाल्याचें दिसत नाही. सुवृत्ततिलक नामक त्याच्या ग्रंथांत छंदासंबंधानें कांही मनोवेधक विचार प्रकट केलेले असून त्यांच्या विनियोगासंबंधानें कांही चांगल्या सूचना दिल्या आहेत व कोणत्या कवीला कोणते वृत्त उत्तम साधले होते हेंहि दाखविले आहे. अनुष्टुप् छंदांत अभिनन्द, उपजातींत पाणिनि, शिखरिणींत भवभूति, शार्दूलविक्रीडितांत राजशेखर श्रेष्ठ अशा त्याने जोड्या लाविलेल्या आहेत. त्याच्या औचित्यविचारचर्चा

* भावप्रकाशनाचे प्रस्तावनेत ( पान २८ ) शृंगारप्रकाशांतील अवतरणें देऊन त्याचा मुख्य सिद्धान्त सांगितला आहे तो असा ' न रत्यादिर्भूमा रसः किं तर्हि शृङ्गारः । शृङ्गारो हि नाम...आत्मनोहङ्कारविशेषः । स चेतसा रस्यमानो रस इत्युच्यते यदस्तित्वे रसिको अन्यथात्वे नीरस इति ।...वयं तु मन्यामहे रत्यादीनामयमेव प्रभव इति । शृङ्गारिणो रत्यादयो जायन्ते नाशृङ्गारिणः ।...नन्वष्टौ स्थायिनोऽष्टौ सात्त्विकास्त्रयस्त्रिंशद्व्यभिचारिण इति ब्रुवते । न तत्साधु । यतोऽमीषामन्यतमस्यैतैरेव निर्वर्त्यमानत्वात् । '

या ग्रथांत त्याच्या स्वतःच्या कारिका व स्वतःचीच वृत्ति असून उदाहरणें अनेक ग्रंथातून वेचिली आहेत. स्वतःच्या ग्रंथांतीलहि पद्ये त्यानें उदाहरणासाठीं घेतलीं आहेत. रसाचें सारें सार म्हणजे औचित्य अथवा युक्तपणा होय असा त्याचा पक्ष असून तो त्याने 'औचित्यस्य चमत्कारकारिणश्चारुचर्वणे। रसजीवितभूतस्य विचार कुरुतेऽधुना (कारिका ३)' या कारिकेत मांडिला आहे व 'उचितं प्राहुराचार्याः सदृशं किल यस्य यत्। उचितस्य च यो भावस्तदौचित्यं प्रचक्षते॥' (कारिका ७) असें औचित्याचें लक्षण केले आहे. पुढे पद, वाक्य, प्रबंधार्थ, ओज आदिकरून गुण, अलंकार, रस, क्रिया, कारक, लिंग, वचन उपसर्ग, काल, देश, इत्यादि अनेक गोष्टींच्या औचित्याची उदाहरणें त्यानें दिलीं आहेत. प्रत्येक विषयासंबंधाने एक औचित्ययुक्त व एक अनौचित्ययुक्त अशीं उलट सुलट उदाहरणें देऊन त्याने विषयाची मांडणी केली आहे. ध्वन्यालोकांत (पाने १३४-१४५) घालून दिलेल्या नियमांचाच सविस्तर विचार क्षेमेन्द्रानें औचित्यविचार-चर्चेत केला आहे. हे नियम ध्वन्यालोकांत (पा. १४५) 'अनौचित्यादृते नान्यद्रसभंगस्य कारणम्। प्रसिद्धौचित्यबन्धस्तु रसस्योपनिषत्परा" ॥ असे साररूपाने सांगितले आहेत. त्याने अनेक ग्रंथकारांच्या ग्रंथातून अवतरणें घेतलीं असून त्यांत परिमल, कालिदासकृत कुन्तेश्वरदौत्य, गौड कुम्भकार, भट्टभल्लट, भट्टतोत व त्याचा स्वतःचा गुरु भट्टगंगक हीं नावें प्रमुख होत. कविकर्णिका-काव्यालंकार नांवाच्या आपल्या स्वतःच्या ग्रंथाचा उल्लेख क्षेमेन्द्राने औचित्य-विचारचर्चेत केला आहे; पण तो ग्रंथ कविकण्ठाभरणाहून निराळा आहे कीं काय याविषयीं संशय आहे.

कविकंठाभरण या ग्रंथांत ५५ कारिका असून त्याचे संधि नांवाचे पांच भाग केलेले आहेत. 'अत्राकवेः कवित्वाप्तिः शिक्षा प्राप्तगिरः कवेः। चमत्कृतिश्च शिक्षाप्तौ गुणदोषोद्गतिस्ततः॥ पश्चात्परिचयप्राप्तिरित्येते पंच संधयः' असे त्या संधींतील विषय आहेत (१,३–४). क्षेमेन्द्रानें शिष्यांचे तीन भेद केले असून, कवीचे छायोपजीवी, पदकोपजीवी, पादोपजीवी, सकलोपजीवी, भुवनोपजीव्य असे प्रकार सांगितले आहेत व काव्याचे गुणदोष आणि व्याकरण, तर्क नाटय या विषयांचा अभ्यास यांविषयीं कवींना कांहीं सूचना केल्या आहेत. क्षेमेन्द्राच्या या दोन्हीं ग्रंथांत मिळून अवसरसार, अमृततरङ्ग (काव्य) कनकजानकी, कविकर्णिका, चतुर्वर्गसंग्रह, चित्रभारत नाटक, देशोपदेश

नीतिलता, पद्यकादम्बरी, बौद्धावदानकल्पलता, मुक्तावली काव्य, मुनिमत-मीमांसा, ललितरत्नमाला, लावण्यवतीकाव्य, वात्स्यायनसूत्रसार, विनयवल्ली, शशिवंश इतक्या त्याच्या दुसऱ्या ग्रंथांचे उल्लेख आले आहेत. सुवृत्ततिलक या ग्रंथांत त्यानें कलश राजाचें म्हणून एक पद्य दिलें असून, कविकण्ठाभरणांत भट्टोदयसिंह नांवाच्या शिष्याच्या ललिताभिधान नामक काव्याचा उल्लेख केला आहे व राजपुत्र लक्ष्मणादित्यनामक दुसऱ्या शिष्याचेंहि एक पद्य दिलें आहे. क्षेमेन्द्राच्या पित्याचें नांव प्रकाशेन्द्र व पितामहाचें सिन्धु असें होतें. क्षेमेन्द्राने आपलें बरेच ग्रंथ रामयशस् याच्या सांगण्यावरून लिहिले. बृहत्कथामञ्जरींत अभिनवगुप्ताचा उल्लेख त्यानें केला असून साहित्यशास्त्राचा अभ्यास आपण त्याच्यापाशी केला असें म्हटले आहे ( श्रुत्वाभिनवगुप्ताख्यात् साहित्यं बोध-वारिधेः । ). तो प्रथम शैव होता, पण मागाहून सोमाचार्याकडून त्यानें वैष्णव पंथाची दीक्षा घेतली. बहुतेक ग्रंथांत त्याने स्वतःला व्यासदास म्हण-वून घेतलें आहे. समयमातृका हा ग्रंथ लौकिक काल २५ म्हणजे सन १०५० या वर्षी त्याने लिहिला व दशावतारचरित लौकिक काल ४१ म्हणजे सन १०६६ या वर्षी लिहिला. त्यावेळी कलश राजा राज्य करीत होता. औचित्यविचारचर्चा व कविकण्ठाभरण हे ग्रंथ अनन्त राजाच्या राज-वटीत त्यानें लिहिले. कविकंठाभरणांत यासंबंधाने ‘ राज्ये श्रीमदनन्तराजनृपते. काव्योदयोऽयं कृतः ’ असें त्यानें म्हटले आहे. अनंतराजा काश्मीरांत सन १०२८ पासून १०६३ पर्यंत राज्य करीत असून १०६३ त त्यानें आपला पुत्र कलश याला राज्याभिषेक केला. अनंत सन १०८१ त आपल्या वयाच्या ६१ व्या वर्षी मृत्यु पावला. क्षेमेंद्राच्या लिहिण्यावरून औचित्यविचारचर्चा व कविकंठाभरण हे दोन्ही ग्रंथ अनंत प्रत्यक्ष राज्य करीत असतां लिहिण्यांत आले असे दिसते. म्हणजे त्यांचा रचनाकाळ सन १०६३ च्या पूर्वी असला पाहिजे. अर्थात् क्षेमेन्द्राचा ग्रंथकर्तृत्वकाल ११ व्या शतकाच्या दुसऱ्या व तिसऱ्या पादांत पडतो. त्याच्या इतर ग्रथांचे वृत्त बुल्हरचे काश्मीरग्रंथवृत्त ( पाने ४५-४८ ), मुंबई रॉयल एशिआटिक सोसायटीचा ग्रंथांक १६ पान १६७–१६९, जादा ग्रंथांक १६ ( पा. ५-९ ), इत्यादिकांवरून कळून येईल.

औचित्यविचारचर्चा व कविकंठाभरण काव्यमालेंत छापले आहेत ×

---

× औचित्यविचारचर्चा या ग्रंथावर सहृदयतोषिणी म्हणून टीका मद्रासला छापली आहे असें प्रो. दे म्हणतात ( व्हा. १ पान १४२ ).

## २४ मम्मटप्रणीत काव्यप्रकाश

मम्मटाचा काव्यप्रकाश हा साहित्यशास्त्रावरील फार प्रसिद्ध ग्रंथ असून तो अनेक ठिकाणी छापिलेला आहे. अलंकारशास्त्राच्या इतिहासांत काव्यप्रकाशाला अपूर्व स्थान मिळालेलें आहे. शेंकडों वर्षें होत असलेला साहित्यशास्त्राच्या अनेकविध अंगाचा विकास त्यांत लक्षात घेतलेला असून त्याचे सार त्यांत आले आहे व तो स्वतःहि साहित्यशास्त्रविषयक अनेक मतांचें उगमस्थान झालेला दिसून येतो. वेदांतशास्त्रांत जसें शारीरकभाष्य किंवा व्याकरणशास्त्रांत जसे व्याकरण-महाभाष्य त्याप्रमाणें काव्यप्रकाश हा काव्यशास्त्रमीमांसेत असून भावी काव्यमीमांसा-पद्धति व तद्विषयक सारा पसारा यांचा उगम त्यांत आढळून येतो. त्यांतलि विवेचन पूर्ण व सर्वांगीण असूनहि तें शक्य तितके थोडक्यांत केलेलें आहे हा त्या ग्रंथाचा विशेष गुण आहे. त्यांत एकंदर १४२ च कारिका किंवा सूत्रें असून त्यांत काव्यमीमांसाशास्त्राच्या बहुतेक सर्व अंगांचा विचार आलेला आहे. कारिका, त्यांच्या स्पष्टीकरणार्थ वृत्ति आणि उदाहरणे असे त्याचे तीन भाग असून विषयानुरोधाने दहा उल्लास केलेल आहेत. व्यतिरेक, उपमा इत्यादिकांच्या अगदी साध्या उदाहरणांशिवाय इतर सर्व अलंकारादिकांची उदाहरणें मम्मटानें पूर्वीच्या ग्रंथांतून घेतलीं आहेत.

या ग्रंथाच्या पहिल्या उल्लासांत काव्याचा उद्देश, काव्याचा हेतु, काव्याची व्याख्या, आणि काव्याचे उत्तम, मध्यम व अधम असे तीन प्रकार यांचे विवेचन आहे. वाच्यार्थाहून व्यङ्ग्यार्थ ज्यांत अधिक ते उत्तम काव्य, दोन्ही समान असलेलें तें मध्यम व वाच्यार्थच ज्यांत मुख्य ते अधम होय. दुसऱ्या उल्लासांत शब्दांच्या शक्तीचा विचार आहे. शब्द हा वाचक, लाक्षणिक व व्यंजक असून तदनुसार अर्थ वाच्य, लक्ष्य आणि व्यङ्ग्य असतो. कांहींच्या मतें तात्पर्यार्थ म्हणून चवथाहि अर्थाचा प्रकार मानिला पाहिजे. या पारिभाषिक संज्ञांचें स्पष्टीकरण आणि लक्षणा व व्यञ्जना यांच्या पोटभेदांचें विवेचन या उल्लासांत आहे. तिसऱ्या उल्लासांत सर्वत्र प्रकारचे अर्थ व्यञ्जक कसे होऊं शकतात व अशा वेळी व्यञ्जना हीच एक शक्ति कशी असते याचें विवेचन केले आहे. चवथ्या उल्लासांत अविवक्षितवाच्य आणि विवक्षितान्यपरवाच्य हे दोन ध्वनिभेद, तसेंच त्यांचे पोटभेद, रस, स्थायिभाव, विभाव, व्यभिचारिभाव वगैरे रसविषयक अनेक कल्पना

यांची चर्चा आहे. पांचव्यांत मध्यम किंवा गुणीभूतव्यङ्गय काव्य व त्याचे आठ प्रकार वर्णिले आहेत. सहाव्यांत चित्रकाव्य किंवा अधम काव्य व त्याचे शब्द-चित्र आणि अर्थचित्र हे दोन भेद विवेचिले असून सातव्यांत पद, वाक्य, अर्थ व रस यांचे दोष वर्णिल्यावर ज्याला सामान्यतः दोष म्हण-तात तो विशिष्ट स्थलीं रमणीयतोत्पादक गुण कसा होऊं शकतो हें सांगितलें आहे. आठव्या उल्लासांत गुण व अलंकार यांमधील भेद सांगून माधुर्य, ओजस् व प्रसाद हे तीनच गुण होत असे मत प्रतिपादिलें आहे व त्यांची लक्षणें दिलीं आहेत. दुसरे गुण म्हणून जे इतरांनीं सांगितले आहेत त्यांचा या तीन गुणांत अन्तर्भाव होतो किंवा ते केवळ दोषाभावरूप असतात. कित्येक विशिष्ट वर्णांच्या संयोगानें गुणोत्पत्ति होते. नवव्यांत शब्दालंकारांचे वर्णन आहे. प्रथम वक्रो-क्तीचे लक्षण सांगून तिचे श्लेष व काकु हे दोन प्रकार सांगितले आहेत. पुढें छेकानुप्रास व वृत्त्यनुप्रास अशा दोन प्रकारचा अनुप्रास, उपनागरिका, परुषा व कोमला या तीन वृत्ति, लाटानुप्रास, अनेक प्रकारचें यमक, श्लेष, खड्गबंध मुरज-बन्धादि चित्ररचना व पुनरुक्तवदाभास यांचे विवरण केले आहे. शेवटच्या दहाव्या उल्लासांत उपमादि अर्थालंकार वर्णिले आहेत. अलंकारविषयक दोषांचें विवेचन सातव्या उल्लासांत दोषांच्या विवेचनांतच केलें आहे.

काव्यप्रकाशाच्या या रूपरेखेवरून त्यांत नाटकाशिवाय इतर सर्व विषयांचा परामर्श घेतलेला आहे हें दिसून येईलच. मम्मटाने आपली उदाहरणें व आधार विस्तृत अशा वाङ्मयक्षेत्रांतून वेचून काढिले आहेत. आपल्या मताच्या स्पष्टीकरणार्थ त्यानें पूर्व ग्रंथकारांच्या ग्रंथांतून ६०० च्या वर श्लोक उद्धृत केले असून आचार्य अभिनवगुप्त, कालिदास, कामशास्त्र, उद्भट, ध्वनिकार किंवा ध्वनिकृत्, बाण, भट्टनायक, भरत, मयूर, लोल्लट, शंकुक, श्रीहर्ष यांची नांवें सांगितली आहेत व कालिदासभवभूतींचे ग्रंथ, अमरुशतक, कर्पूरमंजरी, कुट्टनी-मत, चण्डीशतक, नवसाहसाङ्कचरित, नागानन्द, बालरामायण, भट्टि, भर्तृहरि, भल्लट, भामह, भास, माघ, रत्नावली, राघवानन्द, विज्जका, विद्धशालभंजिका, वेणीसंहार, हयग्रीववध, हरविजय इत्यादिकांतून नामोल्लेख न करितां उतारे घेतले आहेत. विस्तारभयास्तव ते सर्व ग्रंथ व ग्रंथकार यांची नांवें येथे देत नाहीं. ध्वन्यालोक, उद्भट, भामह, रुद्रट, वामन, अभिनवगुप्त, इत्यादि पूर्व साहित्यशास्त्र-कारांच्या ग्रंथानुरोधाने मम्मटानें आपल्याहि ग्रंथांतील विषयांची मांडणी केलेली

आहे, खरी पण त्याने सर्वत्र आपलें स्वतंत्रबुद्धित्व प्रकट केलें असून पूर्वग्रंथकारांविषयी आदर दाखवीत असतांहि त्यांच्या मताचें प्रसंगानुसार खंडन करण्यास त्याने मागे पुढे पाहिलेले नाही. उदाहरणार्थ ९ व्या उल्लासांत त्याने भट्टोद्भटाच्या श्लेषविषयक विवेचनावर चांगलेंच टीकास्त्र सोडले असून सातव्या उल्लासाच्या शेवटीं 'सत्यं मनोरमा रामाः सत्यं रम्या विभूतयः । किन्तु मत्ताङ्गनापांगभङ्गलोलं हि जीवितम् ।' या ध्वन्यालोकांतील श्लोकाचें दोषाविष्करण केलें आहे. * मम्मटाने रुद्रटाचेहि पुष्कळ श्लोक उद्धृत केले आहेत, पण प्रसंगोपात्त त्यांवर विरोधी टीकाहि केली आहे. उदाहरण, त्याची " 'धुनोति चासि तनुते च कीर्तिमित्यादेः', 'कृपाणपाणिश्च भवान् रणक्षितौ ससाधुवादाश्च सुराः सुरालये इत्यादेश्च दर्शनात्', 'व्यधिकरणे' इति, 'एकस्मिन्देशे' इति च न वाच्यम्" इत्यादि समुच्चयालंकारविषयक टीका 'व्यधिकरणे वा यस्मिन्गुणक्रिये' या रुद्रटाच्या ( ७, २७ ) विधानाला अनुलक्षून आहे तसेच त्याचे " हेतुमता सह हेतोरभिधानमभेदतो हेतुः । इति हेत्वलकारो न लक्षितः ... 'अविरलकमलविकासः......कालः' इत्यत्र काव्यरूपतां कोमलानुप्रासमहिम्नैव समाम्नासिषुर्न पुनर्हेत्वलकारकल्पनया ।" हे कारणमालाविषयक शब्दहि रुद्रटाच्या हेतूच्या लक्षणाला व त्याच्या उदाहरणाला ( ७, ८२-८३ ) अनुलक्षून आहेत. तसाच आणखी 'साध्यसाधनयोः पौर्वापर्यविकल्पे न किञ्चिद्वैचित्र्यमिति न तथा दर्शितम्' हा अनुमानासंबंधाचा निगम रुद्रटाच्या 'वस्तु परोक्षं यस्मिन्' ( ७, ५६ ) या अनुमानाच्या लक्षणाला पुढें ठेवूनच लिहिलेला आहे. काव्यालंकारसूत्रांत वामनानें 'काव्यशोभायाः कर्तारो गुणाः । तदतिशयहेतवस्त्वलकाराः ।' ( ३, १, १-२ ) असे म्हणून जो गुण व अलंकार यांत भेद

---

* ध्वन्यालोकांत ( पा. १८० ) म्हटलें आहे, " शृंगारविरुद्धरसस्पर्शः विनेयानुन्मुखीकर्तुं काव्यशोभार्थमेव वा क्रियमाणो न दुष्यति । शृङ्गाररसाङ्गैरुन्मुखीकृताः सन्तो हि विनेयाः सुखं विनयोपदेशं गृह्णन्ति ।...ततश्च 'सत्यं' इत्यादिषु नास्ति रसविरोधः । '. **सत्यं मनोरमा रामाः** या श्लोकांत प्रथम शृङ्गाराचे विभाव सांगून पर्यवसान शांत रसांत केलें आहे, तरी त्यांत विरोध नाहीं कारण त्यांत शृङ्गाररसद्वारा श्रोत्याला उपदेशग्रहणप्रवण करून पुढें योग्य उपदेश केला आहे व ही पद्धति शांतरसमय काव्याला रमणीयत्व देणारीच आहे.

दाखविला आहे त्यांत मम्मटानें दोष काढिला आहे ( उल्लास ८ ). वामनाच्या ओजोगुणाच्या स्पष्टीकरणावरहि मम्मटाची दोषदृष्टि गेलेली आहे. 'अर्थस्य प्रौढिरोजः' ( का. सू. ३, २, २ ) असें लक्षण देऊन त्याचें स्पष्टीकरण वामनाने वृत्तींत 'पदार्थे वाक्यरचनं' इत्यादि श्लोकरूपानें दिलें आहे. त्यावर मम्मट ८ व्या उल्लासांत म्हणतो 'पदार्थे वाक्यरचनं वाक्यार्थे च पदाभिधा । प्रौढिर्व्याससमासौ च साभिप्रायत्वमस्य च ॥ इति या प्रौढिरोज इत्युक्तं तद्वैचित्र्य-मात्रं न गुणः तदभावेऽपि काव्यव्यवहारप्रवृत्तेः'. भामहाचीं वचने मम्मटानें आधारासाठी कित्येक ठिकाणी घेतली आहेत. सहाव्या उल्लासांत 'रूपकादिरलं-कारः' इत्यादि तीन पद्यें व दहाव्यांत 'सैषा सर्वैव वक्रोक्तिरनयार्थो विभाव्यते । यत्नोऽस्यां कविना कार्यः कोऽलंकारोऽनया विना' हें सुप्रसिद्ध पद्य भामहाच्या काव्यालंकारांतून ( परि १,१३-१५; परि २, ८५ ) अनुकूल म्हणून घेतलीं आहेत. पण असें असतांहि 'श्रव्यं नातिसमस्तार्थं काव्यं मधुरमिष्यते' या भामहाच्या ( २, ३ ) माधुर्य गुणाच्या लक्षणांत 'आह्लादकत्वं माधुर्यं शृंगारे द्रुतिकारणम् । श्रव्यत्वं पुनरोजःप्रसादयोरपि' असें म्हणून मम्मटानें ( आठव्या उल्लासांत ) दोष काढिला आहे. त्याच्या मतें श्रव्यत्व हें लक्षण ओजोगुणालाहि लागू पडतें. कालिदासासारख्या महाकवींचेहि दोष दाखविण्यास मम्मट कचरलेला नाही. 'मृदुपवनविभिन्नो' ( विक्रमो० ४, २२ ), इत्यादि श्लोकांत अमंगला-श्लील हा दोष, 'दिवाकराद्रक्षति यो गुहासु' ( कु. सं. १, १२ ) यांत अनु-चितार्थता, 'अतिथिं नाम काकुत्स्थात्पुत्रमाप कुमुद्वती' ( रघु. १७, १ ) यांत भग्नप्रक्रम, 'गाहन्तां महिषा निपानसलिलं ( शाकु. २, ६ ) यांतहि भग्नप्रक्रम, 'वपुर्विरूपाक्षमलक्ष्यजन्मता' ( कु. सं. ५, ७२ ) यांत अविमृष्टविधेयांश दोष असे दोष त्याने कालिदासाच्या काव्यांतून काढून दाखविले आहेत.

काव्यप्रकाशांतील कारिका भरताच्या होत व त्यावर मम्मटानें वृत्ति लिहिली असें कित्येक अर्वाचीन टीकाकारांचे म्हणणें आहे. विद्याभूषणकृत साहित्यकौमु-दींत एका ठिकाणी 'सूत्राणां भरतमुनीशवर्णितानाम् । वृत्तीनां कृतवपुषां कृतौ ममास्याम्', तसेंच शेवटी 'मम्मटाद्युक्तिमाश्रित्य मितां साहित्यकौमुदीम् । वृत्तिं भरतसूत्राणां श्रीविद्याभूषणो व्यधात् ।' असें ग्रंथकार म्हणतो. काव्यप्रका-शांतील कारिका भरताच्या आहेत असें महेश्वरानेंहि काव्यप्रकाशादर्शांत म्हटलें आहे ( जीवानंदाची आवृत्ति पा. ३ ), 'अग्निपुराणादुद्धृत्य......अलंकारशास्त्रं

कारिकाभिः संक्षिप्य भरतमुनिः प्रणीतवान् '. जयरामानें तिलक नांवाच्या आपल्या काव्यप्रकाशटीकेंत कारिका भरतप्रणीत होत असा प्रथम पूर्वपक्ष मांडून शेवटीं वृत्ति व कारिका यांचा कर्ता एकच होय असा सिद्धांत ठरविला आहे. कारिकांच्या कर्त्याविषयींच्या या कल्पनेला मुख्य आधार पुढील तीन गोष्टींचा दिसतो:—(१) कांहीं काव्यप्रकाशकारिका नाट्यशास्त्रकारिकांसारख्याच आहेत; उदाहरण, ' शृंगारहास्यकरुणरौद्रवीरभयानकाः । बीभत्साद्भुतसंज्ञौ चेत्यष्टौ नाट्ये रसाः स्मृताः ॥ रतिर्हासश्च शोकश्च...॥ निर्वेदग्लानिशंकाख्या......त्रयस्त्रिंशदमी भावाः समाख्यातास्तु नामतः ' ॥ या चवथ्या उल्लासांतील कारिका नाटयशास्त्राच्या ६ व्या अध्यायांतील १५, १७, २१, या कारिकांशी समान आहेत. (२) पहिल्या कारिकेवरील वृत्तीत ' ग्रन्थारम्भे विघ्नविघाताय समुचितेष्टदेवतां **ग्रंथकृत् परामृशति** ' असे शब्द असून त्यांवरून वृत्तिकार हा मूळ ग्रंथकाराहून वेगळा असल्याचा भास होतो. (३) दहाव्या उल्लासांतील ' समस्तवस्तुविषयं श्रौता आरोपिता यदा ' ही कारिका व त्या कारिकेवरील ' बहुवचनमविवक्षितम् ' ही वृत्ति यांत मतभेद दिसतो. कारिकाकार व वृत्तिकार जर एकच असते तर कारिकेंत ' श्रौतावारोपितौ यदि ' असे शब्द आले असते असे म्हणणें आहे. पण हीं तिन्ही कारणे अगदींच दुर्बल आहेत असें थोड्या विचाराअन्तीं दिसून येईल. प्रथम कारिकासादृश्य पाहिलें तर काव्यप्रकाशांतील १४२ कारिकांपैकी फारच थोड्या नाट्यशास्त्रांत आढळतात. मम्मटानें त्या रसविषयक कारिका नाट्यशास्त्रांतून बहुधा घेतल्या असाव्या, कारण त्याला आपलें म्हणणे त्यांत थोडक्यांत मार्मिक रीतीनें ग्रथित केलेले आढळले व स्वतःला ते अधिक चांगल्या रीतीने मांडतां येईल असें वाटलें नाहीं. नाट्यशास्त्र हा ग्रंथ रसविवेचनासंबंधाने त्या वेळी अग्रगण्य झाला असल्यामुळे त्यांतून कारिका घेण्यांत कमीपणाहि मानण्याचे कारण नव्हते. मम्मटाने इतर कित्येक कारिकाहि दुसऱ्यांच्या ग्रंथांतून बहुतेक अक्षरशः उचललेल्या आहेत. ७ व्या उल्लासांतील ' कर्णावतंसादिपदे कर्णादिध्वनिनिर्मितिः । सनिधानादिबोधार्थम् ' ही कारिका वामनाच्या ' कर्णावतंसश्रवणकुण्डलशिरःशेखरेषु कर्णादिनिर्देशः **सन्निधेः** ' ( २,२,१४ ) या काव्यालंकारांतील सूत्रावरून घेतलेली दिसते. ' ये रसस्याङ्गिनो धर्माः ', ' उपकुर्वन्ति तं सन्तं येऽङ्गद्वारेण जातुचित् ' या आठव्या उल्लासांतील कारिका ध्वनिकारिकांतील दुसऱ्या उद्द्योतांत आलेल्या ' तमर्थमवलम्बन्ते येऽङ्गिनं ते

गुणाः स्मृताः । अङ्गाश्रितास्त्वलंकारा मन्तव्याः कटकादिवत् ॥ ' या ७ व्या कारिकेवरून रचिलेल्या दिसतात. यास्तव कित्येक कारिका नाट्यशास्त्रांत आहेत म्हणून सर्वच कारिका भरताच्या होत असें म्हणणें युक्तिसिद्ध नाहीं. **ग्रन्थकृत् परामृशति** या तृतीयपुरुषी प्रयोगासंबंधानें खरा प्रकार असा आहे कीं निरभिमानता दाखविण्यासाठीं तसा प्रयोग करण्याची प्राचीन ग्रंथकारांची पद्धतिच आहे. ' मीं ग्रंथ रचितो ' असा प्रथम पुरुषी प्रयोग ते सहसा करीत नाहींत. मनुस्मृतीवरील टीकाकार मेधातिथि व कुल्लूक यानीं ग्रंथकारांचा हा दंडक सांगितला आहे. मेधातिथि म्हणतो ' प्रायेण ग्रंथकाराः स्वमतं परापदेशेन ब्रुवते '. कुल्लूक म्हणतो ' प्रायेणाचार्याणामियं शैली यत्स्वाभिप्रायमपि परोपदेशमिव वर्णयन्ति '. साहित्यदर्पणकार विश्वनाथ स्वतःच्या कारिकांवरील वृत्तींत ' ग्रंथारम्भे...वाग्देवतायाः सांमुख्यमाधत्ते ' असा तृतीय पुरुषीच प्रयोग करितो. अर्थात् त्यावरून ग्रंथकारापासून वृत्तिकाराचे भिन्नत्व मुळीच सिद्ध होत नाहीं. तिसऱ्या कारणासंबंधाने म्हटलें तर, ' समस्तवस्तु...यदा ' ही कारिका व तिच्यावरील वृत्ति यांत खरोखरीचा भेद नाहीच. वृत्तीचा रोंखच तें कारण सांगणारांच्या लक्षांत आलेला दिसत नाहीं. कारिकेंत ' श्रौताः आरोपिताः ' असें जे बहुवचन घातलें आहे ते सामान्य नियम सांगण्याच्या हेतूनें आहे. समस्तवस्तुविषय रूपकांत सामान्यतः आरोप्यमाण गुण पुष्कळ असणार असें समजून 'आरोपिताः' असें बहुवचन कारिकेत घातलें आहे व वृत्तींतहि आरंभाला तसेंच सांगितलें आहे. ' आरोप्यविषया इवारोप्यमाणा यदा ' इत्यादि शब्दांवरून हें दिसून येईल. ' बहुवचनमविवक्षितम् ' हे वृत्तीतील शब्द विशिष्ट उदाहरणाला अनुलक्षून आहेत व त्याकडे दुर्लक्ष होऊं नये म्हणून त्याचा निर्देश स्पष्टपणें केला आहे. आरोप्यमाण विषय दोनच असले तरीहि समस्तवस्तुविषय रूपक होतें हे सांगण्याचा वृत्तीचा उद्देश आहे ही गोष्ट कारिकेंत स्पष्टपणे आलेली नसल्यामुळे तिचा स्वतंत्र उल्लेख वृत्तीत केला आहे. *

पण कारिका व वृत्ति या दोहोंचा कर्ता मम्मटच होय याविषयीं स्वतंत्र स्पष्ट

---

* गोविन्द ठक्कुर यानेंहि काव्यप्रदीपांत ' आरोपिता इति बहुवचनमविवक्षितमित्यारोप्यद्वयस्थले नाव्याप्तिः ' असे म्हणून हाच भाव दाखविला आहे.

प्रमाणेंहि देतां येण्यासारखी आहेत. ( १ ) मम्मटानें दुसऱ्याच्या कारिकांवर आपण वृत्तिरूप टीका करीत आहों असें कोठेंहि स्पष्ट दर्शविलेलें नाहीं. वृत्तिच केवळ त्याची असती तर तिच्या आरंभीं स्वतंत्र मंगलाचरण आलें असतें; तसें मंगलाचरण वृत्तींत नाहीं, कारिकांच्या आरंभीं मात्र आहे. यावरून वृत्तिकार हाच कारिकाकारहि असला पाहिजे असें ठरतें. ( २ ) ' कारणान्यथ कार्याणि ' या ४ थ्या उल्लासांतील कारिकेवरील वृत्तींत ' तदुक्तं भरतेन विभानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिरिति ' असे म्हटले आहे. काव्यप्रकाशकारिका जर भरताची असती तर वृत्तिकारानें ' भरतेन ' च्या जागी ' अनेनैवान्यत्र ' किंवा ' ग्रंथकृताऽन्यत्र ' असे कांहीं तरी म्हटले असते ( ३ ) पण याहूनहि स्पष्ट प्रमाण दहाव्या उल्लासांतील ' साङ्गमेतन्निरङ्गं तु शुद्धं माला तु पूर्ववत् ' या कारिकेंत आहे. या कारिकेत **मालारूपकाचा** संबंध असून तें पूर्वी सांगितलेल्या **मालोपमेसारखें** आहे असें सांगितले आहे. पण पूर्वी सांगितलेली ही मालोपमा कारिकांत आलेली नसून वृत्तीतच असल्यामुळें कारिका व वृत्ति या दोन्ही एकाच्याच हातच्या होत हे निर्विवाद सिद्ध होतें. ( ४ ) माणिक्यचन्द्र, जयन्त, सरस्वतीतीर्थ, सोमेश्वर इत्यादि काव्यप्रकाशावरील आरंभीच्या टीकाकारांनीं कारिकाकार व वृत्तिकार यांत कोठेंहि भेद मानिलेला नाही. उलट जुन्या अशा कित्येक टीकाकारांनी कारिका व वृत्ति एकानेच लिहिल्या असें स्पष्ट दर्शविले आहे. काव्यानुशासनावरील टीकेंत हेमचंद्रानें ( पा. ४ ) ' एवमानन्दयशश्चतुर्वर्गोपायव्युत्पत्तीनां काव्यप्रयोजनतामसाधारणीं प्रतिपाद्य यत्कैश्चित् श्रीहर्षादेर्धावकादीनामिव धनं...नर्थनिवारणं प्रयोजनत्रयमुपन्यस्तम्' असें म्हटलें यांत 'काव्यं यशसेऽर्थकृते ' ही कारिका व तीवरील वृत्ति या एकाच्याच होत असें धरून लेखक चालत आहे हे स्पष्ट होतें. दुसऱ्या एका ठिकाणी हेमचंद्र म्हणतो ( का. शा. टीका पा. १०९ ) " यथाह मम्मटः 'अगूढमपरस्याङ्गं' इति ". 'अगूढम् ' इत्यादि कारिका पांचव्या उल्लासांत आरंभीच आल्या आहेत ( कारि. १-२ ) व त्या मम्मटाच्या म्हणून हेमचंद्रानें स्पष्ट सांगितलें आहे. अलंकारसर्वस्वटीकेत जयरथानें काव्यप्रकाशकृत् ही संज्ञा कारिकाकार व वृत्तिकार यांना अभेदानें लाविलेली आहे ( पा १०२,

---

× इन्डियन ॲटिक्वरी व्हॉल्यूम ४७ पान २३ येथे ' सांगमेतत् ' ह्या कारिकेवरील वृत्तीवरून ही हेच अनुमान प्रो. झिमरमन यांनीं काढिलें आहे.

१०७, १५०, १९९ इ. ). प्रतापरुद्रीयकारानें काव्यप्रकाश या संज्ञेनेंच कारिकांचा उल्लेख केला आहे. ( पा. ६, ९०, २२५, ३३६ इ. ). चित्रमीमांसाकार अप्पयदीक्षितानें उत्प्रेक्षालंकारावरील कारिका व त्याचें उदाहरण ही काव्यप्रकाशिकाकाराचीच मानिलीं आहेत ( चि. मी. पान ८० ). रसगङ्गाधरांतहि " अत एव 'अष्टौ नाट्ये रसाः स्मृताः' इत्युपक्रम्य 'शान्तोऽपि नवमो रसः' इति मम्मटभट्टा अप्युपसमहार्षुः " असे म्हणून मम्मटालाच कारिकाकार मानिलें आहे. या सर्व प्रमाणांवरून पहातां काव्यप्रकाशांतील कारिका व वृत्ति या दोन्ही मम्मटाच्याच होत याविषयी संशय रहात नाहीं.

काव्यप्रकाशाच्या शेवटी ' इत्येष मार्गो विदुषां विभिन्नोप्यभिन्नरूपः प्रतिभासते यत् । न तद्विचित्रं यदमुत्र सम्यग्विनिर्मिता सङ्घटनैव हेतुः ॥' असा श्लोक असून त्याचे अगदी पहिल्या पहिल्या टीकाकारांनीहि दोन निराळे अर्थ केले आहेत. त्यांतील माणिक्यचंद्र हा प्रसिद्ध असलेला जुन्यांत जुना टीकाकार म्हणतो ' अथ चायं ग्रंथोऽन्येनारब्धोऽपरेण च समर्थित इति द्विखण्डोऽपि सङ्घटनावशादखण्डायते । '. काव्यप्रकाशाचा कांही भाग एकानें केल्यावर दुसऱ्यानें त्याची पूर्ति केली; पण सङ्घटनेमुळे त्याची ही दोन खंडे निराळी न दिसतां एकंदर ग्रंथाला अखंड अशा सुसंगत ग्रंथाचे रूप आलेले आहे. काव्यप्रकाशसङ्केत नामक टीकेंत म्हटले आहे ' एतेन महामतीनां प्रसरणहेतुरेष ग्रंथो ग्रंथकृताऽनेन कथमप्यसमाप्तत्वादपरेण च पूरितावशेषत्वात् द्विखंडोऽपि इ० '. मूळ ग्रंथकाराच्या हातून हा ग्रंथ कांही कारणास्तव पुरा झाला नाही व तो दुसऱ्या कोणी पुरा केल्यामुळे त्याची दोन खंडे आहेत, तरी त्यांचा सांधा नीट जुळविल्यामुळें ग्रंथाला सुसंगतपणा आलेला आहे (पीटरसनचें दुसरें ग्रंथसंशोधनवृत्त पा. १३). राजानक आनंद हा काव्यप्रकाशनिदर्शनांत म्हणतो ' यदुक्तं-कृतः श्रीमम्मटाचार्यवर्यैः परिकरावधिः । प्रबंधः पूरितः शेषो विधायालकसूरिणा ॥ अन्येनाप्युक्तं-काव्यप्रकाशदशकेऽपि निबन्धकृद्भ्यां द्वाभ्यां कृतेऽपि कृतिनां रसतत्त्वलाभः ।' इ० ( रॉयल ए. सो. मुंबई शाखा इतिवृत्त जादा क्रमांक १६ पा. २३ ). मम्मटानें परिकरापर्यंत ग्रंथ लिहिला, पण पुढील उरलेला भाग अलकाने पुरा केला असें ह्यांत सांगितलें आहे. काव्यप्रकाशसङ्केताच्या १ ल्या व १० व्या उल्लासांच्या शेवटी ' इति श्रीमद्राजानकामल्लमम्मटरुचकविरचिते निजग्रंथकाव्यप्रकाश-

सङ्केते प्रथम उल्लासः ' व ' कृती राजानकमम्मटालकक्ष्चकानाम् ' असे उपसंहारात्मक शब्द आढळतात ( पीटरसनचें दुसरें ग्रं. सं. वृत्त पा. १४ ). संवत् १२१६ ( सन ११५८ ) मधलि काव्यप्रकाशाच्या एका हस्तलिखित प्रतींत ' कृती राजानकमम्मटालकयोः ' असे उपसंहारशब्द आहेत ( प्रो. श्री रा. भांडारकर वृत्त सन १९०४-६. पा ७९ ). काव्यप्रकाशाच्या या जोडकर्तृत्वाचा उल्लेख अर्जुनवर्मदेव यानें अमरुशतकाच्या टीकेंतहि केलेला दिसून येतो. ' भवतु विदितं ( अ. श. ३० ) इत्यादि श्लोकावर ( पा. २९ ) तो म्हणतो, ' यथोदाहृतं दोपनिर्णये **मम्मटालकाभ्यां** प्रसादे वर्तस्व ' इ०. ' प्रसादे वर्तस्व प्रकटय मुद सत्यज रुषं ' हा श्लोक काव्यप्रकाशाच्या ७ व्या उल्लासांत आला आहे. दुसऱ्या ठिकाणी ' लीलातामरसाहतो ' इत्यादि ७२ व्या श्लोकावरील टीकेत अर्जुनवर्मदेव म्हणतो ' किन्तु ह्लादैकमयीवरलब्धप्रसादौ **काव्यप्रकाशकारौ** प्रायेण दोषदृष्टी येन ' इ०. ' लीलातामरसाहतो ' इत्यादि श्लोक काव्यप्रकाशांत ७ व्या उल्लासांत उद्धृत केला असून अश्लील दोषाचे उदाहरण म्हणून सांगितला आहे. अर्जुनवर्मदेव हा धारानगरीच्या भोजराजापासून १३ वा क्रमागत पुरुष असून त्याच्या राजवटीतील सन १२११ पासून १२१६ पर्यंतचे कोरीव लेख उपलब्ध आहेत. यावरून मम्मटानंतर शंभर वर्षाच्या अवधीतच अर्जुनवर्मदेव झाला व त्यावेळी मम्मटाला **ह्लादैकमयीचा** म्हणजे सरस्वतीचा अवतार मानूं लागले होते असें दिसून येते. अलकाचा संबंध काव्यप्रकाशाच्या १० व्या उल्लासापुरताच नसून ७ व्यांतहि त्याच्या कर्तृत्वाचा भाग होता असेंहि आणखी अर्जुनवर्मदेवाच्या विधानांत व्यक्त होते. अलकाचा काव्यप्रकाशाशी कर्तृत्वसंबंध आहे एवढी परंपरागत गोष्ट ऐकून अर्जुनवर्मदेवाने तो संबंध सर्व ग्रंथाला लावला असण्याचा बराच संभव आहे. मम्मटाच्या या जोडीदाराचें नांव बहुतेक ठिकाणीं ' अलक ' असेंच आढळते. पण काश्मीरी पंडितामध्ये हे '**अलट**' म्हणून प्रसिद्ध आहे व त्याचें दुसरें कांहीं रूप त्यांना माहीत नाहीं असे डॉ. स्टीन यानें जम्मू हस्तलिखितग्रंथनामावलींत (पा. २३) ठांसून सांगितलें आहे व त्याला अनुसरून कर्नल जेकब यानेंहि तें नांव ' अलक ' नसून ' **अलट** ' होय असेंच मानिलें ( ब्रिटिश रॉ. ए. सो. वृत्त वर्ष १८९७ पा. २८२ ). पण अर्वाचीन पंडितांच्या परंपरागत मतावर विसंबण्यापेक्षां प्राचीन हस्तलिखित प्रतींवर विश्वास ठेवणेंच अधिक श्रेयस्कर असल्यामुळें तें नांव

**अलक** असेंच मानिलें पाहिजे. या हस्तालिखित प्रतींतील एक प्रत तर सन ११५८ इतकी जुनी आहे व तींत **अलक** असेंच रूप आढळतें. शिवाय **अल्लट** हे रूप जितकें काश्मीरी वळणाचे आहे, तितकेंच **अलक** हेंहि आहे. रुद्रट, मम्मट, कल्लट, भल्लट, इत्यादिकांप्रमाणें कुन्तक, शङ्कुक, लङ्कक, मङ्खक, अशींहि काश्मीरी नांवें प्रसिद्ध आहेत. याविषयी सविस्तर विवेचन आह्मीं इन्डियन ॲन्टिक्वरी सन १९११, पा. २०८ यांतील या विषयावरील लेखांत केले आहे.

जोनराजानें ज्या अलकदत्ताचा सान्धिविग्रहिक अशा पदवीनं उल्लेख केला आहे व त्यानें कल्याणाला ( बहुधा हा राजतरंगिणीकार कल्हण असावा ) काव्यमीमांसाशास्त्र पढविले असे मङ्खकाच्या श्रीकंठचरितामध्ये ( २५,७८-८० ) म्हटलें आहे, तोच काव्यप्रकाशकार अलक कीं काय याचा निर्णय करणें फार कठीण आहे.

मम्मटाच्या वैयक्तिक वृत्ताची फारशी माहिती नाही. तो महाभाष्यप्रदीपकार कैयट व ऋक्प्रातिशाख्यभाष्यकार उवट यांचा वडील बंधु असून त्याच्या पित्याचें नांव जैयट होतें असें सुधासागर ग्रंथांत भीमसेनानें म्हटले असल्याचे डॉ. पीटरसननें लिहिलें आहे ( पीटरसन कृत पहिलें ग्रंथवृत्त पा. ९४ ). मम्मटाचा जन्म काश्मीरांत झाला, पण त्याचें अध्ययन काशी येथें झालें व त्यानेंच पुढे आपल्या दोन्ही बंधूंना शिकविलें असेंहि त्या ग्रंथांत म्हटलें आहे. पण भीमसेन ( इ. स. १७२३ ) हा मम्मटानंतर सुमारें ६०० वर्षांनी झालेला असल्यामुळें त्याचं विधान कल्पनेवरच उभारलेलें दिसतें. मम्मट, कैयट, उवट या नांवांतील ध्वनिसाम्यावरून ते भाऊ होते अशी कल्पना त्यानें लढविली असावी. उवटाच्या ऋक्प्रातिशाख्यभाष्यावरून त्याच्या पित्याचें नांव 'जैयट' नसून **वज्रट** असें होतें व उवट हा आनंदपुरवासी असून त्यानें भोजराजा राज्य करीत असतां वाजसनेयसंहिताभाष्य लिहिलें असे स्पष्ट कळून येते. या उवटाबद्दलच्या हकीकतीवरून मम्मट हा उवटाचा बंधु मानण्याला कांही अपरिहार्य अडचण

---

* इंडियन ॲंटिक्वरी सन १९२९ व्हा. ५८ पान १६१ येथें एक शिलालेख संवत् १०१० ( सन ९५३-५४ ) चा आहे त्यांत मेवाडच्या अल्लट राजाचें नांव असून त्याचा अमात्य मम्मट होता असे म्हटलेलें आहे. तेव्हां मम्मट व अल्लट ह्या नांवाचा केवळ काश्मीरालाच मक्ता होता असें मानण्याचें कारण नाहीं.

येत नाहीं हे खरे. पण तो उवटाचा बंधु मानिल्यास कैयटाचा मात्र बंधु मानितां येत नाहीं. कारण कैयटाचा पिता जैयट होता व उवटाचा वज्रट होता. नैषधीय काव्याचा कर्ता जो श्रीहर्ष त्याचा मम्मट हा मातुल होता अशी काश्मीरी पंडितांत प्रसिद्धि आहे ( बुल्हरकृत काश्मीरग्रंथवृत्त पा. ६८ ). मम्मट हा मोठा पढिक विद्वान् असून त्याचें वाचनहि फार विस्तृत होते असे दिसते. त्याचा व्याकरण-शास्त्रावरहि गहन व्यासंग होता, महाभाष्य व वाक्यपदीय या ग्रंथांतील वचनें त्यानें उद्धृत केली असून उपमेचे विभाग व्याकरणशास्त्राच्या दृष्टीने केले आहेत, बिभावनेच्या व्याख्येत 'क्रिया' शब्द हेतु या अर्थाने योजिला आहे, शब्दांच्या जात्यादि संकेतासंबंधानें विवेचन करतांना वैयाकरणांच्या मतांचा अनुवाद केला आहे व वैयाकरण म्हणजेच पंडित असें समीकरण ठरविले आहे. **शब्दव्यापार-विचार** नावाचा त्यांचा दुसरा लहानसा ग्रंथ असून तो निर्णयसागरांत अभिधा-वृत्तिमातृकेबरोबर छापिला आहे. या ग्रंथांत काव्यप्रकाशाच्या दुसऱ्या उल्ला-सांतील अभिधा व लक्षणा या शब्दवृत्तींचा विचार अधिक सविस्तर केलेला आहे. **राजानक** असे विशेषण त्याच्या नांवामागे लावण्यांत येते व अद्यापि सुद्धां काश्मिरी ब्राह्मणाना तें पदवी म्हणून लावतात. ' राजानक ' म्हणजे 'राजा समान'. ' राज्ञी कृतज्ञभावेन साऽपि मंत्रिसभान्तरे । तमाजुहाव निर्द्रोहं स्वयं राजानकाख्यया ' ॥ या राजतरंगिणीश्लोकात ( ६, २६१ ) 'राजानक' शब्द या अर्थानें आलेला आहे. मम्मट हा साऱ्या भारतवर्षात अत्यंत लोकप्रिय असा साहित्यग्रंथकार झालेला आहे ही गोष्ट काव्याप्रकाशावरील टीकांच्या प्रचंड संख्ये-वरून दिसून येतें. आजवर त्यावरील सुमारें सत्तर टीका उपलब्ध झाल्या आहेत.

इ. स. १०१५ त विद्यमान असलेल्या अभिनवगुप्ताची लोचनटीका व इ. स. १०१० च्या सुमारास रचिलेलें नवसाहसाङ्कचरित यांतील उतारे मम्मटानें घेतले असून भोजराजानें विद्वानांना दाखविलेल्या औदार्याचें वर्णन करणारा ' यद्विद्-द्भवनेषु भोजनृपतेस्तत्त्यागलीलायितम् ' असा श्लोक उदात्त अलंकाराचे

---

* वाजसनेयसंहितेच्या भाष्याच्या शेवटीं ' आनन्दपुरवास्तव्यवज्रटाख्यस्य सूनुना । उवटेन कृतं भाष्यं पदवाक्यैः सुनिश्चितैः ॥ ऋष्यादींश्च नमस्कृत्य अवन्त्यामुवटो वसन् । मन्त्राणां कृतवान् भाष्यं मही भोजे प्रशासति ॥ ' असे श्लोक आहेत.

उदाहरण म्हणून दिला आहे. हा उल्लेख मम्मटानें प्रत्यक्ष अनुभवावरून केला असला, तरी तो भोजाच्या राजवटीच्या शेवटीं शेवटीं केलेला असला पाहिजे; कारण त्याच्या औदार्याचा दुन्दुभि सर्व देशभर ऐकूं जाण्यास कित्येक वर्षें लागली असतील. भोजाची राजवट इ. स. १०५५ पुढे लांबलेली नाहीं हे पूर्वी दाखविलेंच आहे. अर्थात् काव्यप्रकाशलेखनाचा काल सुमार इ. स १०५० च्या पूर्वीचा असणें संभवनीय नाहीं. संवत् १२१६ ( सन ११५९–६० ) या वर्षी माणिक्य-चंद्रानें **संकेत** नांवाची आपली काव्यप्रकाशटीका लिहिली आणि स्वतः काव्य-प्रकाशाची संवत् १२१५ ( सन ११५८–५९ ) मधील एक हस्तलिखित प्रत उपलब्ध आहे. अलंकारसर्वस्वांत काव्यप्रकाशाचा उल्लेख असल्याचेंहि पुढे सिद्ध केलेलें आहे. तेव्हां त्यापूर्वी म्हणजे निदान सन ११५० च्या पूर्वी काव्यप्रकाश लिहून झालेला होता असे उघड होतें. तात्पर्य काव्यप्रकाशाचा लेखनकाल इ. स. १०५० पासून ११५० पर्यंत केव्हां तरी होता व तो बहुधा इ. स. ११०० च्या सुमारास होता असे ठरतें.

काव्यप्रकाशावरील अनेक टीकांपैकी माणिक्यचंद्र, सोमेश्वर, सरस्वतीतीर्थ, व जयन्त यांच्या टीकांचा अगदी जुन्या म्हणून स्वतंत्र निर्देश करणें अवश्य आहे. गोविन्दठक्कुर याची काव्यप्रदीप नांवाची बरीच अर्वाचीन टीकाहि मोठी विद्वत्तापूर्ण आहे. गोविन्द ठक्कुराचा उदयकाल इ. स. १५ व्या शतकांत असावा असें वाटतें.

## २५ रुय्यकप्रणीत अलंकारसर्वस्व.

अलंकारसर्वस्व हा अलंकारशास्त्रावरील एक प्रमाणभूत ग्रंथ आहे.× त्याचा कर्ता रुय्यक हा ध्वनिसंप्रदायाचा कट्टा अनुयायी असून त्यानें काव्याचा आत्मा काय याविषयी भामह, उद्भट, रुद्रट, वामन, वक्रोतिजीवितकार, व्यक्तिविवे-ककार व ध्वनिकार यांच्या मतांचें सार आरंभीं दिलें आहे. नंतर पुनरुक्तवदा-भास, छेकानुप्रास, वृत्त्यनुप्रास, यमक, लाटानुप्रास व चित्र यांचा विचार केल्या-वर उपमादि ७५ अर्थालंकार वर्णिले आहेत. मम्मटाहून कित्येक अधिक अलंकार

× निर्णयसागरांतील काव्यमालेंत जयरथाच्या टीकेसह व त्रिवेन्द्रम् संस्कृत-ग्रंथमालेंत समुद्रबन्धाच्या टीकेसह हा ग्रंथ छापिलेला आहे. प्रस्तुत विवेचनांत काव्यमाला प्रतीचा उपयोग केलेला आहे.

रुय्यकानें सांगितले असून त्याची विवेचनपद्धति मम्मटापेक्षां सामान्यतः अधिक सविस्तर आहे. मम्मटाने ज्यांचें लक्षण दिलें नाहीं, पण इतरांनीं जे सांगितले आहेत असे परिणाम, रसवत्, प्रेयः, ऊर्जस्वि, समाहित, भावोदय, भावसन्धि व भावशबल हे अलंकार रुय्यकानें सांगितले असून **विकल्प** आणि **विचित्र** हे अगदी नवे अलंकार त्यानें दिले आहेत. विकल्पासंबंधानें त्यानें 'पूर्वैरकृतविवेकोऽत्र दर्शित इत्यवगन्तव्यम्' असें स्वतःच म्हटले असून (पा. १५९) विचित्रासंबंधाने त्याचा टीकाकार जयरथ यानें 'एतद्धि ग्रंथकृतैवाभिनवत्वेनोक्तम्' अशी टीप दिली आहे (पा. १३३-१३४). साहित्यदर्पणकार विश्वनाथानें आपलें विवेचन अलंकारसर्वस्वाच्या आधाराने बऱ्याच प्रमाणावर केलें असून तो ग्रंथ लिहिण्याची स्फूर्तिहि त्याला अलंकारसर्वस्वावरूनच झाली असावी हे आम्ही साहित्यदर्पणावरील इंग्रजी टीपांत दाखविलें आहे. एकावली व कुवलयानंद यांच्या कर्त्यांनींसुद्धां अलंकारसर्वस्वावर आपल्या ग्रंथांची उभारणी केली असे दिसतें. अलंकारसर्वस्वाचे सूत्रें, वृत्ति व उदाहरणे असे तीन भाग आहेत. सूत्र गद्यात्मक असून त्यांत अलंकारादिकांच्या व्याख्या, त्यांचें वृत्तींत स्पष्टीकरण व शेवटीं उदाहरणे असा क्रम आहे. उदाहरणें सारीं पूर्वग्रंथांतूनच ग्रंथकारानें निवडलेली आहेत. ज्या ग्रंथांचा किंवा ग्रंथकारांचा नामनिर्देश किंवा अप्रत्यक्ष उल्लेख अलंकारसर्वस्वांत आढळतो, त्यांत अलंकारमञ्जरी (पा. १५), उद्भट, बिल्हण व त्याचें विक्रमांकदेवचरित (पा. ११८), भामह (पा. १८३), वामन (१२८), श्रीकण्ठस्तव (पा. १९), मङ्खकृत श्रीकण्ठचरित, हरिश्चंद्रचरित (पा. १०२) हे प्रमुख होत उद्भटाचीं मतें त्यानें अनेकवार सांगितली असून (पा. १२३, १२५, १२६, १७४, १८३, २०४) राजानक तिलकाच्या उद्भटविवेक किंवा उद्भटविचार या ग्रंथांतील मतानुसार बहुधा अलंकारसर्वस्वकाराचें विवेचन असतें असें जयरथानें (पा. ११५, २०५) म्हटलें आहे. एका ठिकाणी (पा. ११९) अलंकारसर्वस्वकाराने ध्वन्यालोकाशी मतभेदहि दर्शविला आहे. 'स वक्तुमखिलान् शक्तो हयग्रीवाश्रितान्गुणान्। योम्बुकुम्भैः परिच्छेदं कर्तुं शक्तो महोदधेः।' हें आक्षेपध्वनीचें उदाहरण म्हणून ध्वन्यालोकांत दिलें आहे (पा. १११), पण "नतु 'स वक्तुमखिलान्...महोदधेः' इत्याक्षेपध्वनावुदाहार्यम्" असें अलंकारसर्वस्वकाराचें म्हणणें आहे. 'किं

वृत्तान्तैः परगृहगतैः किन्तु नाहं समर्थः ' हे उदाहरण व्याजस्तुतीचें म्हणून दिल्यामुळें त्यानें लोचनकाराला दोष दिला असून त्या उदाहरणाला क्लिष्ट म्हटलें आहे ( पा. ४४ ). सर्वस्वांत काव्यप्रकाशांतील वचनें कित्येक ठिकाणीं उद्धृत केलीं असून त्यांच्यांत दोष काढिले आहेत. उदाहरण, काव्यप्रकाशांत ' राजन् राजसुता न पाठयति मां देव्योऽपि तूष्णीं स्थिताः......चित्रस्थानवलोक्य शून्यवलभावेकैकमाभाषते ' हा श्लोक अप्रस्तुतप्रशंसेचें उदाहरण म्हणून दिला असून ( उल्लास १० ) यांत ' तूं स्वारीला निघणार हें ऐकतांच तुझे शत्रु तत्काल पळून गेले ' हें तात्पर्य सांगण्यासाठीं शत्रूच्या रिकाम्या राजवाड्यांतील राजशुकाचा वृत्तान्त सांगितला असल्यामुळे कारण सांगावयाचे असतां कार्य सांगितलें असें झालें व म्हणून हें अप्रस्तुतप्रशंसेचे उदाहरण होय असें सांगितलें आहे. पण सर्वस्वकारानें त्याला पर्यायोक्ताचें उदाहरण मानिलें असून (पा. १०७) 'अन्ये तु दण्डयात्रोद्यतं त्वां बुद्ध्वा त्वदरयः पलाय्य गता इति कारणरूपस्यैवार्थस्य प्रस्तुतत्वात्कार्यरूपोर्थोऽप्रस्तुत एव राजशुकवृत्तान्तस्याप्रस्तुतत्वात्प्रस्तुतार्थं प्रति स्वात्मानं समर्पयतीति अप्रस्तुतप्रशंसैवात्र न्याय्येति वर्णयन्ति ' अशा रीतीनें काव्यप्रकाशकाराच्या मताचा निर्देश केला आहे. ' अलंकारोऽथ वस्त्वेव शब्दाद्यत्रावभासते । प्रधानत्वेन स ज्ञेयः शब्दशक्त्युद्भवो द्विधा ॥ ' हा श्लोक सर्वस्वांत ( पा. १०२ ) न्याय या नांवानें उद्धृत केला आहे. हा श्लोक काव्यप्रकाशाच्या ४ थ्या उल्लासांतील एक कारिका आहे. काव्यप्रकाशांतील भाविकाची ' प्रत्यक्षा एव यत्रार्थाः ' इत्यादि व्याख्या अलंकारसर्वस्वांत ( पा. १८३ ) " अत एव, ' प्रत्यक्षा एव यत्रार्थाः क्रियन्ते भूतभाविनः । तद्भाविकम् ' इत्येवमन्यैर्भाविकलक्षणमकारि " असें म्हणून उद्धृत केली आहे. काव्यप्रकाशांत शब्दालंकारांच्या संकराचे उदाहरण म्हणून ' राजति तटीयमभिहतदानवरासातिपातिसारावनदा । गजता च यूथमविरतदानवरा सातिपाति सारा वनदा ' ही आर्यागीति दिली आहे व ' अत्र यमकमनुलोमप्रतिलोमश्च चित्रभेदः पादद्वयगते परस्परापेक्षे ' अशी त्याला स्पष्टीकरणार्थ टीप जोडिली आहे. यासंबंधानें सर्वस्वकार म्हणतो, ' शब्दालंकारसंकरस्तु कैश्चिदुदाहृतो यथा—राजति तटीय........सारा वनदा ॥ अत्र यमकानुलोमप्रतिलोमयोः शब्दालंकारयोः परस्परापेक्षत्वेनाङ्गाङ्गिसंकर इति । एतत्तु न सम्यगावर्जकम् : शब्दालंकारयोः शब्दवदुपकार्योपकारकत्वाभावेनाङ्गाङ्गिभावाभावात् । शब्दालंकारसंसृष्टिस्त्वत्र श्रेयसी ' ( पा. १९९ ). ' स्फुटमेकत्र विषये शब्दार्थालंकृतिद्वयम् ।

**व्यवस्थितं** च ' ही संकराच्या एका प्रकाराचे लक्षण देणारी काव्यप्रकाश-कारिका ( उ. १० ) लक्षांत घेऊन सर्वस्वकाराने ( पा. २०४ ) ' अत एव **व्यवस्थितत्व**मन्यानुभाषितमप्रयोजनकम् । ' अशी टीका केली आहे व काव्य-प्रकाशकाराच्या त्या संकराच्या व्याख्येला अप्रयोजन म्हटले आहे. एखादा अलंकार शब्दालंकार आहे कीं अर्थालंकार आहे हें ठरविण्याचें तत्त्व आश्रयाश्रयिभाव हे होय, अन्वयव्यतिरेक नव्हे असे सर्वस्वकाराचें म्हणणें आहे ' लोकवदाश्रयाश्रयिभावश्च तत्तदलंकारनिबन्धनम् । अन्वयव्यतिरेकौ तु तत्कार्यत्वे प्रयोजकौ ।' [ पा. २०५ ], तर मम्मटाने याच्या उलट मत प्रतिपादिलें आहे. काव्यप्रकाशकाराची ' स्वसिद्धये पराक्षेपः परार्थे स्वसमर्पणम् ' ही दुसऱ्या उल्लासांतील कारिकाहि सर्वस्वकाराने ( पा. ३ ) उद्धृत केली आहे. काव्यप्रकाशांतील कित्येक कारिका सर्वस्वांत आढळतात एवढ्यावरून मात्र मम्मट रुय्यकाच्या पूर्वीचा होता असें ठाम म्हणतां येणार नाहीं, कारण कित्येक कारिका स्वतः काव्यप्रकाशकाराने इतर ग्रंथांतून घेतल्या असल्यामुळे दोघांची उसनवारी एकाच ठिकाणची असण्याचा संभव आहे. तथापि वर उद्धृत केलेल्या काव्यप्रकाशवृत्तीतील सर्वस्वाने घेतलेल्या वचनांवरून हा प्रश्न निर्णीत होतो. जयरथाच्या विमर्शिनी टीकेवरून ( पा. १५०, १६३ ) या प्रश्नाचा उलगडा करण्याचें साधन मिळतें. या बाबतीत आणखी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं, चित्र, काव्यलिंग, व्याजोक्ति, उत्तर, मीलित, समाधि इत्यादि अलंकारांच्या व्याख्या काव्यप्रकाश व अलंकारसर्वस्व या दोहोंतहि सारख्याच असून मम्मटाच्या दहाव्या उल्लासांत व अलकारसर्वस्वांत सुमारें ५६ उदाहरणेंहि सारखीच आहेत.

अलंकारसर्वस्वांतील वृत्तीच्या कर्तृत्वासंबंधानें घोटाळ्याचा प्रश्न उत्पन्न झाला आहे. काव्यमालेंतील आवृत्तींत वृत्तीच्या पहिल्या श्लोकांत ' **निजालंकारसूत्राणां** वृत्त्या तात्पर्यमुच्यते ' असें म्हटलें आहे. रुय्यकाच्या नंतर सुमारें ७९ वर्षांनी विमर्शिनीकार जयरथ उदयास आला व त्याने आपल्या टीकेंत ' निजालंकार ' हाच पाठ स्वीकारला आहे, म्हणजे त्याच्या मतें सूत्रकार व वृत्तिकार एकच होत. पुढील ग्रंथकारहि रुचक किंवा रुय्यक हाच वृत्तीचा कर्ता मानितात. उदाहरण, प्रतापरुद्रयशोभूषणावरील रत्नापण टीकेंत ( पा. ३९३) 'तदुक्तं **रुचकेन** एषार्थाश्रयापि धर्मविषये श्लिष्टशब्दहेतुका क्वचिद्दृश्यते ' असें जें म्हटलें आहे, तें अलंकारसर्वस्वांतील ' एषा चार्थाश्रयाऽपि ' इत्यादि

अपह्नुतिविषयक विवेचनाला उद्देशून *आहे ( पा. ५८ );' 'न चेदं विषमाद्यभेदन्तर्भवति । इह हि स्वनिषेधो वैपरीत्य गमयति विषमे तु व्यत्यय इति भेदस्य **रुचकेनो**क्तत्वात्' ( रत्ना. पा. ४२५); 'काव्यग्रहणं तर्कवैलक्षण्यार्थम् । तेन व्याप्तिपक्षधर्मतादयो न क्रियन्ते इति **रुचकः**' (रत्ना. पा. ४४८), असे आणखी अलंकारसर्वस्वाच्या वृत्तींतील वचनांचे उल्लेख ( अ. स पान १३३ व १४४ ) रत्नापणांत रुचकाचे म्हणून केले आहेत. चित्रमीमांसेतहि ( पा. ७२ ) 'ये तु उद्भिन्नवस्तुनिगूहन व्याजोक्तिः...तेषामिहापि व्याजोक्तिरेव नापह्नुतिरिति **रुचका**दयः' असा उल्लेख सर्वस्वांतील वृत्ति रुचकाची आहे असे सांगणारा आहे. पण बर्नेलच्या तंजावर राजवाड्यातील हस्तलिखितांच्या कॅटलागांत एका हस्तलिखितांत हे श्लोकार्ध 'गुर्वलंकारसूत्राणा वृत्त्या' असे असून त्रिवेन्द्रम् प्रतीतहि तसेच आहे. शिवाय त्रिवेन्द्रम् प्रतीत शेवटी 'इति **मङ्खुको** वितेने काश्मीरक्षितिपसान्धिविग्रहिकः । सुकविमुखालंकरणं तदिदमलंकारसर्वस्वम् ॥' असा श्लोक आला असून समुद्रबंधाने आपल्या टीकेच्या शेवटी '**मङ्खुक**निबन्धविवृतौ विहितायामिह समुद्रबंधेन । गुणलेशमात्रमित्रैर्भावपीष्टादोषदर्शिभिः सद्भिः ॥' अशी प्रार्थना केली आहे व दुसऱ्याहि कित्येक ठिकाणी 'कदाचिन्मङ्खुकोपज्ञ' ( पा. २ ), 'व्यक्तिविवेककाराभिमतस्त्वनुमानपक्षः .....मङ्खुकस्य पूर्वपक्षत्वेना घ्यनभिमत इत्याहुः' ( पा. ४ ) असे म्हणून सर्वस्वांतील वृत्ति मङ्खुकाची ठरविली आहे. मङ्खुक हे रूप शुद्ध नसून ते खरोखर मङ्खक असे आहे. मङ्खकृत श्रीकंठचरितांत ( सर्ग २५ श्लो. ३० ) रुय्यक हा मङ्ख अथवा मङ्खक याचा गुरु× होता असे सांगितले असून राजतरंगिणीकार म्हणतो की ( ८, ३३५४ ) काश्मीरच्या जयसिंह राजाने मङ्खकाला आपला सान्धिविग्रहिक म्हणजे सामदंड मंत्री केले होते, 'सान्धिविग्रहिको मङ्खकाख्योऽलंकारसोदरः । स मठस्याभवत्प्रष्ठः श्रीकंठस्य प्रतिष्ठया ॥.' श्रीकंठचरितात आणखीहि ( ३. ६६ ) रुय्यकमङ्खकांच्या गुरुशिष्यत्वाचे उल्लेख आहेत. त्यांवरून, अलंकारसर्वस्वाच्या कर्तृत्वांत मङ्खकाचा हि भाग होता असा परंपरागत प्रवाद

---

* त्रिवेन्द्रम् प्रतीतील समुद्रबंधाच्या टीकेत हे वाक्य 'यथासंभवं भेदनिर्देश इत्यस्यानन्तरं क्वचित्पठ्यते' असे म्हणून दिले आहे.

× तं श्रीरुय्यकमालोक्य स प्रियं गुरुमग्रहीत् ।

दक्षिण हिंदुस्तानात चालू झाला व अलंकारसर्वस्वाच्या त्रिवेन्द्रम् आवृत्तीचे संपादक गणपतिशास्त्री यांनी त्याअन्वयें या ग्रंथांतील सूत्रें रुय्यकाचीं व वृत्ति आणि उदाहरणें मङ्खकाचीं असें समजून मूळ ग्रंथाला **अलंकारसूत्र** व वृत्तीला **अलंकारसर्वस्व** अशीं नांवे दिलीं आहेत. पण हा प्रवाद वस्तुस्थितिनिदर्शक नसून त्याज्य होय व अलंकारसर्वस्व हा सूत्र व वृत्ति मिळून सर्व ग्रंथ रुय्यकाचा होय हे पुढील कारणांवरून समजून येईल. एका समुद्रबंधाशिवाय अलंकारसर्वस्ववृत्ति मङ्खकाची आहे असें क्वचितच कोणी म्हणतो. उलट दक्षिण हिंदुस्तानांतीलही कुमारस्वामी ( रत्नापण पाने ३९३, ३९६, ४२५, ४४८ ), जगन्नाथ ( रसगंगाधर पाने २५१, ३४२-४३, ३५२, ४८२) इत्यादि ग्रंथकारांनीं सूत्र व वृत्ति मिळून अलंकारसर्वस्व एकाच लेखकाचें मानिलें आहे. * शिवाय जयरथ हा स्वतः विद्वान असा काश्मीरी पंडित व १३ व्या शतकाच्या पहिल्या चरणांत होऊन गेलेला टीकाकार असून त्यानेंहि अलंकारसर्वस्वांतील सूत्रें व वृत्ति हीं रुय्यकाचींच स्पष्टपणे मानिली आहेत जयरथाच्या मागून बऱ्याच वर्षांनी इ. स. १३०० च्या सुमारास समुद्रबंधाची टीका झाली. मङ्खक हा रुय्यकाचा शिष्य असल्यामुळे त्यानें आपल्या गुरूच्या ग्रंथाचा प्रसार करण्यासाठीं पुष्कळ श्रम केले असतील व तो ग्रंथ पुनः लिहून काढीत असतां त्यांत कांहीं भर घातली असेल. यामुळे कदाचित त्याच्या श्रीकंठचरितांतील कित्येक पद्ये ( २,४९, ६,७०, ५,२३; ६,१६, १०,१० इ. ) अलंकारसर्वस्वांत प्रविष्ट झाली ( अलं. स. पाने २१, ८७, ९० इ. ) व गुरु आपल्या

---

* अलंकारसर्वस्वकारस्तु–" आरोप्यमाणस्य प्रकृतोपयोगित्वे परिणाम " ( सू. १६ ) इति सूत्रयित्वा " आरोप्यमाणं रूपके.. ... ..प्रकृतमारोप्यमाणतया परिणमति " इति व्याख्यातवान्; एवं स्थिते 'विनिमयोत्र किंचित्त्यक्त्वा कस्यचिदादानम्' इत्यलंकारसर्वस्वकृता ( सूत्र ६१ वरील वृत्ति ) यल्लक्षणं परिवृत्तेः कृतम्, यच्च 'किमित्यपास्याभरणानि......वल्कलम्' इत्युदाहृतम्, तदुभयमप्यसत् " इ० रसगंगाधर; परंतु 'किंतु श्लेषस्यालंकारान्तरविविक्तविषयाभावेन निरवकाशतया बलवत्त्वेन......श्लेष एव नोपमेति मङ्खकादिभिरभ्युपेयते' असें चित्रमीमांसेतहि म्हटलें असून अलंकारसर्वस्वांतील पान ९७ वरील मताला अनुलक्षून ही टीका आहे.

शिष्याच्या ग्रंथांतील पद्ये उद्धृत करितो असा भास उत्पन्न झाला. वृत्ति मङ्खकाची आहे असे वाटण्याला श्रीकंठचरितांतील कित्येक पद्ये अलंकारसर्वस्वांत आहेत ही गोष्ट कारण झाली असावी मूळ ग्रंथांत अप्रमाण अशी भर पडलेली आहे किंवा मूळांत फरक झालेला आहे ही गोष्ट जयरथानें स्पष्ट सांगितली असून त्यानें अनेक स्थळीं ( पा. ५०, ६७, १०७, १२८, १२६ ) मूळग्रंथांत झालेल्या अपपाठांचा निषेधहि केला आहे.

सहृदयलीला नांवाचा रुय्यकाचा ग्रंथ असून त्यावरून रुचक हे रुय्यकाचे दुसरें नांव होते व तो राजानक तिलकाचा पुत्र होता असें दिसून येतें ( पिशेलची शृंगारतिलकाची प्रस्तावना पा. २८–२९ पहा ). रुचकप्रणीत काव्यप्रकाशसंकेत नामक टीका अलंकारसर्वस्वकारानेंच रचिलेली होय असें विमर्शिनीकार जयरथ स्पष्ट सांगतो व अलंकारसर्वस्वानंतर एका शतकाच्या आंतच जयरथ हा काश्मीर-पंडित होऊन गेलेला असल्यामुळें त्याचें विधान महत्वाचें असून स्वीकारणें अवश्य आहे. काव्यप्रकाशसंकेताच्या प्रास्ताविक श्लोकांत ( श्लो. २ ) ग्रंथकारानें तिलका-पाशीं काव्यशास्त्राचें अध्ययन केल्याचा उल्लेख आहे. पुढील ग्रंथकार रुचक हेंच रूप अनेकवार योजितांना आढळतात ( रत्नापण पा. ३९३, ३९६ इ. ). पुष्कळ ग्रंथकार अलंकारसर्वस्वाला संक्षेपानें सर्वस्व म्हणतात ( रत्नापण पा. ४२४, ४४९, ४५२; रसगंगाधर पा. २२०, २२७, ३५५; चित्रमीमांसा पा. ९८ इ ). एकावलीतरल ( पा. १३६, १८६, २३७ ), प्रतापरुद्रयशोभूषण ( पा. २९१ ), रत्नापण ( पा. ३४१, ४५२ ) इत्यादि ग्रंथांत सूत्र व वृत्ति या दोहोंनाहि अलंकारसर्वस्व किंवा नुसतें सर्वस्व असें अनेकवार म्हटलें आहे.

अलंकारसर्वस्वाशिवाय आणखीहि कित्येक ग्रंथ रुय्यकानें लिहिले. १ अलंकारा-नुसारिणी, २ काव्यप्रकाशसंकेत, ३ नाटकमीमांसा, ४ व्यक्तिविवेकविचार, ५ श्रीकण्ठस्तव, ६ सहृदयलीला, ७ साहित्यमीमांसा, ८ हर्षचरितवार्तिक अशीं त्यांचीं नांवें आहेत. श्रीकण्ठस्तव, साहित्यमीमांसा, हर्षचरितवार्तिक यांचा उल्लेख अलंकारसर्वस्वांत आला आहे. ‘ आटोपेन पटीयसा यदपि सा ’ हें वृत्त्यनुप्रासाचें उदाहरण त्यानें ‘ यथा मदीये श्रीकण्ठस्तवे ’ असा उपोद्घात करून उद्धृत केलें आहे ( पा. १९ ). ‘ एषा च समस्तोपमाप्रतिपादकविषयेऽपि हर्षचरितवार्तिके साहित्यमीमांसायां च तेषु तेषु प्रदेशेषूदाहृता ’ ( पा. ६१ ) असा दुसऱ्या दोघांचा उल्लेख आहे व जयरथानें ( पा. १३ ) व्यक्तिविवेकविचार हा रुय्यकाचा असल्याचें

ठाम सांगितलें असून त्याचा निर्देश पूर्वीं आलेलाच आहे. व्यक्तिविवेकटीकेंत (त्रिवेन्द्रम् प्रत पा. ४४) टीकाकारानें आपल्या हर्षचरितवार्तिकाचा तसाच नाटक-मीमांसा व साहित्यमीमांसा यांचाहि (पा. ३३) उल्लेख केला आहे हेंहि पूर्वीं दाखविले आहे. अलंकारानुसारिणी हा ग्रंथ रुय्यकाने लिहिल्याचे जयरथाने अनेक ठिकाणी (पा. ३६, ५७, ५८, ६०) सांगितले आहे. हा ग्रंथ म्हणजे जल्हणकृत सोमपालविलासावरील टीका होय असे **स्तुतिकुसुमाञ्जलीवरील रत्नकंठा**-च्या (सन १६८१) विधानाला अनुसरून आफ्रेक्ट आपल्या ग्रंथनामावलीत लिहितो. रत्नकण्ठ म्हणतो 'तथापि कविवरजल्हणकृते सोमपालविलासे...... अस्यार्थः श्रीराजानकरुचकविरचितायामलंकारानुसारिण्याम्' इ०; पण जयरथाच्या लिहिण्यावरून अलंकारानुसारिणी हा अलंकारावरील स्वतंत्र ग्रथ असून त्यांत प्रतीयमानोत्प्रेक्षेचे ४८ प्रकार, मालारूपक इत्यादि विषयांवर लांबलचक चर्चा केली आहे. तेव्हा हा ग्रंथ सोमपालविलासावरील टीकेहून भिन्न असावा, कारण एखाद्या दुसऱ्या ग्रंथाच्या टीकेत अलंकारशास्त्राचे इतके विस्तृत्व विवेचन करणें कठीण दिसते. व्यक्तिविवेकविचारांत (पा. ४५) विचारकारानें बृहतीनामक ग्रंथ लिहिण्याचा आपला उद्देश सांगितला आहे व तो ग्रंथ पुरा झाला असेल तर रुय्यकाची ग्रंथमालिका दहा पुष्पांची होते. त्याची सहृदयलीला काव्यमालेत प्रसिद्ध झालेली आहे. हा ग्रंथ लहानसा असून गुण, अलंकार, जीवित व परिकर असे त्याचे उल्लेख नावाचे चार भाग आहेत. पहिल्या उल्लेखांत रूप, वर्ण, प्रभा इत्यादि रमणीय स्त्रियांचे दहा गुण वर्णिले असून दुसऱ्यांत स्त्रिया घालीत असलेले सुवर्ण मोती रत्ने यांचे निरनिराळ्या प्रकारचे अलंकार व उट्या, फुलं इत्यादिकांविषयीं माहिती आहे तिसऱ्यांत सौंदर्याचे जीवित जें तारुण्य किंवा यौवन त्याचें वर्णन असून चवथ्या उल्लेखात सौंदर्य खुलून दिसण्यास कोणते साहित्य कारणीभूत होतें याचा विचार केलेला आहे.

रुय्यकाचा काल निश्चित ठरविणें फारसें कठीण नाही. बुल्हरच्या कालनिर्णया-प्रमाणे सन १०८५ त रचिलेल्या विक्रमांकदेवचरितांतून त्यानें उतारे घेतलेले आहेत व व्यक्तिविवेक आणि काव्यप्रकाश यांच्या मतावर प्रतिकूल टीका केलेली आहे. यावरून अलंकारसर्वस्व सन ११०० नंतरचे आहे असें ठरतें. रुय्यक हा मङ्खाचा गुरु होता व मङ्ख हा काश्मीरच्या जयसिंह राजाचा सांधिविग्रहिक होता. जयसिंहाचा उदयकाल इ. स. ११२८ पासून ११४९ पर्यंत होता.

मङ्खाचें श्रीकण्ठचरित सन ११३५ पासून ११४५ पर्यंत केव्हांतरी लिहिण्यांत आलें असें बुल्हरनें काश्मीरग्रंथवृत्तांत ( पा. ५० ) दाखविलें आहे. त्यावरून श्रीकण्ठचरितांतील श्लोक जर प्रथमपासून अलंकारसर्वस्ववृत्तीत घेतलेले असतील तर सर्वस्वाची रचना इ. स. ११५० च्या सुमारास झाली असें म्हणावें लागते. शिवाय ' असमाप्तजिगीषस्य स्त्रीचिन्ता का मनस्विनः । अनाक्रम्य जगत्सर्वं नो संध्यां भजते रविः ॥ ' हा राजतरंगिणींतील ( ४,४४१ ) श्लोक सर्वस्वांत (पा. ९३) घेतलेला आहे. तेव्हां हा श्लोक जर कल्हणाचा स्वतःचा असून दुसऱ्यापासून तो घेतलेला नसेल तर सर्वस्वाचा रचनाकल इ. स. ११५० नंतरचा ठरतो* इ. स. ११५९-६० च्या सुमारास रचिलेल्या माणिक्यचंद्राच्या काव्यप्रकाशसंकेतांत अलंकारसर्वस्वाचा कित्येक ठिकाणीं ( म्हैसूर प्रत, पा. ३२१, ३५५ ) उल्लेख आला आहे तात्पर्य अलंकारसर्वस्वाचा रचनाकाल इ. स. ११३५ पासून ११५५ पर्यंत केव्हांतरी होता असे निश्चित होतें.

अलंकारसर्वस्वावरील जयरथाची विमर्शिनीनामक टीका विद्वत्ताप्रचुर असून तिच्यावर जगन्नाथपंडितानें अनेक ठिकाणी प्रतिकूल टीका केली आहे ( र ग. पा. ३२५, ३३७, ३५२, ३८०, ३८७, ४१४, ४१८ ). जयरथानें अनेक ग्रंथ व ग्रंथकार यांचीं वचनें उद्धृत केली असून त्यांत अनङ्गलेखा, अलंकारभाष्यकार, अलंकारवार्तिक ( पा. ७१ ), अलंकारसार ( पा. ८८, ९७, १७१ ), अलंकारानुसारिणी, उद्भटविवेक किंवा उद्भटविचार ( ११५, २०५ ), काव्यप्रकाश ( ३, १०, २६ इ. ), काव्यप्रकाशसंकेत ( पा. १०२ ), तिलक, पृथ्वीराजविजय ( पा. १४ ), प्रत्यभिज्ञा ( पा. ४७ ), भोजदेव ( १२१, १९५ ), मम्मट ( ६३, १०२ इ ), राजतरंगिणी ( १९४ ), रुद्रट, लोचनकार ( ११३ ), वक्रोक्तिजीवितकार ( पा. १५० ) इत्यादिकांची नांवें आढळतात. जयरथानें बऱ्याच ठिकाणी पाठान्तरांची चर्चा केलेली आहे ( पा. २१, ३७, ४९, १२६, १७२ इ ). त्यानें रुय्यकाशीहि मतभेद प्रदर्शित केला आहे ( ७०, १०९ ). ' **अन्यैः** ' शब्दानें त्यानें सर्वस्वावरील पूर्वीच्या टीकाकारांचा

*परंतु 'असमाप्तजिगीषस्य' हा श्लोक अभिनवगुप्तानें आपल्या अभिनवभारतींत ( पा. ३०५ ) कर्त्याचा नामनिर्देश न करितां उद्धृत केला आहे. यावरून हा श्लोक कल्हणाचा नसून त्यानें तो अवतरण म्हणूनच घेतला आहे असें सिद्ध होतें.

उल्लेख केला आहे. त्याने तन्त्रालोकविवेक नांवाचा दुसरा ग्रंथ लिहिला असून त्याच्या शेवटीं आपले सविस्तर वंशवृत्त दिले आहे असें बुल्हरच्या काश्मीर ग्रंथवृत्तांत ( पा. ६८ ) लिहिलें आहे. त्याच्या पणजोबाचा बंधु उच्छल राजाचा ( इ. स. ११०१–११११ ) मंत्री असून पिता शृङ्गार हा राजराज अथवा राजदेव ( इ. स. १२०३–१२२६ ) राजाचा मंत्री होता. जयरथाचा जयद्रथ नांवाचा धाकटा भाऊ असून त्यानें लिहिलेले हरचरितचिंतामणि नांवाचे ३२ सर्गाचें काव्य काव्यमालेत प्रसिद्ध झालेलें आहे. म्हणजे हे ग्रंथकार १३ व्या शतकाच्या पहिल्या चरणांत प्रसिद्धीस आले असें ठरते. जयरथानें पृथ्वीराजविजय काव्याचा उल्लेख केला असून त्या काव्यांत सुप्रसिद्ध पृथ्वीराज चव्हाणाच्या पराक्रमाचें वर्णन आहे व पृथ्वीराज इ. स. ११९३ त धरिला गेला या गोष्टीचा विचार केल्यासहि हा काळनिर्णय ठाम ठरतो. जयरथाचा ‘ अलंकारोदाहरण ’ म्हणून आणखी एक ग्रंथ आहे ( राजेन्द्रलाल मित्र कृत हस्तलिखितांच्या नोटिसीस व्हाल्यूम ७ क्रमांक २४४२ ). त्यांत अलंकारविमर्शिनीचा शेवटच्या श्लोकांत उल्लेख केला असून तो ग्रंथ आपल्या नातवासाठीं त्यानें लिहिला असें दिसतें. सर्वस्वावर दुसरी टीका समुद्रबंधाची आहे. पण ती विमर्शिनी इतकी विद्वत्ताप्रचुर व सविस्तर नाहीं. ती केरल देशांत म्हणजे मलबारांत कोलंब येथील रविवर्म राजाच्या सभेंत लिहिण्यांत आली. रविवर्म राजा इ. स. १२६५ त जन्मला असें म्हणतात. समुद्रबंधाने रविवर्मस्तुतीचे कित्येक श्लोक उद्धृत केले असून ( पा. १२, १३, १९ इ. ) पाठान्तरांची चर्चा केली आहे ( पा. ५७ ) आणि रुय्यकाच्या ग्रंथांतील उदाहरणें नष्ट झाल्याबद्दल दुःख प्रदर्शित केलें असून * ( पा. १२७ ) सर्वस्वाच्या इतर टीकाकारांच्या मतांचा निर्देश केला आहे ( पा. ५५, ९६, १४५, २०९ ). अलंकारसर्वस्वावर सञ्जीविनी नांवाची तिसरी एक टीका मल्लिनाथानें तरलनामक टीकेंत ( पा. ३१, २२१ ) सांगितली आहे. तिचा कर्ता चक्रवर्ती नांवाचा होता. सञ्जीविनीचे उल्लेख रत्नापण ( पानें ५४, ३१९, ३७७, ३८७ इ. ) व चित्रमीमांसा ( पानें ७, ७४ ) यांतहि आढळतात. या टीकेंत अलंकारांमधील भेद संक्षेपानें श्लोकांत ग्रथित करून दिले आहेत. उदाहरणार्थ रूपक व परिणाम यांत भेद कसा आहे हें श्लोकांत सांगितले आहे.

---

* अस्मात् पूर्वग्रंथकारदर्शितान्युदाहरणानि भ्रष्टत्वान्न दृश्यन्ते । अतो ग्रंथान्तरदर्शितनयेन तानि दर्शयामः ।

# २६ वाग्भटप्रणीत वाग्भटालंकार.

वाग्भटाचा हा अलंकारग्रंथ सिंहदेवगणि याच्या टीकेसह काव्यमालेत प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ सविस्तर विवेचनात्मक नसून त्यांत २६० पद्येंच आहेत. त्याचीं परिच्छेद नांवाचीं पांच प्रकरणे केलेली असून तीं बहुतेक अनुष्टुप् छंदांत आहेत. प्रतिपरिच्छेदाच्या शेवटची मात्र कित्येक पद्यें इतर छंदांत आहेत. या ग्रंथांत एकच स्थल ( ३, १४ नंतर ) गद्यात्मक आहे. त्याच्या पहिल्या परिच्छेदांत प्रथम काव्याचें लक्षण देऊन काव्याचा उदय प्रतिभेमुळें होतो असे सांगितलें आहे व प्रतिभा, व्युत्पत्ति आणि अभ्यास यांच्या व्याख्या सांगून काव्योत्पादनाला कोणती परिस्थिति अनुकूल असते व कवीने कोणते संकेत पाळिले पाहिजेत या गोष्टींचा विचार केला आहे. दुसऱ्या परिच्छेदांत संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, भूतभाषा ( पैशाची ) या चार भाषांत काव्य करावें असें म्हणून छंदोनिबद्ध आणि गद्यनिबद्ध असे एका प्रकारें व पद्य, गद्य आणि मिश्र असे दुसऱ्या प्रकारे काव्याचे भेद केले आहेत व पद आणि वाक्य यांचे आठ दोष लक्षणें व उदाहरणे यांसह सांगून अर्थदोषांचे विवेचनहि केलें आहे. तिसऱ्या परिच्छेदांत काव्याचे दहा गुण लक्षणे व उदाहरणें यांसह दिले असून चवथ्यांत चित्र, वक्रोक्ति, अनुप्रास व यमक हे शब्दालंकार आणि त्यांचे पोटभेद तसेच पसतीस अर्थालंकार आणि वैदर्भी व गौडीया या दोन रीति यांचे विवेचन केलें आहे. पांचव्या परिच्छेदाचा विषय नऊ रस, नायकादिकांचे विविध प्रकार व तत्संबंधी इतर गोष्टी हा आहे.

हा वाग्भट जैन असून प्राकृतांत त्याचे नांव बाहड असें आढळतें. तो कोणा राजाचा मंत्री होता व त्याच्या पित्याचे नांव सोम होतें. चवथ्या परिच्छेदांतील ( पा. ६० ) ' बंभण्ड-सुत्ति-संपुड-मुत्तिअ-मणि-पहासमूहव्व । सिरि बाहडत्ति तणओ आसि बुहो तस्स सोमस्स ॥ * ' या पद्यावरील टीकेंत टीकाकार म्हणतो ' इदानीं ग्रंथकार इदमलंकारकर्तृत्वख्यापनाय वाग्भटाभिधस्य महाकवेर्महामात्यस्य तन्नाम गाथयैकया निदर्शयति । '. वाग्भटानें सारीं

---

* ब्रह्माण्डशुक्तिसंपुटमाक्तिकमणेः प्रभासमूह इव ।
श्रीवाग्भट इति तनय आसीद् बुधस्तस्य सोमस्य ॥

उदाहरणें स्वरचितच दिलेलीं दिसतात व त्यांतील कित्येक प्राकृतांतहि आहेत. नेमिनिर्माण महाकाव्यांत आढळत असलेली सहा पद्ये वाग्भटानें आपल्या ग्रंथांत दिली असल्याचें कर्नल जेकबनें दाखविलें आहे (रॉ. ए. सो. जर्नल सन १८९७ पा. ३०९). त्या काव्याचा कर्ताहि कोणी वाग्भटच आहे. चवथ्या परिच्छेदांतील 'ककाकुकङ्ककेकाङ्ककोकिकोकैकः ककः। कुकुकौकः काककाक कक्काकुकुकांककुः ॥' या पद्यावर टीकाकारानें 'क का कु इत्येष श्लोक एकव्यंजनो नेमिनिर्माणमहाकाव्ये राजीमतीपरित्यागाधिकारे समुद्रवर्णनरूपो ज्ञेयः' असें स्पष्टीकरण जोडिलें आहे, पण हें पद्य प्रसिद्ध झालेल्या नेमिनिर्वाणाच्या प्रतीत आढळत नाही. या दोन्हीं ग्रंथांचे कर्ते वाग्भट एकच असावेत असें दिसते. वाग्भटालंकारात उदाहरणासाठीं दिलेल्या श्लोकांत अनहिलवाड्याच्या चालुक्य घराण्यांतील कर्णराजाचा पुत्र जयसिंह राजा याचा फार संबंध आलेला आहे. 'इन्द्रेण किं यदि स **कर्णनरेन्द्रसूनु**रैरावणेन किमहो यदि तद्द्विपेन्द्रः। दम्भोलिनाप्यलमलं यदि तत्प्रतापः स्वर्गोप्ययं ननु मुधा यदि तत्पुरी सा ॥ (४·७६); जगदात्मकीर्तिशुभ्रं जनयन्नुद्दामधामदोःपरिघः। जयति प्रतापपूषा **जयसिंहः** क्ष्माभृदधिनाथः। (४,४५); **अनहिल्लपाटकं पुर**मवनिपतिः **कर्णदेवनृपसूनुः**। श्रीकलशनामधेयः करी च रत्नानि जगतीह ॥' (४, १३२) इत्यादि उदाहरणांत तसेच आणखी चवथ्याच उल्लासांतील ८१,८५ याहि श्लोकांत त्या राजाचा संबंध आला आहे. यांतील ८१ व्या श्लोकांत 'आः स्यन्दनध्वजधृतोद्धुरताम्रचूडः **श्रीकर्णदेवनृपसूनु**रयं रणाग्रे।' असें जें वर्णन आहे त्यावरून अनहिलवाड्याच्या चालुक्य राजांचा ध्वजावर कोंबड्याचें चित्र घराण्याचें चिन्ह म्हणून असे असें दिसून येतें. जयसिंहानें इ. सन १०९३ पासून ११४३ पर्यंत राज्य केलें. इंडि. ॲंटि. ग्रंथ ६ पा. १८० व २१३ आणि एपिग्रॅफिआ इंदिका १ पा. २९३ यांतील वडनगर लेखांत अनहिलवाड्याच्या चालुक्यांचे वंशवृक्ष इत्यादि विषय आले आहेत. काव्यमालेच्या संपादकांनीं वाग्भटालंकाराच्या प्रस्तावनेत प्रभाचंद्राच्या प्रभावकचरित्राच्या आधारें असें दाखविलें आहे की वाग्भट हा संवत् ११७९ व १२१३ म्हणजे इ. स. ११२२ व ११५६ या वर्षीं विद्यमान होता. अर्थात् बाराव्या शतकाचे पूर्वार्ध हा त्याचा उदयकाल होता असें ठरतें.

## २७ हेमचंद्राचें काव्यानुशासन

काव्यानुशासन हा हेमचंद्राचा ग्रंथ त्याच्या स्वतःच्या टीकेसह काव्यमालेंत प्रसिद्ध झालेला आहे. सूत्र, वृत्ति व उदाहरणें असे त्याचे दुसऱ्या अनेक ग्रंथांप्रमाणें तीन विभाग असून सूत्रें गद्यांत आहेत. काव्यानुशासन हें नांव त्यांतील सूत्रांना, अलंकारचूडामणि हें सूत्रविवरणात्मक वृत्तीला व विवेक हें टीकेला लाविलेलें आहे असे दिसते. विवेक ही टीका वृत्तीचेंहि स्पष्टीकरण करून थोडी अधिक उदाहरणें देणारी आहे पण कित्येक स्थलीं तीं अगदीं अपुरी आहे. तिच्या प्रास्ताविक पद्यांत हेमचंद्र म्हणतो ' विवरीतु क्वचिद्दृब्धं नव सन्दर्भितुं क्वचित् । काव्यानुशासनस्यायं **विवेकः** प्रवितन्यते ॥ '. काव्यानुशासनाचे आठ अध्याय आहेत. पहिल्या अध्यायांत काव्याचा उद्देश, काव्याचा हेतु किंवा कारण व काव्याचे लक्षण हीं दिलीं आहेत. प्रतिभेमुळे काव्यनिर्मिति होते व व्युत्पत्ति, अभ्यास इत्यादिकांच्या योगानें प्रतिभेचा परिपोष होतो. शब्द व अर्थ यांचे स्वरूप, तसेंच मुख्यार्थ, गौणार्थ, लक्ष्यार्थ व व्यङ्ग्यार्थ या शब्दांचे स्पष्टीकरण हीहि याच अध्यायांत आलीं आहेत. दुसऱ्या अध्यायांत रस, त्यांचे स्थायिभाव, व्यभिचारिभाव व सात्त्विकभाव यांचे विवेचन आहे. तिसऱ्या अध्यायांत शब्द, वाक्य, अर्थ व रस यांचे दोष सांगून चवथ्यांत माधुर्य, ओजस् व प्रसाद या तीन गुणांचा विचार केला आहे व कोणत्या अक्षरांच्या योगानें या गुणांचा परिपोष होतो हें सांगितलें आहे. पांचव्या अध्यायांत अनुप्रास, यमक, चित्र, श्लेष, वक्रोक्ति व पुनरुक्तवदाभास या सहा शब्दालंकारांचें वर्णन असून सहाव्यांत २९ अर्थालंकारांची चर्चा केली आहे. हेमचंद्र संसृष्टीचा अन्तर्भाव संकरांतच करितो. तुल्ययोगितेचा समावेश होईल अशा रीतीनें त्यानें दीपकाचें लक्षण केलें असून, परावृत्ति नांवाचा अलंकार स्वतंत्र सांगितला आहे. त्याच्या परावृत्तींत मम्मटाचे पर्याय व परिवृत्ति हे दोन्ही येतात. रस, भाव इत्यादिकांची छटा ज्यांत असते असे रसवत्, प्रेयः, ऊर्जस्वि, समाहित हे अलंकार त्यानें सांगितले नाहींत व अनन्वय आणि उपमेयोपमा यांना उपमेचे प्रकार समजून त्यांचा जातां जातां उल्लेख मात्र केला आहे. प्रतिवस्तूपमा, दृष्टान्त व इतर ग्रंथकारांनीं सांगितलेली निदर्शना यांना त्यानें निदर्शन या एकाच अलंकारांत घातलें आहेत; तो स्वभावोक्तीला जाति व अप्रस्तुतप्रशंसेला अन्योक्ति अशीं नांवें देतो. उपरोक्त कित्येक अलंकारांचीं

लक्षणें त्यानें दिलीं नसून तीं कां दिली नाहींत हेंहि सांगितलें आहे ( पाने २९२ -२९४ ). सातव्या अध्यायांत नायक व नायिका यांचीं लक्षणें व प्रकार वर्णिले असून आठव्यांत काव्याचे प्रेक्ष्य व श्रव्य हे दोन मुख्य भाग तसेंच त्यांचे पोटविभाग व स्वरूपें यांचें विवेचन आहे.

हेमचंद्राचा हा काव्यानुशासन ग्रंथ स्वतंत्र बुद्धीनें लिहिलेला नसून केवळ संग्रहात्मक आहे. राजशेखरकृत काव्यमीमांसा, काव्यप्रकाश, ध्वन्यालोक व लोचन यांच्या मुख्य आधारावर तो रचिलेला असून त्यांतून अवश्य तीं विवरणें जशींच्या तशी उचलून घेतलेली आहेत. काव्यमीमांसा पा. ५६ व पा. ४२–४४ यांतील विवेचन हेमचंद्राच्या ग्रंथांतील पा. ८–१०, पा. ११–१६ व पा. १२२–१२३ यांतील विवेचनाशी ताडून पाहिल्यास ही गोष्ट लक्षांत येईल. अभिनवगुप्त व भरत यांच्या मतांचा अनुवाद आपण करीत आहों असें तर त्यानें स्पष्टच सांगितले आहे. विवेकांत तो म्हणतो ( पा. ६६ ) 'साधारणीभावना च विभावादिभिरिति **श्रीमानभिनवगुप्ताचार्यः** । एतन्मतमेव वास्माभिरुपजीवितं वेदितव्यम् ।'; तसेंच काव्यानुशासनांत 'तेऽस्माभिर्**भरत**मतानुसारिभिरुपेक्षिताः ।' असें त्यानें म्हटले आहे ( पा. ३१६ ). त्याच्या ग्रंथातील विशेष महत्वाची गोष्ट म्हटली तर त्यानें पूर्वग्रंथकारांच्या ग्रथांतून वृत्ति व विवेक यांत सुमार १५०० श्लोक उदाहरणें म्हणून घेतले आहेत. हेमचंद्राच्या ग्रंथाची पुढील आलंकारिकांवर मात्र छाप पडलेली मुळीच दिसत नाही व त्यामुळें त्यांत त्याच्या ग्रंथांतील अवतरणें क्वचितच आढळतात. रत्नापण या प्रतापरुद्रयशोभूषणावरील टीकेंत मात्र त्याचा उल्लेख कित्येक ठिकाणीं केलेला आढळतो ( पान ४६, ७५, २२४, २३३, २५९, २७९, २९९ ). सिद्धहेमचंद्र किंवा शब्दानुशासन नांवाचा व्याकरणशास्त्रावर एक त्याचा मोठा ग्रंथ असून तो लिहून झाल्यावर काव्यानुशासनाशी रचना त्यानें केली. त्यानें पुष्कळच ग्रंथ व ग्रंथकार यांचे उतारे घेतल्याचें वर सांगितलेंच आहे; त्यांतील प्रमुख नांवें अवन्तिसुंदरी, उषाहरण, भट्टतोत, भट्टनायक, पञ्चशिख शूद्रककथा, भामहविवरण, भोजराज, मम्मट, मङ्गल, मायुराज, यायावरीय, रावणविजय, शाक्याचार्य राहुल ( पा. ३१६ ), राजशेखरकृत हरविलास, हरिप्रबोध, हृदयदर्पण इत्यादि होत.

जैन ग्रंथकारांच्या मालिकेंतील हेमचंद्र हा अत्यंत देदीप्यमान हिरा होय. त्याचें लेखन फार विस्तृत असून त्यांतील विवेचनाचे विषयहि बहुविध आहेत.

गुजराथेंत धंधुका येथें इ. स. १०८८ या वर्षी तो जन्मला व इ. स. ११७२ या वर्षी मृत्यु पावला. जयसिंह सिद्धराज (इ. स. १०९३-११४३) या चालुक्य राजाच्या सांगण्यावरून त्यानें व्याकरणावरील मोठा ग्रंथ लिहिला. जयसिंहाच्या नंतरचा राजा कुमारपाल (इ स. ११४३-११७२) यानें हेमचंद्रापाशी अध्ययन केले. हेमचंद्राने मम्मटाचा उल्लेख केला आहे व शब्दानुशासनानंतर काव्यानुशासन लिहिलें. यावरून काव्यानुशासनचा रचनाकाल इ. स. ११५० नतरचा असला पाहिजे असें म्हणावें लागतें. हेमचंद्राच्या जीवनचरित्रांतील बरेंच वृत्त मेरुतुङ्गकृत प्रबंधचिंतामणि, राजशेखराचा प्रबंधकोश (हा राजशेखर काव्यमीमांसाकार राजशेखर नव्हे), प्रभाचंद्रकृत प्रभावकचारित, सोमप्रभकृत हेमकुमार चरित्र (इ. स. ११८४ या वर्षी लिहिलेलें) इत्यादि ग्रंथांत आलेलें आहे. दुसरे जैन ग्रंथ व ताम्रपट्टादि लेख यांवरूनहि त्यांतील कित्येक गोष्टी कळण्यासारख्या आहेत व डॉ. बुल्हर यानें या सर्व साधनांचा उपयोग करून हेमचंद्राच्या चरित्रावर जर्मन भाषेत लेख लिहिला आहे.

## २८ जयदेवप्रणीत चंद्रालोक.

हा ग्रंथ हिंदुस्तानांत अनेक ठिकाणीं छापिलेला असून त्यांतील जीवानन्दाच्या आवृत्तीचा उपयोग पुढील विवेचनांत केला आहे. चंद्रालोक साहित्यशास्त्रावरील शालोपयोगी ग्रंथ असून तो अनुष्टुप् वृत्तांत रचिलेला आहे. भामह, दंडी इत्यादिकांप्रमाणें जयदेवानेंही उदाहरणें स्वतःच रचून घातलीं आहेत. चंद्रालोकाची मयूख नांवाचीं दहा प्रकरणे व सुमार ३५० पद्ये आहेत. त्याची भाषासरणी, सुगम व स्पष्ट असून शब्दरचना अस्खलित व मधुर आहे आणि साहित्यशास्त्राच्या प्रथमाभ्यसकांना तो उत्तम रीतीनें मार्गदर्शक व्हावा अशी त्याची रचना आहे. त्याच्या पहिल्या मयूखांत प्रथम काव्याची व्याख्या दिली असून श्रुत व अभ्यास यांच्या योगाने परिणत झालेली प्रतिभा ही त्य.चें कारण (हेतु) होय असें सांगितलें आहे व शब्दांच्या रूढ, यौगिक व योगरूढ या तीन प्रकारांचे विवेचन केलें आहे. दुसऱ्या मयूखांत शब्द, अर्थ, वाक्य इत्यादिकांच्या दोषांची चर्चा व तिसऱ्यांत कवी आपल्या काव्याची रमणीयता वाढविण्यासाठीं ‘ ईदशैश्चरितैर्जाने सत्यं दोषाकरो भवान् ’ या उदाहरणांत दाखविल्याप्रमाणें निर्वचनादि उपायांची योजना कशी करतात याचा ऊहापोह हे विषय आले असून चवथ्यांत

काव्याचे दहा गुण वर्णिले आहेत. पांचव्यांत छेकानुप्रास, वृत्त्यनुप्रास, लाटानुप्रास, पुनरुक्तवदाभास, यमक चित्र, हे शब्दालंकार व सुमार १०० अर्थालंकार सोदाहरण सांगितले आहेत. या मयूखांत मध्येच अर्थालंकाराच्या विवेचनाला आरंभ करतांना नवीन मङ्गलाचरण केले आहे. ६ व्या मयूखांत रस, भाव, गौडी लाटी पाञ्चाली या तीन रीति, मधुरा, प्रौढा, परुषा, ललिता आणि भद्रा या पांच वृत्ति यांचे वर्णन, सातव्यांत ध्वन्यालोकाला अनुसरून व्यञ्जनेचे व ध्वनिप्रकाराचे विवेचन व आठव्यांत गुणीभूतव्यङ्गयाच्या प्रकाराची चर्चा हे विषय असून नवव्यांत लक्षणा व दहाव्यांत अभिधा या शब्दशक्तीविषयीं विवेचन आले आहे.

जयदेवाला अमृत वर्षाव करणारा या अर्थाचे **पीयूषवर्ष** असे लौकिक नांव होतें व त्याच्या ग्रंथांत त्याचा उल्लेख 'चंद्रालोकममुं स्वयं वितनुते पीयूषवर्षः कृती (१०२), 'अनेनासावाद्यः सुकविजयदेवेन रचिते चिरं चंद्रालोके सुखयतु मयूखः सुमनसः ॥' (१,१६) असा आढळतो. चंद्रालोकावर गागाभट्टाची राकागम नांवाची टीका असून तींत **पीयूषवर्ष** हे जयदेवाचेच दुसरें नांव होतें 'जयदेवस्यैव पीयूषवर्ष इति नामान्तरम्' असें स्पष्ट म्हटलें आहे (मद्रास सरकारची हस्तलिखित ग्रंथनामावली सन १९१८ पा. ८६५३, क्रमांक १२८७७). जयदेवाच्या पित्याचें नांव महादेव व आईचें सुमित्रा असें होतें असें त्याच्याच '**महादेवः** सत्रप्रमुखमखविद्यैकचतुरः सुमित्रा तद्भक्तिप्रणिहितमतिर्यस्य पितरौ।' (१,१६) या लिहिण्यावरून दिसून येतें प्रसन्नराघव नाटकाचा कर्ता जयदेव हाहि महादेव व सुमित्रा यांचा पुत्र होता (प्रसन्न रा. अंक १ श्लो. १४-१५) व तो तर्कशास्त्रांत निष्णात असल्याचें हि 'ननु अयं **प्रमाणप्रवीणो**ऽपि श्रूयते । सूत्रधार. । येषां कोमल काव्यकौशलकलालीलावती भारती तेषां कर्कशतर्कवक्रवचनोद्गारेऽपि किं हीयते'। (१, १८) या प्रसन्नराघवांतील उल्लेखावरून समजून येतें. हा जयदेव गीतगोविन्दकार जयदेवाहून अर्थातच भिन्न होता. गीतगोविंदकार जयदेव हा भोजदेव व रामादेवी यांचा पुत्र असून बंगाल्यांतील बीरभूम जिल्ह्यांत किन्दुबिल्व येथें रहाणारा होता. पीयूषवर्ष जयदेव बंगालचा रहिवाशी होता असें दिसत नाही. मान्यालोक नामक तर्कशास्त्रावरील ग्रंथाचा कर्ता पक्षधर जयदेव व चंद्रालोककार पीयूषवर्ष जयदेव हे मात्र बहुधा एकच होते.

चंद्रालोकाच्या रचनेचा काल मात्र निश्चित करणें कठीण आहे. या ग्रंथांत कोणत्याहि ग्रंथकाराचा नामोल्लेख केलेला नाहीं. पण 'अङ्गीकरोति यः काव्यं

शब्दार्थावनलङ्कृती । असौ न मन्यते कस्मादनुष्णमनलं कृती ॥ ' ( १, ८ ) या पद्यांत ' तददोषौ शब्दार्थौ सगुणावनलंकृती पुनः क्वापि ' या काव्यप्रकाश-कारिकेचाच उल्लेख आहे हे उघड आहे. पूर्वी अलकारसर्वस्वाच्या वर्णनांत त्या ग्रंथांत विचित्र आणि विकल्प या अलंकाराचा निर्देश नवीनच केलेला आढळतो म्हणून सांगितले आहे. हे दोन्ही अलंकार चद्रालोकांतहि सांगितले असून त्याचीं लक्षणें बहुतेक सर्वस्वाच्या शब्दांतच दिली आहेत. ' तुल्यबलविरोधे विकल्पः ' आणि ' स्वविपरीतफलानिष्पत्तये प्रयत्नो विचित्रम् ' अशी सर्वस्वांतील लक्षणें असून ( पा. १५७, १३३ ), ' विरोधे तुल्यबलयोर्विकल्पालंकृतिर्मता ' व विचित्रं तत्प्रयत्नश्चेद्विपरीतः फलेच्छया ' अशीं चंद्रालोकांतील लक्षणं आहेत ( ५,११२; ). प्राचीन व अर्वाचीन अशा दोन्ही आलंकारिकांची मतें पाहून आपण आपला ग्रंथ लिहिल्याचें जयदेवानें स्पष्ट सांगितलें आहे. तो म्हणतो ' इत्थ शतमलंकारा लक्षयित्वा निदर्शिताः । प्राचामाधुनिकानां च मतान्यालोच्य सर्वत. ॥ ' ( ५,१७३ ). जयदेवाच्या या शब्दांवरून तो प्राचीन ग्रंथकार नसून अर्वाचीन आहे हे उघड होतें. त्यानें सांगितलेल्या अलंकारांची शंभर ही संख्या देखील त्याचे अर्वाचीनत्वच सिद्ध करते. मम्मटाने सुमारे ६० अलंकार सांगितले आहेत. याच क्रमाने पहातां १०० अलंकार सांगणारा चंद्रालोककार सर्वस्वकाराच्या नंतरचा ठरतो व तो इ. स. १२०० च्या फारसा पूर्वीचा असणें शक्य दिसत नाही. प्रसन्नराघवांतील ' कदली कदली करभः करभः करिराजकरः करिराजकर. । ' इत्यादि पद्य ( १,३७ ) साहित्यदर्पणांत ( परि. ४, का. ३ ) उद्धृत केले आहे. प्रसन्नराघवांतील आणखीहि कित्येक पद्ये शार्ङ्गधरपद्धतीत ( इ. स. १३६३ सुमार ) क्रमाक १६४, ३५२०, ३५५७, ३६२६, ३६३१ यांत घेतलेली आहेत. अर्थात् जयदेवाचा उदयकाल इ. स. १३०० पूर्वीचा ठरतो. म्हणजे एकंदरींत चंद्रालोकरचना-काल इ. स. १२०० पासून १३०० पर्यंत केव्हां तरी असला पाहिजे. केशव-मिश्रकृत अलंकारशेखरांत ( पा. १७ ) कोणा जयदेव पंडिताचा उल्लेख असन त्याने उत्कल देशाच्या राजाच्या सभेंतील पंडितांना आपल्या कुशल तर्कपद्धतीनें जिंकिलें असे म्हटलं आहे. हा उल्लेख चंद्रालोककार जयदेवाचाच बहुधा असला पाहिजे, कारण हा तर्कवादकुशल असल्याचे पूर्वी दाखविलें आहेच. शिंगभूपा-लाच्या रसार्णवसुधाकर या ग्रन्थांत ( पान २५८, २७७ ) प्रसन्नराघवाचा

नांवाने निर्देश केलेला आहे. तो ग्रंथ इ. स. १३३० च्या सुमाराचा आहे. अप्पयदीक्षिताच्या कुवलयानन्दांत ' **चन्द्रालोको** विजयतां **शरदागमसम्भवः**। हृद्यः **कुवलयानन्दो** यत्प्रसादादभूदयम्' असा श्लोक शेवटीं आला आहे. यांतील **शरदागम** म्हणजे एक अलकारग्रंथ असून त्याच्या आधारानें चंद्रालोकाची रचना केलेली आहे असे वैद्यनाथाचे स्पष्टीकरण आहे, पण तें यथार्थ नाही. **शरदागम** हें चंद्रालोकावरील टीकेचें नांव असून तिचा कर्ता प्रद्योतनभट्टाचार्य हा होता व त्याला वीरभद्र नांवाच्या बुंदेला राजाचा आश्रय होता असें मद्रास सरकार हस्तलेखनाममालिका १९१८, पा. ८६५५ क्र. १२८७८ यांतील वर्णनावरून कळून येते. या प्रद्योतनाची कामसूत्रावरहि टीका असून ती इ. स. १५७७ या वर्षी लिहिलेली आहे.

## २९ भानुदत्तकृत रसतरंगिणी व रसमंजरी

या ग्रंथांपैकीं रसतरंगिणी मुंबईच्या वेंकटेश्वर छापखान्यांत व पॅरिस येथेंहि छापिलेली आहे व रसमञ्जरी दोन टीकांसह काशीसंस्कृतग्रंथमालेंत छापिलेली आहे. रसतरंगिणीचे आठ तरंग आहेत. पहिल्यांत भाव, त्याचे प्रकार व स्थायिभाव यांचे विवेचन आहे. दुसऱ्यांत विभावाचे लक्षण व त्याचे भेद दिले आहेत. तिसऱ्यांत कटाक्षादि अनुभावांचें वर्णन आहे. चवथ्यांत स्तम्भादि सात्त्विक भाव सांगितले असून पांचव्यांत व्यभिचारिभाव आले आहेत. सहाव्यांत रसांची नांवें व शृंगाराचा सविस्तर ऊहापोह आहे. सातव्यांत हास्यादि रसांची चर्चा व आठव्यांत स्थायिभावजा आणि रसजा दृष्टि वर्णिली आहे.

रसमञ्जरी रसतरंगिणीहून लहान असून तिचा विषयहि निराळा आहे. तींत नायिका व त्यांचे भेद यांचेंच वर्णन विशेष असून दोन तृतीयांश ग्रंथ त्यानेंच व्यापिला आहे. उरलेल्या भागांत नायिकेची सखी, दूती, शृङ्गाररसवर्णनांतलि नायक व त्याचे भेद, नायकाचे पीठमर्द, विट, चेट, व विदूषक हे मित्र, स्तम्भादि आठ सात्त्विक गुण, शृङ्गाराचे संभोग व विप्रलंभ हे दोन प्रकार आणि विप्रलंभाच्या दहा अवस्था यांचे वर्णन आहे.

दोन्ही ग्रंथांत अपवाद वगळतां सारे उदाहरणांचे श्लोक भानुदत्ताचे स्वतःचेच आहेत. जे स्वतःचे नाहीत ते कोणाचे ते त्याने सांगितले आहेत. ' अवगाहस्व वाग्देवि दिव्यां रसतरंगिणीम् । अस्मत्पद्येन पद्मेन रचय श्रुतिभूषणम् ॥' असें

त्यानें रसतरंगिणीत म्हटलें असून ( ७, २९ ), ' **पद्येन स्वकृतेन** तेन कविना श्रीभानुना योजिता ' असें रसमञ्जरीच्या अंतिम श्लोकांत सांगितलें आहे. रसतरङ्गिणीत त्यानें भरताच्या नाटयशास्त्रांतून बरींच अवतरणें घेतलीं असून आपल्या पित्याचे कित्येक श्लोकहि उद्धृत केले आहेत. त्यानें या विषयावरील धनंजयकृत दशरूपाचें नांव प्रत्यक्ष सांगितलेलें नाहीं, तथापि तो ग्रंथहि त्याच्या मनश्चक्षूपुढें असावा असें दिसतें. रसतरंगिणींत ( पा. ५ ) ' एकत्रासनसंस्थितिः परिहृता प्रत्युद्गमाद्दूरतस्ताम्बूलाहरणच्छलेन रभसाश्लेषोऽपि संविघ्नितः ।' इत्यादि अमरुशतकांतील १८ वा श्लोक उद्धृत केला असून रसमञ्जरींत ( पान १८३ ) ' प्रस्थानं वलयैः कृत प्रियसखैरस्त्रैरजस्रं गतम् ' इत्यादि ३५ वा श्लोक घेतलेला आहे. दोन्ही ग्रंथांत भानुदत्तानें प्राचीन ग्रंथांचा मोघम उल्लेख केलेला आढळतो. प्राचीन संमति, प्राचीन लेखन, पूर्वाचार्याः, असे या संबंधांत त्यानें योजिलेले शब्द आहेत. रसतरंगिणींत ( पा. २० ) रसरत्नदीपिकेचा व ( पा. ६८ ) शृंगारतिलकाचा नामोल्लेख भानुदत्तानें केला आहे. त्यानें रसमञ्जरी रसतरङ्गिणीच्या पूर्वी लिहिली असें तरंगिणीवरून ( पा. १३० ) दिसून येतें. ' अनौचित्यादृते नान्यद्रसभंगस्य कारणम् । प्रसिद्धौचित्यवद्वस्तु रसहर्षाय जायते ' ॥ हा श्लोक प्राचीन ग्रंथ म्हणून रसतरङ्गिणीत घेतलेला असून त्याच्या सारखाच जवळ जवळ असलेला श्लोक ध्वन्यालोक ( पा. १४६ ) व व्यक्तिविवेक ( पा. ३१ ) यांत आढळतो. *

भानुदत्ताच्या पित्याचें नांव गणेश्वर असून तो गंगातीरावरील विदेह देशांत रहाणारा होता असें रसमञ्जरीच्या शेवटच्या श्लोकांवरून दिसून येतें. ' तातो यस्य गणेश्वरः कविकुलालंकारचूडामणिर्देशो यस्य विदेहभूः सुरसरित्कल्लोलकिर्मीरिता ' ॥ असें त्यात म्हटलें आहे. कांहीं प्रतींत **विदर्भभूः** असा पाठ आहे. पण तो सुरसरित्कल्लोलाशीं जुळणारा नाहीं. भानुदत्त हा मैथिल होता असें बर्नेल कृत तंजावरच्या ग्रंथनामावलीत स्पष्ट म्हटलेलें आहे. त्याचा पिता गणेश्वर हाहि अर्थात् मैथिल असल्यामुळे, गणेश्वर मंत्री नांवाचा वीरेश्वराचा भाऊ म्हणून जो सांगितला आहे तोच तो असावा असें दिसतें. या वीरेश्वराचा

---

* अनौचित्यादृते नान्यद्रसभंगस्य कारणम् । प्रसिद्धौचित्यबंधस्तु रसस्योपनिषत्परा ॥

पुत्र चण्डेश्वर यानें विवादरत्नाकर नांवाचा ग्रंथ लिहिला व इ. स. १३१४ या वर्षी आपली सुवर्णतुला केली. या साऱ्या गोष्टी भानुदत्ताचा जो काल इतर मार्गांनीं ठरतो त्याशी जुळणाऱ्याच आहेत. त्यानें शृंगारतिलक व रसरत्नदीपिका यांचे उल्लेख केले असून दशरूपकहि त्याच्या दृष्टीपुढें असल्यामुळे तो ११ व्या शतकानंतरचा आहे हे उघड होतें. रसमञ्जरीवर कोणी गोपाळानें इ स. १४३७ त टीका लिहिलेली आहे. यावरून भानुदत्ताचा लेखनकाल तेराव्या शतकाच्या शेवटीं किंवा १४ व्या च्या आरंभी असा कांही तरी असला पाहिजे.

## ३० विद्याधरप्रणीत एकावली

विद्याधराचा एकावली हा ग्रंथ मुंबई सरकारच्या संस्कृतग्रंथमालेत प्रो. क. प्रा. त्रिवेदी यांनीं संपादिलेला असा छापिलेला आहे. त्याच्यावर मल्लिनाथकृत तरलनांवाची टीका असून तीहि प्रसिद्ध झालेली आहे. इतर ग्रंथांप्रमाणें एकावलीचेहि कारिका, वृत्ति व उदाहरणे असे तीन भाग आहेत. उदाहरणें तर स्वतः विद्याधराचीच आहेत व त्यांत त्याचा आश्रयदाता उत्कल ( ओरिसा ) देशाचा राजा जो नरसिंह त्याची स्तुति आली आहे. ‘ एष विद्याधरस्तेषु कान्तासंमितलक्षणम् । करोति **नरसिंहस्य** चाटुश्लोकानुदाहरन् ’ असें स्वतः विद्याधरानें त्यासंबंधानें सांगितले आहे. या दृष्टीनें एकावलीला ऐतिहासिक महत्त्वहि असून प्रतापरुद्रयशोभूषण, नञ्जराजयशोभूषण, रघुनाथभूपालीय व अलंकारमञ्जूषा या ग्रंथांशी तिचे साम्य आहे. एकावलीचे आठ उन्मेष आहेत. प्रतिभा, बहुशास्त्रदर्शिता आणि अभ्यास हे काव्याचे हेतु, काव्याचें लक्षण, भामह महिमभट्टादिकांच्या मतांची चिकित्सा असे विषय पहिल्या उन्मेषाचे आहेत. दुसऱ्यांत, वाचक, लाक्षणिक व व्यञ्जक असे शब्दांचे प्रकार सांगून अभिधा, लक्षणा व व्यञ्जना या वृत्तींचें विवेचन केलें आहे. तिसऱ्यांत ध्वनीचे भेद दिले असून चवथ्यांत गुणीभूतव्यङ्ग्याचें विवेचन केले आहे. पांचव्यांत गुण व रीति, सहाव्यांत दोष व सातव्यांत शब्दालंकार या विषयांचें विवरण केलें असून आठव्या उन्मेषांत अर्थालंकार सांगितले आहेत. पहिल्या उन्मेषांतील प्रतिपादनांत विद्याधरानें ध्वनिकाराचा सर्वस्वी अनुवाद केलेला आहे. एकावलीची रचना मुख्यतः काव्यप्रकाश व अलंकारसर्वस्व यांच्या आधारानें

केलेली असून अलंकारांच्या विवेचनांत काव्यप्रकाशापेक्षां सर्वस्वाचीच कांस त्याने धरिलेली आढळते. परिणाम, उल्लेख, विचित्र व विकल्प हे काव्यप्रकाशांत मुळींच न आलेले अलंकार विद्याधरानें सांगितले असून त्यांचीं लक्षणें सर्वस्वाच्याच शब्दांत बहुतेक दिलीं आहेत. त्याने अभिनवगुप्त, अलंकारसर्वस्व, काव्यप्रकाश, बिल्हण, भोज, महिमभट्ट, वामन, श्रीहर्ष, हम्मीर, हरिहर इत्यादिकांचा नांवानें उल्लेख केला असून दशरूप, नैषधीय, राजशेखराचे ग्रंथ यांतून अवतरणें घेतलेलीं आहेत. कामशास्त्रावर केलिरहस्य नांवाचा ग्रंथहि त्याने लिहिला आहे.

विद्याधराच्या कालनिर्णयाच्या कामीं उपयुक्त अशी सर्व सामग्री त्रिवेदींनी आपल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत गोळा केली आहे व केसरी नरसिंह (इ. स. १२८२-१३०७) अथवा प्रतापनरसिंह (इ. स. १३०७-१३२७) यांतील कोणी तरी एक राजा विद्याधराचा आश्रयदाता होता असा निष्कर्ष तीवरून त्यांनीं काढिला आहे. शिंगभूपालाच्या (सुमारे इ. १३३०) रसार्णवसुधाकर नामक ग्रंथांत एकावलीचा उल्लेख आहे. ‘उत्कलाधिपतेः शृंगाररसाभिमानिनो नरसिंहदेवस्य चित्तमनुवर्तमानेन **विद्याधरेण कविना** बाढमभ्यन्तरीकृतोसि । एवं खलु समर्थितमेकावल्यामनेन’ (त्रिवेन्द्रम् आवृत्ति पा. ३०६)

एकावलीवरील मल्लिनाथाची तरल टीका ही खरोखर आदर्श टीका आहे. रघुकिरातादिमहाकाव्यावरील सुप्रसिद्ध टीकाकार मल्लिनाथ हाच तरलाचा कर्ता होय. मल्लिनाथाचा उत्कर्ष काल १५ व्या शतकांत असावा.

## ३१ विद्यानाथकृत प्रतापरुद्रयशोभूषण.

प्रतापरुद्रयशोभूषणाची एक सुंदर आवृत्ति मुंबई सरकारच्या संस्कृतग्रंथमालेत प्रो. त्रिवेदी यांनी छापून प्रसिद्ध केली असून तींत मल्लिनाथाचा पुत्र कुमारस्वामिन् याची रत्नापण नामक टीकाहि घातली आहे. दक्षिण हिंदुस्थानांत हा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. इतर ग्रंथांप्रमाणें याचेहि कारिका, वृत्ति व उदाहरणे असे तीन भाग असून सर्व उदाहरणांत तेलंगणाच्या काकतीय वंशांतील प्रतापरुद्रदेव नांवाच्या राजाचें वर्णन आहे. या राजाचें नांव वीररुद्र किंवा रुद्र असेंहि असून एकशिला किंवा अर्लीकडचें वारंगळ हे त्याची राजधानी होतें. त्यासंबंधानें ‘प्रतापरुद्रदेवस्य गुणानाश्रित्य निर्मितः । अलंकारप्रबंधोऽयं सन्तः कर्णोत्सवोऽस्तु वः ॥’ असें विद्यानाथानें पहिल्या प्रकरणांत लिहिलें आहे

( श्लो. ९ ). या दृष्टीने एकावलीशी या ग्रंथाचे साम्य आहे. प्रतापरुद्रयशोभूषणाचीं ९ प्रकरणें आहेत. नायक, काव्य, नाटक, रस, दोष, गुण, शब्दालंकार, अर्थालंकार व मिश्रालंकार हे त्यांचे अनुक्रमें विषय आहेत. अलंकारसर्वस्व, उद्भट, काव्यप्रकाश, दण्डिन्, दशरूपक, बालरामायण, भरत, भामह, भोज, रुद्रभट्ट, शृङ्गारतिलक, साहित्यमीमांसा, इत्यादि ग्रंथ व ग्रंथकार विद्यानाथानें नावाने सांगितलें असून तिसऱ्या प्रकरणांत नाटकाचे विवरण करतांना प्रतापरुद्रकल्याण या नावाचें नमुनेदार नाटक आपल्या ग्रंथांतील नियमांचें सोदाहरण स्पष्टीकरण करण्यासाठी दिले आहे. सामान्यतः त्याने काव्यप्रकाशाचा मागोसा घेत घेत आपला ग्रंथ लिहिला आहे, पण अलंकारांच्या बाबतीत मात्र मम्मटापेक्षा अलंकारसर्वस्वकाराचेच अनुकरण त्याने केले आहे. परिणाम, उल्लेख, विचित्र आणि विकल्प हे मम्मटाने गाळलेले अलंकार विद्यानाथानें सांगितले आहेत व 'विरोधस्तुल्यबलयोर्विकल्पालंकृतिर्मता' हें त्याचे विकल्पाचें लक्षण ( पा. ४५६ ) चंद्रालोकांतील 'विरोधे तुल्यबलयोर्विकल्पालंकृतिर्मता' ( ५,११२ ) या लक्षणावरून घेतल्यासारखें दिसतें. प्रतापरुद्रदेवाचा पिता महादेव व माता मुम्मुडि किंवा मुम्मुडम्बा नांवाची असून मुम्मुडम्बेच्या आईचे नांव रुद्राम्बा होतें. रुद्राम्बेला रुद्र असेंहि म्हणत. तिचा बाप गणपति नावाचा एकशिलेचा राजा होता व त्याच्या मागून तीच एकशिलेचें राज्य करूं लागली. प्रतापरुद्रदेवाने यादव घराण्यांतील सेवण राजाचा मोड केला असें वर्णन आहे. हा सेवण म्हणजे इ. स. १२७१ पासून १३०९ पर्यंत देवगिरीच्या सिंहासनावर असलेला रामदेव राजा होय. या वृत्तावरून व इतर कोरीव लेखांतील माहितीवरून प्रतापरुद्रदेव हा इ. स. तेराव्या शतकाच्या शेवटच्या चरणांत व चवदाव्याच्या पहिल्यांत राज्य करीत होता असें अनुमान करावें लागतें. इ. स. १३२३ या वर्षी महमद तघलखानें त्याला बंदिवान केलें. अर्थात् प्रतापरुद्रयशोभूषणाची रचना १४ व्या शतकाच्या पहिल्या चरणांत झालेली असली पाहिजे.

कुमारस्वामीची रत्नापण ही टीका बरीच चांगली आहे, तरी एकावलीवरील मल्लिनाथाच्या तरल टीकेची सर तिला येत नाही. कुमारस्वामीनें अनेक ग्रंथ व ग्रंथकार नांवानें उल्लेखिले असून त्यांतून अवतरणेंहि घेतलीं आहेत. त्या ग्रंथांत व ग्रंथकारांत पुढील नांवें प्रमुख दिसतात—अलङ्कारचूडामणि, एकावली,

एकावलीतरल, कविकल्पद्रुम, गोपाल, चक्रवर्तिन् (अलकारसर्वस्वसंजीविनीचा कर्ता), दशरूप, नरहरि, नाटकप्रकाश, पञ्चपादिका, पदमञ्जरी, भट्टमल्ल, भावप्रकाश, भोजराज, महिमभट्ट, मानसोल्लास, रसनिरूपण, रसमञ्जरी, रसार्णव, रुचक, वसंतराजीय, विदग्धमुखमण्डन, विद्याधर, शारदातनय, शिङ्गभूपाल, शृङ्गारप्रकाश, सञ्जीविनी, साहित्यचिंतामणि, साहित्यदर्पण, हेमचंद्र. प्रतापरुद्रयशोभूषणावर रत्नशाण नांवाची दुसरी एक टीका असून तीत रत्नापणाचा उल्लेख केलेला आढळतो. रत्नशाण ही टीका अपुरी आहे.

## ३२ वाग्भटप्रणीत काव्यानुशासन.

वाग्भटाचें काव्यानुशासन त्याच्याच अलंकारतिलक नांवाच्या टीकेसह काव्यमालेंत प्रसिद्ध झालेलें आहे. काव्यानुशासनाचे पांच अध्याय आहेत. ग्रंथाचा मुख्य भाग गद्य सूत्रात्मक असून त्यांचें सोदाहरण विवरण टीकेंत आलेले आहे. पहिल्या अध्यायांत काव्याचे प्रयोजन, त्यांचा हेतु, व्युत्पत्ति अभ्यास यांचीं लक्षणें, कविसंकेत, काव्याचे लक्षण, त्याचे गद्य पद्य मिश्र हे भेद, आणि महाकाव्य, आख्यायिका, कथा, चम्पू, दहा प्रकारचीं रूपकें म्हणजे मिश्रकाव्य यांच्या व्याख्या हे विषय आहेत. दुसऱ्या अध्यायांत १६ पददोष, १४ वाक्यदोष, १४ अर्थदोष हे विषय असून गुणांचेंहि विवेचन केलें आहे. दंडी व वामन यांनी काव्याचे दहा गुण सांगितले आहेत, पण माधुर्य ओजस् आणि प्रसाद हे तीनच वास्तविक गुण होत असे वाग्भटाचें मत आहे. याच अध्यायांत वैदर्भी, गौडीया व पाञ्चाली या तीन रीतींचे विवेचन आहे, तिसऱ्या अध्यायांत ६३ अर्थालंकार वर्णिले असून त्यांत अन्य, अपर, पूर्व, लेश, पिहित, मत, उभयन्यास, भाव आणि आशीः हे इतरत्र सामान्यपणें न सांगितलेले अलंकार वर्णिले आहेत. चवथ्या अध्यायांत चित्र, श्लेष, अनुप्रास, वक्रोक्ति, यमक व पुनरुक्तवदाभास हे सहा शब्दालंकार आणि त्यांचे भेद यांचें विवेचन आहे. पांचव्यांत रस व त्यांचे विभाव, अनुभाव आणि व्यभिचारिभाव, नायकनायिकांचे भेद, शृंगाराच्या दहा अवस्था आणि रसदोष यांची चर्चा आहे.

हा वाग्भट जैन होता. त्यानें मेदपाट म्हणजे मेवाड देश व राहडपुर आणि नलोटकपुर हीं नगरें आपल्या ग्रंथांत सांगितलीं आहेत. नेमिकुमाराचा तो पुत्र होता. वाग्भटालंकाराचा कर्ता व हा वाग्भट हे भिन्न होत. कारण काव्या-

नुशासनकार वाग्भटाने स्वतःच ' दण्डिवामनवाग्भटादिप्रणीता दश काव्य-गुणाः । वयं तु माधुर्यौजःप्रसादलक्षणांस्त्रीनेव गुणान्मन्यामहे ' असा पहिल्या वाग्भटाचा उल्लेख केलेला आढळतो. टीकेत त्यानें देशांचीं, नद्यांचीं, झाडा-झुडपांची नांवे दिली असून निरनिराळ्या देशांतील उत्पन्नाचें पदार्थहि सांगितले आहेत ( ३–५ पानें ). वाग्भटानें ऋषभदेवचरित नांवाचें महाकाव्य ( पान १५ ) व छंदोनुशासन नांवाचा छंदःशास्त्रावरील ग्रंथ लिहिलेले दिसतात. वाग्भटाला म्हणजे बहुतकरून स्वतः ग्रंथकाराला उद्देशून टीकेत पुढील पद्य आलें आहे; ' सर्वाङ्गीणविसारिभूरिपुलकोद्भेदत्रुटत्कञ्चुकाः स्वाकूतं गुरुबाष्पगद्गदगिरा सख्यै गिरन्त्यो मुहुः ॥ प्राप्तव्यः कथमेष वल्लभ इति म्लायन्मुखास्त्वामभू. श्रीमद्वाग्भट वीक्ष्य चित्रलिखितप्रख्या मृगाक्ष्योऽभवन् ' ॥. तसेंच ' गायन्ति रासकविधाविह मेदपाटनार्योऽधुनाऽपि तव नेमिकुमार कीर्तिम् ' ( पान ३२ ) असा नेमिकुमाराला उद्देशून असलेला श्लोकहि तीत उद्धृत केलेला आहे.

वाग्भटानें कित्येक ग्रंथकार व ग्रंथ यांतील वचनें उद्धृत केलीं असून त्यांत अब्धिमथन नांवाचें अपभ्रंशभाषेतील काव्य ( पा. १५ ), आनंदवर्धन, काव्य-प्रकाश ( पा. २९ ), चंद्रप्रभकाव्य, त्रिविक्रम ( पा. २० ), दमयन्ती नांवाचा चंपू ( पा. १९ ), नेमिनिर्वाण ( पा. १६ ), बालरामायण ( पा. ६७ ), ग्राम्य भाषेतील भीमकाव्य ( पा. १५ ), राजीमतीपरित्याग, लीलावती नावाची पद्यात्मक कथा ( पा. १८ ), वासवदत्ता चंपू ( पा. १९ ), विष्णुविजय, शीता नामक कवयित्री ( पा. २० ), शृंगारतिलक ( पा. ६१, ६३, ' अस्माकं सखि वाससी न रुचिरे ग्रैवेयकं नोज्ज्वलम् ' व ' गाढालिंगनपीडितस्तनतटं ' हे दोन श्लोक ) हीं नांवें प्रामुख्यानें आढळतात.

एगेलिंगच्या संस्कृत ग्रंथनामावलीत काव्यानुशासनाची हस्तलिखित प्रत ११५७ क्रमांकावर असून तिच्यावर संवत् १५१५ ( इ. स. १४५८–५९ ) हें लेखनवर्ष दिलें आहे व वाग्भटानें काव्यप्रकाश व वाग्भटालंकारकर्ता वाग्भट यांचा उल्लेख केला आहे. अर्थात् काव्यानुशासनाचा काल इ. स. ११५० नंतरचा आहे हें उघड आहे. बहुधा तो ग्रंथ चवदाव्या शतकांत केव्हां तरी लिहिलेला असावा.

# ३३ विश्वनाथप्रणीत साहित्यदर्पण.

विश्वनाथानें स्वतः आपल्या ग्रंथामध्यें जी स्वतः विषयींची माहिती दिली आहे, तिच्या पलीकडे त्याचा जीवनवृत्तान्त फारसा उपलब्ध नाही. त्याच्या ग्रंथांतील वृत्तावरून दिसून येते कीं विद्वत्तेने प्रसिद्धीस आलेल्या एका ब्राह्मण कुलांत त्याचा जन्म झाला. त्याचा वृद्धप्रपितामह म्हणजे आजोबाचा आजोबा नारायण नांवाचा असून विद्वान् होता व त्याने साहित्यशास्त्रावर ग्रंथ लिहिला होता असें दिसतें.* विश्वनाथाच्या पित्याचें नांव चंद्रशेखर होतें. हा चंद्रशेखरहि विद्वान् पंडित व कवि होता. विश्वनाथानें त्याच्या ग्रंथांतील पद्ये उद्धृत केलीं आहेत. उदाहरण, ' मध्यस्य प्रतिमानमेति जघनं ' (३,५८), ' नो चाटु श्रवणे कृतं ' ( ३,८२ ), ' चिन्ताभिः स्तिमितं मनः '(३,२०८ ), 'क्षेमं ते ननु पक्ष्मलाक्षि' ( ३,२१३ ) इत्यादि श्लोक त्याने ' यथा मम तातपादानाम् ' असे म्हणून दिले आहेत. ६ व्या परिच्छेदांत ' शिरसि धृतसुरापगे ' हे पद्य 'यथा मम तातपादानां **पुष्पमालायाम्**' असे म्हणून विश्वनाथाने दिले आहे व हा पुष्पमाला नामक त्याच्या पित्याच्या ग्रंथाचा उल्लेख आहे. त्याच्या पित्याचा भाषार्णव नांवाचा दुसराहि ग्रंथ असून त्यांत संस्कृत, शौरसेनी, महाराष्ट्री व इतर प्राकृत भाषा यांच्या

---

* तिसऱ्या परिच्छेदांतील २-३ या कारिकेवरील वृत्तीत विश्वनाथ म्हणतो, ' तत्प्राणत्वं चास्मद्**वृद्धप्रपितामह**-सहृदयगोष्ठीगरिष्ठ-कविपंडितमुख्य-**श्रीमन्नारायणपादै**रुक्तम् । '; परंतु काव्यप्रकाशदर्पण नामक काव्यप्रकाशावरील टीकेंत " यदाहुः श्रीकलिंगभूमण्डलाखण्डल-महाराजाधिराज-श्रीनरसिंह-देवसभायां धर्मदत्तं स्थगयंतः अस्म**त्पितामह**श्री**मन्नारायणदासपादाः** । " असें त्यानेंच म्हटले आहे. त्यावरून नारायण हा त्याचा आजोबा कीं आजोबाचा आजोबा असा प्रश्न होतो. या प्रश्नाचे उत्तर दोन प्रकारांनीं देतां येईल. नारायण हा पहिल्या उताऱ्यांत म्हटल्याप्रमाणें आजोबाचा आजोबाच वस्तुतः असून दुसऱ्या उताऱ्यांत संक्षेपाने त्याला नुसता आजोबा म्हटले असेल. किंवा पहिल्यांतील नारायण आजोबाचा आजोबा व दुसऱ्यांतील नुसता आजोबा असेंहि असेल. आजोबाचें नांव पुढे त्याच्या नातवाला ठेवण्याची पद्धत या देशांत आढळून येतेच.

विशिष्ट नियमांची चर्चा केलेली होती. विश्वनाथानें कित्येक संस्कृत शब्दांच्या स्पष्टीकरणार्थ ओरिया भाषेतील पर्यायशब्द काव्यप्रकाशावरील टीकेंत दिले आहेत, असे वामनाचार्य झळकीकरांनीं काव्यप्रकाशाच्या प्रस्तावनेंत दाखविलें आहे ( पान २५ )* त्यावरून विश्वनाथ हा ओरिसा प्रांतातील रहाणारा असावा असें दिसतें. विश्वनाथाचा पिता व स्वतः विश्वनाथ हे दोघेहि कोणा राजाच्या सभेतील महत्वाचे अधिकारी होते व तो राजा बहुधा कलिंग देशाचा असला पाहिजे असें वाटतें. त्या दोघांनाहि सांधिविग्रहिकमहापात्र अशी पदवी लाविलेली आढळते ‡. साहित्यदर्पणाच्या पहिल्या परिच्छेदाचा उपसंहारात्मक भाग व दहाव्या परिच्छेदाचा शेवटचा श्लोक यांचा विचार करतां विश्वनाथ हा वैष्णवमतानुयायी असला पाहिजे असें दिसतें.× तो स्वतः कवि होता व त्यानें साहित्यशास्त्राचे नियम स्पष्ट करण्यासाठी पदोपदीं स्वत:चे संस्कृत प्राकृत श्लोक दिले आहेत. साहित्यदर्पणाशिवाय दुसरे अनेक ग्रंथ त्यानें पूर्वी लिहिले असून त्यांतील राघवविलास नांवाचें संस्कृत महाकाव्य ( यथा मम राघवविलासे ' विपिने क्व जटानिबन्धनम् ' ३, ३२२ ), कुवलयाश्वचरित नांवाचें प्राकृत काव्य ( यथा मम कुवलयाश्वचरिते प्राकृतकाव्ये ' णवरिअ तं ' ३, १४८ ), प्रभावतीपरिणय व चंद्रकला या नाटिका ( यथा मम प्रभावतीपरिणये ' दत्ते सालसमन्थरं भुवि पदं ' इ. ४, ९६ ) व प्रशस्तिरत्नावली नांवाचा सोळा भाषांतील करंभक ( करंभकं तु भाषाभिर्विविधाभिर्विनिर्मितम् ॥ यथा मम षोडशभाषामयी प्रशस्तिरत्नावली ६, ३३७ ) हे साहित्यदर्पणांत सांगितले आहेत. साहित्यदर्पण लिहिल्यावर नरसिंहविजय हे काव्य व काव्यप्रकाशावरील काव्यप्रकाशदर्पण नांवाची टीका हे दोन ग्रंथहि त्यानें लिहिले ( झळकीकरांचा काव्यप्रकाश प्रस्तावना पा. २५). काव्यप्रकाशावर टीका लिहिणारा चंडीदास हा विश्व-

---

* वैपरीत्यं रुचं कुर्विति पाठः, अत्र चिड्कुपदं काश्मीरादिभाषायामश्लीलार्थबोधकम्, उत्कलादिभाषायां घृतवांडकद्रव इत्यादि.

‡ ' इति श्रीमन्नारायण... **सांधिविग्रहिकमहापात्र**–श्रीविश्वनाथकविराजकृतौ ' इ० १ ल्या परिच्छेदाचा समाप्तिदर्शक भाग.

× ' श्रीमन्नारायणचरणारविन्दमधुव्रत ' इत्यादि; त्याचप्रमाणे प्रथम परिच्छेदांत ' काव्याद्धर्मप्राप्तिर्नारायणचरणारविन्दस्तवादिना ' असें म्हटलें आहे.

नाथाच्या पितामहाचा कनिष्ठ बंधु होता असें साहित्यदर्पणांतील एका उल्लेखावरून दिसते. * विश्वनाथाचा उदयकाल निश्चित करण्याचे काम फारसें कठीण नाहीं. तो काल ठरविण्यासारखीं प्रमाणं आहेत ती अशी:—

जम्मू येथील डॉ. स्टाइनच्या ग्रंथनामावलींत अलंकारशास्त्र या मथळ्याखालीं दिलेल्या हस्तलिखित ग्रंथांत जी साहित्यदर्पणाची प्रत आहे तीवर विक्रम संवत् १४४० म्हणजे इ. स. १३८३–८४ हे लेखनवर्ष दिले आहे. अर्थात् साहित्यदर्पण इ. स. १३८४ पूर्वीं लिहिलें असलें पाहिजे. विश्वनाथानें साहित्यदर्पणाच्या चवथ्या परिच्छेदांत ' सन्धौ सर्वस्वहरणं विग्रहे प्राणनिग्रहः । अलावदीननृपतौ न संधिर्न च विग्रहः ॥ ' ( ४, १४ ) असें पद्य उद्धृत केलें असून त्यांत अल्लाउद्दीन म्हणजे सुलतान अल्लाउद्दीन खिलजीच होय.† त्याच्या मलिककाफर नांवाच्या आवडत्या सेनापतीने दक्षिणेवर स्वारी करून वारंगळ पादाक्रान्त केलें आणि कन्याकुमारीपर्यंत आपला विजयध्वज फडकावीत नेला. अल्लाउद्दीनाचा इ. स. १३१६ त विषयप्रयोगाने वध करण्यांत आला असें म्हणतात. तेव्हां उपरोक्त श्लोक अल्लाउद्दीन जीवंत असताना रचण्यांत आला होता असें धरिल्यास साहित्यदर्पणाचा लेखनकाल इ. स. १३०० पूर्वीं जाऊं शकत नाहीं. अर्थात वर उल्लेखिलेल्या हस्तलिखित प्रतीचे लेखनवर्ष म्हणजे इ. स. १३८४ व अल्लाउद्दीनाच्या उल्लेखावरून दिसून येणारे इ. स. १३०० हे आद्यमर्यादा वर्ष या दोहोंमध्ये कोठें तरी साहित्यदर्पणाचा लेखनकाल असला पाहिजे हें उघड आहे.

हा कालनिर्णय दुसऱ्या आंतर आणि बाह्य अशा दोन्ही प्रमाणांशीं अगदीं जुळता आहे. तीं प्रमाणे अशी:—

( १ ) आंतरप्रमाणें—( अ ) जयदेवाच्या गीतगोविंदांतील ( निर्णयसागर प्रत पा. ६८ ) ' हृदि बिसलताहारो नायं भुजंगमनायकः ' इत्यादि श्लोक विश्व-

---

* अस्मत्पितामहानुज–कविपंडितमुख्य–श्री चंडीदासपादानां तु खण्डरसनाम्ना । ७, ३१.

† सुलतान शब्द सुरत्राण रूपाने साहित्यदर्पणांतहि आलेला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे ' गंगाम्भसि सुरत्राण तव निःशाननिस्वनः । स्नातीवारिवधूवर्गगर्भपातनपातकी ॥' १०, ४२.

नाथानें ( १०,३९ ) निश्चय अलंकाराचे उदाहरण म्हणून दिलेला आहे. परंपरागत माहितीवरून जयदेव हा गोवर्धन, शरण, उमापति व कविराज यांसह लक्ष्मणसेन राजाचा आश्रित होता असें दिसून येते. लक्ष्मणसेन हा इ. स. ११७८ च्या सुमारास गादीवर आला असें आम्ही ‘ धर्मशास्त्राचा इतिहास ’ पान ३०० येथे दाखविले आहे. स्वतः जयदेवानेहि गोवर्धनादिकांची नांवें आपले समकालीन म्हणून गीतगोविन्दांत ( १,४ ) दिली आहेत.* यावरून जयदेव हा इ. स. १२ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला असें म्हणून चालावयास हरकत नाही.

(आ) प्रसन्नराघवकर्त्या जयदेवाचे ‘ कदली कदली करभः करभः ’ इत्यादि पद्य ( १,३७ ) विश्वनाथाने ध्वनिविवेचनांत उद्धृत केले आहे. प्रसन्नराघवकर्ता इ. स. १२०० पासून १३०० पर्यंत केव्हां तरी होऊन गेला. विश्वनाथाने रुय्यकाच्या अलंकारसर्वस्वांतून कित्येक स्थळें अक्षरशः उद्धृत केलेली असून कित्येक ठिकाणी सर्वस्वावर प्रतिकूल टीकाहि केली आहे. ही स्थळे दहाव्या उल्लासांत समासोक्ति, भाविक इत्यादि अलंकारांच्या विवेचनांत आढळतील. सर्वस्वकार रुय्यक मंखाचा गुरु होता हें मंखाच्या श्रीकंठचरितांतील ‘तं श्रीरुय्यकमालोक्य स प्रियं गुरुमग्रहीत् ’ ( २५. ३० ) या श्लोकावरून दिसून येत असल्याविषयीं पूर्वी ( पा. २११ ) सांगितलेच आहे. त्या काव्याच्या २५ व्या सर्गांत मंखानें आपला ग्रंथ विद्वानाच्या सभेत आपल्या वडील बंधूच्या घरी दाखविला असें म्हटलें आहे § त्या बंधूचे नांव अलंकार असें होते व तो काश्मीरच्या जयसिंह

---

* वाचः पल्लवत्युमापतिधरः संदर्भशुद्धिं गिरां जानीते जयदेव एव शरणः श्लाघ्यो दुरूहद्रुते । शृंगारोत्तरसत्प्रमेयवचनैराचार्यगोवर्धनः स्पर्धी कोऽपि न विश्रुतः श्रुतिधरो धोयी कविक्ष्मापतिः ॥

§ मदग्रजन्मनः श्रीमल्लककस्य सभागृहम् । तेऽध्यासते च विस्रब्धाः सारसा इव मानसम् ॥ २५. १५. यांतील लंकक हे अलंकाराचे दुसरें नांव असावें. मंखाचे तीन वडील बंधु शृंगार, भृंग व अलंकार या नांवाचे होते असें तिसऱ्या सर्गांत ( श्लो. ४५, ५३, ५६ ) मंखानेच सांगितलें आहे.

राजाचा प्रधान होता.× जयसिंहाची राजवट इ. स. ११२९-११५० अशी होती व श्रीकंठचरिताचा लेखनकाल इ. स. ११४० च्या सुमाराचा आहे. रुय्यकानें आपला सर्वस्व ग्रंथ इ. स. ११५० नंतर वृद्धपणीं लिहिला. तेव्हां ओरिसानिवासी विश्वनाथासारख्या ग्रंथकाराने उतारे घेऊन त्यांवर टीका करण्याइतकी प्रसिद्धि सर्वस्वास येण्यापूर्वी कांहीं तरी कालावधि गेला असला पाहिजे असे समजल्यास वर सांगितलेल्या विश्वनाथाच्या काळाशी तो जुळताच आहे.

( इ ) श्रीहर्षाच्या नैषधीयचरित काव्यांतील कांही श्लोक विश्वनाथानें उद्धृत केले आहेत.+ श्रीहर्षाचा काल पंडितांमध्ये वादाचा विषय होऊन राहिलेला आहे. कान्यकुब्जदेशाच्या राजाचा श्रीहर्ष हा एक आश्रित होता असें " ताम्बूलद्वयमासनं च लभते यः कान्यकुब्जेश्वरात्। " इत्यादि नैषधीयकाव्याच्या शेवटच्या श्लोकांवरून दिसून येते. संवत् १४०५ या वर्षी लिहिलेल्या प्रबंधकोशांत राजशेखरानें म्हटले आहे की, काशीच्या जयन्तचन्द्रराजाचा हीर नांवाचा जो प्रधान होता, त्याचा श्रीहर्ष हा पुत्र होता. हा जयन्तचंद्र म्हणजे कनोजचा एक राजा जयचन्द्रच असावा. जयचंद्राच्या अगदी पहिल्या पहिल्या लेखातील एकावर संवत् वर्ष १२२३ ( इ. स. ११७६ ) हे आहे. या संबंधावरून नैषधीयचरिताचा लेखनकाल इ. स. ११६७ पासून ११७४ पर्यंत केव्हां तरी असावा असें अनुमान डॉ. बुल्हरनें केलें आहे. नैषधीयचरित काव्यावरील गदाधर नांवाच्या टीकाकारानें श्रीहर्ष हा वाराणशीच्या गोविन्दचंद्र राजाचा आश्रित होता असें म्हटलें आहे* व मंखाच्या लिहिण्यावरून कान्यकुब्जाचा एक राजा गोविन्दचंद्र याने काश्मी-

---

× एकं श्री जयसिंहपार्थिवपतिं काश्मीरमीनध्वजम्।
तस्योपासितसंधिविग्रहमलंकारं द्वितीयं स्तुमः॥ २५. ६१

+ 'हनूमदाद्यैः' इ. ( नै. ९, १२३ ), 'धन्यासि वैदर्भि' इ. (नै. ३. ११६) हे श्लोक व्यतिरेक व प्रतिवस्तूपमा या अलंकारांच्या विवेचनांत आले आहेत.

* प्रो. श्री. रा. भांडारकर यांचे द्वितीय ग्रंथसंशोधनवृत्त १९०४-५ पान ४३, ८७.

रच्या जयसिंह राजाकडे आपला प्रतिनिधि पाठविला होता असे दिसून येतें.× गोविन्दचंद्राचे हे दोन उल्लेख एकाच व्यक्तीसंबंधानें असणें असंभवनीय नाहीं. वाराणशी व कान्यकुब्ज अशा दोन राजधान्या गोविन्दचंद्राच्या असण्याचा संभव आहे किंवा कनोजच्या सिंहासनावर अधिष्ठित झाल्यावर गोविन्दचंद्रानें वाराणसी जिंकिली असेल. दुसऱ्या एका मार्गानें सुद्धां श्रीहर्षाच्या याच कालाचें अनुमान होत आहे. श्रीहर्षानें खण्डनखण्डखाद्य * नांवाचा ग्रंथ लिहिला असून त्यांत उदयनाच्या एका पद्याची ओढाताण करून त्याची थट्टा केली आहे.† उदयनाने लक्षणावली ग्रंथ शके ९०६ म्हणजे इ. स. ९८४–८५ या वर्षी लिहिला असे 'तर्काम्बराङ्कप्रमितेष्वतीतेषु शकान्ततः। वर्षेषूदयनश्चक्रे सुबोधां लक्षणावलीम्' या त्यांतील श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे. हीहि श्रीहर्षाच्या उपरोक्त काळाशीं सुसंगत आहे.

( ई ) काव्यप्रकाशावरील एक टीकाकार चंडीदास हा विश्वनाथाच्या पितामहाचा कनिष्ठ बंधु होता हे वर सांगितलेच आहे. काव्यप्रकाशाचा लेखनकाल इ. स. १०५० पासून ११५० पर्यंत केव्हां तरी होता हेहि पूर्वी दाखविलें आहे. चण्डीदास हा कांहीं काव्यप्रकाशावरील टीकाकारांपैकी पहिल्या काळांतील टीकाकार नव्हे व त्याच्याहि मागून दोन पिढ्यांनीं विश्वनाथ उदयास आलेला आहे.

विश्वनाथाचा पितामह किंवा वृद्धपितामह जो नारायण त्याने कलिंगदेशाच्या नरसिंह नांवाच्या राजाच्या सभेत धर्मदत्त नांवाच्या ग्रंथकाराला जिंकिलें असा

---

× अन्यः स सुहलस्तेन ततोऽवन्द्यत पंडितः। दूतो गोविन्दचंद्रस्य कान्यकुब्जस्य भूभुजः॥ ( श्रीकंठचरित २५. १०२ ).

* षष्ठः खण्डनखण्डतोऽपि सहजात्क्षोदक्षमे तन्महाकाव्येऽयं व्यगमन्नलस्य चरिते सर्गो निसर्गोज्ज्वलः॥ नैषधीयचरित सर्ग ६ शेवट

† न्यायकुसुमाञ्जली प्रस्तावना पा. १५. उदयनाचें पद्य 'शङ्का चेदनुमास्त्येव न चेच्छंका ततस्तराम्। व्याघातावधिराशङ्का तर्कः शङ्कावधिर्मतः'॥ ( न्यायकुसुमाञ्जली स्तबक ३ श्लो. ७. पा. ३८१ ) असे आहे, व त्यावर श्रीहर्षाचें उत्तर 'तस्मादस्माभिरप्यस्मिन्नर्थे न खलु दुष्पठा। त्वद्गाथैवान्यथाकारमक्षराणि कियन्त्यपि। व्याघातो यदि शङ्कास्ति न चेच्छंका ततस्तराम्। व्याघातावधिराशङ्का तर्कः शङ्कावधिः कुतः॥' असे आहे.

इतिहास असून त्या धर्मदत्ताचे शब्द विश्वनाथानें तिसऱ्या परिच्छेदांत ( कारिका २-३ ) उद्धृत केले आहेत . नारायण हा विश्वनाथाचा आजोबा असला किंवा आजोबाचा आजोबा असला तरी त्यामुळे फारसा फरक होणार नाहीं. कलिंगदेशात नरसिंह नांव धारण करणारे राजे अनेक होऊन गेले व त्यांच्या राज्यारोहणकालासंबंधानेंहि बराच अनिश्चितपणा दिसतो × पण त्यांतून मार्ग निघण्यासारखा आहे. कारण साहित्यदर्पणाची एक हस्तलिखित प्रत इ. स. १३८४ मधील असल्यामुळें कलिंगाच्या नरसिंहांपैकीं चवथ्या नरसिंहाच्या सभेंत नारायण होता असें म्हणतां येत नाही. चवथा नरसिंह इ. स. १३७१ पासून १४११ पर्यंत केव्हां तरी राज्यारूढ झालेला आहे. तिसरा नरसिंहहि नारायणाचा आश्रयदाता होऊं शकत नाहीं; कारण त्याचा राज्यारोहण काळ इ. स. १३२८ पासून १३६१ पर्यंत केव्हा तरी होता. तेव्हां नारायणाचा आश्रयदाता नरसिंह हा दुसरा नरसिंहच असावा. दुसऱ्या नरसिंहाचा राज्यारोहण काळ इ. स. १२७० पासून १३०३ पर्यंत केव्हाचा तरी आहे. या नरसिंहाला त्याच्या लेखांत कविप्रिय हे विशेषण लाविलेलं असल्यामुळे तो कवींचा बहुधा आश्रयदाता असला पाहिजे. आतां नारायण हा विश्वनाथाचा वृद्धप्रपितामह असेल तर त्याचा आश्रयदाता नरसिंह हा पहिला नरसिंह असूं शकेल कारण त्याचा राज्यारोहण काळ इ. स. १२५३ च्या सुमाराचा आहे. तात्पर्य हा संबंधहि विश्वनाथाच्या पूर्वनिर्णीत कालाशी विसंगत नाही.

२. बाह्यप्रमाणे:—प्रतापरुद्रीयावरील कुमारस्वामीच्या रत्नापण टीकेंत साहित्यदर्पणाचा दोन वेळां उल्लेख आला आहे.† कुमारस्वामी हा सुप्रसिद्ध टीकाकार

---

: तदाह धर्मदत्तः स्वग्रन्थे ‘ रसे सारश्चमत्कारः सर्वत्राप्यनुभूयते । तच्चमत्कारसारत्वे सर्वत्राप्यद्भुतो रस. ॥ तस्मादद्भुतमेवाह कृती नारायणो रसम् ॥ ’.

× त्रिवेदीच्या एकावलीच्या आवृत्तीला जोडलेल्या डॉ. भांडारकरांच्या प्रस्तावनेत कलिंग राजांसंबंधानें विवेचन केलेले आहे.

† प्रतापरुद्रयशोभूषण पानें २४५, २४८. हे उतारे व्यभिचारिभाव, मद, व मोह यांच्या लक्षणांचे असून तीं साहित्यदर्पणांत तिसऱ्या परिच्छेदांत ( का १४६-१४७ व १५० ) आलीं आहेत

मल्लिनाथाचा पुत्र होता व मल्लिनाथाचा काळ सर्व प्रमाणभूत विद्वानांच्या मतें १५ वें शतक असा ठरला आहे.†

( २ ) काव्यप्रकाशावरील प्रदीप नामक टीकेत मम्मटकृत काव्यलक्षणावरील विश्वनाथाच्या टीकेचा उतारा घेतला असून विश्वनाथाचें काव्यलक्षणहि त्याचे नांव न सांगतां उद्धृत केलें आहे.× काव्यप्रकाशावरील एक टीकाकार कमलाकरभट्ट यानें आपला निर्णयसिन्धु हा ग्रंथ इ. स. १६१२ या वर्षी समाप्त केला असे ' वसुऋतुऋतुभूमिते ( १६६८ ) गतेब्दे नरपतिविक्रमतोऽथ याति रौद्रे। तपसि शिवतिथौ समापितोऽयं रघुपतिपादसरोरुहे समर्पितश्च ॥ ' या श्लोकांत सांगितलें आहे. त्याने प्रदीपकार गोविन्दठक्कुराचा नामनिर्देश केलेला असल्यामुळे गोविन्दठक्कुर इ. स. १६०० च्या पूर्वीचा ठरतो.

येथपर्यंतच्या विवेचनावरून असे दिसून येईल की इ. स. बाराव्या शतकांत होऊन गेलेल्या अनेक ग्रंथकारांचा उल्लेख विश्वनाथानें केला आहे व उलट त्याच्या विषयीचे उल्लेख १५ व्या व १६ व्या शतकांतलि ग्रंथकारांनी केले आहेत. अर्थात् विश्वनाथ हा १४ व्या शतकात झालेला असावा असें जें पूर्वी अनुमान केलें आहे त्याला हा स्वतन्त्र असा निश्चित पुरावाच आहे.

आतां साहित्यदर्पणांतील विषयाचें सार अगदी संक्षेपानें सांगण्याचा प्रयत्न करूं. पहिल्या परिच्छेदांत औपचारिक मङ्गलाचरण केल्यावर काव्याचें फल सांगून निरनिराळ्या साहित्यकारांच्या काव्यलक्षणांची चर्चा केली आहे व शेवटी ' वाक्यं रसात्मकं काव्यम् ' असें स्वतःचें काव्यलक्षण देऊन त्याचें सोदाहरण स्पष्टीकरण केलें आहे. दुसऱ्या परिच्छेदांत वाक्य व शब्द यांची लक्षणें दिल्यावर

---

† मालतीमाधवनाटकाची डॉ. भांडारकर यांची प्रस्तावना व त्रिवेदीची भट्टिकाव्याची प्रस्तावना ( पानें २४–२५ )

× अर्वाचीनास्तु " यथोक्तस्य काव्यलक्षणत्वे काव्यपदं निर्विषयं प्रविरलविषयं वा स्यात्। दोषाणां दुर्वारत्वात्। तस्मात् ' वाक्यं रसात्मकं काव्यं ' इति तल्लक्षणम्। तथा च दुष्टेऽपि रसान्वये काव्यत्वमस्त्येव। परंतु अपकर्षमात्रम्। तदुक्तं ' कीटानुविद्धरत्नादि ' इत्यादि। एवं चालंकारादिसत्त्वे उत्कर्षमात्रम्। नीरसे तु चित्रादौ काव्यव्यवहारो गौणः " इत्याहुः। ( प्रदीप पा. १३ )

शब्दाच्या अभिधा, लक्षणा व व्यञ्जना या तीन शक्तींचे विवरण केले आहे. तिसऱ्यांत रस, भाव, त्यांचे दोष, नायकनायिका, त्यांचे भेद, हावभाव, दूती व त्यांचे गुणदोष, रसांचे भेद, रसाभास, यांचे विवेचन असून चवथ्यांत ध्वनि व गुणीभूतव्यङ्ग्य हे मुख्य काव्यप्रकार व त्यांचे उपप्रकार सविस्तर वर्णिले आहेत. पांचव्यांत व्यञ्जनावृत्ति सिद्ध केली असून ती नाहीं म्हणणारांचें मत खोडून काढिले आहे. सहाव्या परिच्छेदांत नाटकविषयाची सविस्तर व सांगोपाग चर्चा केली असून सातव्यांत काव्यदोष आणि आठव्यांत माधुर्य, ओज व प्रसाद हे तीन काव्यगुण सांगून इतर गुण म्हणून जे दुसऱ्या ग्रंथकारांनीं सांगितले आहेत, त्यांचा एक तर या तीन गुणांत अन्तर्भाव झाला पाहिजे नाहीं तर त्यांना गुणत्वच नाहीं असा निर्णय दिला आहे. आठव्यांत वैदर्भी, गौडी, पाञ्चाली व लाटी या चार रीतींचे म्हणजे काव्यांतील भाषासरणींचें सविस्तर वर्णन दिलें असून दहाव्यांत शब्दालंकार व अर्थालंकार यांचा विचार केला आहे.

संस्कृत साहित्यकारांच्या मालिकेत विश्वनाथाचे स्थान दुय्यम प्रतीचेंच आहे. आनंदवर्धन, मम्मट, जगन्नाथ, यांच्या देदीप्यमान वाणीच्या जोडीला ठेविल्यास विश्वनाथाचे तेज फिक्कें दिसते. तरी देखील विश्वनाथाच्या ग्रंथांत कांहीं विशिष्ट गुण आढळतात ही गोष्ट मान्य केली पाहिजे. त्याचा पहिला मोठा गुण म्हणजे एकाच ग्रंथांत साहित्यशास्त्राचे सर्व क्षेत्र सांगोपांग व सविस्तर आक्रमिलें आहे हा होय. या शास्त्रावरील पुष्कळ ग्रंथकारांनी नाटक हा विषय सोडून दिला आहे. उदाहरण, दंडी म्हणतो ' नाटकासारखी जीं मिश्र काव्ये त्यांचे विवेचन इतरांनीं केले आहे ' ( मिश्राणि नाटकादीनि तेषामन्यत्र विस्तरः । का. द. १, ३१ ); भामह म्हणतो, ' नाटकादि अभिनयार्थ काव्यांचा विचार इतरांनी केला आहे ' ( नाटकं द्विपदी शम्या रासकस्कंधकादि यत् । उक्तं तदभिनेयार्थमुक्तोऽन्यैस्तस्य विस्तरः । १, २४ ). मम्मट व जगन्नाथ यांनींहि तसेच केलें आहे. पण साहित्यदर्पणांत नाट्यकला व निरनिराळे नाटकप्रकार यांविषयीं संपूर्ण, सविस्तर व सांगोपांग विवेचन आले असून संस्कृत नाट्यशास्त्राच्या प्रदेशांत भरताचें नाट्यशास्त्र, धनंजयाचें दशरूप व विश्वनाथाचें साहित्यदर्पण हे तीन ग्रंथ मिळून नाट्यशास्त्राची प्रमाणभूत त्रिमूर्ति बनलेली आहे. साहित्यदर्पणाचा दुसरा गुण म्हणजे त्याची सरळ व साधी भाषाशैली होय. मम्मटानें बुद्धिपुरस्सर भाषासंक्षेप केलेला असल्यामुळें काव्यप्रकाश वाचतांना वाचकाला पदोपदी थांबून अर्थ लक्षांत

आणावा लागतो. जगन्नाथाची घवघवीत भाषा, सूक्ष्म कोटिक्रम, व पूर्व ग्रंथकारांना दिलेली शेलकी शेलापागोटी व त्यांच्या मतांचे खंडन यांच्या योगानेंहि वाचक बावरून जातो. पण विश्वनाथाचा ग्रंथ वाचतांना असे अडखळण्याचे व बावरण्याचे प्रसंग क्वचित् येतात. त्याने कित्येक ठिकाणीं सूक्ष्म चिकित्सेची आवड दाखविली असली तरी सामान्यत: त्याचे विवेचन सरळच असते. पण कांही झाले तरी विश्वनाथाचा ग्रंथ स्वतंत्र विवेचनात्मक नसून केवळ संग्रहात्मक आहे यांत शंका नाही. अलंकारसर्वस्वांतील विवेचन त्याने अनेक ठिकाणी स्वीकारिलेलें आहे हें पूर्वी दाखविलेच आहे. अलंकारसर्वस्वाचीं मतें घेतांना कित्येक ठिकाणीं त्याने आपल्या सारासार विचाराला बाजूस ठेविले असून त्याचें अंधवृत्तीनें अनुकरण केलें आहे. परिणाम, व्यतिरेक व अर्थान्तरन्यास या अलंकारांच्या विवरणांत हा प्रकार चांगला पहावयास मिळतो. विवेचनाच्या स्पष्टीकरणार्थ घेतलेल्या उदाहरणांची निवड करितांना त्याने फारशी काळजी घेतलेली दिसत नाहीं. १, २ व १० या तीन परिच्छेदांत त्याने एकंदर २५० श्लोक उदाहरणासाठीं दिलेले असून त्यातील ८५ च्या वर श्लोक ध्वन्यालोक, काव्यप्रकाश अथवा सर्वस्व यांतून घेतलेले आहेत व सुमारे वीस त्याचे स्वत:चे आहेत. नवीन कांहीं गोष्टींचे प्रतिपादन करतांना त्याला तें नीटसे करतांना आलेलें नाही निश्चय व अनुकूल या अलंकारांच्या विवेचनांत हा प्रकार स्पष्ट दिसून येतो. ज्याला विश्वनाथ निश्चय म्हणतो, तो वस्तुत: भ्रांतिमान् आहे, त्याने वर्णिलेल्या निश्चयाच्या स्वरूपांत निश्चयाची रमणीयता नसून ती भ्रांतीमुळेंच उत्पन्न झालेली आहे. अनुकूल हा अलंकार विश्वनाथाने नवीनच सांगितला आहे. पण विषमाशी त्याचे इतके सादृश्य आहे की त्याला स्वतंत्र अलंकार मानिल्यास आणखीहि कित्येक किरकोळ भेदांच्या योगाने बरेच नवीन अलंकार बनवावे लागतील. भेद ठळक असल्याशिवाय अलंकाराचे स्वतंत्र अस्तित्व प्रतिपादण्यांत विशेष अर्थ नाहीं. ‘ काव्यशोभाकरान्धर्मानलंकारान्प्रचक्षते । ते चाद्यापि विकल्प्यन्ते कस्तान्कात्स्न्र्येन वक्ष्यति ’ असे म्हणून दंडीनेंहि हा आशय पूर्वी व्यक्त केला आहे ( का. द. २, १–२ ). कित्येक ठिकाणी त्याने केलेले प्रतिपादन चूकहि आहे. उपमानलुप्ता उपमा, पर्यायोक्त इत्यादिकांच्या विवेचनांत चुकीचें प्रतिपादन आढळून येईल. पण असे कांही दोष साहित्यदर्पणांत असले तरी साहित्यशास्त्राचें

साग्र स्वरूप लक्षांत येण्यास हा ग्रंथ सुलभ व सोइस्कर साधन आहे यांत शंका नाही.

साहित्यदर्पणावर झालेल्या टीकांचा विचार केल्यास बंगालशिवाय इतरत्र हा ग्रंथ फारसा लोकप्रिय झाल्याचे दिसत नाही. अनेक ग्रंथसंशोधनवृत्तांवरून साहित्यदर्पणावरील चारच टीका सांपडलेल्या आहेत असे दिसून* येते. त्यांपैकीं रामचरणाची टीका मात्र आम्हाला मिळालेली आहे. पण ही टीका प्रदीप किंवा उद्योत या काव्यप्रकाशटीकांसारखी विद्वत्तापूर्ण व मार्गदर्शक आहे असे म्हणतां येत नाही. उदाहरणासाठीं घेतलेले श्लोक कोठून घेतले हे तीत सांगितलेले नसून श्लोकांचे स्पष्टीकरणहि केलेले नाही. विश्वनाथाच्या व्याख्यांची इतर ग्रंथकारांच्या व्याख्यांशी तुलना करण्याच्या भानगडींतहि रामचरण फारसा पडलेला नाही. निश्चय, भाविक, विशेष, इत्यादि कित्येक ठिकाणी तर त्याने ठळक दिसण्यासारख्या चुकाहि केलेल्या आहेत.

## ३४ रूपगोस्वामींचा उज्ज्वलनीलमणि

हा ग्रंथ निर्णयसागर छापखान्याने दोन टीकांसह काव्यमालेत छापिला आहे ( सन १९१३ ), एक टीका जीवगोस्वामी यांची लोचनरोचिनी या नांवाची व दुसरी विश्वनाथ चक्रवर्ती यांची आनन्दचन्द्रिका नांवाची आहे. सनातन, रूप व वल्लभ हे तीन बंधु असून ते परमवैष्णव होते. लोचनरोचिनीच्या पहिल्या श्लोकात ही माहिती आहे ( सनातनसमो यस्य ज्यायान् श्रीमान् सनातनः । श्रीवल्लभोनुज सोसौ श्रीरूपो जीवसद्गतिः ॥ इति ) टीकाकार जीवगोस्वामी हे वल्लभाचे पुत्र होत. या ग्रंथाची छापी सुमारें पांचशे पाने असून त्याचा सारांश थोडक्यांत देणेहि कठीण आहे. या ग्रंथाचे प्रयोजन आरंभीच असे सांगितले आहे की शांत, प्रीति, प्रेयः, वत्सल, उज्ज्वल या मुख्य रसांपैकीं भक्तिरसाचा केवळ राजा असा जो मधुर रस ( व ज्याच्या गूढत्वामुळें संक्षिप्त विवेचन पूर्वी केलें ) त्याचा या ग्रंथांत विस्तार करूं ( मुख्यरसेषु पुरा यः संक्षेपेणोदितो रहस्यत्वात् । पृथगेव भक्तिरसराट् स विस्तरेणोच्यते मधुरः ॥ ). हा पूर्वीचा ग्रंथ

---

* अनन्तदास, रामचरण, मथुरानाथ शुक्ल यांच्या टीका व गोपीनाथकृत प्रभा. यांतील पहिलीची हस्तलिखित प्रत इ. स. १६२६ या वर्षी केलेली असून रामचरणाची टीका इ स. १७०० या वर्षी लिहिलेली आहे.

म्हणजे भक्तिरसामृतसिंधु हा ग्रंथ होय असें दोन्ही टीकाकारांनी सांगितले आहे. श्रीकृष्ण ( रतीचा विषय म्हणून ) व त्याच्या वल्लभा ( रतीचे आश्रय म्हणून ) हे आलम्बनविभाव; श्रीकृष्णाचे गुण, क्रिया, प्रसाधनें हे उद्दीपनविभाव; नृत्य, गान इत्यादि अनुभाव; स्तम्भ रोमाञ्च इत्यादि सात्त्विक भाव व निर्वेदादि व्यभिचारिभाव यांच्या योगानें मधुरारति नांवाचा स्थायिभाव जेव्हां भक्तांचे हृदयांत प्रकर्ष पावतो व ते त्याचा आस्वाद घेतात तेव्हां त्याला भक्तिरस म्हणतात. हा शृंगारच आहे ( वक्ष्यमाणैर्विभावाद्यैः स्वाद्यतां मधुरा रतिः। नीता भक्तिरसः प्रोक्तः शृंगाराख्यो मनीषिभि.॥ ). त्यानंतर श्रीकृष्णाचे गुण ( सुरम्य, मधुर, इत्यादि ) निर्दिष्ट करून त्यांचीं उदाहरणे पूर्वीच ( म्हणजे भक्तिरसामृतसिंधु या ग्रंथांत ) सांगितली आहेत असे म्हटलें आहे ( पान ७ ). धीरोदात्त, धीरललित, धीरप्रशान्त, धीरोद्धत असे चार नायक सांगितले आहेत त्यांचे पुनः प्रत्येकी तीन भेद आहेत ( पूर्णतम, पूर्णतर, पूर्ण ), त्यांचे पुनः या ग्रथांत पति व उपपति असे दोन भेद केलें आहेत. ज्या कुमारिकांचे श्रीकृष्णानें पाणिग्रहण केलें त्यांचा व ज्या कांही कुमारिकांनी संकल्प करून त्याला पति मानिलें त्यांचा श्रीकृष्ण पति झाला व राधेसारख्या व्रजांगनाचा तो उपपति झाला (जीवगोस्वामींनी टीकेत सांगितले आहे की श्रीकृष्णाचे ठिकाणी हे उपपतित्व वास्तव नाहीं ) उपपतित्व हे लघुत्वापादक आहे असे जे ( पूर्वाचार्यांनी ) म्हटले आहे तें फक्त प्राकृत नायकाला लागू आहे, मधुर भक्तिरसाचा आस्वाद परमभक्तांना मिळवून देण्यासाठीं अवतीर्ण झालेल्या श्रीकृष्णाला लागू नाहीं ( पान १२ ). पति व उपपति यांचे प्रत्येकी पुनः चार भेद केले आहेत, अनुकूल, दक्षिण, शठ, धृष्ट. या सर्वांच्या व्याख्या व उदाहरणे दिलेली आहेत राधेच्या संबधीं श्रीकृष्ण हे अनुकूलत्वाचे उदाहरण आहे. असे एकंदर पाणाव भेद नायकाचे आहेत. नतर नायकाचे पांच सहाय ( चेट, विट, विदूषक, पीठमर्द, प्रियतम सखा ), त्यांच्या व्याख्या त्यांचे गुण व त्यांचीं उदाहरणे दिली आहेत. नंतर हरीच्या दोन प्रकारच्या वल्लभा ( स्वीया व परकीया ) सांगितल्या आहेत ( पान ३९ ). स्वीया १६१०८ द्वारावतींत होत्या व त्यांत रुक्मिणी, सत्यभामा, जाम्बवती, अर्कनन्दिनी, शैब्या, भद्रा, कौशल्या, माद्री ह्या प्रधान होत्या. परकीया दोन प्रकारच्या ( कन्या व परोढा ) व त्या व्रजवासिनी होत्या. या ठिकाणीं ( पान ४७ ) ग्रंथकारानें सांगितलें आहे की, व्रजांगनांना त्यांच्या पतींनीं

आपल्या स्त्रिया मायेमुळे मानिल्या परंतु त्यांच्याशी समागम केला नाही. दुर्गाव्रत-परा धन्यादि कन्या होत व गोपांशी विवाहित गोपी ह्या परोढा होत. ह्या तीन प्रकारच्या आहेत, साधनपरा, देवी, नित्यप्रिया. साधनपरा पुनः दोन प्रकारच्या यौथिक्यः व अयौथिक्यः; ' यौथिक्यः ' म्हणजे गण [ समूह ] करून साधन करणाऱ्या, त्या पुनः दोन प्रकारच्या मुनि व उपनिषदः. ' अयौथिक्य. ' दोन प्रकारच्या ( प्राचीन व नव ). राधा, चन्द्रावली ह्या नित्यप्रिया होत. स्वकीया व परकीया या दोन्ही पुनः मुग्धा, मध्या व प्रगल्भा अशा तीन प्रकारच्या असतात. त्यांचे पुनः उपभेद व उदाहरणे दिली आहेत. या सर्व नायिका पुन. प्रत्येकी आठ प्रकारच्या असतात, ( अभिसारिका, वासकसज्जा, उत्कण्ठिता, खण्डिता, विप्रलब्धा, कलहान्तरिता, प्रोषितपतिका, स्वाधीनपतिका ). त्यांचे आणखी पोटभेद मिळून ३६० प्रकारच्या नायिका आहेत. दूती दोन प्रकारच्या, स्वयंदूती व आप्तदूती. त्यांचे गुण व व्यापार व नंतर सख्या यांचें वर्णन आहे. उद्दीपनविभाव म्हणजे हरीचे गुण ( कायिक, वाचिक, मानसिक ), नाम, चरित्र, मण्डन, संबंधी, तटस्थ. चरित्र दोन प्रकारचे, अनुमान व लीला ( उदाहरणार्थ वेणुवादन, गोदोह, पर्वतोद्धार, इत्यादि ). मण्डन चार प्रकारचे ( वस्त्र, भूषण, माल्य, अनुलेपन ), संबंधी दोन प्रकारचे लग्न ( वंशीरव, गीत इत्यादि, ) व संनिहित ( निर्माल्य इत्यादि ); तटस्थ ( चन्द्रिका, मेघ, विद्युत् इत्यादि ). नतर अनुभावांचे वर्णन व उदाहरणे, सात्त्विक भावांची उदाहरणे, शृङ्गारांतील मधुरा रति या स्थायिभावाचें विवरण हे विषय आहेत. रति दृढ असली म्हणजे तिलाच प्रेमा म्हणतात, त्याचे स्नेह, मान, प्रणय, राग, अनुराग व भाव असे सहा पर्याय आहेत ( ज्याप्रमाणें एकाच उसाच्या रसाचे गूळ, खडीसाखर, पिठीसाखर इत्यादि प्रकार असतात ). ह्याचे पुनः उपभेद आहेत. उज्ज्वल किंवा मधुर शृंगार हा विप्रलंभ व संभोग ह्या दोन प्रकारचा आहे. विप्रलम्भाचे पूर्व राग, मान, प्रेमवैचित्य, प्रवास असे चार भेद व त्यांचे पोट भेद; संभोगाचे दोन भेद मुख्य व गौण व त्यांचे उपभेद व उदाहरणें; वरील प्रमाणें ग्रंथांतील विषय आहेत.

उज्ज्वल म्हणजे भक्तिरसांतील अत्यंत श्रेष्ठ जी मधुराभक्ति तिचें विवरण ह्या ग्रंथांत आहे म्हणून याला उज्ज्वलनीलमणि असे अभिधान दिलेलें आहे. या ग्रंथाचें दोन प्रकारांनीं वैशिष्ट्य आहे. एक त्याचा विषय कृष्णभक्ति हा असून

इतर साहित्यशास्त्रीय ग्रंथांत याचें विवरण केलेले नाही ते यांत आहे. दुसरे यांतील सर्व उदाहरणें श्रीकृष्णाला व त्याच्या चरित्राला अनुलक्षून आहेत. शिवाय इतरसाहित्यशास्त्रीय ग्रंथांत जी परिभाषा शृंगाररसाचे संबंधानें वापरलेली आहे ती या ग्रथात तशीच्या तशीच भक्तिरसाला लाविलेली आहे.

उज्ज्वलनीलमणींत भागवतपुराणाचा प्रामुख्याने उल्लेख असून त्यांतील उदाहरणें बरीचशी रूपगोस्वामीनें आपल्याच दुसऱ्या ग्रंथांतून म्हणजे दानकेलिकौमुदी, ललितमाधव, विदग्धमाधव, पद्यावली, उद्धवसंदेश यातून घेतली आहेत. याशिवाय मुनि ( भरत ), रुद्र ( पान ४३ ), गीतगोविन्द, हरिवंश, वगैरे ग्रंथ व ग्रंथकार यांचा उल्लेख केलेला आहे. जीवगोस्वामीने आपल्या टीकेंत नाटकचन्द्रिका ( रूपगोस्वामीची पा. २३ ), साहित्यदर्पण ( पा. १०६ ) इत्यादि ग्रथांचा उल्लेख केलेला आहे. विश्वनाथचक्रवर्ती यानें आपली टीका शके १६१८ त ( सन १६९६ ) वृन्दावन येथें पुरी केली असें त्यानेच टीकेचे शेवटी सांगितलें आहे त्यानें जीवगोस्वामी, नारायणाची रसतरंगिणी, भागवतामृत, मधुसूदनसरस्वती इत्यादिकांचा उल्लेख केला आहे

रूपगोस्वामीनें अनेक ग्रथ रचिले त्यांची यादी औफ्रेक्ट सूचींत दिलेली आहे. त्यापैकी नाटकचन्द्रिकेची माहिती थोडक्यांत या ठिकाणी दिली पाहिजे. हा ग्रथ रचिताना भरतनाट्यशास्त्र व रससुधाकर याचा आधार घेतला व साहित्यदर्पण ह्या ग्रंथात भरतमुनींचे मताचे विरुद्ध सांगितलें असल्यामुळें त्याची प्रक्रिया प्राय: त्याज्य ठरविली आहे असे ग्रंथकार म्हणतो. रससुधाकर म्हणजे बहुतकरून शिंगभूपालाचा रसार्णवसुधाकर हा ग्रंथ असावा. ह्या ग्रथात नाटक म्हणजे काय, नायक, नान्दी वगैरे रूपकांची अंगे, संधि पताका विष्कंभक वगैरे पारिभाषिक शब्दांचे विवरण, निरनिराळ्या भाषा कोणत्या पात्रांचे तोंडी घालाव्या, वृत्ति व रस याचा अन्योन्यसंबंध इत्यादि विषय आले आहेत. उदाहरणें पुष्कळ आहेत व ती बहुधा वैष्णवग्रथातून घेतली आहेत. या ग्रंथांत काय आहे याचे सविस्तर वर्णन डॉ. राजेन्द्रलाल मित्र यांच्या 'संस्कृतहस्तलिखितांचे समालोचन' ( नोटिसीस ) ह्या ग्रंथांत ( व्हा. ९ पा. २४० क्रमांक ३१५८ येथें ) पाहावें.

सनातन व रूपगोस्वामी हे बंगाल्यांतील महान् वैष्णवसाधु प्रभुचैतन्य यांचे शिष्य व बहुतेक समकालीन होते असें कविकर्णपूर याचे चैतन्यचंद्रोदय या नाटकावरून समजतें. रूपगोस्वामीनें आपले 'विदग्धमाधव' हे नाटक सन १५३३

मध्ये लिहिले व उत्कलिकावल्लरी हा ग्रंथ सन १५४९–१५५० मध्यें लिहिला असें डॉ. राजेंद्रलाल यांच्या 'संस्कृतहस्तलिखितांचे समालोचन' (व्हा. ९ पान २४० क्रमांक ३१५९) यावरून दिसते. म्हणून रूपगोस्वामी इ. स. १५०० ते १५६० या सुमारास झाला असे म्हणण्यास हरकत नाही. त्याचा पुतण्या जीवगोस्वामी हा इ. स. १५२० ते १६०० सुमारास झाला असला पाहिजे. भक्तिरसामृतसिंधु हा ग्रंथ इ. स. १५४१-४२ मध्ये पुरा झाला (डॉ. स्टाईनचा कॅटलाग पान २२२). त्याचा उल्लेख उज्ज्वलनीलमणींत असल्यामुळे उज्ज्वल-नीलमणि हा ग्रंथ इ. स. १५४२ नंतर लिहिला गेला हे स्पष्ट आहे.

भक्तिरस म्हणून स्वतंत्र मानावा की नाही ह्याचे याठिकाणी थोडक्यात विवेचन केले पाहिजे. आठ किंवा नऊ स्थायिभाव मानणे ही प्रक्रिया मानस-शास्त्रावर थोडीशी अवलंबून आहे हे आम्ही रसनिरूपणात दाखविणार आहो. मनुष्याच्या अंत:करणांत असलेल्या मूलभूतभावनांना स्थायिभाव म्हटले आहे व त्या भावना आस्वाद्यमानतेला किंवा चर्व्यमाणतेच्या पदवीला पोचल्या म्हणजे रसनिष्पत्ति होते. आठ किंवा नऊच स्थायिभाव कां मानावे जास्त कां मानूं नये याबद्दल मतभेद होणे शक्य आहे. भक्तिरसाचे म्हणून जरी 'उज्ज्वलनीलमणि' वगैरे ग्रंथांनी स्वतंत्र वर्णन केले असले तरी त्यांनी उपयोगांत आणलेल्या परि-भाषेवरून भक्तिरसाचा स्थायिभाव रति असल्यामुळे त्याला शृंगार हेच अपर नाम म्हणून त्यांनीच दिले आहे. भक्तीला स्वतंत्र रस न मानिल्यास तिला अप्रा-धान्य दिल्यासारखे होते हे न रुचून रूपगोस्वामीसारख्या परम भागवतांनी तिलाच प्राधान्य येण्यासाठी भक्तिरस असे नांव देऊन तिचे प्राधान्य प्रस्थापित केले. परंतु परिभाषा सर्व शृंगाररसाचीच घेतली प्राचीन शास्त्रकारांनी भक्तीला रस-विवेचनांत मुळीच स्थान दिले नव्हते असे नाही देव, मुनि, गुरु, नृप, पुत्र ह्यांवर असलेले जे प्रेम (किंवा रति) त्याचे काव्यांत वर्णन आले असतां त्याला 'भाव' म्हणावे असे काव्यप्रकाशादि ग्रंथांत सांगितले आहे ('रतिर्देवादिविषया व्यभिचारी तथाञ्जित भाव प्रोक्त' काव्यप्रकाश उल्लास ४) व 'हरत्यघ' हा माघकाव्यांतील (सर्ग १) श्लोक मुनिविषयक रतीचे उदाहरण होय. स्त्री-पुरुष विषयक रतीला शृंगार म्हटलें व तद्व्यतिरिक्त देव, गुरुजन, पुत्र इत्यादिकांचे ठिकाणी असलेल्या अनुरागाला भाव म्हटले हे काही अयोग्य केले असे नाहीं. या दोन्ही रतीच्या

प्रकारांत फरक आहे तो दर्शविण्यासाठी ही परिभाषा उपयोगांत आणिली असावी. शाण्डिल्याच्या भक्तिसूत्रांतही ' ईश्वराचे ठिकाणी अनुरक्ति ' हेंच पराभक्तीचें लक्षण म्हणून दिले आहे ( अथातो भक्तिजिज्ञासा । सा परानुरक्तिरीश्वरे । ). जोपर्यंत प्राचीन साहित्यशास्त्रकारांची रसविषयक परिभाषा वापरावयाची आहे तोपर्यंत भक्तिरस म्हणून स्वतंत्र मानण्याचे कारण आहे असें आम्हांला वाटत नाही. ती परिभाषा सोडून देऊन स्वतंत्र बुद्धीनें साहित्याची शास्त्रीय चर्चा ज्यांना करावयाची असेल त्यांनी भक्तिरसाला प्राधान्य द्यावे, त्याला हरकत दिसत नाही. असे प्राधान्य दिल्यावर भक्तीतही ( दानवीर दयावीर या वीररसाच्या परिभाषेप्रमाणे ) ईश्वरभक्ति, पुत्रभक्ति, पितृभक्ति इत्यादि अनेक भेद मानावे लागतील.

## ३५ केशवमिश्रप्रणीत अलंकारशेखर.

अलंकारशेखर हा ग्रंथ काव्यमालेत प्रसिद्ध झालेला आहे. कारिका, वृत्ति व उदाहरणे असे त्याचे नित्याप्रमाणे तीन भाग आहेत. त्यांतील कारिका शौद्धोदनिकृत आहेत असे ग्रंथकार केशवमिश्राने स्वतःच सांगितले आहे. ' अलंकारविद्यासूत्रकारो भगवान् शौद्धोदनिः परमकारुणिकः स्वशास्त्रे प्रवर्तयिष्यन्प्रथमं काव्यस्वरूपमाह ' ( पा. २ ), ' श्रुतमेवान्यथाकारमक्षराणि कियन्त्यपि । काव्यालंकारविद्यायां शौद्धोदनिरसूत्रयत् ॥ ' ( पा. ८३ ) असे शौद्धोदनीचे उल्लेख त्याने केले आहेत. शौद्धोदनि हे खरोखर कोणा ग्रंथकाराचे नांव आहे की कोणी तरी बौद्धधर्मीय लेखकाने त्या कारिका रचिल्या व गौतमबुद्धाच्या शौद्धोदनि या नांवावर त्या पुढे प्रसिद्धीस आल्या याविषयी कांही निश्चित मत देतां येत नाही. अलंकारशेखरांत काव्यादर्श, काव्यमीमांसा, ध्वन्यालोक, काव्यप्रकाश, वाग्भटालंकार या ग्रंथांचा भरपूर अनुवाद केला असून श्रीपाद नांवाच्या आलंकारिकाच्या ग्रंथांतूनहि अनेक अवतरणे घेतलीं आहेत. हा श्रीपाद कोण होता व त्याच्या ग्रंथाचे स्वरूप काय होतें हे समजत नाही. कारण अलंकारशेखराशिवाय श्रीपादाचा उल्लेख दुसऱ्या कोठे केलेला आढळत नाहीं. अलंकारशेखराचे रत्न नांवाचे आठ भाग व त्यांचे आणखी मरीचि नांवाचे भाग केलेले आहेत. उपक्रमरत्न, दोषरत्न, गुणरत्न, अलंकाररत्न, वर्णकरत्न, कविसप्रदायरत्न, कविसामर्थ्यरत्न व विश्रामरत्न अशी ती आठ रत्नें होत. पहिल्यांत तीन

मरीचि आहेत, त्यांतील काव्यस्वरूप, फल, कारण हा पहिला. त्यांत 'काव्यं रसादिमद् वाक्यं श्रुतं सुखविशेषकृत्' अशी काव्याची व्याख्या दिली आहे. प्रतिभा ही काव्याचें कारण, व हित हे त्याचें फल होय. ( २ ) रीत्यादि बहिरंगत्रय या दुसऱ्या मरीचीत गौडी, वैदर्भी, व मागधी या रीतींचे आणि उक्ति व मुद्रा यांचे प्रकार, यांचें वर्णन आहे. लोकोक्ति, छेकोक्ति, अर्भकोक्ति, उन्मत्तोक्ति, अशा चार प्रकारच्या उक्ति होत. 'कार्तिकांतील प्रबोधिनी एकादशीला भगवान् विष्णु शेषशयनावरून झोप पुरी करून उठतो ' ही लोकोक्ति, 'त्या मनुष्यरूपी पशूला नमस्कार असो ' ही छेकोक्ति ( रसिक मनुष्याची बोलण्याची रीत ), ' आई, चांदोबा कोणत्या झाडाचे फूल ' ही अर्भकोक्ति व विरहादि दुःखांनं भान नाहींसें झालेल्याचें बोलणे म्हणजे उन्मत्तोक्ति होय. पदमुद्रा व वाक्यमुद्रा असे मुद्रेचे दोन प्रकार आहेत. ( ३ ) तिसऱ्या वृत्तिमरीचींत शब्दाच्या वृत्तीचा विचार आहे, शक्ति, लक्षणा व व्यञ्जना या तीन वृत्ति होत. दोपरत्नांत पद-दोष, वाक्यदोष व अर्थदोष असे तीन मरीचि आहेत. ( ४ ) कष्ट, अप्रयुक्त, संदिग्ध, व्यर्थ, अप्रतीत, असाधु, अवाचक व ग्राम्य असे आठ पददोष होत. ( ५ ) न्यून, विसंधि, व्याकीर्ण, समाप्तपुनरुक्तिक, भग्नक्रम, भग्नयति, भग्नच्छन्द, वाक्यगर्भ, अरीतिमत्, अभिमृष्टविधेयांश, समुदायार्थवर्जित, विरुद्धमतिकृत् व असमर्थसमास हे वाक्यदोष होत व ( ६ ) विरस, ग्राम्य, व्याहत, खिन्न, हीनोपम, अधिकोपम, असदृशोपम, देशादिविरोधि, हे अर्थदोष होत. गुणरत्नांत शब्दगुणमरीचि, अर्थगुणमरीचि व वैशेषिकगुणमरीचि असे तीन आहेत. ( ७ ) संक्षिप्तत्व, उदात्तत्व, प्रसाद, उक्ति व समाधि हे पांच शब्दगुण होत; ( ८ ) भाविकत्व, सुशब्दत्व, पर्यायोक्ति, सुधर्मिता हे चार अर्थगुण होत. ( ९ ) पूर्वी जे पद, वाक्य व अर्थ यांचे दोष सांगितले, ते केव्हां केव्हां गुण होतात व तेव्हां त्यांना वैशेषिक गुण म्हणतात. कष्ट हा अनुप्रासांत गुण होतो. तसेंच श्लेषांत अप्रयुक्ततेला, संदिग्धाला मिथःस्तुतीत, व्यर्थाला यमकादि अलंकारांत, अशा रीतीनें दोषांना गुणत्व येते. अलंकाररत्नांत शब्दालंकार, उपमा, रूपक, असे मरीचि आहेत. ( १० ) शब्दालंकारांत चित्र, वक्रोक्ति, अनुप्रास, गूढ, श्लेष, प्रहेलिका, प्रश्नोत्तर, व यमक यांचा विचार आहे. ( ११ ) उपमामरीचींत उपमा, रूपक, उत्प्रेक्षा, समासोक्ति, अपह्नुति, समाहित, स्वभाव, विरोध, सार, दीपक, सहोक्ति, अन्यदेशत्व, विशेषोक्ति व विभावना हे चवदाच अर्थालंकार होत, आणखी नाहींत

असें स्पष्ट सांगून उपमेच्या दहा प्रकारांचीं उदाहरणे दिलीं आहेत. ( १२ ) रूपकमरीचींत रूपकाचें लक्षण देऊन त्याचे विरुद्ध, समस्त, व्यस्त, रूपकरूपक व श्लिष्ट असे पांच भेद सांगितले आहेत. ( १३ ) तेराव्या मरीचींत प्रथम उरलेल्या उत्प्रेक्षादि अलंकारांचीं लक्षणें व उदाहरणे दिल्यावर अलंकाररत्न पुरें केलें असून पुढें त्याच मरीचींत वर्णकरत्नाला आरंभ केला आहे. तेराव्या मरीचीच्या उत्तरार्धाला योषिद्वर्णनमरीचि असें नांव असून सुंदर स्त्री व तिचा वर्ण आणि केशकलापादि अवयव यांना कोणती उपमाने लावावी हें सांगितलें आहे. वर्णकरत्नांत योषिद्वर्णनानन्तर ( १४ ) पुरुषवर्णनमरीचि आला असून त्यांत नायकाच्या शारीरिक स्वरूपाचें वर्णन कसें करावें हे सांगितलें आहे. (१५) पुढच्या नियममरीचींत सादृश्यवाचक शब्द सांगितल्यावर वर्णकरत्नाची समाप्ति केली असून कविसंप्रदायरत्नाला आरंभ केला आहे व कांहीं कविसंकेत देऊन तो मरीचि पुरा केला आहे. यानंतर ( १६ ) वर्णनीयमरीचि व (१७) शुक्लादिनियम मरीचि आले असून त्यांत राजा, राणी, देश, नगर, नदी इत्यादि वर्ण्य विषय व त्यांतील विशेष सागण्यासारखा गुण आणि निसर्गातील विविध वस्तूंचे वर्ण ( रंग ) असे विषय अनुक्रमे वर्णिले आहेत. (१८) पुढच्या मरीचींत एक पासून सहस्रपर्यंतच्या संख्या दर्शविणाऱ्या वस्तूंची नांवे देऊन कविसंप्रदायरत्न पुरें केले आहे व त्याच चित्राद्युपकारमरीचींत कविसामर्थ्यरत्नाला आरंभ करून गतागतसमत्व, संस्कृतप्राकृतैक्य, वचनसाम्य, इत्यादि शब्दचमत्कार सांगितले आहेत. नंतरच्या ( १९ ) मरीचित समस्यापूरण वर्णून कविसामर्थ्यरत्न पुरें केले आहे. शेवटच्या विश्रामरत्नांत ( २० ) रसमरीचि, (२१) रसदोषमरीचि व ( २२ ) अनुकूलवर्णमरीचि असे तीन मरीचि आहेत. पहिल्यात नऊरस, नायक नायिका व त्यांचे भेद व त्रिविध भाव दिले असून दुसऱ्यांत रसदोष व तिसऱ्यांत प्रत्येक रसाला अनुकूल असे कोणते वर्ण ( अक्षरें ) आहेत तें सांगितले आहे.

शौद्धोदनीच्या कारिका १२ व्या शतकानंतर रचिलेल्या असल्या पाहिजेत असें अनुमान होते. रसादिमत् वाक्य म्हणजे काव्य असे त्यानें काव्यलक्षण केलें असून ( पा. २ ) रसाला काव्याचा आत्मा मानिले आहे * व्यक्तिविवेककार

---

* काव्याला शरीर कल्पिल्यास त्याचे निरनिराळे अवयव इत्यादि कसे होतील याविषयी शौद्धोदनि म्हणतो, ' रीतिरुक्तिस्तथा' मुद्रा वृत्तिः काव्यस्य जीवितम् । अलंकारस्तु शोभायै **रस आत्मा** परे मन. ॥ ( पा. ६ ).

महिमभट्टाचा उल्लेख शौद्धोदनीने केला असून ( पा. ८० ) त्याची विवरणपद्धति सामान्यतः वाग्भटालंकाराप्रमाणे दिसते. उदाहरणार्थ ' गुणवत्यपि निर्दोषेऽलंकारैः काव्यराजनि । जायतेन्यैव सुषमा रत्नालंकरणैरिव '। ( पान २७ ) हा श्लोक वाग्भटाच्या ' दोषैर्मुक्तं गुणैर्युक्तमपि येनोज्झितं वचः । स्त्रीरूपमिव नो भाति तं ब्रुवेऽलंक्रियोच्चयम् '। या कारिकेशी ताडून पहावा.

अलंकारशेखरांत ' कविकल्पलता ' ( पा. ३८ श्रीपादानुकारिकविकल्पलताकारः ), गोवर्धन ( पा. १२, २९, ३७, ४३, ४९ इ. ), भार्गवसर्वस्व ( पा. २४), भोजराज ( पा. ७ ), महिमा * ( पा. ८१ ), राजशेखर ( पा. ३२, ६७ ), श्रीपाद ( ४, ५, २३, २७, ३२, ७२, ८३ इ. ), श्रीहर्ष ( पा. ४१ ) इत्यादि ग्रंथ व ग्रंथकार यांची नांवे आली आहेत. अलंकारशेखर लिहिण्यापूर्वी कवींच्या हितासाठी दुसरे सात ग्रंथ लिहिले असल्याचें केशवमिश्रानें ' ग्रंथाः काव्यकृतां हिताय विहिता ये सप्त पूर्वं मया ' इत्यादि प्रास्ताविक श्लोकांत सांगितलें असून त्यांतील अलंकारसर्वस्व ( पा. ९ प्रयोजनं .....च विस्तरः । **तथालंकारसर्वस्वे** सप्रपंचमदर्शयम् ॥ ), काव्यरत्न ( पा. ७२ क्वचित्संभोगपोषकत्वेन...... विस्तृतं मयैव **काव्यरत्ने** ) यांचीं नांवे प्रस्तुत ग्रंथांत आली आहेत. काव्यमाला प्रतीत पान १२ वर **वाक्यरत्ने** म्हटले आहे त्या ठिकाणी बहुधा ' काव्यरत्ने ' असेंच असले पाहिजे. **वाक्यरत्न** नांवाचा आणखी स्वतंत्र ग्रंथ असेल असें दिसत नाही.

केशवमिश्रानें आपला अलंकारशेखर हा ग्रंथ धर्मचंद्राचा पुत्र माणिक्यचंद्र याच्या सांगण्यावरून लिहिला प्रास्ताविक व समाप्तिद्योतक श्लोकांत केशवमिश्र म्हणतो ' वेदान्त–न्याय–विद्यापरिचयचतुरं **केशवं संनियुज्य** श्रीमन्**माणिक्यचन्द्रः** क्षितिपतितिलको **ग्रंथमेनं निधत्ते** ' ॥; ' श्रीमत्के**शवमिश्रम**द्भुतगुणावासं **नियुज्य** स्वयं चक्रे शक्रसमः प्रबंधमनघं माणिक्यचंद्रो नृपः ॥ '. प्रास्ताविक श्लोकातील वृत्तावरून आणखी असे समजून येत की धर्मचंद्र हा रामचंद्राचा पुत्र असून रामचंद्र हा दिल्लीच्या काबिल

---

* दोषं **व्यक्तिविवेकेषु** कविलोकविलोचने । काव्यमीमांसिषु प्राप्तं **महिमा** महिमाहतः ॥. ' अनौचित्याहृते ' इत्यादि ध्वन्यालोकांत ( पा. १४५ ) आलेलें पद्य महिमभट्टाचें म्हणून अलंकारशेखरांत दिलें आहे.

( अफगाण ) राजाचा पराभव करणाऱ्या सुशर्मा नांवाच्या राजाचा वंशज होता. कनिंगहॅमच्या मताप्रमाणे ( आर्किऑलॉजिकल् सर्वे ऑफ इंडिया ग्रंथांक ५, पा. १६० ) माणिक्यचंद्र हा कांग्राचा राजा असून धर्मचंद्रानंतर इ. स. १५६३ सालीं सिंहासनावर आला व दहा वर्षे त्यानें राज्य केलें. त्याच्या सांगण्यावरून लिहिलेला अलंकारशेखर हा अर्थात् १६ व्या शतकाच्या उत्तरार्धांत लिहिण्यांत आला हे उघड आहे.

## ३६ अप्पय्यदीक्षित.

अप्पय्यदीक्षित हा चतुरस्र विद्वान मोठा प्रचंड ग्रंथकार होता. त्यानें शंभरांवर ग्रंथ लिहिल्याची आख्यायिका असून त्यांतील तीन साहित्यशास्त्रावर आहेत, वृत्तिवार्तिक, कुवलयानंद आणि चित्रमीमांसा. वृत्तिवार्तिक अगदी लहान असून त्याचे छापील प्रतीत ( काव्यमाला ) दोन परिच्छेद आहेत व त्यांत रूढि, योग व योगरूढि या तीन प्रकारची अभिधा व चार प्रकारची लक्षणा या दोन शब्दशक्तींचें सविस्तर विवरण केले आहे. लक्षणेचे प्रथम शुद्धा व गौणी असे भेद करून प्रत्येकीचे निरूढ व फल असे पोट भेद आणि त्या पोट भेदांचे आणखी उपभेद केलेले आहेत कुवलयानन्द हा विद्यार्थ्यांच्या उपयोगाचा असा अलंकारग्रंथ आहे. त्यांत अलंकारांची लक्षणे व उदाहरणें बहुधा चंद्रालोकांतून घेतलेली आहेत. जी लक्षणे व उदाहरणे चंद्रालोकांत मिळालीं नाहीत ती मात्र आपण नवीन रचिलीं असे ग्रंथकारानें स्वतःच सांगितलें आहे. तो म्हणतो ‘ येषां चंद्रालोके दृश्यन्ते लक्ष्यलक्षणश्लोकाः । प्रायस्त एव तेषामितरेषां त्वभिनवा विरच्यन्ते ॥ ’. कुवलयानन्दग्रंथ अप्पय्यदीक्षितानें वेंकटपति राजाच्या आज्ञेवरून लिहिला; ‘ अमुं कुवयानन्दमकरोदप्पदीक्षितः । नियोगाद्वेङ्कटपतेर्निरुपाधिकृपानिधेः । ’. कुवलयानंदांत ग्रंथकाराने स्वतःचें स्पष्टीकरण जोडिलें असून उदाहरणें इतर ग्रंथांतून घेतलीं आहेत. चंद्रालोकांत १०० अलंकार सांगितले आहेत व अप्पय्यदीक्षितानें त्यांत चोवीस स्वतंत्र अलंकारांची भर घालून कुवलयानंदांत १२४ अलंकार दिले आहेत. त्याचा तिसरा ग्रंथ चित्रमीमांसा हा मात्र इतर दोहोंपेक्षां अधिक महत्वाचा आहे. प्रथम अलंकारलक्षणाची कारिका देऊन तत्संबंधी इतरांच्या मतांची गद्यांत चर्चा करावयाची व शेवटी अवश्य तर त्यांचें खंडन करावयाचें अशी चित्रमीमांसेची विवेचनपद्धति आहे.

त्या ग्रंथांत प्रथम ध्वनि, गुणीभूतव्यङ्ग्य व चित्र हे जे काव्याचे भेद केलेले आढळतात त्यांचे थोडक्यांत दिग्दर्शन करून शब्दचित्रांत विशेषसें रमणीयत्व नसल्यामुळे ग्रंथकार अर्थचित्राकडे वळला आहे. त्यांत प्रथम उपमा अलंकार घेऊन त्यावर बावीस अलंकारांची उभारणी कशी केली आहे हें त्यानें दाखविलें आहे. काव्यमालेंत छापलेल्या चित्रमीमांसेच्या प्रतींत उपमा, उपमेयोपमा, अनन्वय, स्मरण, रूपक, परिणाम, ससन्देह, भ्रान्तिमान्, उल्लेख, अपह्नुति, उत्प्रेक्षा, अतिशयोक्ति या अलंकारांचे विवरण केल्यावर अतिशयोक्तीचें वर्णन अर्धवट होतांच ग्रंथाला खंड पडला आहे. अशा रीतीनें खंडित असलेल्या या चित्रमीमांसेच्या शेवटीं ' **अप्यर्धचित्रमीमांसा** न मुदे कस्य मांसला । अनूरुरिव घर्मांशोरर्धेन्दुरिव धूर्जटेः ॥ ' असा श्लोक असून त्यांत त्या ग्रंथाची अर्धा म्हणून लंगड्या अरुणांशी व अर्ध्या चंद्राशी तुलना केली आहे व त्या स्थितीतहि तो आनंददायक आहे असे म्हटले आहे जगन्नाथ पंडिताने या चित्रमीमांसेचे खंडन केले असून तोहि खडनग्रंथ छापील प्रतींत अपह्नुति अलंकारापर्यंतच आलेला आहे. पण अप्पय्यदीक्षिताने ' अधिकं निदर्शनालंकारप्रकरणे चित्रयिष्यते ' असे जे म्हटले आहे ( पा. १०१ ) त्यावरून आणखी कांहीं अलंकारांचे विवेचन त्याच्या मनांतून करावयाचे होतें हे उघड दिसते. कुवलयानन्दांत श्लेषाच्या शेवटी ' एतद्विवेचनं तु चित्रमीमांसायां द्रष्टव्यम् ' । अशी अप्पय्यदीक्षिताची टीपहि तेच दर्शविते. पण त्या टीपेवर टीकाकार वैद्यनाथाने ' यद्यप्युत्प्रेक्षाग्रंथानन्तरं चित्रमीमांसा न क्वापि दृश्यते ' असें म्हटले आहे. यावरून वैद्यनाथाला उपलब्ध झालेल्या चित्रमीमांसेच्या भागापेक्षां प्रस्तुत छापील प्रतीत थोडासा अधिक भाग आलेला आहे हे स्पष्ट आहे.

अप्पय्यदीक्षिताचे नांव अप्पदीक्षित किंवा अप्पयदीक्षित असेंहि लिहिलेलें आढळतें. रसगंगाधरांत पान २१८ वर ' **अप्पयदीक्षितास्तु**...इत्याहुः ' असें रूप असून चित्रमीमांसाखंडनांतील तिसऱ्या प्रास्ताविक पद्यांत ' सूक्ष्मं विभाव्य मयका समुदीरितानाम**प्पय्यदीक्षित**कृताविह दूषणानाम् । ' यांत अप्पय्य हें वृत्ताला अनुकूल असें रूप आलें आहे. रसगंगाधरांतहि पान १२० वर ' यत्तु **अप्पय्यदीक्षितो** वृत्तिवार्तिके...आह ' या वाक्यांत अप्पय्य असेच रूप आहे. कुवलयानंदाच्या शेवटच्या श्लोकांत वृत्तानुरोधाने अप्पदीक्षित असें रूप पाहिजे असल्यामुळें तेथें ' अमुं कुवलयानन्दमकरोदप्पदीक्षितः ' असें रूप

आढळत असून रसगंगाधरांतहि अन्यत्र पुष्कळ ठिकाणी ( पा. २०९, २२६, २३९, २५४, इ. ) अप्पदीक्षित असेच रूप योजिलेले आढळून येते. जगन्नाथ पंडिताने अप्पय्यदीक्षितावर अतिशय उग्र टीका केली असून त्याला प्रसंगीं **दीर्घश्रवस्** ( म्हणजे लंबकर्ण, र. ग. पा. २३९ 'इति केनाप्यलंकारिकंमन्येन प्रतारितस्य **दीर्घश्रवस** उक्तिरश्रद्धेयैव ), द्रविडपुंगव म्हणजे बडे द्रविड पंडित ( किंवा बैल ? ) अशी शेलकी विशेषणेहि लाविलेली आहेत ( पा ४२० 'इति सहृदयैराकलनीयं किमुक्त **द्रविडपुंगवेनेति** ).

अप्पय्यदीक्षिताने एकावली, प्रतापरुद्रयशोभूषण, व अलंकारसर्वस्वसञ्जीविनी या ग्रंथांतून अवतरणे घेतलेली असल्यामुळे तो १४ व्या शतकानंतरचा आहे हे उघड आहे. एपिग्रॅफिआ ईंदिका ग्रंथांक ४ पा. २६९ यांत डॉ. हुल्टश यानें असे दाखविले आहे की, कुवलयानन्दांत सांगितलेला वेङ्कटपति हा विजयनगरचा राजा पहिला वेङ्कट होय व त्याचे एक दानपत्र शके १५२३ म्हणजे इ स. १६०१–२ या वर्षात केलेले आहे तसे असल्यास अप्पय्यदीक्षिताचा उत्कर्षकाल १६ व्या शतकाचे उत्तरार्ध व १७ व्याचा पहिला चरण या सुमारास होता असे ठरते. अप्पय्यदीक्षिताचा धाकटा बंधु **आच्चा दीक्षित** नावाचा असून त्याचा नातू नीलकण्ठदीक्षित याने नीलकण्ठविजय नांवाचा ग्रथ गतकलि ४७३८ म्हणजे इ. स. १६३७–३८ या वर्षी लिहिला. हा काळ वरील काळाशी जुळताच आहे जगन्नाथाने अप्पय्यदीक्षितावर जो वैयक्तिक दृष्टीने उग्र भडिमार केलेला आहे व त्याविषयी द्वेष दर्शविला आहे त्याचा विचार केल्यास अप्पय्यदीक्षित हा जगन्नाथाहून पुष्कळ वडील असला तरी जगन्नाथाच्या वेळी विद्यमान होता असे अनुमान सहजच करावे लागते जगन्नाथाचा ग्रंथकर्तृत्वकाल इ. स. १६२० पासून १६५० पर्यंत होता असे पुढे दाखविण्यांत येईल. तात्पर्य अप्पय्यदीक्षिताच्या कालाविषयीचा उपरोक्त निर्णय योग्यच आहे असे दिसून येते. मद्रास येथील 'जर्नल ऑफ ओरिएन्टल रिसर्च' या त्रैमासिकात व्हा. ३ पान १४८ येथे अडैय्यपालं येथील कालकण्ठेश्वराच्या देवालयांतील शिलालेखांत अप्पदीक्षित हा रङ्गराजाचा पुत्र होता असे दाखवून तें देऊळ शके १५०४ ( सन १५८२ ) मध्ये बांधण्यांत आले असे सांगितले आहे. त्याच त्रैमासिकाच्या चवथ्या व्हाल्यूममध्ये ( पान २४३–२४४ ) अप्पय्यदीक्षिताच्या 'लक्षणरत्नावलि' या ग्रंथाचा थोडासा भाग छापला आहे. या

ग्रन्थांत नाट्यशास्त्रांतील ' नान्दी ' वगैरे संज्ञांचें विवरण असून त्या ग्रंथावर ' वेङ्कटपति ' राजाच्या आज्ञेनें ( बहुधा अप्पय्यानेच ) लिहिलेली टीकाही आहे. त्याच त्रैमासिकाच्या व्हाल्यूम २ पान २२५-२३७ येथें महालिंगशास्त्री यांनी अप्पय्यदीक्षिताचा काल सन १५२० ते १५९२ असा निश्चित केला आहे. अप्पय्यदीक्षिताच्या ' शिवार्कमणिदीपिका ' ग्रंथाच्या शेवटी चिनवीराचा पुत्र चिन्नबोम हा अप्पय्यदीक्षिताचा आश्रयदाता होता असे सांगितले आहे. हा वेल्लोरचा राजा होता व त्याच्या शिलालेखांचे काल शके १४७१ व १४८८ आहेत (इन्डियन ॲंटिक्वरी व्हा. १३ पान १५५ व एपिग्राफिआ इन्दिका व्हा ३ पान २३८ ).

## ३७ जगन्नाथकृत रसगंगाधर

रसगंगाधर हा जगन्नाथाचा ग्रंथ नागेशभट्टकृत मर्मप्रकाश टीकेसह काव्यमालेत छापिलेला आहे. हा ग्रंथ साहित्यशास्त्रावरील व विशेषतः अलंकारविषयावरील एक प्रमाणभूत ग्रंथ झालेला आहे. काव्यमीमांसाशास्त्राच्या क्षेत्रांत ध्वन्यालोक, लोचन व काव्यप्रकाश यांच्या खालोखाल रसगंगाधरालाच बसविले पाहिजे. जगन्नाथाचा काळ अगदी अलीकडील असला तरी काव्यमय नीटनेटक्या पद्धतीच्या संस्कृत भाषासरणीवर त्याचे चांगलेच प्रभुत्व आढळून येते आपल्या ग्रंथांतलि उदाहरणे त्याने स्वतःच रचिलेली आहेत. आपली उदाहरणे आपण स्वत रचिलेली असून दुसऱ्याचे कांहीच घेतलेले नाहीं अशी प्रौढि त्याने दाखविली असून कस्तूरीमृग फुलांचा वास केव्हां तरी घेईल काय असा प्रश्न विचारिला आहे. आरंभीच्या भागात तो म्हणतो ' निर्माय नूतनमुदाहरणानुरूप काव्य मयात्र विहितं न परस्य किंचित् । किं सेव्यते सुमनसां मनसाऽपि गन्धः कस्तूरिकाजननशक्तिभृता मृगेण ॥ '. त्याची उदाहरणात्मक पद्ये सोप्या, अस्खलित व सुंदर भाषेंत रचिलेली असून त्यांवरून त्याची श्रेष्ठ पदवीची काव्यशक्ति दिसून येते. रसगंगाधरांत, प्रथम एखाद्या विषयांचें लक्षण करावयाचे, मग त्यावर चर्चा करून उदाहरणाने त्याचे स्पष्टीकरण करावयाचे आणि शेवटीं पूर्व ग्रंथकारांच्या तद्विषयक मतांची चिकित्सा करावयाची अशी पद्धत त्यानें स्वीकारिलेली आहे. जगन्नाथाचें गद्य स्पष्ट व जोरदार भाषासरणीनें गुंफिलेलें असून त्यांत उत्तम प्रकारची चिकित्सक विवेचनशक्ति दिसून येते. त्याची मते अगदीं स्वतंत्र बुद्धीचीं असून प्रसंगोपात्त ध्वन्यालोक, मम्मट, अलंकारसर्वस्व इत्यादि पूर्वींच्या

सन्मान्य ग्रंथांच्या मतावर देखील झोड उठविण्यास तो कचरत नाहीं. " प्राप्तश्रीरेष कस्मात्पुनरपि मयि तं मन्थखेदं विदध्यात् " इत्यादि ध्वन्यालोकांतील रूपकध्वनीच्या उदाहरणावर त्यानें कडक टीका केली आहे, तसेंच मम्मटाची काव्याची व्याख्या ( पान ५ ), रूपकाची व्याख्या ( पान २२९ ), ' येनास्यभ्युदितेन चन्द्र ' इत्यादि श्लोकावरील त्याचे विचार ( पा. ४०३ ) इत्यादिकांवर त्यानें आक्षेप काढिले आहेत. अलंकारसर्वस्वांतील परिणाम व रूपक यांमधील भेदाविष्करण ( पा. २५१ ), भ्रान्तिमान् अलंकाराची व्याख्या ( पा. २६९ ), उत्प्रेक्षेचें लक्षण ( पा. ३०१ ), वाक्यार्थनिदर्शनेचें उदाहरण ( पा. २४२ ) यांवरहि त्यानें प्रतिकूल मत दिलें असून आपला पक्ष सिद्ध केला आहे. त्याची प्रतिकूल टीका सुज्ञ विचाराची असून तिच्या मागें जोरदार कोटिक्रम व सूक्ष्म दृष्टि दिसून येतात आणि प्रतिपक्षावर निकराचा हल्ला चढवितांना सुद्धां तो सभ्यपणाचा व आदरशीलतेचा अतिक्रम सहसा करीत नाहीं. अप्पय्य दीक्षिताशीं दोन हात करतांना मात्र त्यानें हा आदरशीलपणा दाखविलेला नाहीं, हें पूर्वी सांगितलेंच आहे. पण त्याची प्रतिकूल टीकाहि बहुधा योग्य असून विचाराला पटण्यासारखी असते यांत शंका नाहीं.

रसगंगाधर हा ग्रंथ फार मोठा असल्यामुळे त्याची रूपरेखा देऊन त्यांतील विषयाची कल्पना आणून देणें अशक्यप्राय आहे. सांप्रत उपलब्ध असलेला हा ग्रंथ अपुरा असून त्याचे आनन नांवाचे जे पांच भाग केलेले होते असें म्हणतात त्यांतील दुसऱ्या आननाच्या कांहीं भागापर्यंत ग्रंथ आल्यावर तेथें त्याला खण्ड पडला आहे पहिल्या आननांत ' रमणीयार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम् ' असें काव्याचें लक्षण करून प्रतिपादनाला आरंभ केल्यावर पूर्व ग्रंथकारांच्या काव्यलक्षणाचें परीक्षण केलें आहे. काव्याचा हेतु केवळ प्रतिभाच होय असें जगन्नाथ पंडिताचें ठाम मत आहे. उत्तमोत्तम, उत्तम, मध्यम आणि अधम असे काव्याचे चार प्रकार त्याच्या मतें होतात. रस, भाव व तदनुषंगिक इतर विषय यांचेंहि विवेचन याच आननांत असून गुण हे दहा कीं तीन या प्रश्नावरील निरनिराळीं मतें घेऊन त्यांची चर्चा त्यांत केली आहे व भाव, रसाभास, भावोदय इत्यादिकांचेंहि स्पष्टीकरण केलें आहे. दुसऱ्या आननांत प्रथम ध्वनीचे भेद सांगितले असून पुढें संयोग, विप्रयोग, साहचर्य, विरोधिता, अर्थ, प्रकरण, लिंग, अन्यशब्दसंनिधि, सामर्थ्य, औचिती, देश, काल, व्यक्ति, स्वरादि हीं जीं अनेक अर्थ

असलेल्या शब्दांचे विशेष स्थळीं काय अर्थ आहेत त्याचे नियमन करणारीं कारण सांगितलीं आहेत त्यांचा विचार केला आहे. नंतर अभिधा आणि लक्षणा या शब्दशक्ति व त्यांचे भेद सांगून अलंकारांच्या विवेचनाला उपमेपासून आरंभ केला आहे. उपमेसह ७० अलंकारांचें विवेचन झाल्यावर उत्तर अलंकाराच्या मध्येंच ग्रंथाला खंड पडला आहे. जगन्नाथानंतर पन्नासच वर्षांच्या सुमारास झालेला जो नागेशभट्ट त्याची रसगंगाधरावर टीका असून तीहि उत्तर अलंकारापर्यंतच येऊन थांबली आहे. रसगंगाधराचें लेखन चालू असतांना मध्येच जगन्नाथाच्या आयुष्याची दोरी तुटली अशी कल्पना करणें मात्र शक्य नाहीं. कारण अप्पयदीक्षिताच्या चित्रमीमांसेचें खंडन करण्यासाठीं लिहिलेल्या चित्रमीमांसाखंडनांत तो खंडनग्रंथ रसगंगाधरानंतर लिहिलेला आहे असें स्वतः जगन्नाथानेच सुचविलें आहे. प्रास्ताविक श्लोकांतील दुसऱ्यांत तो म्हणतो ' रसगंगाधरे चित्रमीमांसायां मयोदिताः । ये दोषास्तेऽत्र संक्षिप्य कथ्यन्ते विदुषां मुदे ' ॥. तसेच पुढें एका ठिकाणींहि ( पान १२ ) ' विशेषस्तु उदाहरणालंकारप्रकरणे रसगंगाधरादवसेय.' असा रसगंगाधराचा उल्लेख त्यानें केला आहे. पण प्रस्तुत उपलब्ध असलेल्या रसगंगाधरांत उदाहरण या अलंकारासंबंधानें त्याने विशेष टीप जोडलेली नाही.

रसगंगाधर आणि चित्रमीमांसाखंडन या साहित्यग्रंथांशिवाय जगन्नाथाने आणखी दहा बारा ग्रंथ लिहिलेले आहेत. त्यांतील (१) अमृतलहरी, (२) करुणालहरी, (३) लक्ष्मीलहरी, व (४) सुधालहरी, (५) प्राणाभरण हे काव्यमालेंत छापलेले असून (६) पीयूषलहरी, (७) भामिनीविलास हे पुष्कळांनी छापिले आहेत. (८) आसफविलास, (९) जगदाभरण, (१०) यमुनावर्णन व ( ११ ) मनोरमाकुचमर्दन ( व्याकरणशास्त्रग्रंथ ) हे प्रसिद्ध झालेले आढळत नाहीत. चित्रमीमांसाखंडनहि काव्यमालेंत छापिलें आहे. पीयूषलहरीचें लोकप्रिय नाव गंगालहरी असें असून हा ग्रंथ व भामिनीविलास हे दोन्ही सर्वत्र सुप्रसिद्ध आहेत. मनोरमाकुचमर्दन हा भट्टोजिदीक्षिताच्या मनोरमा नामक ग्रंथाच्या खंडनार्थ लिहिलेला आहे.

जगन्नाथ हा तैलंग ब्राह्मण होता. * त्याच्या पित्याचें नांव पेरुभट्ट किंवा

---

* ' तैलंगान्वय-मंगलालय ' इत्यादि श्लोक प्राणाभरणाच्या शेवटीं आहे. तसेच आसफविलासांत " सार्वभौमश्रीशहाजहानप्रसादादधिगत-पंडितराजपदवी-विराजितेन तैलंगकुलावतंसेन पंडितजगन्नाथेनासफविलासाख्येयमाख्यायिका निरमीयत " असें म्हटलेलें आहे.

पेरमभट्ट असून मातेचें लक्ष्मी होतें. त्याचें अनेक शास्त्राचें अध्ययन पेरुभट्टाजवळ व कांही शेष आडनांवाच्या वीरेश्वर. नामक पडिताजवळ झाले. पेरुभट्ट मोठा विद्वान पंडित असून त्याने ज्ञानेंद्रभिक्षूपाशीं वेदान्तशास्त्राचें, महेंद्रपंडिताशीं न्यायवैशेषिकदर्शनाचें, खडदेव पंडितापाशीं पूर्वमीमांसेचें, व वीरेश्वरापाशीं व्याकरणमहाभाष्याचें अध्ययन केलें होतें. जगन्नाथ अध्ययन पुरें झाल्यावर तरुणपणीच दिल्लीस × शहाजहान बादशहाकडे गेला व त्याच्या दरबारांत त्याचा सन्मान होऊन त्याला पडितराज अशी पदवी मिळाली शहाजहानचा आवडता खान खानन हाच बहुधा आसफविलासांतील आसफ असून त्या ग्रंथांत जगन्नाथानें त्याच्या मृत्यूविषयीं दुःखप्रदर्शन केलें आहे. हा आसफ सन १६४१ त मरण पावला. जगदाभरणांत शहाजहानाचा पुत्र दाराशिकोह किंवा दारा याची स्तुति आली आहे आसफखानाचा उल्लेख रसगगाधरांतहि ' सुधेव वाणी वसुधेव मूर्तिः सुधाकरश्रीसदृशी च कीर्तिः । पयोधिकल्पा मतिरासफेन्द्रो महीतलेऽन्यस्य न हीति मन्ये ॥ ' ( पा. १६६ ), ' युक्तं तु याते दिवमासफेन्दौ तदाश्रितानां यदभूद्विनाशः ॥ ' ( पा. ४५७ ) या श्लोकांत आला असून, 'भूमीनाथ शहाबुदीन भवतस्तुल्यो गुणांनां गणैः ' इत्यादि श्लोकांत ( पा. २११ ) शहाजहानाचा उल्लेख आहे. चित्रमीमांसाखंडनाच्या एका हस्तलिखित प्रतीवर संवत् १७०९ हे वर्ष ( इ. स. १६५२-५३ ) आहे. यावरून चित्रमीमांसाखंडन व रसगगाधर हे दोन्ही ग्रथ इ. स. १६४१ नंतर म्हणजे आसफखानाच्या मृत्यूनंतर व १६५० च्या पूर्वी लिहिलेले असलेले पाहिजेत. हे दोन्ही ग्रंथ जगन्नाथाच्या परिणतप्रज्ञेची फळें असल्यामुळें जगन्नाथाचा उत्कर्षकाळ इ. स. १६२० पासून १६५० पर्यंतच्या अवधींत होता असें ठरतें.

रसंगगाधराचा टीकाकार नागेश हा मोठा पंडित असून त्यानें अनेक शास्त्रविषयक ग्रंथांवर टीका लिहिल्या आहेत. पुढें दिलेल्या वंशपरंपरेवरून जगन्नाथाच्या मागाहून तो सुमारें दोन पिढयांनी झाला असें दिसून येईल व तदनुसार त्याचा उदयकाल १८ व्या शतकाचें पहिलें अर्ध असलें पाहिजे हें उघड आहे.

---

× दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले नीतं नवीनं वयः । ( भा. वि. समाप्तिश्लोक )

## शेष घराण्याचा वंशवृक्ष व गुरुशिष्यपरंपरा.




काशीच्या शेष घराण्याचें वृत्त इंडियन ॲटिक्करी सन १९१२ ( पान २४५ पासून पुढे ) यात आढळून येईल.

जगन्नाथपंडित हाच साहित्यशास्त्रावरील शेवटचा मोठा ग्रंथकार होय. त्याच्यानंतर कित्येक संग्रहात्मक व बालोपयोगी ग्रंथ झाले आहेत, त्यांचा विचार करण्याची तादृश आवश्यकता नाही. म्हणून साहित्यशास्त्राच्या इतिहासांतील ग्रंथकारवर्णनाचा भाग येथेंच पुरा करणें योग्य दिसतें.

---

# संस्कृत साहित्यशास्त्राचा इतिहास

### भाग २ रा.

## साहित्यशास्त्राची उत्पत्ति आणि वाढ

१ **काव्यरचनेचें आदिस्वरूपः**—काव्याचें यथार्थ लक्षण करून त्याचें इतर प्रकारच्या वाङ्मयाहून काय वैशिष्ट्य आहे हें दाखवून देण्याचें काम अत्यंत बिकट आहे. स्वरूपतः गद्यांत असलेला ग्रंथ काव्यग्रंथ होऊं शकेल की नाहीं हा प्रश्न सोडून दिला तरी जिला खरोखर काव्य म्हणतां येईल अशा रचनेला विशिष्ट गुणाची जोड पाहिजे. विशिष्टप्रकारची भाषासरणी, विषय, आणि त्या विषयाचे प्रतिपादन करतांना असलेली मनाची ठेवण या तीन गुणांनीं युक्त अशा शब्दरचनेला काव्यत्व येतें असें सामान्यतः म्हणावयास हरकत नाहीं. या दृष्टीनें विचार केल्यास, आर्यांचा आदिग्रंथ जो ऋग्वेद तो जरी प्रामुख्यानें धर्मग्रंथ आहे व तदनुसार त्यांत अत्यंत कळकळीनें केलेल्या देवांच्या प्रार्थनाच विशेषतः ग्रथित झालेल्या आहेत, तरी त्यांत सुद्धां ज्यांना यथार्थपणे काव्य म्हणतां येईल असे अनेक भाग आढळून येतात. ऋग्वेदांतील अनेक सूक्तांत व विशेषतः उषोदेवतेच्या सूक्तांत सरस काव्याचीं कितीतरी उदाहरणें दाखवून देतां येतील. उदाहरणार्थ १ ल्या मंडळांतील १२४ वे सूक्त पहा. ‘अभ्रातेव पुंस एति प्रतीची गर्तारुगिव सनये धनानाम्। जायेव पत्य उशती सुवासा उषा हस्रेव निरिणीते अप्सः ॥’ असा त्या सूक्तांतील सातवा मंत्र आहे. एकुलती एक भ्रातृविहीन अशी कन्या जशी ( आपल्या पुत्रासह ) पुरुषाकडे ( म्हणजे आपल्या बापाकडे ) जाते, किंवा धन मिळविण्यासाठीं जशी कोणी स्त्री ( सभेंत ) उच्चासनावर चढते, तशी उत्तम वेश करून पतिसन्निध जाण्यासाठी उत्सुक झालेल्या पत्नीसारखी ही उषोदेवी हंसतमुख तरुणीप्रमाणें आपलें सौंदर्य व्यक्त करीत आहे; अशा आशयाचें वर्णन या मंत्रांत केलें असून त्यांत चार उपमा आल्या आहेत व त्यांतील शेवटच्या दोन तर कोणत्याहि देशांतील व कोणत्याहि काळांतील काव्यांत बसण्याला योग्य आहेत. त्याच मंडळांतील आणखी १६४ व्या सूक्तांतील कित्येक मंत्र पहा. त्यांतील २० वा मंत्र ‘द्वा सुपर्णा सयुजा

सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरेकः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्योऽभिचाकशीति ॥ ' असा असून त्यांत जीव आणि ईश्वर यांना पक्षी कल्पून त्यांचें वर्णन केले आहे. * जोडीने असणारे दोन मित्रपक्षी एकाच (पिंपळाच्या) झाडाला धरून राहातात, त्यांतील एक त्या झाडाचे गोड फळ खातो व दुसरा मात्र कांही एक न खातां तटस्थपणें पहात असतो, असा त्या वर्णनाचा आशय असून त्यांतील कल्पना मोठी सरस आहे व अलंकारशास्त्रांत ज्याला रूपकातिशयोक्ति म्हणतात तो अलंकार त्यांत साधिलेला आहे. या सूक्तांतील ११ वा मंत्र ' द्वादशारं न हि तज्जराय वर्वर्ति चक्रं परिद्यामृतस्य । आ पुत्रा अग्ने मिथुनासो अत्र सप्त शतानि विंशतिश्च तस्थुः ॥ ' असा असून त्यांत संवत्सराला ऋताचे चक्र कल्पून त्याचे वर्णन केलें आहे. सामान्य चक्रांहून हे चक्र विलक्षण आहे असे वर्णन यांत असल्यामुळें त्यांत व्यतिरेक अलंकार झाला आहे. ' यत्रा सुपर्णा अमृतस्य भागमनिमेषं विदथाभिस्वरंति । इनो विश्वस्य भुवनस्य गोपाः स मा धीरः पाकमत्रा-विवेश ॥ ' ( ऋ. १,१६४,२१ ), ' स्वसुर्जारः शृणोतु नः ' ( ऋ. ६,५५,५ ) इत्यादि मंत्रांत श्लेष साधण्याचा प्रयत्न दिसून येतो. यांतील दुसऱ्या श्लोकाचे दोन अर्थ निरुक्तांत ( ३-१२ ) दिले आहेत. त्याचप्रमाणे ' यत्र बाणाः संपतन्ति कुमारा विशिखा इव' ( ऋ. ६,७५,१७ ), 'अहिरिव भोगैः पर्येति बाहुं ज्याया हेतिं परिबाधमानः' ( ऋ. ६,७५,१४ ), 'जीमूतस्येव भवति प्रतीकं यद्वर्मी याति समदामुपस्थे ' ( तै. सं. ४,६,६,१), 'द्रुपदादिवोन्मुमुचानः स्विन्नः स्नात्वी मलादिव । पूतं पवित्रेणेवाज्यं विश्वे मुञ्चन्तु मैनसः ( तै. ब्रा. २,४,४,९ व वाज. संहिता २०–२० ) इत्यादि स्थली फार सुन्दर उपमा आहेत. वेदसंहितांमध्ये जशीं हीं सरस काव्याचीं उदाहरणे आढळतात, तशी ब्रह्मज्ञानविवेचक अशा उपनिषदांमध्येंहि तीं आढळतात. मुंडकोपनिषदांतील ( २,२,३ ) ' धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं ह्युपासानिशितं सधयीत । आयम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं तदेवाक्षरं सोम्य विद्धि ॥' या मंत्रांत ब्रह्मसाधनाचा उपाय सुंदर रूपकानें दर्शविला आहे. ' आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु ' इत्यादि कठोपनिषदांतील ( १,३,३ ) मंत्रांतहि असेच रूपक गुंफिलें असून ' इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थे-

* ' द्वा सुपर्णा ' हा मंत्र जगन्नाथपंडितानें अतिशयोक्तीचे वैदिक उदाहरण म्हणून दिला आहे ( रसगंगाधर पान ३१६ ).

भ्यश्च परं मनः । मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ॥ महतः परमव्यक्तम-व्यक्तात्पुरुषः परः । पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ॥ ' ( क. उ. ३, ७,१०–११ ) यांत सार नांवाचा अलंकार आला आहे. ऋग्वेदांतील कित्येक सूक्तांत मनोहर संवादहि आले आहेत. दहाव्या मंडलांतील १०८ वें सूक्त देवशुनी सरमा आणि पणिनामक असुर यांमधील संवाद आहे. तिसऱ्या मंडलांतील ३३ व्या सूक्तांत विश्वामित्र व विपाट् आणि शुतुद्रि या नद्या यांतील संवाद वर्णिला आहे. याशिवाय ऋग्वेद १,१६५ व १७०; १, १७९; ४,१८ व ४,४२; ७,३३; १०,२८; १०,५१ व ५३; १०,८६; १०,१०; १०,९५ यांत संवाद आहेत. हे वैदिक संवाद म्हणजे पुढे संस्कृतवाङ्मयांत विकास पावलेल्या नाटकांचें आदिस्वरूपच होय. या खेरीज तै. सं. ७–५–९–३ व तै. ब्रा. १-२-६६ यांत महाव्रत नांवाच्या यज्ञांत ब्राह्मण व शूद्र यांनी लटकी लढाई करावयाची असें वर्णन केले आहे त्यांतही पुढे झालेल्या नाटकविकासाचे बीज आहे. या शिवाय यज्ञांत ' ब्रह्मोद्य ' म्हणून जे कूट प्रश्न करण्यांत येत ( तै. सं. ७-४-१८ 'किं स्विद्धिमस्य भेषजं किं स्विदावपनं महत् ' इत्यादि व वाज. सं. २३ व तै. ब्रा. ३-९-५ ) ते पुढे जे प्रहेलिका वगैरे प्रकार झाले त्यांचे बीजरूप होत.

**२ वेदोत्तरकालीन काव्यस्वरूप**—वैदिक कालानंतरच्या संस्कृत भाषेतील ग्रंथभांडाराचा विचार करूं लागले असतां आपल्याला असें आढळून येतें की, खिस्ती शकापूर्वीं कित्येक शतकें या देशांत उच्च पदवीची काव्यनिर्मिति झाली होती. महाभारताचे सांप्रतचे स्वरूप त्या ग्रंथाला इ. स. पूर्वीच्या दुसऱ्या शतकानंतर आलेलें नसून त्याच्या पूर्वीं केव्हां तरी ते आलेलें आहे व त्याचा बराच भाग तर इ. स. पूर्वी ५०० वर्षांच्या सुमारासहि रचून झालेला होता, ही गोष्ट आतां सर्व पंडितांनी मान्य केली आहे. रामायणाचाहि रचनाकाल इ. स. पूर्वीचे ४ थे शतक होय असें डॉ. कीथ प्रभृति पंडितांचें मत असून याकोबी आदिकरून विद्वानांनी तर तो काळ इ. स. पूर्वीच्या ६ व्या शतकाइतका मागें नेला आहे. अशा या दोन्ही प्राचीन महाकाव्यांत उच्च प्रतीचें काव्य असलेलीं अनेक स्थळें आढळून येतात. ध्वन्यालोक, काव्यप्रकाश अशासारख्या अलंकारशास्त्रावरील सर्वमान्य ग्रंथांच्या कर्त्यांनी महाभारत व रामायण यांमधील अनेक पद्ये उदाहरणे म्हणून आपल्या ग्रंथांत उद्धृत केली आहेत हे पहिल्या भागांतील त्या ग्रंथांच्या वर्णनांत दाखविले आहे. ' या निशा सर्वभूतानां तस्यां

जागर्ति संयमी ' इत्यादि गीताश्लोक, ध्वन्यालोकांत ( पा १२५ ) घेतलेला आहे. काव्यप्रकाशाच्या ४ थ्या उल्लासांत शांतिपर्वातील ( अ. १५३ ) गृध्र-गोमायुसंवादाचा निर्देश केला आहे. ' मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः । यत्क्रौञ्चमिथुनादेकमवधीः काममोहितम् ' हा रामायण बालकाण्डांतील ( २, १५ ) श्लोक, तसाच ' रविसंक्रान्तसौभाग्यस्तुषारावृतमण्डलः । निःश्वासान्ध इवादर्शश्चन्द्रमा न प्रकाशते ॥ ' हा अरण्यकाण्डांतील श्लोक ( २२. १३ ) ध्वन्यालोकांत ( पा. २८ व ६३ ) घेतलेले आढळून येतात. महाभारतापासून अनेक कवींना काव्यस्फूर्ति मिळाली असली तरी मुख्यतः तो काव्यग्रंथ नसून धर्मशास्त्र किंवा इतिहास म्हणून मानिलेला दिसतो. ' इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धयः ' । ( आदिप. २, ३८५ ), ' इदं कविवरैः सर्वैराख्यानमुपजीव्यत । ' ( आदिप. २. ३८९ ) इत्यादि वर्णन महाभारताला यथार्थपणे लागू पडतेच. पण रामायण तर मूळांतच काव्य म्हणून रचिलेले असून तदनुसार त्यांतील विषय आहेत. त्यांत महाकाव्याला अवश्य असलेली लांबलचक अशी नगरे, वने, समुद्र, ऋतु, सायंकाळ, प्रातःकाळ इत्यादिकांची तशींच सैन्याचा तळ, विवाहसमारंभ, यज्ञसमारंभ यांची वर्णने पुष्कळ असून काव्यप्रतिभेच्या उच्च भराऱ्याहि अनेक आढळून येतात. युद्धकाण्डांतील समुद्रवर्णन ( ४ ११० इत्यादि ), सुन्दरकाण्डांतील रूपकयुक्त आकाशवर्णन ( ५७ १-४ ), अयोध्याकाण्डांतील लांबलचक रूपक ( ६९. १८ इ. ) हीं काव्यांची उत्तम उदाहरणें म्हणून देण्यासारखी आहेत. 'हसन्तामिव फेनौघैर्नृत्यन्तामिव चोर्मिभिः ' (४,११०) इत्यादि समुद्राचे वर्णन, ' भुजंगयक्षगन्धर्वप्रबुद्धकमलोत्पलम् ।......ऐरावतमहाद्वीपं स्वातीहंसविलासितम् । ' इत्यादि आकाशावरील समुद्राची उत्प्रेक्षा यांत निःसंशय उच्च प्रतीची काव्यप्रतिभा दिसून येत आहे. ' इत्याद्यशेषमिह वस्तुविभेदजातं रामायणादि च विभाव्य बृहत्कथां च ॥ आसूत्रयेत्तदनु नेतृरसानुगुण्याच्चित्रां कथामुचितचारुवचःप्रपञ्चैः ॥ ' असें म्हणून धनंजयानें दशरूपांत ( १, ६८ ) रामायण बृहत्कथा इत्यादि प्राचीन ग्रंथांतून नाटककारानें नाटकाचा विषय काढावा अशी सूचना केली आहे, यावरून विविधरसानुकूल प्रसंग या ग्रंथांत भरपूर आहेत असें त्याचें मत होतें हें उघड आहे. निरुक्तांतील ( २,२ ) ' अक्रूरो ददते मणिम् ' हें वाक्य हि कोणत्यातरी काव्यग्रंथांतूनच उद्धृत केलेलं असावे. व्याकरणवेदान्तधर्म इत्यादि

शास्त्रांशिवाय केवळ काव्यासारख्या ग्रंथाची रचना पाणिनीच्या पूर्वी होत होती हे त्याच्या ' अधिकृत्य कृते ग्रंथे ' ( ४,३,८७) या व त्याच्या पुढच्या सूत्रांवरून समजून येतें. पाणिनीने पातालविजय नांवाचें महाकाव्य लिहिलें होतें असें रुद्रटाचा टीकाकार नमिसाधु यानें ( २,८ ) दर्शविले असून त्यांतील श्लोकही उद्धृत केले आहेत. * जाम्बवतीजय नांवाचें काव्य व्याकरणकार पाणिनीनें रचिलें असल्याचा उल्लेख राजशेखराने केला× आहे. पाणिनीचा उपजाति वृत्ताच्या रचनेंत हात-खंडा होता असे सुवृत्ततिलककारानें सांगितलें असून ( ३,३० ) पाणिनीच्या नांवावर कित्येक पद्यें सुभाषितावलीसारख्या सुभाषितसंग्राहक ग्रंथांत घेतलेली आढळतात.+ त्यांतील ' उपोढरागेण विलोलतारकं तथा गृहीतं शशिना निशा-मुखम् । यथा समस्तं तिमिरांशुकं तया पुरोपि रागाद्गलितं न लक्षितम् ॥' हा श्लोक ध्वन्यालोकांत कोणाचा तो न सांगतां घेतला असून ' ऐन्द्रं धनुः पाण्डु-पयोधरेण शरद्दधानार्द्रनखक्षताभम् । प्रसादयन्ती सकलंकमिन्दुं तापं रवेरभ्य-धिकं चकार ॥ ' हा श्लोक वामनाने काव्यालंकारसूत्रांत घेतलेला आहे. आतां हा काव्यकर्ता पाणिनि व व्याकरणकार पाणिनि हे एकच होत कीं काय हा मात्र प्रश्न आहे. पण 'अधिकृत्य कृते ग्रंथे' या पाणिनिसूत्रावरील ' लुबाख्या-यिकाभ्यो बहुलम् ' या वार्तिकावरून एवढे दिसून येत की पतञ्जलीच्या पूर्वी बराच काळ आख्यायिका नांवाचे ग्रंथ रचण्यांत येत होते. पतञ्जलीनें व्याकरण महाभाष्यांत ( कीलहॉर्न आवृत्ति पुस्तक २ पान ३१५ ) 'यत्तेन कृतं न च तेन प्रोक्तं वाररुचं काव्यम् ' असे म्हणून वररुचिकृत एका काव्याचा निर्देश केला आहे व ' लुबाख्यायिकाभ्यो बहुलम् ' या वार्तिकावर भाष्य करतांना वासवदत्ता, सुमनोत्तरा, व भैमरथी या तीन आख्यायिकानामक ग्रंथवर्गात

---

*तथाहि पाणिनेः पातालविजये महाकाव्ये-'संध्यावधूं गृह्य करेण' इत्यत्र गृह्येति क्त्वो ल्यबादेशः । तथा तस्यैव कवेः-' गतेऽर्धरात्रे परिमन्दमन्दं गर्जन्ति यत्प्रावृषि कालमेघाः । अपश्यती वत्समिवेन्दुबिम्बं तच्छर्वरी गौरिव हुंकरोति ॥' इत्यत्र ' पश्यती' इदं छुप्तन्तीनकारं पदम् ।

× पीटर्सनचें ४ थें ग्रंथसंशोधनवृत्त पा. ७६.

+ सुभाषितावलीची पीटरसनकृत प्रस्तावना पान ५८ व रॉ. ए. सो. वृत्त सन १८९१ पा. ३११-३१६.

मोडणाऱ्या ग्रंथांचीं नांवें दिलीं आहेत ( म. भा. व्हॉ. २ पा. ३१३ व २८४ ). कंसवध व बलिबन्ध या विषयांवरील नाटकासारखे दोन प्रबंध व त्यांचे रंगभूमीवरील प्रयोग यांचेंहि उल्लेख पतञ्जलीनें केले आहेत * ( पु. २ पा ३४-३६ ). दुसऱ्या एका ठिकाणीं त्यानें नटांच्या स्त्रियांचा उल्लेख करून 'नटांना स्त्रियो रङ्गं गता योयः पृच्छति कस्य यूयं कस्य यूयमिति तंतं तव तवेत्याहुः ।' असें त्यांच्याविषयीं म्हटलें आहे ( पु. ३ पा. ७ ). व्याकरणमहाभाष्यांत या शिवाय आणखीहि पूर्वीच्या कवीच्या ग्रंथांतून उतारे घेतलेले असून त्यांतील कित्येक काव्यदृष्ट्या फार मनोहर आहेत. 'असिद्वितीयोऽनुससार पाण्डवम् ', ' संकर्षणद्वितीयस्य बलं कृष्णस्य वर्धताम् ' ( पु. १ पा. ४२६ ), ' जघान कंसं किल वासुदेवः ' ( पु २ पा. ११९ ), ' जनार्दनस्त्वात्मचतुर्थ एव ' ( पु. ३ पा. १४३ ), ' प्रियां मयूरः प्रतिनर्नृतीति ', ' यद्वत्त्वं नरवर नर्नृतीषि हृष्टः ( पु. ३ पा. ३३८ ), ' एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ' ( पु. १ पा. २७७ ), ' वरतनु संप्रवदन्ति कुक्कुटाः ' ( पु. १ पा. २३८ ) अशीं अनेक उदाहरणें आढळतात. ' एति जीवन्तमानन्दो ' हे श्लोकार्ध रामायणाच्या युद्धकाण्डांत ( स. १२६ श्लो. २ ) आलें असून त्याला तेथे लौकिकी गाथा म्हटलें आहे ( कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति मे । एति इ. ). असो.

येथवर केलेल्या संक्षिप्त विवेचनावरून एवढें लक्षांत येईल की, इ. स. पूर्वी निदान ५०० पासून १०० पर्यंतच्या काळांत धर्म, तत्त्वज्ञान इत्यादि विषयांहून भिन्न असे लौकिक वाङ्मय विदग्ध संस्कृतांत बऱ्याच मोठ्या प्रमाणावर सिद्ध झालेलें होतें. असें वाङ्मय चिकित्सक विद्वानांसमोर असल्यावर त्याचें कार्य, त्याचे उद्देश, त्याचा बरेवाईटपणा, त्याचें निरनिराळ्या प्रकारें वर्गीकरण, निरनिराळ्या वर्गांना युक्त असें रूप कोणतें असावें या विषयींचे नियम, इत्यादि विषयांवर त्यांच्यांत स्वैर चर्चा चालू होणें अगदीं स्वाभाविक होतें. अशा चर्चेतून काव्यमीमांसा व ग्रंथचिकित्सा या शास्त्राचीं मूलतत्त्वे स्थूलदृष्ट्या निर्माण होऊन कालान्तरानें त्यांची परिणति होत होत त्यांना सूक्ष्म व नियमबद्ध स्वरूप आलें, आणि त्यानंतर काव्यरचना आणि काव्यचिकित्साशास्त्राचा विकास या दोन्ही क्रिया जोडगोळीनें चालू झाल्या.

* ये तावदेते शोभनिका नामैते प्रत्यक्षं कंसं घातयान्ति प्रत्यक्षं च बलिं बन्धयन्तीति । महाभाष्य

# ३ काव्यचिकित्सेचें आदिस्वरूप

कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत शासनाधिकारांत ( अधिकरण २ ) शासन लिहितांना त्यांत कोणते गुण असावेत ते सांगून त्यांच्या व्याख्या दिल्या आहेत ‘ अर्थक्रमः संबन्धः परिपूर्णता, माधुर्यमौदार्य स्पष्टत्वमिति लेखसंपत् ’. यांतील माधुर्य, औदार्य व स्पष्टत्व यांच्या व्याख्या लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. ‘ सुखोपनीतचार्वर्थशब्दाभिधानं माधुर्यम् । अग्राम्यशब्दाभिधानमौदार्यम् । प्रतीत–शब्दप्रयोगः स्पष्टत्वमिति ’. नाटयशास्त्रांत दहा गुण ( १६. ९२ ) सांगितले आहेत. दण्डी व वामन ह्यांनीं तेच गुण सांगितले आहेत. मात्र दहाही गुण शब्दांचे व अर्थाचे म्हणून पृथक् वर्णिले आहेत. कौटिल्यार्थशास्त्रांत फक्त सहाच गुण सांगितले आहेत व त्यांची नांवेंही भरतादिकांच्या नांवाशीं सर्वस्वी जुळत नाहींत. तथापि वामनाच्या व्याख्या ‘ अग्राम्यत्वमुदारता ’ ( ३, २, १२ ), ‘ उक्तिवैचित्र्यं माधुर्य ’ ह्या कौटिल्याच्या व्याख्येशीं जुळतात. कौटिल्य ज्याला स्पष्टत्व म्हणतो तो गुण अर्थव्यक्ति ( वामनाचा ) असावा. ‘ ललितविस्तर ’ या बौद्ध ग्रंथांत ( डॉ. राजेंद्रलाल प्रत पान १७८ अध्याय १२ ) बोधिसत्व ज्या शास्त्रांत प्रवीण झाला त्यांची एक लांबलचक याद आहे त्यांत ‘ काव्यव्याकरणे ग्रंथरचिते रूपकर्माणि वीणायां वाद्यनृत्ये गीतपठिते आख्याने हास्ये लास्ये नाटये विडम्बिते ’ असे शब्द आहेत पण अलंकारशास्त्राचा उल्लेख नाहीं.

इ. स. दुसऱ्या शतकांतील व त्यानंतरच्या प्राचीन लेखांवरून असे सिद्ध होते कीं, त्या काळापूर्वी काव्यमीमांसाशास्त्राला पद्धतशीर स्वरूप आलेले होते. साहित्यशास्त्राच्या वाढीसंबंधाने इं. ॲंटि सन १९१२ ( पा. १२४ इ. व २०४ ) यांतील लेखांत आम्हीं सविस्तर चर्चा केली असून, डॉ. बुल्हरनें त्या विषयावरील साहित्याची प्राचीन लेखांतून केलेली जमवाजमव इं. ॲ. १९१३ तील ( पा. २९,१३७,१७२,१८८,२३०,२४२ ) लेखांत भाषान्तर रूपानें प्रो. घाटे यांनीं दिली आहे. इ. स. १५० या वर्षीचा जुनागड येथील रुद्रदाम याचा कोरींव लेख या विषयीं महत्वाचा आहे. त्यावरून त्याकाळीं काव्य-चिकित्साशास्त्र कोणत्या पदवीला आलें होतें या विषयीं चांगलीच माहिती मिळते. हा लेख एपिग्राफिआ इन्डिका ग्रंथांक ८ ( पा. ३६ ) मध्ये दिला आहे. त्यांतील उपलब्ध भागांत दोनच क्रियापदे असून सर्व लेख दीर्घसमासयुक्त

गद्यात्मक आहे व त्यांत अनुप्रास आणि इतर शब्दचित्रे यांचीं रेलचेल उडविलेली आहे. त्यांतील एक लहानसा भाग असा आहे.

‘ सर्वक्षत्राविष्कृत–वीरशब्दजातोत्सेकाविधेयानां यौधेयानां प्रसह्योत्सादकेन...शब्दार्थगान्धर्वन्यायाद्यानां विद्यानां महतीनां पारणधारणविज्ञानप्रयोगावाप्तविपुलकीर्तिना ... स्फुट–लघु–मधुर–चित्रकान्त–शब्द–समयोदारालंकृतगद्यपद्य...स्वयमधिगतमहाक्षत्रपनाम्ना नरेन्द्रकन्यास्वयंवरानेकमाल्यप्राप्तदाम्ना महाक्षत्रपेण रुद्रदाम्ना. ’

या उताऱ्यावरून असे दिसून येते की, इ. स. च्या दुसऱ्या शतकापूर्वी काव्याचे गद्य व पद्य असे मुख्य भेद पडले असून प्रसाद, माधुर्य, कान्ति, उदारता इत्यादि जे काव्यगुण पुढे काव्यादर्शादि ग्रंथांत प्रसिद्ध आहेत त्यांचे स्वरूप निश्चित होऊन तद्दर्शक स्फुट, मधुर, कान्त, उदार, इत्यादि शब्द रूढ झाले होते. गद्य आणि पद्य या दोन्ही प्रकारांना अलंकारांनी अधिक शोभा आणण्याची पद्धति पडली होती. या लेखाच्या लेखकाला तत्कालीन साहित्यग्रंथांत सांगितलेल्या लक्षणानुसार उत्तम कवीची पदवी प्राप्त करून घेण्याची उघड इच्छा असलेली दिसून येते व तीप्रमाणे त्यानें या लेखांत तत्कालीन कल्पनेला धरून काव्य म्हणजे कसे असावे हे उदाहरणाने प्रत्यक्ष दाखविण्याचा सामान्यतः प्रयत्न केलेला आहे. सिरि पुलुमायीचा नाशिक येथील प्राकृत लेख रुद्रदामन् याच्या लेखाहून थोडा जुना असून त्यांत सुद्धां अशीच लक्षणे दृष्टीस पडतात. मुंबई गॅझेटीअर पुस्तक १६ ( पा. ५५० ) मध्ये तो लेख उतरलेला आहे. तो समासांनीं भरलेला असून अनुप्रासाची जुळणी त्यांत अनेक ठिकाणीं केलेली आहे. या काळानंतरच्या म्हणजे ४ थ्या शतकांतील एका लेखांत हरिषेणकृत समुद्रगुप्तप्रशस्ति आली आहे ( फ्लीटचे गुप्तांचे लेख अंक १ पा. ८ ). समुद्रगुप्त हा गुप्तवंशांतील मोठा पराक्रमी राजा असून त्याच्या या प्रशस्तीचें गद्य बाणभट्टाच्या गद्यसरणीशीं स्पर्धा करणार आहे. त्याची कल्पना पुढील उताऱ्यावरून थोडी तरी करितां येईल.

‘ कृपणदीनानाथातुरजनोद्धरणसमन्त्रदीक्षाद्युपगतमनसः समिद्धस्य विग्रहवतो लोकानुग्रहस्य धनदवरुणेन्द्रान्तकसमस्य स्वभुजबलविजितानेकनरपतिविभवप्रत्यर्पणनित्यव्यापृतायुक्तपुरुषस्य निशितविदग्धमतिगांधर्वललितैर्व्रीडितत्रिदशपतिगुरुतुम्बरु-

नारदादेर्विद्वज्जनोपजीव्यानेककाव्यक्रियाभिः प्रतिष्ठितकविराजशब्दस्य ' इ.

या लेखांतील वर्णनावरून असे दिसून येते की समुद्रगुप्तानें अनेक काव्यें रचिली असून त्यांवरून विद्वानांना सुद्धां काव्यस्फूर्ति होत असे व त्यामुळें त्याला कविराज ही पदवी प्राप्त झाली होती. असो. या प्राचीन लेखांवरून एवढें सिद्ध होते की इ. स. दुसऱ्या किंवा चवथ्या शतकापूर्वी बराच काळ साहित्यशास्त्राची बरीच प्रगति झालेली होती. हीच गोष्ट दुसऱ्याहि प्राचीन प्रमाणांवरून दिसून येणारी आहे. निघण्टूमध्यें ( ३, १३ ) एका भागांत इदमिव, इदं यथा, तद्वत् इत्यादि ऋग्वेदांतील शब्दप्रयोगांचा संग्रह केलेला असून त्यांना **उपमाः** असे नांव दिलेलें आहे. निघण्टूच्या या भागावर टीका करितांना निरुक्तकार यास्कानें उपमेची शास्त्रीय व्याख्या दिली असून ती गार्ग्यनामक पूर्वग्रंथकारानें सांगितलेली आहे असें तो म्हणतोः ' अथात उपमा यदतत् तत्सदृशमिति गार्ग्यः । तदासां कर्म ज्यायसा वा गुणेन प्रख्याततमेन वा कनीयांसं वाऽप्रख्यातं वोपमिमीतेऽथापि कनीयसा ज्यायांसम्' ( ३. १३ ). गार्ग्याच्या उपमालक्षणाचे स्पष्टीकरण करतांना यास्कानें यांत म्हटले आहे की, अधिकगुणयुक्त किंवा अधिक प्रसिद्ध गोष्टीशी कमीगुणांनीं युक्त किंवा कमी प्रसिद्ध अशा गोष्टींची तुलना करण्याचा सामान्यतः प्रघात असला तरी ऋग्वेदांत कधी कधी त्याच्या उलट म्हणजे श्रेष्ठ वस्तूची कनिष्ठ वस्तूशी तुलना केलेलीहि आढळते. याचें उदाहरण म्हणून यास्काने ' तनूत्यजेव तस्करा वनर्गू रशनाभिर्दशभिरभ्यधीताम् ' । ( ऋ. १०. ४. ६ ) व ' कुह स्विद्दोषा कुह वस्तोरश्विना कुहाभिपित्वं करतः कुहोषतुः । को वां शयुत्रा विधवेव देवरं मर्यं न योषा कृणुते सधस्थ आ ॥ ' ( ऋ. १०. ४०.२ ) हे दोन मंत्र दिले आहेत. पहिल्यांत आततायी चोरांची बाहूंना उपमा दिली असून दुसऱ्यांत अश्विनांना विधवा भावजयीशी ( नियोग ) संबंध ठेवणाऱ्या दिराची उपमा दिली आहे. उपमेचे जे पुढें पूर्णा व लुप्ता असे भेद झाले त्यांचे मूळ ' लुप्तोपमान्यर्थोपमानीत्याचक्षते ' या यास्कवचनांत ( निरुक्त ३. १८ ) सांपडते. पूर्णोपमेला उपमान, उपमेय, ( उपमित ), सामान्यधर्म, व इव, तुल्य इत्यादि सादृश्यबोधक शब्द अशीं चार साधनें लागतात. या चारी साधनांचे वाचक शब्द संस्कृत भाषेत पाणि-

नीच्या पूर्वींच रूढ झालेले हात ही गोष्ट ' **उपमानानि** सामान्यवचनैः ', * ' **उपमितं** व्याघ्रादिभिः **सामान्या**प्रयोगे ' ( अष्टाध्यायी २. १. ५५–५६ ) आणि '**तुल्यार्थै**रतुलोपमाभ्यां तृतीयाऽन्यतरस्याम्' (२.३.७२), या सूत्रांवरून सिद्ध होते. शिलाली आणि कृशाश्व यांनी रचिलेल्या नटसूत्रांचा उल्लेख पाणिनीनें ' पाराशर्यशिलालिभ्यां भिक्षुनटसूत्रयोः ' व ' कर्मन्दकृशाश्वादिनिः ' ( ४, ३, ११०, व १११ ) या सूत्रांत केला आहे. या नटसूत्रांत काय प्रतिपादिलें होतें हें समजण्याला कांहीं मार्ग नाही, पण त्यांना सूत्र हे प्रतिष्ठित नांव ज्या अर्थी देण्यांत आले होतें, त्या अर्थी त्यांत नटाच्या कार्याविषयीं प्रतिपादन केलें असून नटानें श्रोत्यांच्या मनोवृत्ति कशा उद्दीपित कराव्या म्हणजे रसोत्पत्ति व रसपारिपोष कसा करावा याविषयीं विवेचन करून कांहीं स्थूल मानाच्या तरी सूचना दिलेल्या असल्या पाहिजेत हे उघड आहे. वेदान्तसूत्रांत उपमा व रूपक हीं दोन अलंकारनामें ' अत एव **चोपमा** सूर्यकादिवत् ' ( ३, २, १८ ) व ' आनुमानिकमप्येकेषां शरीररूपकविन्यस्तगृहीतेर्दर्शयति च ' ( १, ४, १ ) या सूत्रांत सांगितली आहेत. अश्वघोषाचे बुद्धचरित इ. स. ४२१ च्या पूर्वींच चिनी भाषेत रूपांतर पावले होते. अर्थात त्याची मूळ रचना इ. स. ३ ऱ्या शतकाहून अलीकडची असणं शक्य नाही. इतक्या प्राचीन काळी रचिलेल्या या काव्यांतहि पूवीच होऊन गेलेल्या साहित्यशास्त्रविषयक विकासाची गमकें आहेत. त्यांतील प्रतिसर्गाच्या अन्ताचे पद्य भिन्न वृत्तांत घातलेले असून त्यांत कर्त्यांची अनुप्रासाची आवड ( सर्ग १ पद्य १४, १५; सर्ग ५ प. २६ ) व ' हरितुरगतुरङ्गवत्तुरङ्गः ' ( ५-८७ ) अशी नादमय शब्दयोजना करण्याची हौस दिसून येते. **यथासंख्य** हा अलंकारहि अश्वघोषाला फार प्रिय होता ( उदा. ५,४२;९,१६ इ. ). बुद्धचरितांतील ' **भावज्ञानेन हावेन** चातुर्याद्रूपसंपदा । ' इत्यादि श्लोकांत ( ४,४२ ) हाव व भाव यांचा उल्लेख असूत त्यांचें विवेचन नाटयशास्त्राच्या विसाव्या अध्यायांत ८-१० या श्लोकांत केलेलें आहे. पहिल्या भागांत नाटयशास्त्राचे वर्णन करतांना तो मूळ ग्रंथ इ स. ३०० च्या अलीक-

---

* या सूत्रावरील महाभाष्यांत ' यत्र ' किंचित्सामान्यं कश्चिच्च विशेषस्तत्रोपमानोपमेये भवतः ' असे सूचक वाक्य आहे ( कीलहॉर्न प्रत व्हा. १. पान ३९७ ).

डचा असणें शक्य नाहीं असे दाखविलें आहेच. त्यांत रसोपपत्तींच साग्र विवेचन करून नाटकाची सर्वांगीण माहितीं दिली आहे व चार अलंकार आणि गुण यांचें वर्णन केलेले आहे. कालिदासाच्या रघुवंशांत ९ व्या सर्गात उत्तम यमक साधिलें आहे. सुकुमार अनुप्रासाची तर कालिदासाचें काव्यांत रेलचेल आहे. सुबन्धु कवीच्या वासवदत्तानामक कथेंत अनेक स्थली साहित्यशास्त्रांतलि विषयांचा उल्लेख केलेला आढळतो. 'प्रत्यक्षर–श्लेषमय–प्रबंध–विन्यास–वैदग्ध्य-निधिर्निबन्धम्' असें म्हणून आपल्याला प्रतिअक्षरावर श्लेष करतां येतो अशी प्रौढी सुबन्धूनें मारली असून, वक्रोक्ति, काव्याचा आत्मा (काव्यजीव), तु हि या अव्ययांना टाळून केलेली उत्तम कवीची काव्यरचना, तशीच लांबलचक प्रकरणे (उच्छ्वास) घालून व वक्त्रवृत्ताची योजना करून केलेलीं काव्यें यांचे उल्लेख त्यानें केले आहेत.* या शिवाय शृङ्खलाबन्ध, उत्प्रेक्षा व आक्षेप या अलंकारांचाहि त्याने निर्देश केला आहे [पा. १४६]. बाणभट्टाच्या ग्रंथांत अक्षरच्युतक, मात्राच्युतक, बिन्दुमती, प्रहेलिका, इत्यादि शब्दकूटांचा उल्लेख केलेला असून, कथा व आख्यायिका यांमधील भेद दाखविला आहे (**उच्छ्वासा**न्तेप्यखिन्नास्ते येषां **वक्त्रे** सरस्वती। कथ**माख्यायिका**-कारा न ते वन्द्याः कवीश्वराः ॥ (ह. च. श्लोक १०) व श्लेष, उत्प्रेक्षा, उपमा, दीपक, जाति हे अलंकार सांगितले आहेत. × बाणानें शूद्रक राजाला 'आगमः काव्यामृतरसानाम्' म्हणजे काव्यरूप अमृतरसाचा झरा असें म्हणून त्याची स्तुति केली आहे (कादम्बरी प्रारंभ). इवल्लीच्या इ. स. ६३४ च्या शिलालेखांत ज्याची स्तुति केली आहे त्या भारवीने किरातार्जुनीयांत अनेक चित्रबंध गुंफिले आहेत. इ, स. ७५० च्या पूर्वीं खात्रीनें झालेल्या माघानें साहित्यशास्त्राचें ज्ञान अनेक ठिकाणी प्रकट केलें आहे. सर्ग १९. ४१ (विषमं सर्वतोभद्रचक्रगोमूत्रिका-

---

* 'अग्रहेणापि **काव्यजीव**ज्ञेन' (पा. १२९); 'सत्कविकाव्यबंध इवानवबद्ध**तुहि**निपातः' (पा. १५८); '**दीर्घोच्छ्वास**रचनाकुलं सुश्लेष**वक्त्र**-घटनापटु सत्काव्यविरचनमिव' (पा. २३८, श्रीरंग प्रत)

× हरंति कं नोज्ज्वल**दीपकोपमै**र्नवैः पदार्थैरुपपादिताः **कथाः**। कादम्बरी प्रस्तावना श्लोक ९; **श्लेष**प्रायमुदीच्येषु प्रतीच्येष्वर्थमात्रकम्। **उत्प्रेक्षा** दाक्षिणात्येषु गौडेष्वक्षरडम्बरः ॥ हर्षचरित प्रस्तावनाश्लोक १०

दिभिः । श्लोकैरिव महाकाव्यं व्यूहैस्तदभवद्बलम् ) यांत महाकाव्यांत सर्वतोभद्र, चक्रबन्ध, गोमूत्रिका इत्यादि असतात असे त्यानें सांगितले आहे. त्याचप्रमाणें २, ८५ येथें [ ओजः प्रसादो वा रसभावविदः कवेः ] यांत ओजः व प्रसाद या गुणांचा रसांशी संबन्ध आहे हेंहि दाखविले आहे. तात्पर्य इ. स. ६०० च्या सुमारास साहित्यशास्त्रांतील अनेक अलंकारांची लक्षणें निश्चित झाली होतीं, कवींना मार्गदर्शक अशा सूचना पद्धतशीर ग्रथित झाल्या होत्या, व कथा, आख्यायिका इत्यादि प्रकारच्या विविध प्रबंधांतील भेदाविष्करण झालेले होते, असे येथवर केलेल्या विवेचनावरून दिसून येईल. बाणाच्या काळाच्या आसपास भामह, दंडी इत्यादि आलंकारिकांचे अलंकारशास्त्र ग्रंथ प्रसिद्ध झाले होते हे प्रथम भागांत दाखविले आहेच.

## ४ शास्त्राचें नामकरण.

या विषयावरील पहिले पहिले जे ग्रथ आहेत त्यांना सामान्यतः **काव्यालंकार** असे नांव दिलेले आढळते; उदाहरण भामह, वामन आणि रुद्रट यांचे ग्रंथ. ग्रंथाला नाव द्यावयाचे ते 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' या न्यायाने देतात. अर्थात काव्यालंकार हे नांव त्या ग्रंथांत अलंकारांना जे महत्त्व दिलेले आहे त्याला अनुसरूनच असले पाहिजे. अलंकार शब्दाचे दोन अर्थ काव्यालंकारसूत्रांत वामनाने दिले आहेत. सौदर्ययुक्त वस्तु ( अलंकृतिरलंकारः ) व शब्दार्थाचीं उपमादि भूषणे ( करणव्युत्पत्त्या पुनरलंकारशब्दोऽयमुपमादिषु वर्तते। १. १ २ ). वामनाच्या मताप्रमाणे काव्यचिकित्साशास्त्रावरील ग्रंथाला काव्यालंकार नांव देण्यांत येते ते काव्याला ग्राह्यत्व देणारें सौदर्य दृष्टोत्पत्तीस येऊन त्याचें स्पष्टीकरण होते म्हणून होय ( काव्यं ग्राह्यमलंकारात् । सौन्दर्यमलंकारः । १. १. १–२ ). या विषयीं कामधेनुकार म्हणतो 'योऽयमलङ्कारः काव्यग्रहणहेतुत्वेन उपन्यस्यते तद्व्युत्पादकत्वाच्छास्त्रमपि अलङ्कारनाम्ना व्यपदिश्यते इति शास्त्रस्यालंकारत्वेन प्रसिद्धिः प्रतिष्ठिता स्यादिति सूत्रयितुमयं विन्यासः कृतः काव्यं ग्राह्यमलंकारादिति'–म्हणजे काव्याला आदरणीय करणारा असा जो अलंकार म्हणून सांगितला त्या अलंकाराचे विवेचन करणारें शास्त्रहि अलंकार या नांवाने प्रसिद्ध झालें हें दाखविण्याठीं 'काव्यं ग्राह्यमलंकारात्' असें म्हटलें आहे; पण हें विवेचन अर्थातच केवळ पांडित्यप्रदर्शकच दिसतें. कारण साहित्य-

शास्त्रावरील ज्या प्राचीन ग्रंथांना अलंकार असें नांव दिलेलें नाहीं, त्यांतहि अलंकारांचेंच प्राधान्य दिसून येतें. उदाहरण, दंडीच्या काव्यादर्श या ग्रंथाचा तीन चतुर्थांश तरी शब्दालंकार आणि अर्थालंकार यांच्या विवेचनानेंच व्यापिलेला आहे. काव्यचिकित्साशास्त्राला दुसरें नांव **साहित्य** असें आहे. प्राचीन ग्रंथांत साहित्य शब्दाचा अर्थ तीन प्रकारें दिलेला आहे. पण अलीकडील वाङ्मयांत मात्र सामान्यतः साहित्य म्हणजे काव्यचिकित्साशास्त्र असे मानिलेलें आहे. ' साहित्यसंगीतकलाविहीनः ' इत्यादि श्लोकांत साहित्य म्हणजे प्रत्यक्ष काव्यच होय असे दिसतें. ' साहित्यपाथोनिधिमन्थनोत्थं कर्णामृतं रक्षत हे कवीन्द्राः ' या बिल्हणाच्या विक्रमांकदेवचरितांतील श्लोकांत ( १-११ ) साहित्य शब्दावरून सामान्य वाङ्मय असा बोध होतो असे दिसून येईल. कारण त्यांत काव्याला साहित्य सागरांतून निघालेलें अमृत म्हटले आहे. म्हणजे काव्य साहित्याचे सार होय असा कवीचा आशय दिसतो. भट्टोद्भटाचा टीकाकार प्रतीहारेन्दुराज यानें आपला गुरु जो मुकुलभट्ट त्याचे माहात्म्य सांगतांना त्याला ' साहित्यश्रीमुरारिः ' असें म्हणून त्याचें मीमांसादि शास्त्रांतील नैपुण्य दाखविलें आहे. त्यांत साहित्य शब्दाचा अर्थ काव्यचिकित्साशास्त्र म्हणजे साहित्यशास्त्र असा घेतला पाहिजे. कारण ' साहित्यश्रीमुरारेः ' याच्यापूर्वीं ' मीमांसासारमेघात्, पदजलधिविभोः, तर्कमाणिक्यचन्द्रात् ' अशीं विशेषणे आली आहेत व त्यांतील मीमांसा, पद, तर्क, हे शब्द शास्त्रबोधक असल्यामुळे **साहित्य** शब्दहि शास्त्रदर्शकच समजला पाहिजे. अभिधावृत्तिमातृकेवरील टीकेंत मुकुलानें स्वतः साहित्यशब्दाचा साहित्यशास्त्र या अर्थींच प्रयोग केला आहे. ' पदवाक्यप्रमाणेषु तदेतत्प्रतिबिम्बितम् । यो योजयति **साहित्ये** तस्य वाणी प्रसीदति । ' या कारिकेच्या स्पष्टीकरणांत तो म्हणतो ' व्याकरण–मीमांसातर्क–साहित्यात्मकेषु चतुर्षु शास्त्रेषूपयोगात् । '. राजशेखरानें काव्यमीमांसेंत साहित्याला पांचवी विद्या म्हणून शास्त्रत्वच दिले आहे. ' पञ्चमी साहित्यविद्येति यायावरीयः । सा चतसृणामपि विद्यानां निष्यन्दः । ' असें तो म्हणतो ( काव्यमी. पा. ४ ). ' विना न साहित्यविदाऽपरत्र गुणः कथंचित्प्रथते कवीनाम् ' म्हणजे साहित्यविद्येशिवाय कवींच्या गुणाची प्रसिद्धि होत नाही असें श्रीकंठचरितांत ( २. १२ ) मङ्खकानें म्हटलें आहे. या उताऱ्यांवरून असे दिसून येईल कीं राजशेखराच्या काळाच्या सुमारास तरी म्हणजे इ. स. ९०० च्या पूर्वीं कांहीं काळ साहित्यशब्दाला काव्यमीमांसा-

शास्त्र असा अर्थ प्राप्त झालेला होता. आणखी किती काळापूर्वी हा अर्थ रूढ झाला होता हें सांगणें अर्थातच कठीण आहे. साहित्य शब्द ' सहित ' म्हणजे ' समागमें ' या शब्दावरून साधिलेला दिसतो. ' शब्दार्थौ सहितौ काव्यं ' ( भामह ) अशी काव्याची व्याख्या झाल्यावर ती करणाऱ्या काव्याचिकित्सा-शास्त्राला साहित्य हे नांव सहजच मिळालें. राजशेखरानें साहित्य शब्दाची व्युत्पत्ति अशीच दिली आहे. तो म्हणतो ' शब्दार्थयोर्यथावत्सहभावेन विद्या साहित्य-विद्या' ( काव्यमीमांसा पा. ५ ). व्यक्तिविवेकावरील टीकेंतहि ( पा. ३६ ) ' न च काव्ये शास्त्रादिवदर्थप्रतीत्यर्थं शब्दमात्रं प्रयुज्यते सहितयोः शब्दार्थयोस्तत्र प्रयोगात् । साहित्यं तुल्यकक्षत्वेनान्यूनातिरिक्तत्त्वम् । ' असें म्हटलें आहे. शास्त्रां-मध्यें अर्थबोध व्हावा म्हणूनच शब्दयोजना केलेली असते. पण काव्यांत अर्था इतकेंच शब्दालाहि महत्त्व असतें व म्हणून त्याचें विवेचन करणारें शास्त्र ते साहित्यशास्त्र होय. भामहानें ' शब्दार्थौ सहितौ काव्यं ' असें काव्याचें लक्षण केलें आहे व त्याचाच अनुवाद ' शब्दार्थौ सहितौ वक्रकविव्यापारशालिनि । बन्धे व्यवस्थितौ काव्यं तद्विदाह्लादकारिणि ' अशा शब्दांनी वक्रोक्तिजीवितकारानें केला आहे. शिशुपालवधांत माघानें ' शब्दार्थौ सत्कविरिव द्वयं विद्वानपेक्षते ' ( २. ८६ ) असें म्हणून तोच आशय दर्शविला आहे.

या सर्व गोष्टींचा विचार करितां साहित्यशब्द काव्यविवेचनाचें शास्त्र या अर्थानें रूढ झाला तो निदान इ. स. सातव्या किंवा आठव्या शतकांत झाला असला पाहिजे असें बरेंच दृढ अनुमान होतें.

## ५ साहित्यशास्त्रांतील विषय.

या पुढील प्रश्न म्हणजे काव्यमीमांसाशास्त्रांत कोणकोणत्या विषयांचे विवे-चन करितात हें पहावयाचें. पहिल्या भागांत साहित्य शास्त्रावरील ग्रंथांचें व ग्रंथ-कारांचें वर्णन करीत असतां प्रत्येक ग्रंथांत कोणकोणते विषय आले आहेत याचा विचार पृथक् पृथक् केला आहेच. आतां या ठिकाणी ते सर्व विषय एकत्र करून त्यांचा साहित्यशास्त्रदृष्टीनें परस्पर संबंध कसा आहे हें थोडक्यांत दाख-वावयाचें आहे. साहित्यशास्त्राचें पहिलें कार्य म्हणजे काव्याच्या योगानें वाचक आणि स्वतः कवि यांच्यावर काय परिणाम होतो व ते कां म्हणून करावयाचे हें सांगणें हें होय. थोडक्यांत सांगावयाचें तर या विषयाला ( १ ) काव्यप्रयो-

जन म्हणजे काव्याचा उद्देश सांगणे असें म्हणतात. हें सांगितल्यावर काव्योत्पत्तीसाठीं कवीच्या ठायीं कोणत्या गोष्टी अवश्य पाहिजेत याचा विचार येतो. या विषयाला ( २ ) काव्यहेतु म्हणजे काव्योत्पत्तीचीं कारणें असें म्हणतात. या नंतर काव्य म्हणजे काय हें सांगितलें पाहिजे. हा विषय ( ३ ) काव्यलक्षण होय. काव्याचें लक्षण करतांना शब्द आणि अर्थ यांचा संबंध येतो व काव्याचें काव्यत्व कशांत आहे हे सांगावें लागते. यासाठी ( ४ ) काव्यात्मा किंवा काव्यजीवित हा विषय उत्पन्न होतो. या विषयाच्या विवेचनांत विविध ग्रंथकारांत निकराचे मतभेद उत्पन्न झालेले असून त्यामुळें साहित्यग्रंथकारांत कित्येक पंथ किंवा संप्रदाय बनले आहेत. शब्द आणि अर्थ हे काव्याला अवश्य असल्यामुळे शब्दाच्या निरनिराळया शक्ति व त्यामुळें शब्द आणि अर्थ यांमध्यें दिसून येणारा निरनिराळा संबंध यांचा विचार करावा लागतो. या चर्चेत ( ५ ) अभिधा, लक्षणा व व्यंजना या तीन शब्दवृत्ति व त्यांचे पोटभेद आणि त्यांना अनुसरून होणारे वाच्य, लक्ष्य आणि व्यङ्गय असे अर्थांचे तीन प्रकार यांचा विचार हा विषय येतो. यानंतर काव्यमीमांसकाला काव्यें किती प्रकारचीं असतात हें निरनिराळ्या दृष्टींनीं सांगावें लागते. हा विषय ( ६ ) काव्यभेद होय. बाह्य स्वरूपाचाच केवळ विचार केला तर गद्य, पद्य व मिश्र असे त्याचे भेद होतील; अवश्य त्या काव्यगुणांच्या प्राधान्याचा किंवा गौणत्वाचा विचार करितां उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे काव्याचे भेद करावे लागतील; दुसऱ्या एका दृष्टीनें काव्य दृश्य व श्रव्य असें द्विविध होईल; किंवा कोणत्या भाषेंत काव्य रचिलें आहे हे पाहूं लागल्यास संस्कृत, प्राकृत, व मिश्र इत्यादि भेद पुढे येतील. यांपैकीं दृश्य व श्रव्य हे भेद आले की ( ७ ) नाट्यशास्त्राचा प्रचंड क्षेत्रविस्तार पुढें उभा रहातो. काव्यांत कित्येक गुण अवश्य असल्यामुळे ( ८ ) गुणविचार हाहि विषय या शास्त्रांत येतो. गुण हे कित्येकांच्या मते तीन, तर कित्येकांच्या मतें दहा आणि आणखी इतरांच्या मतं चोवीसहि आहेत. गुणांशीं निरनिराळ्या भाषाशैलींचा सबंध आल्यामुळें त्यांचा म्हणजे ( ९ ) रीतींचा विचार हा विषय येतो. काव्य गुणयुक्त पाहिजे, तसें ते निर्दोषहि पाहिजे. म्हणजे पद, वाक्य, अर्थ, रस इत्यादिकांत कोणत्या गोष्टींनीं हीनपणा येतो याची चर्चा केली पाहिजे. हा ( १० ) दोषविचार नांवाचा विषय होय. कित्येक साहित्यकार याच्याहि पुढें जाऊन कवींना कित्येक व्यावहारिक सूचना करितात व त्यांना

निरनिराळ्या विषयांचे ज्ञानहि देतात व त्यामुळें (११) कविसंकेत, (१२) शब्दशुद्धि, (१३) औचित्यविचार, (१४) कलासंग्रह, (१५) भौगोलिक माहिती, (१६) वृक्षादिवस्तुवर्णन इत्यादि विषयहि साहित्यशास्त्रांत कोणी कोणी आणिले आहेत.

साहित्यशास्त्रांत अन्तर्भूत होणारे जे हे अनेक विषय सांगितले त्या सर्वांचा विचार साहित्यशास्त्रावरील प्रत्येक ग्रंथांत केलेला आहे असें मात्र मुळीच नाहीं. या सर्व विषयांचा ऊहापोह करणारे ग्रंथ फारच थोडे आहेत. विषयविवेचनाच्या दृष्टीनें साहित्यग्रंथांचे कित्येक वर्ग होतात ते असे:—

(१) साहित्यदर्पण व प्रतापरुद्रयशोभूषण यांसारख्या थोड्याच ग्रंथांत नाट्यशास्त्रासुद्धां सर्व विषयांचा संग्रह केलेला आहे (२) नाट्यशास्त्र वगळून इतर वर सांगितलेल्या विषयांचे विवेचन मात्र बहुतेक प्रसिद्ध साहित्य ग्रंथांत आलें आहे. या वर्गात दंडिकृत काव्यादर्श, भामह, रुद्रट, वाग्भट यांचे काव्यालंकार, वामनाचें काव्यालंकारसूत्र, मम्मटप्रणीत काव्यप्रकाश, जगन्नाथपंडिताचा रसगंगाधर इत्यादि ग्रंथांचा अन्तर्भाव होतो. प्रस्तुत निबंधांत नाट्यशास्त्रावरील ग्रंथ सामान्यतः आम्ही वगळले आहेत व ज्यांत रसविचार आला आहे त्यांचा मात्र तेवढ्यापुरता निर्देश केला आहे. (३) नाट्यशास्त्र व दशरूप इत्यादि ग्रंथांत केवळ नाट्यशास्त्र व त्याच्या अनुषंगानें रसविचार हे विषय मात्र विवेचिले आहेत. (४) कांहीं ग्रंथांत केवळ अलंकारांचेच विवरण आढळतें. अलंकारसारसंग्रह, अलंकारसर्वस्व, कुवलयानंद, चित्रमीमांसा इत्यादि ग्रंथ या वर्गांत मोडतात. (५) कांहीं थोड्या ग्रंथांमध्यें साहित्यशास्त्रविषयक एखाद्या विशिष्ट मताचा पुरस्कार केलेला दिसून येतो. ध्वन्यालोक, वक्रोक्तिजीवित, व्यक्तिविवेक हे ग्रंथ अशा प्रकारचे होत. (६) कित्येक ग्रंथ केवळ अभिधादि शब्दशक्तींचा विचार करणारे असून अभिधावृत्तिमातृका, वृत्तिवार्तिक, शब्दव्यापारविचार इत्यादिकांचा या वर्गांत समावेश केला पाहिजे. (७) केवळ रसाचा विचार करणारे व नाट्यशास्त्राचाहि संबंध आपल्या विवेचनांत न आणणारे असे शृंगारतिलक, रसतरंगिणी प्रभृति थोडे ग्रंथ आहेत. (८) यांशिवाय नायक नायिका व त्यांचे भेदोपभेद असल्या अगदीं विशिष्ट गोष्टींचाच रसमंजरीसारख्या ग्रंथांत सविस्तर विचार केलेला आहे.

## ६ काव्यप्रयोजन.

काव्य ही ललितकलांपैकीं एक कला असून तिचा उद्देश मनाला प्रत्यक्ष आनंद देण्याचा आहे. संस्कृत साहित्यशास्त्रकारांनीं अगदी प्राचीन काळापासून हा काव्याचा उद्देश मान्य केलेला आहे. नाट्यकलेचा प्रचार भरतानें केला तो सर्व लोकांना आनंद देण्याचा उपाय म्हणून केला असें नाट्यशास्त्रांत सांगितलें आहे. ' **क्रीडनीय**कमिच्छामो दृश्यं श्रव्यं च यद्भवेत् । ' ( नाट्य. १. ११ ); ' वेदविद्येतिहासानामर्थानां परिकल्पनम् । **विनोद**करणं लोके नाट्यमेतद्भविष्यति ॥ ' ( नाट्य. १. ८६ ); ' तथापि **प्रीति**रेव प्रधानं...प्राधान्येना**नन्द** एवोक्तः ' ( लोचन पा. १२ ); ' **प्रीत्या**त्मा च रसस्तदेव नाट्यं नाट्य एव च वेद इत्यस्मदुपाध्यायः । ' ( लोचन पा. १४९ ); '**सकलप्रयोजनमौलिभूतं** समनन्तरमेव रसास्वादनसमुद्भूतं विगलितवेद्यान्तर**मानन्दं** ' ( काव्यप्र. १ ) इत्यादि प्रसिद्ध साहित्यकारांच्या वचनांवरून मनोविनोद हाच काव्याचा मुख्य उद्देश त्यांनी मानिला आहे हें दिसून येईल. आनंदाशिवाय दुसरेहि कित्येक काव्याचे उद्देश कित्येक साहित्यग्रंथांत सांगितले आहेत. त्यांतील :कांहीं कविप्राप्य असून दुसरे वाचकप्राप्य आहेत. काव्याच्या वाचकांना त्यापासून ( १ ) शांति प्राप्त होते, ( २ ) धर्म, नीति व अध्यात्मशास्त्र यांचे ज्ञान मिळते आणि ( ३ ) जगाची ओळख पटून कलानैपुण्य प्राप्त होतें. स्वतः कवीला सुद्धां काव्यरचनेच्या योगानें कीर्ति व धन हीं मिळतात. ' दुःखार्तानां समर्थानां शोकार्तानां तपस्विनाम् । विश्रांतिजननं काले नाट्यमेतन्मया कृतम् ॥ ' ( नाट्य. १. ८० ) असा प्रेक्षकांना नाट्यापासून होणारा लाभ नाट्यशास्त्रांत सांगितला आहे. 'धर्मार्थकाममोक्षेषु वैचक्षण्यं कलासु च । **प्रीतिं** करोति **कीर्तिं** च साधुकाव्यनिबन्धनम् ॥' असें भामहाचें ( १. २ ) म्हणणें असून त्याचा अनुवाद ' काव्यं सद्दृष्टादृष्टार्थं प्रीतिकीर्तिहेतुत्वात् ' असें म्हणून वामनानें ( १.१.५ ) केला आहे. काव्याच्या योगें कवीला कीर्तीचा व धनाचा लाभ तसा वाचकाला व्यवहारज्ञानाचा लाभ होऊन त्याचें पाप नष्ट होतें, त्याला परम सुखाची प्राप्ति होते व कसें वागावें आणि काय करावें याचा गोड रीतीनें उपदेश मिळतो, असें काव्यप्रकाशांत सांगितले आहे. मम्मट म्हणतो ' काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये । सद्यःपरनिर्वृतये कान्तासंमिततयोपदेशयुजे ॥' ( का. प्र. १ ला उल्लास ). रुद्रट म्हणतो '...ज्वलदुज्ज्वलवाक्प्रसरः सुरसं कुर्वन्महाकविः काव्यम् । स्फुट-

माकल्पमनल्पं प्रतनोति यशः परस्यापि । ' ( १. ४. ). द्रव्यप्राप्ति, संकट-निवारण, सुखलाभ, रोगमुक्ति, इष्टप्राप्ति, इत्यादि लाभहि कवीला काव्यापासून होतात असें रुद्रटानें सांगितलें आहे ( १, ८-१३, २१ ). श्रोत्याचे लाभ रुद्रटानें 'ननु काव्येन क्रियते सरसानामवगमश्चतुर्वर्गे । लघु मृदु च नीरसेभ्यस्ते हि त्र्यस्यन्ति शास्त्रेभ्यः ' ॥ असे सांगितले आहेत. रसिक श्रोत्यांना काव्याच्या योगानें चारी पुरुषार्थांची प्राप्ति सुलभपणे होते कारण धर्मादिशास्त्रें नीरस असल्यामुळें रसिकांना त्यांची भीति वाटते व त्यामुळें त्यांना पुरुषार्थाचा तो मार्ग बंद झाल्यासारखा असतो ( रुद्रट १२. १ ). या प्रमाणे धर्मादिकांचें ज्ञान हा काव्याचा उद्देश असला तरी ते ज्ञान त्यानें प्रत्यक्ष देतां कामा नये, तर अप्रत्यक्षपणें सूचनारूपानें ते दिलें पाहिजे व तेच काव्याचे कार्य होय. अनीतिमान् रावणाचा नाश झाला व नीतिमान् रामाचा जय झाला, रावणासारखें वागूं नये तर रामासारखें वागावें असे काव्य सुचवितें असे मम्मटानें म्हटलें आहे. ' कान्तेव सरसतापादनेनाभिमुखीकृत्य रामादिवद्वर्तितव्यं न रावणादिवदित्युपदेश...करोतीति ' ( उ. १ ). प्रतापरुद्रीयांत म्हटलें आहे, ' यथा वेदशास्त्रपुराणादेः हितप्राप्तिः अहितान्निवृत्तिश्च तथा तत्समात् काव्यादपि । इयान् विशेष. । काव्यात्कर्तव्यताधीः सरसा अन्यत्र न तथा ।' ( पा. ५. ). यांत शास्त्राहूनहि काव्याला वरची पदवी दिली आहे. वक्रोक्तिजीवितकार म्हणतो ' धर्मादिसाधनोपायः सुकुमारक्रमोदितः । काव्यबंधोऽभिजातानां हृदयाल्हादकारकः ॥ ' ( १. ४ ). अशा रीतीनें, काव्याच्या योगाने सदाचाराचें गोड शब्दांनी शिक्षण देऊन धर्मार्थकाममोक्ष या पुरुषार्थांची प्राप्ति करून देणे हा एक काव्याचा उद्देश सर्व साहित्यकारांनीं मान्य केलेला आहे.

## ७ काव्यहेतु

आतां काव्याची निर्मिति होण्यास कोणत्या गोष्टी अवश्य पाहिजेत हें पहावयाचें. बहुतेक संस्कृत साहित्यकारांनी प्रतिभा व्युत्पत्ति व अभ्यास या तीन गोष्टी काव्योत्पत्तीला अवश्य मानिल्या आहेत. व्युत्पत्ति म्हणजे व्याकरणादि शास्त्रांचें ज्ञान व अभ्यास म्हणजे काव्यरचनेचा नित्य व्यासंग. काव्यादर्शकार दंडी या संबंधानें म्हणतो 'नैसर्गिकी च **प्रतिभा श्रुतं च** बहु निर्मलम् । अमन्दश्चाभियोगोऽस्याः कारणं काव्यसंपदः ॥ ' ( १. १०३ ). भामहानें म्हटलें आहे, ' **काव्यं** तु जायते जातु कस्यचित्**प्रतिभावतः** ॥ ... शब्दाभिधेये विज्ञाय

कृत्वा तद्विदुपासनम् ॥ विलोक्यान्यनिबंधांश्च कार्य. काव्यक्रियादरः ॥' (१-५ व १-१०). 'त्रितयमिदं व्याप्रियते **शक्तिर्व्युत्पत्तिरभ्यासः।'** असें रुद्रटानें सांगितलें असून (१-१४), 'शक्तिर्निपुणता लोकशास्त्रकाव्याद्यवेक्षणात्। काव्यज्ञशिक्षयाभ्यास इति हेतुस्तदुद्भवे ॥' असे काव्यप्रकाशाचें म्हणणे आहे (१-३). एकावली, वाग्भटालंकार, अलंकारशेखर इत्यादिकांनीं असेंच प्रतिपादिले आहे. प्रतिभा, बहुशास्त्रदर्शिता व अभ्यास हे काव्यहेतु एकावलींत (१-१२) दिले असून, वाग्भटालंकारांत त्यांसंबंधानें 'प्रतिभा कारणं तस्य व्युत्पत्तिस्तु विभूषणम्। भृशोत्पत्तिकृदभ्यास इत्याद्यकविसंकथा' असे परंपरागत मत दिलें आहे (१-३). अलंकारशेखरांत 'तद्धेतुः प्रतिभादिकम्' असें म्हणून प्रतिभादिकांचे स्पष्टीकरण करतांना वर सांगितलेली इतरांची मतेहि एकत्र करून दिली आहेत (मरीचि ९. पा. १). पण काव्याचा खरा हेतु प्रतिभाच एकटी होय असे प्रतिपादणारा साहित्यकारांचा दुसरा वर्ग आहे. राजशेखर, अलंकारतिलककार वाग्भट, जगन्नाथपंडित इत्यादि ग्रंथकार या वर्गात मोडतात. 'सा (शक्ति) केवलं काव्ये हेतुरिति यायावरीयः' असें राजशेखराने म्हटले असून (पा. ११) 'प्रतिभैव कवीना काव्यकरणे कारणम्। व्युत्पत्त्यभ्यासौ तस्या एव संस्कारकारकौ न तु काव्यहेतू' असे वाग्भटाचें म्हणणें आहे (पा. २). रसगंगाधरांतहि 'तस्य च कारणं कविगता केवला प्रतिभा' असेंच म्हटले आहे (पा. ८). हे ग्रंथकार व्युत्पत्ति व अभ्यास यांना प्रतिभेचे सहायक असेंच मानितात. प्रतिभा ही एक मनोगत शक्ति असून तिच्यामुळ कवीला काव्यविषय रमणीयत्वाने ओतप्रोत भरलेला दिसतो आणि तेणकरून तो आपल्याला दृश्य झालेल्या त्या रमणीय विषयाचें वर्णन यथोचित शब्दांनीं करून तो विषय वाचकांपुढे किंवा श्रोत्यांपुढें जणूं काय प्रत्यक्ष उभा करितो. या शक्तिविशेषाच्या योगानें, वाचकाच्या अनुभवांचे सुप्त झालेले ठसे त्यांच्या हृदयांत कवि पुनः जागृत तर करितोच, पण त्याशिवाय सामान्य माणसाच्या अनुभवाला पूर्वीं कधींहि न आलेले किंबहुना त्याच्या मनालाही कधीं न शिवलेले असे नित्य नवीन भासणोर अद्भुत आणि रम्य प्रसंग व वस्तुसंयोग तो त्यांच्या मनश्चक्षूंपुढे उभे करितो. कवि म्हणजे एक प्रकारचा अतींद्रिय द्रष्टा होय. तो आपल्या अद्भुत दृष्टीने स्वतः तर अदृष्टपूर्व अद्भुत व रम्य गोष्टी पहातोच, पण आपण पाहिलेल्या व अनुभविलेल्या त्या रमणीय गोष्टींचें यथार्थ वर्णन शब्दांच्या

द्वारा करून इतर कमी भाग्यवान् जीवांनाहि तो त्या रमणीय अनुभवाचे वांटेकरी करितो. असे या प्रतिभानामक कविशक्तीचें लक्षण साहित्यकारांनी केलेलें आहे. भट्टतौतानें '**प्रज्ञा** नवनवोन्मेषशालिनी **प्रतिभा** मता। तदनुप्राणनाजीवद्-वर्णनानिपुणः कविः' असें काव्यकौतुकांत म्हटलें आहे. 'अपारे काव्यसंसारे कविरेव प्रजापतिः। यथास्मै रोचते विश्वं तथेदं परिवर्तते' असे ध्वन्यालोक-काराचें म्हणणे असून (पा. २२२) लोचनकार अभिनवगुप्त म्हणतो '**प्रतिभा** अपूर्ववस्तुनिर्माणक्षमा **प्रज्ञा**' (पान २९), 'शक्तिः प्रतिभानं वर्णनीय-वस्तुविषयनूतनोल्लेखशालित्वम्' (पा. १३७). 'प्रसन्नपदनव्यार्थयुक्त्यु-द्बोधविधायिनी। स्फुरन्ती सत्कवेर्बुद्धिः प्रतिभा सर्वतोमुखी॥' असे वाग्भटा-लंकारांत प्रतिभेचें लक्षण केलें आहे. काव्यालंकारसूत्रकार वामन 'कवित्वबीजं प्रतिभानम्' असें प्रतिभेचे लक्षण करून 'कवित्वबीजं जन्मान्त-रागतसंस्कारविशेषः कश्चित्। यस्माद्विना काव्यं न निष्पद्यते, निष्पन्नं वाव-हासायतनं स्यात्' असे त्याचे वृत्तीत स्पष्टीकरण करितो (१-३-१६)–प्रतिभा-म्हणजे पूर्वजन्मीचा विशिष्ट संस्कार; हा संस्कार नसेल तर त केवळ हास्यास्पद होईल. रुद्रटानें याचाच अनुवाद करून 'मनसि सदा सुसमाधिनि विस्फुरणमने-कधाभिधेयस्य। अक्लिष्टानि पदानि च विभान्ति यस्यामसौ शक्तिः॥ प्रतिभेत्यपरै-रुदिता' असें प्रतिभाशक्तीचें लक्षण केलें आहे. मन स्थिर ठेऊन वर्ण्य विष-याचें अनेक प्रकारें सुलभ शब्दांनीं वर्णन जीमुळे करितां येतें ती प्रतिभा शक्ति होय. रुद्रटाच्या मतें ही प्रतिभा स्वाभाविक असेल किंवा परिश्रमानें प्राप्त करून घेतलेली असेल; पण त्यांतील स्वाभाविक प्रतिभा ही अर्थात् श्रेष्ठ होय (रुद्रट १, १५-१६). ध्वन्यालोकांत 'अतहट्ठिए वि तहसंठिएव्व हिअ-अम्मि जा णिवेसेइ। अत्थविसेसे सा जअइ विकडकविगोअरा वाणी॥' * (पा. २२६) असे प्राकृत पद्य उद्धृत केलें असून त्यांत 'अपारे काव्यसंसारे' इत्यादि ध्वन्यालोकांतील मताचाच अनुवाद आहे. अलौकिक सौंदर्ययुक्त गोष्टीचा साक्षात्कार करून घेण्याची व त्या साक्षात्काराची कल्पना इतरांना यथार्थ शब्दांनीं आणून द्यावयाची अशी जी दुहेरी कविप्रतिभा तिचा भट्टतौतानेंहि उल्लेख केला असल्याचें पूर्वीं दाखविलेंच आहे.

---

* अतथास्थितानपि तथास्थितानिव हृदये या निवेशयति।
अर्थविशेषान्सा जयति विकटकविगोचरा वाणी॥

दुसरा काव्यहेतु म्हणजे व्युत्पत्ति या संबंधानें फारसें सांगावयास नकोच. अनेक शास्त्रांचे परिशीलन म्हणजे व्युत्पत्ति. कवीला अमुक विषय म्हणजे वर्णनातीत आहे असें नाहीं; अर्थात् काव्यरचना करून आपल्या बांधवांच्या व पुढील पिढयांतील लोकांच्या मनाला आकर्षू पहाणाऱ्या कवीला एका विशिष्ट मर्यादेपर्यंत तरी शास्त्रज्ञान अवश्य आहे हे सांगावयास नकोच. नाटकांत कोणकोणत्या विषयांचा अन्तर्भाव होऊं शकेल हें सांगतानां नाटयशास्त्रकार म्हणतो ' न तज्ज्ञानं न तच्छिल्पं न सा विद्या न सा कला। न तत्कर्म न वा योगो नाटके यन्न दृश्यते ॥' ( १९-११७ ). म्हणजे अमुक एक विषय नाटकांत येणार नाहीं असें नाही. अर्थात् जितक्या अधिक विषयांचे ज्ञान असेल तितकी व्युत्पत्ति अधिक व त्या मानाने काव्यकर्तृत्वाची पात्रताहि अधिक. रुद्रट या संबधानें म्हणतो 'छंदोव्याकरण–कला–लोकस्थितिपदपदार्थविज्ञानात् । युक्तायुक्तविवेको **व्युत्पत्ति**रियं समासेन। ' ( १-१८ ). वाग्भटालंकारांतहि व्युत्पत्तीची व्याख्या अशीच केली आहे. वाग्भट म्हणतो ' शब्द–धर्मार्थकामादिशास्त्रेष्वाम्नायपूर्विका। प्रतिपात्तिरसामान्या व्युत्पत्तिरभिधीयते ॥ ' ( १-५ ). व्याकरण, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, कामशास्त्र, छंदःशास्त्र, अलंकारशास्त्र, शब्दकोश, गजपरीक्षा, अश्वपरीक्षा, रत्नपरीक्षा, न्यायवैशेषिकादि दर्शन इत्यादिकांचें गुरपरंपरेनें अध्ययन करून त्यांचे उत्तम ज्ञान करून घेणे म्हणजे व्युत्पत्ति होय. काव्यहेतु या विषयासंबंधाने विशेष विवेचन ' संस्कृत कवि कसा होत असे ' या विषयावर डॉ. टॉमस, लंडन येथील इंडिया आफिस मधील पुस्तकालयाचे अधिकारी, यांचा डॉ. भांडारकर स्मृतिग्रंथांत लेख आला आहे त्यांत पहावयास मिळेल. (पा. ३७५).

## ८ काव्यलक्षण

काव्याच्या व्याख्येच्या विषयावर साहित्य शास्त्रकारांत पुष्कळच भिन्न मतें दिसून येत असून निरनिराळ्या ग्रंथकारांनी काव्याच्या निरनिराळ्या व्याख्या दिल्या आहेत. काव्याचे काव्यत्व कशांत आहे या विषयीं जसें ग्रंथकाराचें मत असेल, तसं त्यानें काव्याचें लक्षण केलें आहे. कित्येक ग्रंथकारांनीं केलेलीं काव्यलक्षणें ही लक्षणें नसून केवळ वर्णनेंच आहेत. पहिल्या पहिल्या साहित्यग्रंथकारांनीं काव्यलक्षण करतांना शब्द व अर्थ यांना समान महत्त्व दिलें आहे. कित्येकांच्या काव्याच्या व्याख्या आकलन होण्यास काव्यापेक्षांहि कठीण आहेत. उदाहरणार्थ,

' वाक्यं रसात्मकं काव्यम् ' ही साहित्यदर्पणाची व्याख्या पहा. व्याख्या न करतांहि काव्य म्हणजे काय हे सामान्यतः समजतें. पण ' रसात्मक वाक्य ' म्हणजे काय हें समजणे कठीण आहे. या तीन वर्गांतील पहिल्या वर्गांत भामह, रुद्रट, वक्रोक्तिजीवित, मम्मट, प्रतापरुद्रयशोभूषणकार, काव्यानुशासनकार वाग्भट, हेमचंद्र, वामन इत्यादि ग्रंथकारांच्या व्याख्या येतात. त्यांनी शब्द आणि अर्थ यांचें महत्त्व समान मानिले आहे. भामहाची व्याख्या ' शब्दार्थौ सहितौ काव्यं ' ( १. १६ ) अशी आहे. त्याच्या मतें काव्याला काव्यत्व यावयास तें निर्दोष व अलंकारयुक्तहि असावें ( १. ११-१३ ). ' ननु शब्दार्थौ काव्यं ' इ० ( ३. ९ ) रुद्रटकृत व्याख्या पूर्वी दिलीच आहे. वक्रोक्तिजीवितकाराचें ' शब्दार्थौ सहितौ वक्रकविव्यापारशालिनि ' । इत्यादि काव्यलक्षणहि पूर्वी दिलें आहे. 'तददोषौ शब्दार्थौ सगुणावनलंकृती पुनः क्वापि ' अशी मम्मटाची व्याख्या असून ' गुणालंकारसहितौ शब्दार्थौ दोषवर्जितौ । गद्यपद्योभयमयं काव्यं काव्यविदो विदुः ॥'' ( २ १ ) अशी प्रतापरुद्रयशोभूषणाची व्याख्या आहे. ' शब्दार्थौ निर्दोषौ सगुणौ सालंकारौ काव्यम् ' अशी काव्यानुशासनाची [ पा. १४ ] व ' अदोषौ सगुणौ सालंकारौ च शब्दार्थौ काव्यम् ' अशी हेमचंद्राची ( पा. १६ ) व्याख्या असून वामनाने ' काव्यशब्दोऽयं गुणालंकारसंस्कृतयोः शब्दार्थयोर्वर्तते । भक्त्या तु शब्दार्थमात्रवचनोऽत्र गृह्यते । ' असें म्हटले आहे. काव्यलक्षणांत शब्दावरच विशेष भर देणारे साहित्यकार दंडी , अग्निपुराणकार, चंद्रालोककार, रसगंगाधरकार जगन्नाथपंडित इत्यादि होत. काव्यादर्शाचे काव्यलक्षण ' तैः शरीरं च काव्यानामलंकाराश्च दर्शिता. । शरीरं तावदिष्टार्थव्यवच्छिन्ना पदावली ॥ ' ( १. १० ) असें असून अग्निपुराणांत ( ३३६,६-७ ) तसेच शब्द आहेत ' इष्टार्थव्यवच्छिन्ना पदावली। काव्यं स्फुटदलंकारं गुणवद्दोषवर्जितम् ॥'. ' रमणीयार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम् ' अशी जगन्नाथपण्डितांची व्याख्या आहे ( पा. ४ ). चंद्रालोकांत ती ' निर्दोषा लक्षणवती सरीतिर्गुणभूषिता । सालंकाररसानेकवृत्तिर्वाक् काव्यनामभाक् । ' ( १,७ ) अशी केली आहे. या दुसऱ्या वर्गांतील काव्यलक्षणांत काव्याच्या एका विशेष अंगावर भर दिला आहे; ते असें की काव्यांत चालू भाषेंतील शब्दांचाच विनियोग करण्यांत येत असला, तरी त्यांची निवड नित्यव्यवहाराच्या भाषेहून निराळ्या प्रकारची असते आणि भाषासरणि सौंदर्याच्या

दृष्टीनें योजिलेली असते. पण आतांपर्यंत सांगितलेलीं हीं दोन्हीं काव्यलक्षणें एका अर्थीं अव्याप्तिदोषानें युक्त आहेत. दंडीनें म्हटल्याप्रमाणें शब्द हेच जर काव्याचे शरीर असेल, तर तेंच रूपक चालू ठेवून काव्याचा आत्मा काय असा प्रश्न सहजच विचारितां येईल. हा प्रश्न महत्वाचा असून त्याचीं उत्तरें निरनिराळया ग्रंथकारांनीं निरनिराळी दिलेलीं असून त्यामुळे साहित्यशास्त्रांत कित्येक संप्रदाय उत्पन्न झाले आहेत. नाट्यशास्त्रकार भरत याचा संप्रदाय म्हणजे रस-संप्रदाय असून त्यांत रस हा काव्याचा आत्मा होय असें ठरविलें आहे. ध्वन्यालोककार आनंदवर्धनाचा संप्रदाय ध्वनिसंप्रदाय या नांवानें प्रचलित असून त्यांत रसकल्पनेचा विस्तार केला आहे आणि व्यङ्गयार्थ आत्मा आहे असे ठरविलें आहे. रस आणि ध्वनि या जोड संप्रदायांच्या ग्रंथांत काव्याची व्याख्या स्वतःला अनुरूप अशीच केलेली असते. उदाहरण, शौद्धोदनीने अलंकारशेखरांत 'काव्यं रसादिमत् वाक्यं श्रुतं सुखविशेषकृत्'। (पा. २) असे काव्यलक्षण केलें असून साहित्यदर्पणांत 'वाक्यं रसात्मकं काव्यम्' व सरस्वतीकंठाभरणांत 'निर्दोषं गुणवत्काव्यमलंकारैरलंकृतम्। रसात्मकं कविः कुर्वन् कीर्तिं प्रीतिं च विन्दति॥' असें ते केलें आहे. हीं लक्षणें सुद्धां निर्दोष नाहीत व त्यांच्यावर इतर साहित्यग्रंथकारांनी मोठे आक्षेप काढिलेले आहेत; पण विस्तारभयास्तव त्यांचा परामर्श येथे विस्तारानें घेतां येत नाही. रस व व्यंग्यार्थ यांतच जर सारें काव्यत्व असेल तर ज्यांत ते नाही अशा मनोहरशब्दरचना-पूर्वक केलेल्या वर्णनाला काव्य म्हणतां येणार नाहीं पण सरळ सुंदर वर्णन किंवा अलंकारयुक्त वर्णन यांत रस किंवा व्यंग्यार्थ नसतांही त्याला आपण काव्य म्हणतोंच; उदाहरण, जलप्रवाहाचे वर्णन, वानर मुलें इत्यादिकांच्या स्वैर क्रीडेचे वर्णन यांत रस नसतांहि त्याला काव्य ही संज्ञा लावण्यांत येते, अशी जगन्नाथपंडिताचीं विचारसरणि आहे. *

साहित्यशास्त्राच्या विवेचनांत रस, ध्वनि, गुण अलंकार, रीति हे शब्द नित्य

---

* यत्तु रसवदेव काव्यमिति साहित्यदर्पणे निर्णीतं तन्न। वस्त्वलंकारप्रधानानां काव्यानामकाव्यत्वापत्तेः। न चेष्टापत्तिः। महाकविसंप्रदायस्याकुलीभावप्रसंगात्। तथा च जलप्रवाहवेगनिपतनोत्पतनभ्रमणानि कविभिर्वर्णितानि कपिबालादिविलसितानि च। (र. गं. पा. ७-८)

येणारे असल्यामुळें त्यांचा अर्थ काय, व त्यांचा परस्पर संबंध कसा लागतो हें पाहण्यासाठीं या शास्त्रांत जे विविध संप्रदाय झालेले आहेत त्यांचें परिगणन करून त्यांच्या सिद्धांतांचा थोडक्यांत निर्देश करणें इष्ट व अवश्य आहे. हे मुख्य संप्रदाय कालानुक्रमानें घेतल्यास ( १ ) रससंप्रदाय, ( २ ) अलंकारसंप्रदाय, ( ३ ) रीतिसंप्रदाय, ( ४ ) ध्वनिसंप्रदाय, व ( ५ ) वक्रोक्तिसंप्रदाय असे लाविले पाहिजेत. ध्वन्यालोकांत ( पा. ४-११ ) तीन विरोधी संप्रदायांचा उल्लेख केलेला आहे. × एक ध्वनीचें मुळीं अस्तित्वच न मानणारा; दुसरा ध्वनीचा अन्तर्भाव भक्ति किंवा लक्षणा या शब्दवृत्तींत करणारा व तिसरा ध्वनि हा लक्षणातीत असून केवळ रसिकांना मनानेच जाणतां येण्यासारखा असल्यामुळे त्याची शास्त्रीयदृष्टीनें चर्चा करितांच येत नाहीं असे म्हणणारा. यांतील पहिला सांप्रदाय जो ध्वन्यभाववाद्यांचा त्याचेहि आणखी किरकोळ मतभेदामुळे तीन पोट संप्रदाय पडलेले लोचनकाराने दाखविले आहेत ( पा. ४ ५ ). हे जे ध्वनिविरोधी संप्रदायाचे पांच प्रकार लोचनकाराने सांगितले, तसेच समुद्रबंधानेंहि निराळ्या रीतीने पांच संप्रदाय सांगितले आहेत. तो म्हणतो ' इह विशिष्टौ शब्दार्थौ काव्यम् । तयोश्च वैशिष्ट्यं धर्ममुखेन व्यापारमुखेन व्यङ्ग्यमुखेन वेति त्रयः पक्षाः । आद्येऽपि अलंकारतो गुणतो वेति द्वैविध्यम् । द्वितीयेऽपि भणितिवैचित्र्येण भोगकृत्त्वेन वेति द्वैधम् । इति पञ्चसु पक्षेष्वाद्य उद्भटादिभिरंगीकृतः, द्वितीयो वामनेन, तृतीयो वक्रोक्तिजीवितकारेण, चतुर्थो भट्टनायकेन, पञ्चम आनन्दवर्धनेन । ' ( अलंकारसर्वस्व त्रिवेन्द्रम् प्रत पा. ४ ). पण समुद्रबंधाच्या या संप्रदायवर्णनांत भरताच्या रससंप्रदायाचे नांव आलेले नाही हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. भट्टनायक हा वस्तुतः रससांप्रदायीच होय. त्याची रसविवेचनाची सरणी जरा निराळी आहे इतकेच. भट्टनायकाच्या रसविवेचनाचें स्वरूप पहिल्या भागांत हृदयदर्पण ग्रंथाचे वर्णन करतांना दिलें आहेच. ध्वनिकारानें केलेल्या शब्दशक्तिविषयक विवेचनाचाहि अनुवाद भट्टनायकानें केलेला नसून त्याचें विवेचन स्वतंत्रपणें केलेलें आहे. असो. या संप्रदायांशिवाय महिमभट्टाचा आणखी एक अनुमानसंप्रदाय नांवाचा वेगळाच पंथ असून त्याच्या

---

× ध्वन्यभाववादी ( तस्याभावं जगदुरपरे ), लक्षणान्तर्भाववादी ( भाक्तमाहुस्तमन्ये ), सहृदयहृदयसंवेद्यवादी ( केचिद्वाचां स्थितमविषये तत्त्वमूचुस्तदीयम् ).

मतें सर्व ध्वनिप्रकारांचा समावेश अनुमानांतच होतो. पण महिमभट्टाला कोणी अनुयायी न मिळाल्यामुळें त्याची गणना स्वतंत्र संप्रदायस्थापकांत करण्याचे कारण नाही. त्याचप्रमाणे क्षेमेन्द्रानें औचित्याचे प्रस्थ माजविलें परंतु त्यालाई अनुयायी न मिळाल्यामुळें तो स्वतंत्र संप्रदाय झाला नाहीं. अलंकारसर्वस्वाच्य टीकेंत जयरथानें दोन श्लोक उद्धृत केले असून त्यांत ध्वनिसंप्रदायाचे विरोधी असलेला बारा संप्रदाय सांगितले आहेत. ' तात्पर्यशक्तिरभिधा लक्षणानुमिती द्विधा । अर्थापत्तिः क्वचित्तन्त्रं समासोक्त्याद्यलंकृतिः ॥ रसस्य कार्यता भोगो व्यापारान्तरबाधनम् । द्वादशेत्थं ध्वनेरस्य स्थिता विप्रतिपत्तयः ॥ '. पण या बारा पंथांपैकीं ध्वनिकल्पनेला विरोधक असे मुख्य तीनच होत असेहि त्याने ' काव्यस्यात्मा ध्वनिरिति ' इत्यादि ध्वनिकारिकेला अनुसरून सांगितलें आहे ( ' तथापि काव्यस्यात्मा ध्वनिरिति...... इत्युक्तनीत्यैव ध्वनेर्विप्रतिपत्तिप्रकारत्रयमिह प्राधान्येनोक्तम् । पा. ९ ). या विषयी प्रो. सोवनी यांचा भांडारकरस्मृतिग्रंथांतील ' ध्वनिकारापूर्वीचे अलंकारशास्त्रांतील संप्रदाय ' हा लेख ( पान ३८३ ) वाचनीय आहे.

## ९ रससंप्रदाय.

प्रस्तुत उपलब्ध असलेल्या साहित्यशास्त्रविषयक ग्रंथांचा विचार करतां नाट्यशास्त्राचा कर्ता हाच रससंप्रदायाचा मूळ प्रवर्तक असून त्या संप्रदायाचा संबंध विशेषतः नाट्यकलेशीच लाविलेला आढळतो. ' विभावानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः ' हे नाट्यशास्त्रांतील सूत्र साऱ्या रससंप्रदायपद्धतीचे केन्द्र असून त्याच्या भोवती त्या संप्रदायाचा सारा पसारा मांडिलेला आहे. विभाव म्हणजे रसप्रादुर्भावाचीं मूळ कारणें, अनुभाव म्हणजे रसानुकूल वृत्तीला व्यक्त करणाऱ्या गोष्टी व व्यभिचारिभाव म्हणजे त्या वृत्तीचा परिपोष करणाऱ्या अवान्तर गोष्टी किंवा भाव यांच्या संयोगानें रसनिष्पत्ति होते, असा त्या सूत्राचा अक्षरशः अर्थ आहे. या सूत्राचा खरा अर्थ काय असावा हे सांगून एकंदर रसकल्पनेचें सविस्तर विवरण करण्यांत अनेक ग्रंथकारांनी आपल्या ग्रंथांचा महत्त्वाचा भाग गुंतविला आहे. अर्थात् त्या विषयाचें स्वरूप थोडक्यांत पूर्णपणें सांगणें शक्य नाहीं. तरी शक्य तेवढा त्याचा परामर्श घेतला पाहिजे. मनुष्याच्या मनोवृत्ति उद्दीपित करणें व आनंद देणें हें काव्याचें मुख्य कार्य असून बुद्धीला प्रेरणा देण्याचें नाहीं हें प्रथम लक्षांत ठेविलें पाहिजे. रसकल्पनेचा पाय

कांहीं अंशीं इंद्रियकार्यविज्ञानविषयक असून कांहीं अंशी मानसशास्त्रविषयक आहे व तदनुसार तीत मनुष्यांच्या भावनांवर आणि वृत्तींवर काव्याचा परिणाम कसा होतो हें सांगण्याचा प्रयत्न केलेला असतो. मनुष्याच्या अंतःकरणांत कित्येक वृत्ति किंवा भाव नित्य असतात, पण सामान्यतः ते सुप्तावस्थेंत असून जेव्हां त्यांना योग्य ती चालना मिळते तेव्हां ते जागृत होतात. ज्याप्रमाणे शरीरांतील शक्ति योग्य औषधयोजनेनें जागृत होऊन प्रतिक्रिया दाखवितात तसाच हा मनोवृत्तींचा प्रकार आहे. नाट्यप्रयोगांत ही चालना शब्द आणि अभिनय यांच्या योगानें मिळते, आणि काव्यांत एकट्या शब्दांनीच मिळते. जसा एखादा कुशल चितारी थोड्याशा रंगांच्या साह्याने खऱ्या वस्तूचें भासमान दृश्य उभें करतो व प्रेक्षकाला आपल्यापुढे खरोखरीची वस्तुच आहे असे वाटावयास लावितो, त्याप्रमाणे कुशल नाटककार किंवा कवि शब्द आणि अभिनय यांच्या योगानें किंवा केवळ शब्दांच्या जोरावर श्रोत्यांच्या किंवा वाचकांच्या मनांतील कित्येक भाव जागृत करून त्यांना आपली वस्तुस्थिति विसरावयास लावितो आणि त्यामुळे ते एका प्रकारच्या आनंदमयवृत्तीचा उपभोग घेऊं लागतात. हा जो आनंदमयवृत्तीचा सुखानुभव त्याला रस अशी संज्ञा दिलेली आहे. नाटक किंवा काव्य यांच्या योगानें जे स्थायिभाव उद्दीपित होतात ते कित्येकांच्या मतें आठ तर कित्येकांच्या मतें नऊ आहेत. रति किंवा प्रेम, हास किंवा विनोद, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा म्हणजे किळस, व विस्मय हे आठ स्थायिभाव; कित्येकांच्या मतें शम म्हणजे मनःशांति हा नववा होय. रति म्हणजे प्रेम हा भाव पुरुषामध्यें स्त्रीसंबंधानें व स्त्रीमध्ये पुरुषासंबंधानें उत्पन्न होतो, म्हणजे तो स्त्रीपुरुषांवर अवलंबून असतो आणि तो एकदां जागृत झाला म्हणजे चंद्रोदय, वसंतऋतु, पुष्पे, लतामंडप इत्यादि उद्दीपक कारणांच्या योगानें पुष्ट होतो. या ज्या रतिभावोत्कर्षक वस्तु म्हणजे स्त्री व पुरुष आणि त्याला प्रज्वलित करणाऱ्या वस्तु वसंतादिक त्यांना विभाव अशी संज्ञा आहे. पहिल्या म्हणजे रतीला अंकुर फोडणाऱ्या वस्तूंना आलंबनविभाव आणि दुसऱ्या तिला उद्दीपित करणाऱ्या वस्तूंना उद्दीपन विभाव असे म्हणतात. रति उद्दीपित झाली म्हणजे तिला व्यक्त स्वरूप देणाऱ्या ज्या कटाक्षक्षेपणादि गोष्टी त्यांच्यावरून रतीचें कार्य चालू झाल्याचें समजून येत असल्यामुळें त्यांना अनुभाव असें नांव दिलेलें आहे. इत्यादि कित्येक स्थायिभावांना साधारण असे दुसरे अनित्य किंवा दुय्यम

प्रतीचे कांहीं भाव आहेत, त्यांचा उपयोग स्थायिभावाचा पूर्ण परिपोष करण्याच्या कामी होतो. निर्वेद म्हणजे खिन्नपणा, ग्लानि म्हणजे श्रांतपणा हे भाव अशा प्रकारचे होत. यांच्या योगानें रति व शोक या स्थायिभावांची पूर्ण व्यक्ति होऊं शकते. त्यांना व्यभिचारि किंवा संचारि भाव म्हणतात. रति, शोक, हास इत्यादि स्थायिभाव अवश्य त्या विभानुभावव्यभिचारिभावांच्या संयोगानें पूर्ण व्यक्त झाले म्हणजे त्यांना रसावस्था येते व शृंगार, करुण, हास्य इत्यादि संज्ञा प्राप्त होतात. नाटककार नाटक रचितांना अमुक ठिकाणी शृंगार रस आपण आणिला आहे, तमुक ठिकाणी वीररस योजिला आहे असं कांहीं कोठें सांगत नाहीं. तर नायिक नायिका इत्यादि विभाव, कटाक्षक्षेपणादि अनुभाव, व निर्वेदादि व्यभिचारिभाव यांची यथोचित योजना करून त्यांच्या वर्णनानें उत्पन्न होणारें मनःसंवेद्य आनंद भोगण्याचें काम श्रोत्यावर किंवा प्रेक्षकावर सोंपवितो. या कारणास्तव रस हा वाच्य नसून व्यङ्ग्य होय असें मानण्यांत येतें. उलट जर कवि किंवा नाटककार अमुक वर्णनांत शृङ्गार रस घातला आहे, अमक्यांत वीररस घातला आहे असे स्पष्ट सांगत असतांहि जर त्या वर्णनांत विभावानुभावादिकांचा यथोचित मेळ नसेल तर श्रोत्याला किंवा प्रेक्षकाला रसोत्पत्तीमुळें होणारा आनंद भोगावयास मिळणारच नाहीं. म्हणजे रस हा सांगून उत्पन्न होत नाहीं, तर त्याला लागणारें साहित्य जुळवून आणिल्यासच त्याची प्रतीति होऊं शकते. रसाविषयी सांगोपाग व सविस्तर विवेचन नाटयशास्त्र ( अध्याय ६-७ ), दशरूप ( प्रकाश ४ ), साहित्यदर्पण ( उल्लास तीन ), व रसतरंगिणी ( समग्र ग्रंथ ) यांत केलेलें आढळून येईल. नाटयशास्त्रांत ( ६-१५ ) शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स आणि अद्भुत असे आठ रस सांगितले असून पुढील कित्येक ग्रंथकारांनीं शान्तरसाची त्यांत भर घालून रस संख्या नऊ केली आहे. पण शान्तरस हा इतरत्र कोणी मानीत असले तरी नाट्यांत त्याला स्थळ नाहीं असें दशरूपकादिकांनी म्हटले आहे. दशरूपांत ( ४.३५ ) धनंजय म्हणतो ' शममपि केचित् प्राहुः पुष्टिर्नाटयेषु नैतस्य ।. ' शांतरसासंबंधानें असा प्रकार होण्याचें कारण असें दिसतें की नाटकाचें मुख्य कार्य अभिनयाच्या द्वारा होणारें आहे व त्यांतील सर्व परिस्थितीच मुळीं शांत रसाला प्रतिकूल आहे, कारण शांतरसाचा स्थायिभाव जो शम म्हणजे निरिच्छपणा, निर्भावनत्व, वैराग्य,

इंद्रियनिग्रह इत्यादिकांचा संयोग * तो नाटयप्रयोगाच्या परिस्थितींत उत्पन्न होणें शक्य नाहीं. पण केवळ वाचावयाचा काव्यांत तो स्थायिभाव उत्पन्न होणें शक्य आहे; कारण काव्य शांतपणें एकान्तांत वाचण्याचा विषय असल्यामुळें महाभारतांत दिसून येत असल्याप्रमाणे त्यांत शांतरसाचा परिपोष होण्यास अनुकूल ती सर्व सिद्धता असूं शकते व तेथे तो सहज उत्पन्न होतो.× यासाठी नाटकांत जेथें गौणरस म्हणून शांतरसाची योजना करितात तेथें शृंगाराचा नायक व शांताचा नायक हे भिन्न ठेवून त्यांची परिस्थितिहि भिन्न दाखविली पाहिजे तसें न केल्यास सर्वथा रसहानि होईल, अशा आशयाचें विवेचन ध्वन्यालोकांत केले आहे. या नऊ रसांच्या जोडीला प्रेयान् नांवाचा दहावा रस रुद्रटानें सांगितला आहे ( १२–३ ) व ' स्नेहप्रकृतिः प्रेयान् ' (१६-१७) असे त्याचें लक्षण करून साहचर्यादि त्याचे विभाव, स्त्रियांचे अश्रु इत्यादि अनुभाव व स्नेह हा स्थायिभाव असे सांगितले आहेत. याशिवाय आणखी वात्सल्य, लौल्य, भक्ति व कार्पण्य हेहि रस मानावे असें कित्येकांचे म्हणणें आहे. पण हें मत रसतरंगिणीकाराने ( तरंग ६ ) खोडून काढिले असून त्यांचा अंतर्भाव पूर्वीच्या नऊ रसांत होतो असा निर्णय दिला आहे. भक्ति, वात्सल्य, व श्रद्धा हे रस होत असे कित्येकांनी प्रतिपादिले असून त्यांचाहि अंतर्भाव नऊ रसांत किंवा भावांत होतो असें सांगून रसरत्नहारकर्त्या शिवरामाने त्यांच्या म्हणण्याचें खंडन केलें आहे.

आतां रसादि संज्ञांचा विचार करूं. रस ही एक मनाची आनंदात्मक अवस्था असून तो आनंद केवळ हृदयानेच भोगावयाचा आहे. ' रसनाद्रसत्वमेषां ' असें रसशब्दाचें व्युत्पादन रुद्रटानें केलें असून ( १२–४ ), रसतरंगिणीत ( तरंग६ ) ' विभावानुभावसात्त्विकव्यभिचारिभावैरुपनीयमानः परिपूर्णः स्थायिभावो रसः ' असे रसलक्षण केलेलं आहे. नाट्यशास्त्राचें लक्षण अशाच आशयाचें असून तें पूर्वींच दिलें आहे ( ६–३४ ). विभावाची व्युत्पत्ति नाटयशास्त्रांत ( ७–४ ) ' बहवोर्था विभाव्यन्ते वागंगाभिनयश्रयाः । अनेन यस्मात्तेनायं विभाव इति

---

* शांतश्च तृष्णाक्षयसुखस्य यः परिपोषस्तल्लक्षणो रसः प्रतीयत एव । ' ( ध्व. लो. पान १७६ ).

× महाभारतेऽपि शास्त्रकाव्यरूपच्छायान्वयिनि वृष्णिपांडवविरसावसानवैमनस्यदायिनीं समाप्तिमुपनिबध्नता महामुनिना वैराग्यजननतात्पर्यं प्राधान्येन स्वप्रबन्धस्य दर्शयता मोक्षलक्षणः पुरुषार्थः शान्तो रसश्च मुख्यतया विवक्षाविषयत्वेन सूचितः । ( ध्व. लो. पा. २३८ )

संज्ञितः । ' अशी दिली असून दशरूपांत ( ४-२ ) ' ज्ञायमानतया तत्र विभावो भावपोषकृत् । आलम्बनोद्दीपनत्वप्रभेदेन स च द्विधा ॥ ' अशी व रसतरंगिणींत ( २ रा तरंग ) ' विशेषेण भावयन्ति उत्पादयन्ति ये रसांस्ते विभावाः' अशी ती दिली आहे. रस उत्पन्न करणारीं जीं विशेष कारणे ते विभाव होत.

स्थायिभाव हा सर्व भावांचा अधिपति होय. नाट्यशास्त्रकार म्हणतो, ' यथा नराणां नृपतिः शिष्याणां च यथा गुरुः । एवं हि सर्वभावानां भावः स्थायी महानिह ॥ ' ( ना. शा. ७,८ ). इतर अनुकूल प्रतिकूल भावांनी ज्याच्यांत कांहीं विकृति होत नाहीं, इतकेंच नव्हे तर जो त्यांना आपल्यासारखे करून सोडतो तो भाव स्थायी होय असें दशरूपकाराचें म्हणणें आहे ( ४.३४ ); ' विरुद्धैरविरुद्धैर्वा भावैर्विच्छिद्यते न यः । आत्मभावं नयत्यन्यान्स स्थायी लवणाकरः ॥'. शेवटपर्यन्त जो टिकून रहातो तो स्थायी भाव होय 'चरमसमयपर्यन्तस्थायित्वादस्य स्थायित्वव्यपदेशः ' असा अर्थ रसतरंगिणीत दिला आहे ( १ ला तरंग ).

अनुभावाचे लक्षण दशरूपांत ( ७.३ ) ' अनुभावो विकारस्तु भावसंसूचनात्मकः ' असें केले आहे व त्यावर टीकाकार धनिक म्हणतो, ' स्थायिभावाननुभावयतः सामाजिकान् सभ्रूविक्षेपकटाक्षादयो रसपोषकारिणोनुभावाः '. रसांतील स्थायिभाव दृग्गोचर करणारे जे कटाक्षक्षेपणादि बाह्य व्यापार ते अनुभाव होत. अनुभावांतील आठ अनुभावांची गणना सात्त्विक भाव म्हणून केलेली आहे. याविषयी दशरूपकार म्हणतो ' पृथग्भावा भवन्त्यन्येऽनुभावत्वेऽपि सात्त्विकाः । सत्त्वादेव समुत्पत्तेस्तच्च तद्भावभावनम् ॥ स्तम्भप्रलयरोमाञ्चाः स्वेदो वैवर्ण्यवेपथू । अश्रुवैस्वर्ण्यमित्यष्टौ स्तम्भोऽस्मिन्निष्क्रियांगता ॥ प्रलयो नष्टसंज्ञत्वं शेषाः सुव्यक्तलक्षणाः ॥ ' ( द. रू. ४. ४-६ ). स्तम्भ म्हणजे निष्क्रियता, प्रलय म्हणजे मूर्च्छा, रोमाञ्च, स्वेद, मुखाची म्लानता, कंप, अश्रु व स्वरभेद हे सत्त्वापासून उत्पन्न होत असल्यामुळे त्यांना सात्त्विक भाव म्हणतात. सत्त्व म्हणजे सहानुभूतिपूर्ण मन, त्या सत्त्वापासून उद्भवलेला ' सत्त्वेन निर्वृत्तः ' तो सात्त्विक असा अर्थ दशरूपांत दिला आहे. साहित्यदर्पणांत ( ३. १३४ ) असेंच मत प्रतिपादिलें असून रसतरंगिणींत मात्र ' सत्त्वं जीवशरीरं तस्य धर्माः सात्त्विकाः । इत्थं च शरीरभावाः स्तम्भादयः सात्विका भावा इति अभिधीयन्ते ॥' (र. त. तरंग ४). सत्त्व म्हणजे मनुष्याचें शरीर; त्याच्यावर दिसून येणारे धर्म किंवा भाव म्हणजे सात्त्विक भाव होत असें तरंगिणीचें म्हणणें आहे. असा सात्त्विक शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधानें मतभेद दिसतो.

व्यभिचारिभाव एकंदर तेतीस सांगितले आहेत. ते निर्वेद, ग्लानि, शंका, आवेग, दैन्य, श्रम, जाड्य, उग्रता इत्यादि होत. * ' विविध-माभिमुख्येन रसेषु चरन्तीति ' ( ना. शा. पा. ७२ ) म्हणजे रसांमध्यें निरनिराळ्या रीतीनें ते प्रकट होतात म्हणून व्यभिचारि असे त्यांना म्हटलें आहे. दशरूपकार म्हणतो ' विशेषादाभिमुख्येन चरन्तो व्यभिचारिणः । स्थायिन्युमग्न-निर्मग्नाः कल्लोला इव वारिधौ ॥ ' नित्य अशा समुद्रामध्यें लाटा जशा वर खाली होतात, तसे स्थायीभावांत मधून मधून हेलकावे खात प्रकट होणारे ते व्यभि-चारि भाव होत. आठ स्थायिभाव, आठ सात्त्विक भाव व तेतीस व्यभिचारि भाव मिळून एकंदर भाव ४९ होतात. या गोष्टी अभिनयाच्या द्वारा रसांना भावित म्हणजे पुष्ट करितात म्हणून त्यांना भाव म्हणतात, भावाशिवाय रसोत्पत्ति नाही व भाव असतील तेथें रस असावयाचा; भाजी व वंजन ही जशीं एकमेकांना पोषक होऊन अन्नाला रुचि देतात तसाच प्रकार रस व भाव यांचा आहे असें नाट्यशास्त्रांत म्हटलें आहे ' नानाभिनयसंबद्धान्भावयन्ति रसानिमान् । यस्मा-त्तस्मादमी भावा विज्ञेया नाटययोक्तृभिः ॥ न भावहीनोऽस्ति रसो न भावो रस-वर्जितः । परस्परकृता सिद्धिस्तयोरभिनये भवेत् ॥ व्यंजनौषधिसंयोगो यथान्नं स्वादुतां नयेत् । एवं भावा रसाश्चैव भावयन्ति परस्परम् ॥' नाटय० ४. ३५-३७.

रसाची प्रतीति रसिकाला निश्चितपणें कशी होते हे सांगतानां लोल्लट, शङ्कुक भट्टनायक व अभिनवगुप्त यांच्यामध्यें बराच मतभेद दिसतो. या बाबतींत अर्वाचीन साहित्यकारांचा कल अभिनवगुप्ताच्या मताकडेच वळलेला आहे. रसभोगाविषयीं लोल्लटाचे मत थोडक्यांत सांगावयाचे तर ते असे आहेः रस हा ' मूळचा नायकगत होय. उदाहरण राम हा नायक घेऊं. तो राम सीतेवर प्रेम करितो व त्या प्रेमाचें वर्णन नाटककार यथार्थ शब्दांनीं करितो. रामाची भूमिका करणारा नट आपल्या अभिनयनैपुण्यानें आपण रामाच्याच मनःस्थितींत आहोंत असा भास प्रेक्षकांच्या मनांत उत्पन्न करतो व प्रेक्षक त्या क्षणापुरतें तसें मानूं लागल्यामुळें नटाच्या ठायीं आरोपित केलेला प्रेमभाव प्रेक्षकाच्या मनांत

---

* निर्वेदावेगदैन्यश्रममदजडता औग्र्यमोहौ विबोधः । स्वप्नापस्मार-गर्वा मरणमलसतामर्षनिद्रावहित्था ॥ औत्सुक्योन्मादशंकाः स्मृतिमतिसहिता व्याधिसंत्रास-लज्जा-हर्षासूयाविषादाः सधृतिचपलताग्लानिचिन्तावितर्काः ॥ ' साहित्यदर्पण. ३.१४१; तसेंच नाट्यशास्त्र ६. १८-२१.

आनंद उत्पन्न करितो. ' विभानुभावव्यभिचारिसंयोगाद्रसनिष्पत्तिः ' या भरत-सूत्राचा अर्थ लोल्लटाच्या मतें असा आहे. या मताप्रमाणे पाहतां रसाचा प्रेक्ष-काच्या भावनांशी किंवा वृत्तींशीं कांहीं संबंध नाहीं. लोल्लटाच्या मतानें ' निष्पत्ति ' म्हणजे ' उत्पत्ति '. त्याच्या मतानें स्थायिभाव ( रति इत्यादि ) हे चित्तवृत्ति असून विभावांच्या ( म्हणजे स्त्रीपुरुष आणि वसंतादि ) संयोगाने रसोत्पत्ति होते म्हणजे विभाव हे स्थायिभावाचे कारण होत व विभावानुभावादिकांच्या वर्णनानें व अभिनयानें स्थायिभाव पुष्ट झाला म्हणजे तोच रस होय. हा रस मुख्यत्वें करून नाटकांतील व काव्यांतील जी राम आदि पात्रे त्यांच्या ठिकाणी असतो आणि त्याचप्रमाणें आपण रामच आहों असे समजून अभिनय करणाऱ्या नटांत असतो. ह्या मतावर मोठा आक्षेप हा आहे की प्राचीन काळीं होऊन गेलेल्या रामा-दिकांचे ठायी असलेल्या किंवा त्यांचें अनुकरण करणाऱ्या नटांचे ठिकाणी अस-णाऱ्या रसाने प्रेक्षकाला आनंद कां व्हावा याचे स्पष्टीकरण होत नाही. शंकुकाच्या मते रस हा अनुमानाचा परिणाम होय. अभिनयकलेत निष्णात झालेला नट रामादि मूळ वर्ण्य पुरुषाच्या कृतीचा कौशल्यानें अभिनय करितो, त्यावेळी प्रेक्ष-काला क्षणभर हा नट नसून प्रत्यक्ष वर्ण्यपुरुषच होय अशी अभेदप्रतीति होते व नटाने व्यक्त केलेल्या अनुभावव्यभिचारिभावांवरून तो त्या रामादिवर्ण्य पुरुषाच्याच प्रेमाचें अनुमान करून त्या प्रेमभावनेला मनांत घोळवितो व त्यांत आनंद मानूं लागतो. * शंकुकाच्या या मतांत रसाचा संबंध प्रेक्ष-

* शङ्कुकाच्या मताचे विस्तृत विवेचन अभिनवभारतींत ( पान २७४–२७८ ) केलें आहे. त्याच्या मतानें 'रसनिष्पत्तिः' म्हणजे रसाचे अनुमान. रामाच्या ठिकाणीं सीतेविषयीं असलेली रति ( स्थायिभाव ) नटाकडून अनुकृत झाली म्हणजे त्यावरून प्रेक्षक जे रामाच्या रतीसंबंधानें अनुमान करितो तो शृंगार. या ठिकाणीं प्रेक्षक असें समजत नाहीं की नट हाच रतिसुखयुक्त आहे किंवा हाच राम आहे असाहि भ्रम प्रेक्षकाला होत नाहीं किंवा हा सुखी नाही किंवा हाच राम असेल किंवा नसेल असा संदेहहि त्याला येत नाहीं. परंतु चित्रांतील घोड्याप्रमाणें जो रतिसुखी राम होता त्याची प्रतीति प्रेक्षकाला होते. अभिनवगुप्तानें शंकुकाचे दोन श्लोक दिले आहेत. ' प्रतिभाति न सन्देहो न तत्त्वं न विपर्ययः । धीरसावयमित्यस्ति नासावेवायमित्यपि । विरुद्धबुद्धिसंभेदादविवेचितसंप्लवः । युक्त्या पर्यनुयुज्येत स्फुरन्ननुभवः कथा ।।' अभिनवभारती पान २७५

काशी जोडिला आहे हे खरें, पण नटाच्या अभिनयकौशल्यामुळें प्रेक्षकाच्या मनांत निघणारें अनुमान हेंच रसाचें स्वरूप होय असें तो म्हणतो. 'अनुकरणरूपो रसः' हें शंकुकाच्या मताचें सार होय. या मतावर अनेक आक्षेप येतात. राम मूळ कसा होता हेंच जर आपणांला व नटांना माहीत नाही तर त्याचे तंतोतंत अनुकरण तरी नट कसे करणार ? म्हणून नट रामाचें अनुकरण करितो असे म्हणणेंच मुळीं चूक आहे. त्याचप्रमाणें रामाला वाटणाऱ्या सीताविषयक प्रेमाचें अनुकरण करून नट जो अभिनय करितो त्याने रामाच्या प्रेमाचें अनुमान होणे शक्य नाही. धुरासारखें दिसणारें जें धुके त्यावरून अग्नीचें किंवा अग्नीसारखीं लाल असलेलीं जी जासवंदीची फुलें त्यांचे अनुमान आपण करीत नाही. शिवाय प्रत्यक्ष प्रतीतीनें जो आनंद होतो तो अनुमानानें होत नाहीं.

रस हा अनुमानरूप आहे हें मत भट्टनायकानें अमान्य केलें असून रस म्हणजे प्रेक्षकानें अनुमानानें मिळविलेली प्रतीति असेंहि मानावयास तो सिद्ध नाहीं. भट्टनायकानें या रसास्वादाला परब्रह्मसाक्षात्काराच्या कोटींत बसविलें आहे. परब्रह्म जसें आनन्दमय आहे, तसाच रसास्वादहि आनन्दस्वरूपच होय असें त्याचे म्हणणें आहे. भट्टनायकाचे हे रसविषयक मत लोचनकारानें ( पा. ६७-६८ ) सविस्तर दिलें असून त्याचा उल्लेख आम्ही पूर्वीं भट्टनायकाच्या वर्णनांत केला आहे ( पान १४८–१५० ). भट्टनायकाचे मत असें कीं रस हा प्रमाणग्राह्य नाहीं, तो उत्पन्न होत नाहीं किंवा व्यक्त होत नाहीं. जर तो इतर ज्ञानाप्रमाणें आहे तसा प्रतीत झाला असता तर करुण रसाचें नाटक पाहतांच प्रेक्षकाला नुसता शोकच भासला पाहिजे पण शोककारक नाटक पाहण्यांतही एक प्रकारचा आनन्द होत असतो. सीतेविषयींच्या रामाच्या प्रेमाचा प्रयोग पाहिल्यावर सीता ही प्रेक्षकांच्या मनांतील शृंगाराचें कारण होऊं शकत नाही, कारण तिचा व आपला संबंध नाहीं हें प्रेक्षकास माहीत असतें किंवा त्या प्रयोगानें त्याला स्वतःच्या कान्तेचेंही स्मरण होत नाहीं. खरोखर काय होतें की अभिनयचातुर्यानें व शब्दांच्या सौंदर्यानें प्रेक्षक हा व्यक्तिनिष्ठत्व विसरून मूळ पात्रें, नट व आपण ह्यांना एकाच सामान्य कोटींत आणून सीतानिष्ठ रामाची रति असें वैयक्तिक रूप नाहींसें करून केवळ सामान्यत्वानें रतिभावाचा आविर्भाव करितो ( यालाच भावकत्वशक्ति म्हणतात ) आणि त्याला जें चर्वणात्मक सुख मिळतें तोच रस. रसाविषयीं अभिनवगुप्ताचें स्वतःचें म्हणणें असें

आहे कीं रस हा कार्य किंवा ज्ञाप्य म्हणजे उत्पन्न करण्याचा किंवा अनुमानानें जाणीव करून देण्याचा नसून अभिव्यक्त म्हणजे सूचित करून द्यावयाचा असतो. भट्टनायकानें अभिधेशिवाय ज्या भावना व भोग नांवाच्या शब्दशक्ति मानिल्या आहेत, त्या अभिनवगुप्त मान्य करीत नाही आणि रस हा केवळ स्वसंवेद्य व वर्णनातीत आहे हेंही त्याला मान्य नाहीं. प्रेक्षकांच्या मनांत रत्यादिस्थायिभाव सुप्तावस्थेंत नित्य असतातच. ते विभावादिकांच्या प्रेरणेनें जागृत होऊन रसावस्थेंत परिणत होतात. या चारी मतांचें सविस्तर दिग्दर्शन मम्मटानें काव्यप्रकाशाच्या चवथ्या उल्लासांत व अभिनवगुप्तानें लोचनांत ( पा. २४, ५६ ) केलें आहे. काव्याचा आत्मा रस होय हें भरताचे मत शृंगारतिलककार रुद्रानें स्वीकारलेले असून अग्निपुराण, काव्यमीमांसा, अलंकारशेखर यांनींहि त्याचाच अवलंब केलेला आहे. 'वाग्वैदग्ध्यप्रधानेऽपि रस एवात्र जीवितम्' म्हणजे काव्यांत शब्दकौशल्याचें प्राधान्य असलें तरी त्याचा आत्मा किंवा जीव रसच होय ( अग्नि. ३३६. ३३ ) असें अग्निपुराणांत म्हटलें आहे. 'रस आत्मा' असें राजशेखरानें ( काव्यमी. पा. ६ ) म्हटले असून शौद्धोदनीनें 'अलंकारस्तु शोभायै रस आत्मा परे मनः' ( अलं. शेखर पा. ६ ) असें सांगितलें आहे.

## १० अलंकारसंप्रदाय

साहित्यशास्त्रांतील अलंकारसंप्रदायाचे धुरीण भामह व उद्भट हे असून रुद्रट व प्रतीहारेन्दुराज हे त्याचे अनुयायी होत. दण्डीहि बहुतेक याच संप्रदायांतील आहे असे धरण्यास हरकत नाहीं. मात्र तो अलंकारांइतकेंच गुणांना किंवा मार्गाला ( रीतीला ) महत्त्व देतो. या साहित्यशास्त्रकारांना रसकल्पनेची जाणीव नव्हती असे मात्र नाहीं. भामहानें स्वतः रसाचा उल्लेख केला आहे व महाकाव्यांत रस असले पाहिजेत असेंहि सांगितलें आहे. महाकाव्याच्या लक्षणांत 'युक्तं लोकस्वभावेन रसैश्च सकलैः पृथक्' ( १.२१ ) असें त्यानें म्हटलें असून रसवत् अलंकाराच्या वर्णनांत 'रसवद् दर्शितस्पष्टशृंगारादिरसं' असा शृंगारादि रसांचा निर्देशहि केला आहे ( ३.६ ). उद्भटानेंहि रसवद् अलंकाराची व्याख्या 'रसवद्दर्शितस्पष्टशृंगारादिरसोदयम् । स्वशब्दस्थायिसञ्चारिविभावाभिनयास्पदम्' ॥ अशी केली असून ( ४ था वर्ग ) तींत स्थायिभाव, सञ्चारि म्हणजे व्यभिचारिभाव व विभाव या पारिभाषिक संज्ञा दिल्या आहेत व त्याच्या पुढच्या श्लोकांत

नऊ रसांचीं नांवेंहि सांगितली आहेत. दण्डीनें देखील रसवत् आणि ऊर्जस्वि या अलंकारांची लक्षणें दिल्यावर 'मधुरं रसवद्वाचि वस्तुन्यपि रसस्थितिः'। (१.५१) व 'कामं सर्वोप्यलंकारः रसमर्थे निषिञ्चति' (१.६२) अशा रीतीने काव्यांतील रसाचे अस्तित्व व त्याच्या परिपोषाचे साधन यांचा निर्देश केला आहे. आठ रस व त्यांचे स्थायिभावहि त्यानें सांगितले आहेत. 'इह त्वष्ट-रसायत्ता रसवत्ता स्मृता गिराम्' (काव्यादर्श २.२९२); 'प्राक् प्रीतिर्दर्शिता सेयं रतिः शृंगारतां गता' (२.२८१) इत्यादि वचनांवरून त्याची रसविषयक कल्पना दिसून येते. * रुद्रटानेंसुद्धां 'तस्मात् तत् कर्तव्यं यत्नेन महीयसा रसैर्युक्तम्' म्हणजे कवीनें आपलें काव्य प्रयत्नपूर्वक रसयुक्त करावें असें म्हटलें आहे (काव्यालं. १२.२). याप्रमाणे या ग्रंथकारांना रसकल्पनेची जाणीव होती हे उघड आहे. पण सामान्यपणे काव्याला ती कशी लावावी हे त्यांना सुचलें नव्हते. काव्यांत महत्त्वाचें स्थान ते अलंकारांनाच देतात व अलंकारांच्या मानानें रसांना गौण समजून ज्यांत रस आहे तो रसवत् अलंकार असा स्वतंत्र अलंकार त्यांनीं सांगितला. भामह व दंडी यांनी अलंकार आणि गुण यांत फारसा भेद केलेला नाहीं. भामहाने तर भाविक नामक अलंकाराला गुण म्हटलें असून (भाविकत्व-मिति प्राहुः प्रबंधविषयं गुणम्।' काव्यालं. ३, ५७) दंडीने काव्याच्या दहाहि गुणांना अलंकार मानिलें आहे (काव्यशोभाकरान्धर्मानलंकारान् प्रचक्षते।...... काश्चिन्मार्गविभागार्थमुक्ताः प्रागप्यलंक्रियाः॥ परिच्छेद २, श्लोक १ व ३). अलंकारसर्वस्वकार याविषयीं म्हणतो 'इह तावद्भामहोद्भटप्रभृतयश्चिरंतनालंकारकाराः प्रतीयमानमर्थं वाच्योपस्कारकतयाऽलंकारपक्षनिक्षिप्तं मन्यन्ते।...उद्भटादिभिस्तु गुणालंकाराणां प्रायः साम्यमेव सूचितम्।...तदेवमलंकारा एव काव्ये प्रधानमिति प्राच्यानां मतम्।' (पान ३ व ७). वाच्यार्थाला खुलवून दाखवीत असल्यामुळे व्यङ्गयार्थ हा अलंकारच होय असें भामहउद्भट इत्यादि प्राचीन साहित्य-

---

* इत्यारुह्य परां कोटिं क्रोधो रौद्रात्मतां गतः। (२, २८३); इत्युत्साहः प्रकृष्टात्मा तिष्ठन् वीररसात्मना। (२. २८५); इति कारुण्यमुद्रिक्तमलंकारतया स्मृतम्। तथा परेऽपि बीभत्सहास्याद्भुतभयानकाः॥ (२. २८७) असे इतरहि रसांचे स्थायिभाव दंडीनें सांगितले आहेत. वरील अवतरणांवरून दण्डीचें मत रसाचे बाबतींत भट्टलोल्लटासारखें होते असें दिसतें.

शास्त्रकारांचें मत आहे. उद्भटादिकांनी गुण व अलंकार यांनाहि समान लेखिलें आहे. याप्रमाणें काव्यांमध्यें अलंकारांनाच प्राधान्य आहे हेच मत प्राचीन ग्रंथकारांचें दिसून येतें. या सर्वस्वकाराच्या विधानावरून भामह हा ध्वन्यभाववादी असेल असें कोणास वाटेल, पण हें अनुमान बरोबर होणार नाहीं. प्रतीयमान म्हणजे व्यंग्य अर्थ काव्याचें जीवित होय या ध्वनिकाराच्या मताची कल्पना भामहदंडिप्रभृतींना आलेली नव्हती व त्यांनीं काव्यप्रकारदर्शक शब्दांत ध्वनिकाव्य, गुणीभूतव्यङ्गयकाव्य इत्यादि शब्द अर्थातच योजिलेले नाहीत हें खरें. पण त्यांना प्रतीयमान अर्थाची जाणीव होती हेंहि तितकेंच खरें आहे. त्यांच्या अप्रस्तुतप्रशंसा समासोक्ति आक्षेप या अलंकारांच्या व्याख्यांत ध्वनिकाराच्या गुणीभूतव्यङ्गयाचा म्हणजे प्रतीयमान अर्थाचा बहुतांशी अन्तर्भाव झालेला आहे. उदाहरण, 'यत्रोक्ते गम्यतेऽन्योऽर्थस्तत्समानविशेषणः । सा समासोक्तिः' अशी समासोक्तीची व्याख्या भामहानें केली असून 'समान विशेषणांमुळें जेथें वाच्यार्थाप्रमाणेंच **दुसऱ्याहि अर्थाचा बोध होतो**' या शब्दांनी प्रतीयमान अर्थाचा उल्लेख केला आहे. ध्वनीचे उरलेले प्रकार या साहित्यकारांच्या दृष्टीनें पर्यायोक्तनामक अलंकारांत समाविष्ट होतात. प्राचीन साहित्यकारांना ध्वनीची कल्पना नव्हती असा जो कित्येक अर्वाचीनांचा पक्ष तो जगन्नाथपंडितानें अशा रीतीनें खोडून काढिला आहे. तो म्हणतो 'ध्वनिकारात्प्राचीनैर्भामहोद्भटप्रभृतिभिः स्वग्रंथेषु कुत्रापि ध्वनिगुणीभूतव्यङ्गयादिशब्दा न प्रयुक्ता इत्येतावतैव तैर्ध्वन्यादयो न स्वीक्रियन्ते इत्याधुनिकानां वाचोयुक्तिरयुक्तैव । यतः समासोक्तिव्याजस्तुत्यप्रस्तुतप्रशंसालंकारनिरूपणेन कियन्तोऽपि गुणीभूतव्यङ्गयभेदास्तैरपि निरूपिताः । अपरश्च सर्वोऽपि व्यङ्गयप्रपंचः पर्यायोक्तकुक्षौ निक्षिप्तः ।' (पान ४१४–१५). भामह आणि दंडी यांनी ध्वनीचा किंवा व्यङ्गयाचा काव्यजीवित म्हणून उल्लेख केलेला नाही, पण तें स्थान त्यांनी वक्रोक्तीला किंवा अतिशयोक्तीला दिलें असून तिच्या वांचून कोणताच अलंकार होऊं शकत नाही असें म्हटलें आहे. 'सैषा सर्वैव वक्रोक्तिरनयार्थो विभाव्यते । यत्नोऽस्यां कविना कार्यः कोऽलंकारोऽनया विना ॥' (भामह २-८५) असें वक्रोक्तीचें अलंकारव्यापकत्व भामहानें सांगितलें असून 'अलंकारान्तराणामप्येकमाहुः परायणम् । वागीशमहितामुक्तिमिमामतिशयाह्वयाम् ।' असा अतिशयोक्तीचा महिमा दंडीनें गायिला आहे (काव्यादर्श २-२२०). नित्याच्या सामान्य वाक्यपद्धतीहून वेगळी

व पुष्कळांशीं श्लेषमूलक अशी जी चमत्कृतिजनक वाक्यपद्धति तिला भामहानें वक्रोक्ति म्हटले आहे. रुद्रटाने भावनामक अलंकाराचे दोन प्रकार सांगितले असून त्यांत कांही व्यङ्ग्य अर्थ अभिप्रेत असतो ( ७.३८ व ४० ). * रुद्रटानें व्यङ्ग्य उत्प्रेक्षेचेंहि एक उदाहरण दिले आहे.× म्हणजे रुद्रटानेहि व्यङ्ग्य अर्थाचा स्वीकार केलेला आहे हें उघड होते. पण दंडिभामहांनी अलंकारांना जे प्राधान्य दिलें ते अगदीं पुढील काळीहि थोड्याबहुत प्रमाणानें टिकून राहिले. मम्मट हा ध्वन्यालोकाचा सर्वतोपरी अनुयायी असतांहि त्याच्या ग्रंथांत इतर कोणत्या हि विषयापेक्षां अलंकारविवेचनालाच अधिक जागा दिलेली आहे. निरनिराळ्या ग्रंथकारांनी सांगितलेल्या स्वतंत्र अलंकारांची संख्या दोनशेच्या वर भरते. अलंकारसंप्रदायासंबंधानें अधिक विवेचन इन्डियन ॲंटिक्करीच्या १९१२ च्या २०६–२०८ पानांवरील लेखांत मी केलेले आहे.

## ११ रीतिसंप्रदाय

काव्यालंकारसूत्राचा प्रणेता वामन हा साहित्यशास्त्रांतील रीतिसंप्रदायाचा प्रधान पुरस्कर्ता होय. त्याच्यापूर्वी दंडीनेंहि रीतिविवेचनावर बराच भर दिलेला असून अलंकारावरील पुढील ग्रंथकारांनींहि त्याचा थोडा बहुत परामर्श घेतलेला आहे. वामनानें गुण व अलंकार यांमध्ये आपल्या दृष्टीने भेद केलेला असून तो म्हणतो ‘ काव्यशोभायाः कर्तारो धर्मा गुणाः । तदतिशयहेतवस्त्वलंकाराः ’ ( ३, १, १–२ ). गुण हे काव्याची शोभा मूळ उत्पन्न करणारे व अलंकार त्या शोभेची वाढ करणारे होत. त्यांतील गुण हे नित्य म्हणजे अवश्य होत. कारण त्यांच्याशिवाय काव्यशोभाच होऊं शकत नाही ( पूर्वे नित्याः... तैर्विना काव्यशोभानुपपत्तेः । ). वामनानें दहा शब्दगुण व दहाच अर्थगुण सांगि-

---

* यस्य विकारः प्रभवन्नप्रतिबद्धेन हेतुना येन । **गमयति तदभिप्रायं तत्प्रतिबंधं च** भावोसौ ॥ अभिधेयमभिदधानं तदेव तदसदृशसकलगुणदोषम् । **अर्थान्तरमवगमयति** यद्वाक्यं सोऽपरो भावः ।

× पल्लवितं चंद्रकरैरखिलं नीलाश्मकुट्टिमोर्वीषु । ताराप्रतिमाभिरिदं पुष्पितमवनीपतेः सौधम् ॥ ( ९, १३ ). यांत नीलरत्नखचित अशी राजवाड्याची गच्ची चंद्रकिरणांमुळे पल्लवित झाली व तारांच्या प्रतिबिंबांमुळें पुष्पयुक्त झाली असें म्हटलें असून वाच्य अर्थाच्या अशक्यपणामुळें सादृश्याचा बोध होतो.

तले आहेत ते असेः—१ ओजः, २ प्रसाद, ३ श्लेष, ४ समता, ५ समाधि, ६ माधुर्य, ७ सौकुमार्य, ८ उदारता, ९ अर्थव्यक्ति व १० कांति. दंडीनें सुद्धां हेच गुण सांगितले आहेत, पण त्यानें शब्दगुण व अर्थगुण असा भेद केला नाहीं. काव्याच्या गुणांची कल्पना फार जुनी असून इ. स. १५० तील रुद्रदाम याच्या लेखांत माधुर्य, कान्ति व उदारता या गुणांचा उल्लेख असल्याचे पूर्वी दाखविलेच आहे. 'श्लेषः प्रसादः समता समाधिर्माधुर्यमोजः पदसौकुमार्यम् । अर्थस्य च व्यक्तिरुदारता च कान्तिश्च काव्यार्थगुणा दशैते' असे दहा काव्यार्थ-गुण नाटयशास्त्रांत ( १६, ९२ ) दिले आहेत. ही नाटयशास्त्रांतील नांवेंच दंडी व वामन यांनीं दिलीं आहेत हे लक्षांत येईलच. नाटयशास्त्रांत रसाला प्राधान्य देऊन गुण व अलंकार यांना गौण लेखिले आहे ( १६, १०४ ). १६ व्या अध्यायांत काव्यलक्षणें, काव्यदोष इत्यादि विषयांबरोबर गुण व अलंकार यांचा परामर्श नाटयशास्त्रांत घेतला आहे तेवढाच. पण त्यांत रसविवेचनानें बराच मोठा भाग व्यापिला आहे. दंडीनें गुण ( १, ४०–१०१ ) व अलंकार यांना प्राधान्य दिले असून त्यांच्या वर्णनानेंच बहुतेक काव्यादर्श भरलेला आहे. त्यांतहि पुनः दंडीनें गुण व अलंकार यांतील भेदाविष्करण न करितां शब्दालंकार व अर्थालंकार यांनाच विशेष महत्त्व दिलें आहे आणि वामनानें गुण व अलंकार यांतील भेदावर भर दिला आहे. काव्याचे दहा गुण म्हणून जे सांगितले तेच वैदर्भी रीतीचें किंवा मार्गाचें जीवित होय व अर्थव्यक्ति, उदारता व समाधि यांशिवाय बाकीच्या गुणांच्या विपर्ययांच्या योगानें गौडी रीति सामान्यतः होते असे दंडीचे मत आहे. तो म्हणतो 'इति वैदर्भमार्गस्य प्राणा दश गुणाः स्मृताः । एषां विपर्ययः प्रायो दृश्यते गौडवर्त्मनि ॥' ( काव्यादर्श १, ४२ ). अर्थव्यक्ति, उदारता व समाधि हे तीन गुण मात्र दोन्हीं रीतींना अवश्य आहेत. समाधि गुणाला दंडीनें काव्याचें सर्वस्व म्हटले आहे, 'अन्यधर्मस्ततोन्यत्र लोकसीमानुरोधिना । सम्यगाधीयते यत्र स समाधिः स्मृतो यथा' ( का. द. १.९३ ); पण म्हणून समाधि हा काव्याचा आत्मा आहे असें मात्र त्याचें म्हणणें नाहीं. त्याचे शब्द अर्थवादात्मकच आहेत. पण वामनानें रीति काव्याचा आत्मा होय असें स्पष्ट सांगितलें असून रीति म्हणजे काय हेहि सांगितलें आहे. रीति म्हणजे शब्दांची विशिष्ट प्रकारची रचना व रचनेचा हा विशिष्टपणा त्यांतील गुणांवर अवलंबून असतो

असें त्याचें मत आहे. 'रीतिरात्मा काव्यस्य। विशिष्टा पदरचना रीतिः। विशेषो गुणात्मा।' या सूत्रांत त्याचा सिद्धान्त दिसून येतो (काव्या. सू. १.२.६–८). वैदर्भी, गौडीया व पाञ्चाली अशा तीन रीति होत. वैदर्भी रीतीत दाही गुण दिसतात, गौडीया रीतीत ओजः हा गुण विशेषेकरून झळकतो व पाञ्चाली रीतींत माधुर्य व सौकुमार्य या गुणांचे विशेष प्राबल्य असतें असें वामन म्हणतो (१.२.११-१३). 'गाहन्तां महिषा निपानसलिलं' इत्यादि शाकुन्तलश्लोक (२–६) वैदर्भी रीतीचें उदाहरण, 'दोर्दण्डाञ्चितचन्द्रशेखर-धनुर्दण्डावभङ्गोद्यतष्टंकारध्वनिरार्यबालचरितप्रस्तावनाडिण्डिमः।' इत्यादि महावीर-चरितांतील श्लोक गौडीया रीतीचे व 'ग्रामेऽस्मिन्पथिकाय पान्थ वसति-र्नैवाधुना दीयते।' हा अमरुशतकांतील श्लोक (१३१) पाञ्चाली रीतीचे उदाहरण म्हणून वामनानें दिले आहेत. विदर्भ देशांत जी विशेषतः आढळून येते ती वैदर्भी इत्यादि त्या रीतिसंज्ञांची व्युत्पत्ति तो देतो. 'विदर्भादिषु दृष्टत्वात्तत्समाख्या' असे त्याचे सूत्र असून (१-२-१०) त्यावरील वृत्तीत तो म्हणतो 'विदर्भ–गौड–पाञ्चालदेशेषु तत्रत्यैः कविभिर्यथास्वरूपमुपलब्धत्वाद्देश-समाख्या। न पुनर्देशैः किञ्चिदुपक्रियते काव्यानाम्।'. नाट्यशास्त्रकर्ता, दण्डी व वामन यांनी निरनिराळ्या गुणांची जी लक्षणें दिली आहेत, त्यांत कांहीं ठिकाणीं साम्य असले तरी बऱ्याच ठिकाणी भिन्नपणाच फार दिसून येतो. विस्तारभयास्तव त्या लक्षणांची साग्र तुलना येथें करीत नाही. एक दोन उदाहरणे मात्र घेऊं. ओजोगुणाचें लक्षण नाट्यशास्त्रांत 'समासवद्भिर्विविधैर्विचित्रैश्च पदैर्युतम्। सातु-स्वरै (सानुस्वारै) रुदारैश्च तदोजः परिकीर्त्यते॥' असे केले असून (१६, ९९) दण्डीनें 'ओजस्समासभूयस्त्वम्' असे (१, ८०) व वामनाने 'गाढबन्धत्व-मोजः' (३, १, ५) व 'अर्थस्य प्रौढिरोजः' (३, २, २) असे केलें आहे. समाधिगुणाचें लक्षण 'अभियुक्तैर्विशेषस्तु योर्थस्यैवोपलभ्यते। तेन चार्थेन संपन्नः समाधिः परिकीर्त्यते।' असे नाट्यशास्त्रांत (१६, ९७) केले असून, 'आरोहाव-रोहक्रमः समाधिः' (३, १, १२) व 'अर्थदृष्टिः समाधिः' (३, २, ६) असें काव्यालंकारसूत्रांत केलें आहे. दंडीचे लक्षण 'अन्यधर्मस्ततोऽन्यत्र' इत्यादि वर दिलेंच आहे. वस्तुतः अलंकारांचे महत्व काव्यांत गौण असून अलंकारांशिवाय-हि काव्य असूं शकतें, असे असतांहि अलंकारसंप्रदायांत अलंकाराचें प्राधान्य मानिलें आहे, ह्या गोष्टीचा विचार केल्यास गुणांना किंवा त्या गुणांमुळें होणाऱ्या

रीतींना अधिक महत्व देणाऱ्या रीतिसंप्रदायाने अलंकारसंप्रदायाहून साहित्य-शास्त्राच्या विकासाच्या दृष्टीनें खरी प्रगति केली असें म्हटलें पाहिजे. काव्याचें जीवित कशांत आहे याचा शोध रीतिसंप्रदायाला जरी पुरा लागला नाही, तरी सत्याच्या जवळ जवळ तो गेलेला आहे. अलंकार या अनवश्यक गोष्टीला काव्य-जीवित न मानतां गुणांना ते स्थान या संप्रदायाने दिले. पण ते गुणहि वस्तुतः कोणत्या तरी वस्तूचे होत व ती वस्तु गुणांहून वेगळी आहे ही कल्पना रीतिसंप्रदायालाहि आलेली नव्हती. म्हणूनच ध्वनिकाराने ' अस्फुटस्फुरितं काव्यतत्त्वमेतद् यथोदितम् । अशक्नुवद्भिर्व्याकर्तुं रीतयः संप्रवर्तिताः ॥ ( ३-५२ ) असें रीतिसंबंधानें म्हटलें आहे. रीतिसंप्रदायप्रवर्तकांना काव्याच्या जीविताचे रहस्य अर्धवटच कळलें असल्यामुळे ते त्यांना नीट सांगतां येईना म्हणून त्यांनी रीतींना उचलून धरिलें असा ध्वनिकाराचा भावार्थ आहे. वामनानें ' सादृश्याल्लक्षणा ' म्हणजे वक्रोक्ति अशी जी व्याख्या दिली आहे तीत अविवक्षितवाच्य ध्वनीचे सर्व प्रकार अन्तर्भूत होणार असून कान्तिगुणाच्या लक्षणांत त्यानें रसांचा समावेश केलेला दिसतो. ' दीप्तरसत्वं कान्तिः ' अशी कान्तीची व्याख्या त्यानें केली आहे व त्यांत रसांच्या उद्दीपनानें कान्ति गुण होतो असें म्हटलं आहे (३-२-१४). खरे पाहिले तर गुण हे रसाच्या आश्रयाने असतात व रस हा खरा काव्यात्मा होय. माधुर्यगुण हा शृंगाराच वैशिष्टय होय, व त्याचा पूर्ण परिपोष विप्रलंभशृंगारांत व करुणरसांत होतो. रौद्र वीर व अद्भुत या रसांचें जेथें प्राबल्य असेल तेथें ओजोगुण विशेषकरून आढळतो व प्रसाद गुण सर्व रसांना अवश्य आहे असें ध्वनिकारानें दाखविलें आहे ( ध्वनिकारिका २.८-११ ) भामहानें गुणांचें वर्णन अगदी थोडक्यांत आटोपून माधुर्य, ओजस् व प्रसाद ह्या तीनच गुणांचा निर्देश केला आहे. मम्मट हेमचंद्रादि पुढील ग्रंथकारांनी अनेक गुणांना संक्षेप देऊन माधुर्य ओजस् प्रसाद या गुणत्रयालाच मान्यता दिली व इतर गुणांचा एक तर या तिहींत अन्तर्भाव होतो किंवा ते वस्तुतः गुणस्वरूपच नसून केवळ दोषाभावरूप होत असें म्हटलें आहे. रीतींची संख्याहि निरनिराळ्या ग्रंथकारांनी निरनिराळी सांगितली आहे. काव्यमीमांसाकार राजशेखरानें काव्यमीमांसेंत वामनाच्याच तीन रीति दिल्या आहेत; पण कर्पूरमञ्जरीत त्यानें त्यांचीं नांवें वच्छोमी, माअही व पञ्चालिका अशीं दिली आहे. वैदर्भीच्या जागीं तो वच्छोमी म्हणतो व तो शब्द विदर्भांतील म्हणजे वऱ्हाडांतील सांप्रतच्या वाशिम नांवाच्या

नगराच्या वत्सगुल्म या प्राचीन नांवावरून निघालेला दिसतो. गौडीच्या ऐवजीं राजशेखर मागधी म्हणतो. रुद्रटानें लाटीया ( लाट देशावरून ) रीतीची भर घालून रीतिसंख्या चार सांगितली आहे ( २.४-६ ). वाग्भटालंकारांत दण्डी-प्रमाणेंच वैदर्भी व गौडी या दोनच दिल्या आहेत. पण काव्यानुशासनकार वाग्भटानें वामनाला अनुसरून रीतिसंख्या तीन सांगितली आहे आणि त्या तिहींत आवन्ती, मागधी व लाटी अशा तिहींची भर घालून भोजानें सरस्वतीकंठाभरणांत सहा रीति सांगितल्या आहेत.

## १२ वक्रोक्तिसंप्रदाय.

संस्कृत वाङ्मयांत वक्रोक्ति शब्द फार प्राचीन काळापासून आढळत असून अनेक अर्थीं त्याचा विनियोग केलेला दिसून येतो. वक्रोक्तिनिपुण विलासिजनांचा उल्लेख बाणानें केलेला आहे ( कादम्बरी परिच्छेद ४४ ). परिहास नांवाचा शुक आणि मत्सरग्रस्त सारिका यांच्या कलहाचे विनोदी वर्णन ( क्रीडालाप ) चंद्रापीड करीत असतां त्यांत शुकानें त्याला उद्देशून ' एषाऽपि बुध्यत एवैतावतीर्वक्रोक्तीः । इयमपि जानात्येव परिहासजल्पितानि ।... अभूमिरेषा भुजंगभंगिभाषितानाम् । ' असे म्हटलें आहे. या बाणकृत वर्णनांत वक्रोक्ति म्हणजे क्रीडालाप किंवा परिहासजल्पित असा अर्थ आहे. अमरुशतकांतील ( श्लो. २९ ) ' सा पत्युः प्रथमेपराधसमये सख्योपदेशं विना नो जानाति सविभ्रमाङ्गललना-वक्रोक्ति-संसूचनम् । ' या श्लोकांतहि वक्रोक्ति म्हणजे आडून बोलणे ( अनृजुभणिति ) असा अर्थ आहे. दंडीनें वक्रोक्ति शब्द स्वभावोक्तीचा विरोधी म्हणून योजिलेला असून श्लेषाच्या योगानें वक्रोक्ति साधतां येते असे सांगितले आहे. तो म्हणतो ' श्लेषः सर्वासु पुष्णाति प्रायो वक्रोक्तिषु श्रियम् । भिन्नं द्विधा स्वभावोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम् ॥ ' ( २.३६३ ). तात्पर्य वक्रोक्ति म्हणजे श्लेषावर किंवा द्व्यर्थी शब्दयोजनेवर उभारलेली आणि नित्याच्या उघड व सरळ पद्धतीहून वेगळ्या प्रकारची अशी चमत्कृतिजनक बोलण्याची रीत होय. भामहानें बहुतेक याच अर्थीं वक्रोक्ति शब्द उपयोजिला असून सर्व अलंकारांना वक्रोक्तीचाच आधार असतो, असें म्हटलें आहे ( २.८५ ). ' कोऽलंकारस्तया विना ' असे म्हणून सर्व अलंकारांमध्ये तिची आवश्यकता त्यानें प्रतिपादिलेली आहेच, पण ' वक्राभिधेयशब्दोक्तिरिष्टा वाचा-

मलंकृतिः। ' ( १.३६ ); ' हेतुश्च सूक्ष्मो लेशश्च नालंकारतया मतः । समुदायाभिधानस्य वक्रोक्त्यनभिधानतः ।'( २.८६ ), ' वाचां वक्रार्थशब्दोक्तिरलंकाराय कल्पते ।' ( ५.६६ ), ' वक्रवाचां कवीनां ये प्रयोगं प्रति साधवः ' इत्यादि वचनांतही वक्रोक्तीचें माहात्म्य त्यानें दाखविलें आहे. ' वक्राभिधेय ' इत्यादि भामहवचन लोचनकारांनं उद्धृत केलें असून ' शब्दस्य हि वक्रता अभिधेयस्य च वक्रता लोकोत्तीर्णेन रूपेण अवस्थानम् ' असें त्याचें स्पष्टीकरण केलें आहे. या सर्व ठिकाणी वक्रोक्तीवर जो विशेष भर दिलेला आहे, त्यावरून काव्यासंबंधी दोन अवश्य गोष्टी समजून येतात. काव्यांत ज्या शब्दांची योजना करावयाची ते शब्द जरी सामान्य भाषाप्रचारांतून घेणें अवश्य आहे हे खरे तरी त्यांची निवड सामान्य लोक व्यवहारांत करतात त्याहून काव्यांत ती निराळ्या प्रकारें करावी लागते म्हणजे काव्यांतील भाषासरणि सामान्य वाक्प्रचाराहून भिन्न असते ही एक गोष्ट, आणि दुसरी अशी की सामान्य व्यवहारी माणसाच्या कल्पनेच्या आटोक्यांत येणार नाहींत असे चमत्कृतिपूर्ण वस्तुसंबंध कवि शब्दांनी वर्णितो. वक्रोक्तिजीवितकारानें वक्रोक्ति शब्दाचा विनियोग मुख्यतः याच अर्थी केलेला आहे, पण ही वक्रोक्तीच काव्याचा आत्मा आहे असें म्हणून त्यानें फारच मोठी उडी मारिलेली आहे. असे करण्यांत अलंकारसंप्रदायाच्या हातून जी चूक घडली तीच वक्रोक्तिजीवितकाराकडूनहि घडली आहे. वक्रोक्तिजीवितकाराच्या सिद्धान्ताचें विस्तृत दिग्दर्शन पहिल्या भागांत ग्रंथवर्णनप्रसंगीं केलें आहेच. वक्रोक्ति ही कविप्रतिभेवर अवलंबून आहे असे अलंकारसर्वस्वटीकेंत जयरथ म्हणतो ( पा. ८ ). ' वैदग्ध्यभंगीभणितिः ' ही वक्रोक्तीची कुंतककृत व्याख्या ' विदग्धभणितिभंगीनिवेद्यं वस्तुनो रूपं न नियतस्वभावमिति अवन्तिसुंदरी ' या काव्यमीमांसेंतील (पा.४६) अवन्तिसुंदरीच्या वचनांत आलेल्या शब्दांवरून घेतलेली दिसते. विदग्ध शब्द विद्वत् शब्दाचा प्रतिस्पर्धी म्हणून प्राचीन काळापासून योजण्यांत आलेला असून त्याचा अर्थ चतुरभाषणपटु, रसिकभाषणांत कुशल अशा प्रकारचा आहे. ' प्रसिद्धिश्श्रेयमस्त्येव विदग्धविद्वत्परिषत्सु ' ( ध्वन्या. पा. २३९ ), ' विदग्धपरिषत्सु ' ( ध्व. २०१ ) इत्यादि ठिकाणींहि विदग्ध शब्दाचा तोच अर्थ आहे. मालतीमाधवाच्या प्रथमाङ्कांत ' रमणीय एष वः सुमनसां संनिवेशः ' इत्यादि

द्व्यर्थी शब्द ऐकून मकरंदानें 'अहो वैदग्ध्यम्' असे उद्गार काढिले, त्यांतहि वैदग्ध्य म्हणजे चमत्कृतिजनक भाषण करण्याचें कौशल्य असाच अर्थ आहे. भंगी शब्दाचा अर्थ 'अभूमिरेषा भुजंगभङ्गीभाषितानाम्' हे कादंबरीवाक्य, तशीच 'वाक्यार्थीभूतस्यापि कस्यचित्करुणरसविषयस्य तादृशेन शृङ्गारवस्तुना भङ्गिविशेषाश्रयेण संयोजनं रसपरिपोषायैव जायते' ( ध्वन्या. १६९ ), 'भङ्ग्यन्तरेणोपवर्णिता' ( ध्व. २४१ ), 'शान्तविभावानुभावानामपि शृंगारभङ्ग्या निरूपणं विनेयानुन्मुखीकर्तुं या काव्यशोभा तदर्थं नव दुष्यति' ( लोचन पा. १८० ) या वचनावरून नित्यव्यावहारिक पद्धतीपेक्षा निराळी चमत्कृतिजनक वर्णनपद्धति असा असल्याचें दिसून येईल. भणितिशब्द 'अविदितगुणाऽपि सत्कविभणितिः कर्णेषु वमति मधुधाराम्' या वासवदत्तावाक्यांत, तसाच 'भणितिकृतं वैचित्र्यमात्रं' या ध्वन्यालोकवचनांत ( पा. २४२ ) आला असून विशेष प्रकारची भाषणपद्धति किंवा वर्णनपद्धति असा त्याचाहि अर्थ आहे. कुन्तकाच्या वक्रोक्तिलक्षणाचा हा विचार झाला. पण वामनानें 'सादृश्याल्लक्षणा वक्रोक्तिः' अशी व्याख्या करून वक्रोक्ति हा अलंकार मानिला आहे व त्याचें 'उन्मिमील कमलं सरसीनां कैरवं च निमिमील मुहूर्तात् ।' असे उदाहरण देऊन 'अत्र नेत्रधर्मौ उन्मीलननिमीलने सादृश्याद्विकाससंकोचौ लक्षयतः' असें स्पष्टीकरण केलें आहे. या वामनाच्या लक्षणाप्रमाणें होणारा वक्रोक्ति अलंकार म्हणजे दंडीचा समाधि अलंकार होय. वर ( पान २९५ ) रीतिसंप्रदायाच्या विवेचनांत दंडिकृत समाधिलक्षण दिलें आहेच. दंडीनें त्याचें उदाहरण 'कुमुदानि निमीलन्ति कमलान्युन्मिषन्ति च' असें दिलें आहे व त्याचें स्पष्टीकरण 'इति नेत्रक्रियाध्यासाल्लब्धा तद्वाचिनी श्रुतिः' असें केलें आहे त्यावरून वामनोक्त वक्रोक्ति व दण्डयुक्त समाधि हीं एकच होत हें सहज दिसून येईल. रुद्रटानें वक्रोक्ति हा शब्दालंकार मानिला असून त्याचे काकुवक्रोक्ति व श्लेषवक्रोक्ति असे दोन प्रकार दिले आहेत आणि मम्मट, वाग्भटालंकार, काव्यानुशासनकार वाग्भट, एकावलीकार, हेमचंद्र व विश्वनाथ यांनीं त्याचा अनुवाद केला आहे. या वक्रोक्तीचीं उदाहरणें साहित्यदर्पणांत 'के यूयं स्थल एव संप्रति वयं प्रश्नो विशेषाश्रयः किं ब्रूते विहगः स वा फणिपतिर्यत्रास्ति सुप्तो हरिः ।' इत्यादि व 'काले कोकिलवाचाले सहकारमनोहरे । कृतागसः परित्यागात्तस्याश्चेतो न दूयते'

अशी दिली आहेत. *रुय्यकानें वक्रोक्ति हा अर्थालंकार मानिला असून ' वक्रोक्ति-शब्दश्चालंकारसामान्यवचनोपीहालंकारविशेषे संज्ञितः । ' अशी टीप दिली आहे ( अलं. स. पान १७७ ). यावरून रुद्रट व रुय्यक यांची वक्रोक्ति दंडी भामह व कुंतक यांच्या वक्रोक्तीहून संकुचित स्वरूपाची आहे हे उघड होते. वक्रोक्तिशब्दाच्या जागी किंवा तशाच अर्थी कित्येक साहित्यग्रंथांत विच्छित्ति व वैचित्र्य असे शब्दहि योजिलेले आहेत. '**विच्छित्तिशोभिनैकेन**...ध्वनिना भाति भारती ' ( ध्वन्या. पा. १३० ), ' उपमा**विच्छित्ति**प्रकाराणामसंख्यत्वात्, ' ' अन्यस्यापि **वैचित्र्यस्य** शक्योत्प्रेक्षत्वात् ' ( लोचन पा. ५ ) इत्यादि अनेक स्थळीं हे शब्द आढळतात. वक्रोक्तिसंप्रदाय खरें म्हटले तर अलंकारसंप्रदायाचीच एक बाजू असल्यामुळें त्याला स्वतंत्र स्थान देण्याची विशेष आवश्यकता नाही.

## १३ ध्वनिसंप्रदाय

साहित्यशास्त्रविषयक संप्रदायांत ध्वनिसंप्रदायानें विशेष महत्त्वाचें स्थान मिळविलेलें आहे. त्याचें स्वरूपवर्णन ध्वन्यालोकाच्या रूपरेखेत पूर्वी केले आहे, त्यावरून ध्वनिकल्पना म्हणजे रसकल्पनेचा विस्तारच आहे असें समजून येईल. दोघांमध्ये भेद एवढाच की रसकल्पनेला संपूर्ण नाटकग्रंथाचा आश्रय पाहिजे, तर ध्वनिकल्पनेला लहानसें काव्यप्रचुर वाक्यहि पुरते. विभाव, अनुभाव इत्यादिकांच्या आविष्करणानें शृंगार, करुण इत्यादि रसांचा परिपोष करणें हा नाटकग्रंथांचा मुख्य उद्देश असतो व त्यामुळें रसकल्पनेच्या मागें कांही तरी सविस्तर काव्यरचना पाहिजे असते. एखादाच श्लोक घेतला तर तो कितीहि सुंदर असला तरी त्यांत पूर्ण रस परिपोषाला पुरेसा वाव असणं शक्य नाही; पण त्यांत रसपरिपोषाला अवश्य अशी एखाद दुसरी गोष्ट अन्तर्भूत करतां येण्यासारखी मात्र असते. तेव्हां रस हाच काव्याचा आत्मा असे ठरविल्यास असली मनोहर सुटीं पद्यें काव्यकक्षेच्या बाहेर ठेवावी लागतील. रस हा केव्हांहि सूचित केलेला असतो, तो प्रत्यक्ष वर्णिलेला नसतो हे पूर्वी सांगितलेच आहे. तोच कोटिक्रम स्वीकारून ध्वनिकाराने असे प्रतिपादिलें कीं रमणीय असा व्यङ्ग्य म्हणजे सूचित होणारा अर्थ ज्यांत

---

*विशेषाश्रय म्हणजे वि ( गरुड ), शेष ( नाग ) यांसंबंधी. दुसऱ्या उदाहरणांत ' न दूयते ' हा प्रश्न समजून त्याचें ' दुःखित होतेच ' असें विध्यर्थी पर्यवसान आहे, म्हणून ही काकुवक्रोक्ति. काकु म्हणजे अन्यार्थदर्शक स्वरभेद.

असेल, तेंच काव्य उत्तम काव्य या पदवीला पात्र होतें. ध्वन्यालोककार म्हणतो, ' अयमेव हि महाकवेर्मुख्यो व्यापारो यद्रसादीनेव मुख्यतया काव्यार्थीकृत्य तद्व्यक्त्यनुगुणत्वेन शब्दानामर्थानां चोपनिबन्धनम् । एतच्च रसादितात्पर्येण काव्यनिबन्धनं भरतादावपि सुप्रसिद्धमेवेति...। रसादयो हि द्वयोरपि तयोर्जीवितभूताः ।' ( ध्व. पा. १८१-८२ ); ' सारभूतो ह्यर्थः स्वशब्दानभिधेयत्वेन प्रकाशितः सुतरामेव शोभामावहति । प्रसिद्धिश्चेयमस्त्येव विदग्धविद्वत्परिषत्सु यदभिमततरं वस्तु व्यङ्ग्यत्वेन प्रकाश्यते न साक्षाच्छब्दवाच्यत्वेनैव ।' ( ध्व. पा. २३९ ). कवीनें रस हें ध्येय पुढें ठेवून त्याचा परिपोष होईल अशी शब्दांची व अर्थाची रचना केली पाहिजे; भरतादि ग्रंथकारांचें हेच मत होतें. साधें काव्य असो कीं नाटक असो दोघांचेंहि जीवित रसच होत. याप्रमाणें रस हा काव्याचा तात्पर्यार्थ असला तरी तो शब्दांनीं स्पष्टपणें न सांगतां थोड्या निराळया शब्दांनीं सूचित केला तरच तो शोभतो. जी गोष्ट मुख्यत्वेंकरून सांगावयाची तिचें स्पष्ट कथन न करतां सूचित होईल अशा दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाची असा रसिक पंडितांचा परिपाठच आहे. कोणत्याहि शब्दांतून किंवा वाक्यांतून कसला तरी व्यङ्ग्यार्थ काढितां येण्यासारखा असला तरी वाटेल त्या वाक्याला किंवा शब्दांना काव्य म्हणतां येत नाहीं. विशिष्टगुणयुक्त शब्दांची विशिष्ट रीतीची रचना करून तींतून मनोहर असा ध्वनितार्थ निघेल असें केल्यासच त्या शब्दरचनेला काव्यत्व येतें. या संबंधानें लोचनकार म्हणतो ' तेन सर्वत्रापि न ध्वननसद्भावेऽपि तथा व्यवहारः । आत्मसद्भावेऽपि क्वचिदेव जीवव्यवहार इत्युक्तं प्रागेव । ' ( पा. २८ ). सर्वत्र आत्म्याचें अस्तित्व असलें तरी जीवत्व कांहीं विशिष्ट परिस्थितीतच असतें, तसें ध्वनियुक्तत्व प्रतिवाक्यांत असले तरी प्रत्येक वाक्याला काव्यत्व नसतें. व्यंग्यार्थाचे रसादि, अलंकार व वस्तु असे तीन प्रकार ध्वनिकारानें केले आहेत. रस व त्यांचे भाव किंवा त्यांचे आभास हे जेथें ध्वनित होतात तेथें रसादि व्यंग्य असतें. कित्येक ठिकाणीं अलंकार स्पष्ट न सांगतां सूचित केलेला असतो, तेथें अलंकारध्वनि असतो. वस्तुध्वनींत शब्दाच्या वाच्यार्थानें जो विषय समजतो त्याहून निराळा विषय व्यंग्यार्थानें समजतो. रसध्वनींचें स्पष्टीकरण करण्याचें कारण नाहीं. कारण रस हा नित्य ध्वनितच असला पाहिजे हें अनेक वेळां सांगण्यांत आलें आहे. मनोभावना प्रबळ होऊन त्या आपोआप शब्दरूपानें बाहेर पडल्या म्हणजे काव्य होतें असा ध्वनिकाराचा अभिप्राय असून तो त्यानें ' क्रौञ्चद्वंद्ववियोगोत्थः शोकः

श्लोकत्वमागतः ।' यांत व्यक्त केला आहे ( पा. २६ ), क्रौञ्च पक्षांच्या प्रेमी जोडप्यांतील एकाचा निषादानें वध केल्यामुळें तो देखावा पाहून वाल्मीकीच्या मनांत ज्या वेळीं भावनांचा आवेग उत्पन्न झाला, त्या वेळीं त्याच्या प्रतिभाशक्तीला स्फुरण आले व ' मा निषाद ' इत्यादि भावनामय गीत त्याच्या तोंडून बाहेर आलें. पण वाल्मीकीला स्वतः दुःख झालें होतें किंवा एखादा वाचक असलें भावनामय गीत वाचतांना दुःखित होतो अशी कांही वस्तुस्थिति नाहीं. कारण करुणरसमय काव्य वाचल्यानें वाचकाला केवळ दुःख झालें असतें, तर तसलें काव्य वाचण्याचा उपद्याप कोणता वाचक करिता ? काव्यवाचनानें रसिकांना एक प्रकारचा आनंद होतो, म्हणून तर ते काव्य वाचितात. याविषयीं लोचनकार म्हणतो, ' तेन रस एव वस्तुत आत्मा । वस्त्वलंकारध्वनी तु सर्वथा रसं प्रति पर्यवस्येते इति वाच्यादुत्कृष्टौ तौ इत्यभिप्रायेण ध्वनिः काव्यस्यात्मेति सामान्येनोक्तम् ' ( पा. २७ ). तसेंच ध्वन्यालोकांत म्हटले आहे ( पान २२३ ) ' प्राथमिकानामभ्यासार्थिनां यदि परं चित्रेण व्यवहारः प्राप्तपरिणतीनां तु ध्वनिरेव प्राधान्येन काव्यमिति स्थितमेतत् ।'. काव्याचा आत्मा रस हेच एकंदरींत खरें. वस्तुध्वनि व अलंकारध्वनि यांचें पर्यवसान रसांतच शेवटीं होतें, यास्तव त्यांनाहि वाच्यार्थाहून वरच्या प्रतीचे मानून काव्याचा आत्मा ध्वनि असा सामान्य अभिप्राय सांगितला. नवशिक्या काव्याभ्यासूंचें जरी अलंकारप्रचुर चित्रकाव्यानेंच काम भागतें, तरी विवेचकशक्ति प्रगल्भ झाली असतां ध्वनिकाव्य हेंच मुख्यतः काव्य वाटूं लागतें यांत शंका नाहीं.

ध्वन्यालोकांत ध्वनिकाव्य, गुणीभूतव्यङ्ग्य आणि चित्र असे काव्याचे तीन प्रकार सांगितले असून चित्रकाव्यांत सर्व शब्दालंकार व अर्थालंकार यांचा समावेश केला आहे. ' वाच्यवाचकचारुत्वहेतूनां विविधात्मनाम् । रसादिपरता यत्र स ध्वनेर्विषयो मतः ।( ध्व. २.४ ). शब्दालंकार, अर्थालंकार व गुण इत्यादि सौंदर्योत्पादक कारणांनीं जेथे मुख्यार्थ जो रस त्याचाच परिपोष होतो तें ध्वनिकाव्य होय. ' प्रकारोऽन्यो गुणीभूतव्यङ्ग्यः काव्यस्य दृश्यते । यत्र व्यङ्ग्यान्वये वाच्यचारुत्वं स्यात्प्रकर्षवत् ॥ ( ३-३५ ) ज्यांत व्यङ्ग्य अर्थापेक्षां वाच्य अर्थ अधिक सुंदर असतो तें गुणीभूतव्यङ्ग्य काव्य होय; व या दोन्हीं प्रकारांहून निराळें तें चित्रकाव्य होय, ' ततोऽन्यत्तच्चित्रमित्यभिधीयते ।' ( ३-४२ ) चित्र काव्याचे शब्दचित्र व वाच्यचित्र असे दोन भेद केलेले पूर्वीं सांगितले

आहेतच. याप्रमाणे काव्याचे प्रकार व त्यांची लक्षणें सांगितल्यावर ध्वन्यालोककारानें रसविहीन काव्य करून व्यर्थ कालक्षेप करूं नये अशी कवींना सूचना दिली आहे. तो म्हणतो ‘ एतच्च चित्रं कवीनां विशृङ्खलगिरां रसादितात्पर्यमनपेक्ष्यैव काव्यप्रवृत्तिदर्शनादस्माभिः परिकल्पितम् । इदानींतनानां तु न्याय्ये काव्यनयव्यवस्थापने क्रियमाणे नास्त्येव ध्वनिव्यतिरिक्तः काव्यप्रकारः । यतः परिपाकवतां कवीनां रसादितात्पर्यविरहे व्यापार एव न शोभते ।’ ( पा. २२१ ). चित्रकाव्य हा प्रकार सांगितला याचे कारण कांही स्वैरकवि रसादिकांचा विचार न करितांहि काव्य करताना आढळतात एवढेंच होय. पण काव्याचें योग्य तें लक्षण करून त्याचे विवरण करीत असतांना ध्वनिकाव्याशिवाय दुसरा काव्याचा प्रकारच नाही असें समजले पाहिजे. परिणत बुद्धीचे कवि असतील तर त्यांना रसविरहित काव्य करणे शोभणारच नाही. अनुप्रास व यमक याविषयी तो म्हणतो ‘ शृंगारस्याङ्गिनो यत्नादेकरूपानुबंधनात् । सर्वेष्वेव प्रभेदेषु नानुप्रासः प्रकाशकः ॥ ध्वन्यात्मभूते शृंगारे यमकादिनिबन्धनम् । शक्तावपि प्रमादित्वं विप्रलंभे विशेषतः ॥’ ( २,१५-१६ )–शृंगार रस प्रधानविषय असतांना अनुप्रास व यमक हे रमणीय होतच नाहीत, उलट रसहानि मात्र करतात. विप्रलभ शृंगारांत तर हा प्रकार विशेष दिसून येईल. याप्रमाणें ध्वनीचें काव्यात्मत्व स्थापित केल्यावर ध्वनिकारानें गुण व अलंकार यांचे स्थान निश्चित केले आहे. ‘ तमर्थमवलम्बन्ते येऽङ्गिनं ते गुणाः स्मृताः । अंगाश्रितास्त्वलंकारा मन्तव्याः कटकादिवत् ॥ (२,७). आत्मभूत जो मुख्यार्थ त्यावर अवलंबून असणारे ते गुण होत व काव्याच्या अंगावर असलेले ते अलंकार होत. पुरुषामध्ये जसा शौर्य हा गुण असतो व हातांतील सलकडें हा जसा अलंकार तसे माधुर्यादि हे काव्याचे गुण व रूपकादि हे अलंकार होत. याविषयीं ध्वन्यालोकांतील वृत्तीत म्हटलें आहे, ‘ये तमर्थं रसादिलक्षणमङ्गिनं सन्तमवलम्बन्ते ते गुणाः शौर्यादिवत् । वाच्यवाचकान्यङ्गानि ये पुनराश्रितास्तेऽलङ्कारा मन्तव्याः कटकादिवत् इति ।’ (पा. ७८). रीतींचा अन्तर्भाव लोचनकारानें गुणांतच केलेला आहे, ‘ रीतिर्हि गुणेष्वेव पर्यवसायिता ।’ (पान २३१ ). ध्वनिकाराने तोच पक्ष घेतलेला असून गुणवर्णनांतच रीतींची व्यवस्था लाविली आहे. रीतिसंप्रदायप्रवर्तकांनीं रीति सांगितल्या त्या त्यांना ध्वनीचें स्वरूप अर्धवट कळल्यामुळें तें स्पष्ट करून सांगतां येईना म्हणून होय, असे ध्वनिकारांच म्हणणं असून त्याचा पूर्वीं निर्देश केला आहेच. त्यानें संघटना म्हणून एक तत्त्व सांगितले असून त्याचे असमासा,

मध्यमसमासा, व दीर्घसमासा असे तीन प्रकार दिले आहेत. यांतील प्रत्येक प्रकार कांहीं विशिष्ट रसांना सामान्यतः अनुकूल असतो. या संघटनेशीं गुणांचा मात्र कांहीं संबंध नाहीं, म्हणजे गुण हे संघटनात्मक नव्हेत व संघटनेवर अवलंबूनहि नाहींत. संघटनेचें औचित्यानौचित्य रस, वक्ता व वर्ण्यविषय यांवरून ठरतें ( पा. १३३-१३५ तस्मान्न गुणाः संघटनास्वरूपाः । न च संघटनाश्रयाः गुणाः ). उपनागरिकादि शब्दावलंबी वृत्ति व कैशिक्यादि अर्थावलंबी वृत्ति याहि रीतिसमानच होत, म्हणजे काव्यात्मा जो रस त्यावरच त्याहि अवलंबून असतात. ध्वनिकार म्हणतो ‘ तत्र रसानुगुण औचित्यवान् वाच्याश्रयो यो व्यवहारस्ता एता कैशिक्याद्या वृत्तयः । वाचकाश्रयाश्चोपनागरिकाद्याः । वृत्तयो हि रसादितात्पर्येण संनिवेशिताः काममपि नाटयस्य काव्यस्य च च्छायामावहन्ति । रसादयो हि द्वयोरपि तयोर्जीवितभूताः । इतिवृत्तादि तु शरीरभूतमेव । ’ ( पा. १८२ ). दुसऱ्या ठिकाणी तो म्हणतो ‘ यदि वा वृत्तीनां भरतप्रसिद्धानां कैशिक्यादीनां काव्यालंकारान्तरप्रसिद्धानामुपनागरिकाद्यानां वा यदनौचित्यमविषये निबन्धनं तदपि रसभंगहेतुः ॥ ’ ( पा. १६३ ), ‘ अस्मिन्व्यङ्ग्यव्यंजकभावविवेचनमये काव्यलक्षणे ज्ञाते सति याः काश्चित्प्रसिद्धा उपनागरिकाद्याः शब्दतत्त्वाश्रया वृत्तयो याश्चार्थतत्त्वसंबद्धाः कैशिक्यादयस्ताः सम्यग्रीतिपदवीमवतरन्ति । अन्यथा तु तासामदृष्टार्थानामिव वृत्तीनामश्रद्धेयत्वमेव स्यान्नानुभवसिद्धत्वम् । ’ ( पा. २३१-३२ ). उपनागरिका, परुषा व ग्राम्या ( कोणी तिला कोमला म्हणतात ) या तीन वृत्ति उद्भटानें, मम्मटानें व दुसऱ्याहि कित्येक साहित्यकारांनी सांगितल्या आहेत. उद्भटानें या वृत्तींचीं लक्षणे अशीं दिलीं आहेत:—
‘ शषाभ्यां रेफसंयोगैष्टवर्गेण च योजिता । परुषा नाम वृत्तिः स्याद् ह्लह्वह्याद्यैश्च संयुता । सरूपसंयोगयुतां मूर्ध्नि वर्गान्त्ययोगिभिः । स्पर्शैर्युतां च मन्यन्ते उपनागरिकां बुधाः ॥ शेषैर्वर्णैर्यथायोगं कथिता कोमलाख्यया ॥ ’. उपनागरिका शृङ्गाराला अनुरूप, परुषा वीराला व रौद्राला आणि कोमला हास्यरसाला अनुरूप आहे. रुद्रटानें मधुरा, ललिता, प्रौढा, परुषा व भद्रा अशा पांच वृत्ति सांगितल्या आहेत (२,१९). नाटयशास्त्रांत भारती, कैशिकी, सात्वती व आरभटी अशा चारच वृत्ति वर्णिल्या आहेत ( अध्याय २० ). नाटकाचें कथानक किंवा इतिवृत्त हें त्याचें शरीर होय व रस त्याचा आत्मा होय असें नाट्यशास्त्र म्हणतें ‘इतिवृत्तं हि नाटयस्य शरीरं परिकीर्तितम् । ’ ( १९-१ ). वृत्ति या नाटयाच्या जननी होत ‘ वृत्तयो

नाट्यमातरः ' असें नाट्यशास्त्र × म्हणते ( २०, ६२ ). प्रत्येक वृत्ति कांहीं विशिष्ट रसालाच अनुरूप असते ( नाट्य. २०, ६३-६४ ). राजशेखरानें प्रवृत्ति, वृत्ति व रीति यांमध्यें ' वेषविन्यासक्रमा प्रवृत्तिः ', ' विलासविन्यासक्रमो वृत्तिः, ' 'वचनविन्यासक्रमो रीतिः ' असा भेद दाखविला आहे. असो. ध्वन्यालोकांत संपूर्ण अशा काव्यचिकित्साशास्त्राचे जे घटक भाग म्हणून घालून दिले आहेत त्यांचा अनुवाद सर्व अर्वाचीन साहित्यकारांनी निःशकपणे केला आहे व त्यावरूनच ' ध्वनिकृतामालंकारिकसरणिव्यवस्थापकत्वात् ' या रसगंगाधरोक्त वचनांत म्हटल्याप्रमाणे ( पा. ४२५ ) ध्वन्यालोककाराला **आलंकारिकसरणिव्यवस्थापक** ही पदवी प्राप्त झाल्यासारखी आहे. पण ध्वनिकल्पनेला अशी सर्वसाधारण मान्यता प्राप्त होण्यापूर्वी प्रतीहारेन्दुराज, वक्रोक्तिजीवितकार कुन्तक, भट्टनायक व व्यक्तिविवेककार महिमभट्ट यांच्या निष्ठुर अशा प्रतिकूल टीकांचे भयंकर आघात सोसण्याच्या दिव्यांतून तिला जावें लागलें आहे.

## १४ काव्याचें विविध वर्गीकरण

अलीकडील पाश्चात्त्य साहित्यकारांप्रमाणेंच प्राचीन संस्कृत साहित्यवेत्त्यांनींहि काव्याचे श्रव्य, गेय व दृश्य असे विभाग केले आहेत. काव्याचें वर्गीकरण विविध असून ते निरनिराळ्या दृष्टींनीं केलेलें आढळतें. दंडीनें प्रथम गद्य, पद्य व मिश्र असे बाह्य स्वरूपावरून काव्याचे वर्ग केले. काव्याला गद्यपद्यादि बाह्य स्वरूपाचें बंधन किती आहे याविषयीं इंग्रजी साहित्यकोविदांत मतभेद असला तरी आतां प्रो. मोल्टन प्रभृति थोड्याशा पंडितांशिवाय इतरांनी काव्याला पद्याची आवश्यकता सर्वस्वी आहे हेंच मत स्वीकारिलेलें आढळतें. पण संस्कृत साहित्यकारांना काव्याला पद्याची आवश्यकता आहे असें मुळींच वाटत नाही व एकानेंहि तसें प्रतिपादन केलेलें नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट पद्याहून गद्यानेंच महत्त्व कित्येकांनी वर्णिलें असून ' गद्यं कवीनां निकषं वदन्ति ' म्हणजे गद्यांतच कवीच्या कवित्वशक्तीची खरी पारख होते असें म्हटलें आहे ( काव्या. सू. १-३-२१ ). पद्यमय काव्याचे सर्गबन्ध किंवा महाकाव्य, मुक्तक किंवा सुटे श्लोक, कुलक किंवा पंचश्लोकी, कोष व संघात म्हणजे परस्परांशीं संबद्ध नसलेल्या पद्यांचा संग्रह असे आणखी प्रकार दंडीनें सांगितले आहेत.

× ' मातरः ' याचा अर्थ ' व्यवहारमातृका ' वगैरे शब्दांत आहे त्याप्रमाणें ' मूलतत्त्वं ' असाहि होईल

गद्यांत कथा, आख्यायिका व चम्पू हे प्रकार तो घालितो. मिश्रकाव्यांत नाटक व त्याचे दुसरे विविध प्रकार यांचा अंतर्भाव होतो. दंडीचें दुसरें वर्गीकरण भाषा-मूलक आहे व तदनुसार संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश असे तीन प्रकार त्यानें सांगितले आहेत. पण याच तत्त्वावर रुद्रटाने ( २, ११ ) संस्कृत, प्राकृत, मागध, पिशाच, शूरसेन व अपभ्रंश असे सहा काव्यभेद केले आहेत. भामहानेंहि काव्याचें वर्गीकरण दोन रीतींनी केलें आहे. गद्य व पद्य असे त्याचें एक वर्गीकरण असून संस्कृत, प्राकृत व मिश्र असें दुसरें आहे ' शब्दार्थौ सहितौ काव्यं गद्यं पद्यं च तद् द्विधा । संस्कृत प्राकृतं चान्यदपभ्रंश इति त्रिधा ॥ ' ( १-१६ ) वामनानेंहि गद्य व पद्य असे दोन भेद केलेले असून गद्याचे वृत्तगन्धि म्हणजे पद्यसमान, चूर्ण, व उत्कलिकाप्राय असे तीन प्रकार दिले आहेत व पद्याचे पुष्कळ प्रकार आहेत असें म्हटलें आहे; पण गद्य व पद्य ह्या दोन्हीं प्रकारांचे अनिबद्ध व निबद्ध असे दोन उपप्रकार तो करितो. निबद्ध काव्याला प्रबंध असे नांव आहे. संपूर्ण लांबलचक काव्यग्रंथांत ( सन्दर्भांत ) त्याच्या मते नाटक श्रेष्ठ होय, ' सन्दर्भेषु दशरूपकं श्रेयः' ( १-३-३० ). हेमचंद्राने प्रेक्ष्य व श्रव्य असे दोन काव्यभेद सांगितले असून प्रेक्ष्याचे पाठ्य व गेय असे उपप्रकार व त्या उपप्रकारांचे आणखी उपोपप्रकारहि अनेक सांगितले आहेत. श्रव्यांत महाकाव्य, आख्यायिका, कथा, चंपू, व अनिबद्ध असे प्रकार आहेत. भाषामूलक भेदहि हेमचंद्रानें सांगितले आहेत; संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, व ग्राम्यापभ्रंश. कथा या काव्यभेदाचे आख्यान, निदर्शन, प्रवह्लिका, मतल्लिका, मणिकुल्या, परिकथा, खण्डकथा, सकलकथा, व उपकथा असे पोट प्रकार तो करितो. ध्वन्यालोकांत ( पा. १४१ ) ' काव्यस्य प्रभेदा मुक्तकं संस्कृतप्राकृतापभ्रंशनिबद्धम् । संदानित–विशेषक–कलापककुलकानि पर्यायबन्धः परिकथा सकलकथा खण्डकथा सर्गबन्धोऽभिनेयार्थमाख्यायिका कथा इत्येवमादयः । ' असे काव्यप्रभेद सांगितले असून लोचनकारानें त्यांचीं लक्षणे दिलीं आहेत व इत्यादि शब्दांचे सार्थक्य करण्यासाठीं चम्पूची त्यांत भर घातली आहे.

## १५ काव्यदोष.

सर्व साहित्यग्रंथांत काव्यदोष या विषयाला महत्त्व दिलेले आहे. नाट्यशास्त्रांत दहा काव्यदोष सांगितले आहेत. अर्थहीन, एकार्थ, गूढार्थ, अर्थान्तर, विसन्धि, शब्दच्युत, विषम, भिन्नार्थ, अभिप्लुतार्थ व न्यायदपेत. दंडीनेंहि

दहाच सांगितले असून भामहानें अकरा दिले आहेत. पहिल्या भागांत नवव्या परिच्छेदांत (पान ६१) या दोषांची नामावली दिलीच आहे. या दोषविभागांत पददोष, वाक्यदोष, पदार्थदोष व वाक्यार्थदोष असें शास्त्रीय वर्गीकरण मात्र त्यांनीं केलेलं नाहीं. तें वामनानें प्रथम केलेलें आढळतें. वामनाचें हें दोषांचें वर्गीकरण मम्मटादि अर्वाचीन ग्रंथकारांनी स्वीकारलें असून त्यांनीं पददोष, वाक्यदोष, अर्थदोष असे भेद केले आहेत. मम्मटानें याशिवाय रसदोषहि सांगितले आहेत ( ७ वा उल्लास ). काव्यांत रसपरिपोष करण्यासाठीं कित्येक प्रकारचें औचित्य सांभाळावें लागतें व मुख्यरसाच्या परिपोषाला प्रतिबंधक अशा गोष्टी टाळाव्या लागतात असा जो नियम* दिला आहे, त्यामुळें रसदोषाचा विषय पुढें आला. काव्यप्रकाशाच्या दशमोल्लासांत मम्मटानें अलंकारांचे कित्येक दोष निर्दिष्ट केले असून ७ व्या उल्लासात वर्णिलेल्या निरनिराळ्या दोषांतच त्यांचाहि समावेश होतो असें दाखविलें आहे.

## १६ साहित्यशास्त्र व इतर शास्त्रें.

साहित्यशास्त्राच्या वाढीवर इतर शास्त्रांचा कसा व काय परिणाम झाला हें आता थोडक्यांत दाखवावयाचें आहे. व्याकरणशास्त्राचा साहित्यशास्त्रावर फार मोठा परिणाम झाला. ध्वन्यालोकासंबंधीं वरती केलेल्या विवेचनांत ध्वनिवादाची सूचना व्याकरणशास्त्रांतील स्फोटवादावरून मिळाली असें ध्वन्यालोककाराला संमत असल्याचा उतारा दिलेला आहे ( पा. १२३; ध्वन्यालोक पान ४७-४८ ). त्याचप्रमाणें काव्यप्रकाशामध्यें 'बुधैर्वैयाकरणैः प्रधानभूतस्फोटरूपव्यंग्यव्यञ्जकस्य शब्दस्य ध्वनिरिति व्यवहारः कृतः । ततस्तन्मतानुसारिभिरन्यैरपि न्यग्भावितवाच्यव्यंग्यव्यञ्जनक्षमस्य शब्दार्थयुगलस्य' ( उल्लास १ ) असें सांगितलें आहे. या ठिकाणीं स्फोटवादाची अगदी थोडक्यांत कल्पना आणून दिली पाहिजे. शब्द कशाला म्हणावें या बाबतीत दोन मतें आहेत. वर्ण हाच शब्द असें एक आहे. हें मत भगवान् उपवर्षाचें आहे व तेच शंकराचार्यांनाही मान्य होतें असें ब्रह्मसूत्रभाष्यावरून ( १, ३, २८ ) दिसतें. 'गौः' हा शब्द आपण

*अनौचित्यादृते नान्यद्रसभङ्गस्य कारणम् । प्रसिद्धौचित्यबंधस्तु रसस्योपनिषत्परा ॥ ( ध्व. लो. पान १४५ ). या रसानुरूप व रसविरोधी गोष्टी उद्योत ३ का. १०–१४ व का. १८–१९ यांत अनुक्रमें दिल्या आहेत.

गाईला लावतों. यांत गकार, औकार व विसर्जनीय असे तीन वर्ण आहेत. या प्रत्येक वर्णाचा अर्थ गाय असा आहे, किंवा तिन्ही मिळून आहे हा एक प्रश्न आहे. जर प्रत्येक वर्णाचा अर्थ गाय असेल तर इतर दोन वर्ण व्यर्थ होत; सर्व वर्णामिळून असेल तर तीन वर्ण तीन निरनिराळ्या क्षणीं उच्चारिले जात असल्यामुळें व वर्णाचा उच्चार झाल्याबरोबर तो नष्ट होत असल्यामुळे तीन वर्णांचा सयोग एकाच वेळीं होऊन तिही मिळून अर्थनिष्पत्ति होणं दुष्कर आहे. सर्व वर्ण एक-समयावच्छेदेंकरून प्रतीत होतात असे म्हटले तर ते खरोखर अनुभवाचे विरुद्ध आहे आणि असें म्हणण्यांत हा दोष आहे की मग ' नदी ' व ' दीन ', ' पिक ' व ' कपि ' ह्या दोन शब्दांत तेच वर्ण असल्यामुळे दोन्ही शब्दांचा एकच अर्थ व्हावा. म्हणून या मतवाद्यांचे असे म्हणणे आहे की पूर्वपूर्वींच्या वर्णाची प्रतीति होऊन जे संस्कार मनावर होतात त्यांच्याशी अन्त्यवर्णाच्या उच्चाराबरोबर होणाऱ्या अनुभवाचा मिलाफ होऊन ' गौः ' असा शब्द प्रतीत होतो व त्या पासून ' गाय ' ह्या अर्थाचा बोध होतो. ह्या मताचे विरुद्ध स्फोटवादी आहेत. हे मत पतञ्जलीच्या महाभाष्यांत व भर्तृहरीचे वाक्यपदीयांत विशद केलेलें आहे. स्फोट हा खरोखर शब्द होय. स्फोट म्हणजे ज्ञानरूपी सर्वव्यापी शब्दतत्त्व. ह्या शब्दतत्त्वांत व परब्रह्मांत अभिन्नत्व आहे. तो कूटस्थ व नित्य आहे. हा स्फोट ध्वनींनी अभिव्यक्त होतो. खरोखर पाहिलें असतां वाक्य, पद, वर्ण ही केवळ सोयीसाठीं वैयाकरणांनीं निर्माण केलेली प्रणालिका आहे. तत्त्वतः वाक्य व पदे ह्यांत भेद नाहीं. ज्याप्रमाणें वर्णाचे अवयव म्हणून भिन्न नाहीत त्याप्रमाणेंच खरोखर पदांत वर्ण नाहींत ( पदे न वर्णा विद्यन्ते वर्णेष्ववयवा इव । वाक्यात्पदानामत्यन्तं प्रविवेको न कश्चन ॥ वाक्यपदीय १-७३ ). नाद किंवा ध्वनि हे क्रमानें उत्पन्न होतात. पूर्व पूर्व नादांनीं केलेल्या संस्कारांशीं अन्य ध्वनींचा संयोग झाला म्हणजे बुद्धींत शब्दाच्या प्रतीतीची स्थापना होते. म्हणजे स्फोट हा नादांनी किंवा ध्वनींनी अभिव्यङ्ग्य आहे व नाद किंवा ध्वनि हा अभिव्यञ्जक आहे. ज्याप्रमाणें चंद्रार्चे प्रतिबिम्ब ज्या जलादि पदार्थावर पडेल त्या पदार्थाच्या चलनवलनाप्रमाणे प्रतिबिम्बही क्रियायुक्त भासते त्याप्रमाणें नादाचे ठिकाणीं असणाऱ्या ह्रस्व, दीर्घ, उदात्त, अनुदात्त, द्रुत विलम्बित इत्यादि धर्मांचा आरोप स्फोटावर होतो; अभिव्यंजक जे ध्वनि त्यांच्या क्रमांत फरक असल्यामुळें शब्द भिन्न भासतात ( नादस्य क्रमजातत्वान्न पूर्वो नापरश्च सः । अक्रमः क्रमरूपेण भेदवानिव गृह्यते ॥ प्रतिबिम्बं यथान्यत्र

स्थितं तोयक्रियावशात् । तत्प्रवृत्तिमिवान्वेति स धर्मः स्फोटनादयोः ॥ नादैराहित-बीजायामन्त्येन ध्वनिना सह । आवृत्तपरिपाकायां बुद्धौ शब्दोवधार्यते ॥ वाक्यपदीय १.४८,४९,८६ ). महाभाष्यकाळींही शब्दाबद्दलची ही दोन्ही मतें प्रचलित होतीं असे दिसते ' कस्तर्हि शब्दः । येनोच्चारितेन सास्नालाङ्गूलखरविषाणिनां संप्रत्ययो भवति स शब्दः । अथवा प्रतीतपदार्थकः लोके ध्वनिः शब्द उच्यते ' ( महाभाष्य कीलहार्नप्रत पान १ ) व 'एवं तर्हि स्फोटः शब्द. ध्वनिः शब्दगुणः' ( महाभाष्य पान १८१ ). ज्याप्रमाणे ऐकिल्या जाणाऱ्या वर्णांना वैयाकरण ध्वनि म्हणतात व स्फोट ध्वनिव्यङ्गय आहे असा सिद्धान्त स्थापितात त्याचप्रमाणें साहित्यशास्त्रज्ञही शब्दार्थरूपी काव्याला ध्वनि म्हणतात व त्या काव्याने गूढार्थ अभिव्यक्त होतो असें मानतात म्हणजे स्फोटवादी वैयाकरण व साहित्यशास्त्रज्ञ हे दोघेही ' व्यञ्जकत्व ' ह्या धर्माला प्राधान्य देतात. भामहानें मात्र स्फोटवादाचे निराकरण केलं आहे ( तस्मात्कूटस्थ इत्येषा शाब्दी वः कल्पना वृथा । प्रत्यक्षमनुमानं वा यत्र तत्परमार्थतः ॥ शपथैरपि चादेयं वचो न स्फोटवादिनाम् । नभःकुसुममस्तीति श्रद्दध्यात्कः सचेतनः ॥ स कूटस्थोनपायी च नादादन्यश्च कथ्यते । मन्दाः सांकेतिकानर्थान् मन्यन्ते पारमार्थिकान् ॥ ). शब्दाचा संकेत जाति, गुण, क्रिया आणि द्रव्य या चारांपैकी एकाविषयी असतो असें जें काव्यप्रकाशादि ग्रंथांत ( संकेतितश्चतुर्भेदो जात्यादिर्जातिरेव वा । काव्यप्रकाश उल्लास २ ) प्रतिपादिलें असतें तें महाभाष्यकाराच्या ' चतुष्टयी शब्दानां प्रवृत्ति ' * ह्या वचनाला धरूनच असते. ह्याच विषयाचा अभिधावृत्तिमातृका ( कारिका २ ) व मम्मटाच्या शब्दव्यापारविचार या ग्रंथांत जास्त विचार केलेला आहे. भामहानेहि म्हटलें आहे ' द्रव्यक्रियाजातिगुणभेदात्ते च चतुर्विधाः । यदृच्छाशब्दमित्यन्ये डित्थादि प्रतिजानते ॥ ' ( भामहालंकार ६, २१ ) व शब्दाचा अर्थ अन्यापोहानें सिद्ध होतो असें जें बौद्धांचे मत त्याचे त्यानें खंडन केलें आहे ( भामहालंकार ६, १६–१९ ). काव्यप्रकाशकारानें (उल्लास २) भर्तृहरीच्या वाक्यपदीयाचा आश्रय करून सांगितलें आहे कीं, ' गौः ' या शब्दानें ' गोत्वयुक्त प्राणी ' असा अर्थ होतो, नुसती एक वैयक्तिक गाय असा अर्थ होत नाहीं ( ' उक्तं हि वाक्यपदीये नहि गौः स्वरूपेण गौर्नाप्यगौः गोत्वाभिसंबंधात्तु गौः ' काव्यप्र. २ ). तसेंच अनेकार्थक शब्दाचा संयोगादि कारणांनीं

* हे शब्द महाभाष्यांत [ कीलहॉर्न प्रत व्हाल्यूम १ पान १९ ] आहेत.

एकच अर्थ निश्चित होतो असे सांगून भर्तृहरीच्या वाक्यपदीयांतून ( काण्ड २ श्लोक ३१७–३१८ ) ‘ संयोगो विप्रयोगश्च साहचर्यं विरोधिता । ......काको व्यक्तिः स्वरादयः । शब्दार्थस्यानवच्छेदे विशेषस्मृतिहेतवः ॥ ’ हे दोन श्लोक काव्यप्रकाश, साहित्यदर्पण वगैरे ग्रंथांत उद्धृत केलेले आहेत.

उपमेचे पोटभेद व्याकरणशास्त्राला धरून करण्याची प्रवृत्ति भामहापासूनच सुरू झालेली दिसते. ‘ यथैवशब्दौ सादृश्यमाहतुर्व्यतिरेकिणोः । विनायथेवशब्दाभ्यां समासाभिहिता परा ।......वतिनापि क्रियासाम्यं तद्वदेवाभिधीयते । ’ ( भामहालंकार २, ३१–३३ ). उद्भटानें श्रौती, आर्थी, क्यच्गा, क्यङ्गा इत्यादि उपमेचे प्रकार ( काव्यालंकारसारसंग्रह १, १५ व २१ ) वर्णिले आहेत आणि काव्यप्रकाशकारानें तर उद्भटावरही ताण करून व्याकरणशास्त्रमूलक उपमाभेद अनेक वर्णिले आहेत. अशा प्रकारचे विभाग करण्यांत अलंकारशास्त्रदृष्ट्या कांहीं वैचित्र्य नाही असा शेरा चित्रमीमांसाकार अप्पय्यदीक्षित यांनीं मारिला आहे [ एवमयं पूर्णालुप्ताविभागो......शब्दशास्त्रव्युत्पत्तिकौशलप्रदर्शनमात्रप्रयोजनो नातीवालंकारशास्त्रे व्युत्पाद्यतामर्हति । चि. मी. पान २७ ]. काव्यप्रकाशकारानें विभावनालंकाराची व्याख्या ( क्रियायाः प्रतिषेधेपि फलव्यक्तिर्विभावना ) देतांना क्रिया हा शब्द वैयाकरणांचे सिद्धान्ताला अनुसरून ‘ हेतु ’ ( कारण ) ह्या अर्थी योजिला आहे. वामनाच्या काव्यालंकारांत पांचव्या अधिकरणांत व्याकरणदृष्ट्या कवींनीं कशी शब्दशुद्धि साधावी हें सांगितले आहे व हाच विषय भामहालंकारांतहि ( परिच्छेद ६, ३०–६१ ) विशद केलेला आहे.

तर्कशास्त्राचाही साहित्यशास्त्राचे वाढीवर फार परिणाम झालेला दिसतो. शब्दाच्या अभिधा व लक्षणा ह्या वृत्तीचा ऊहापोह अनेक शास्त्रांत ( म्हणजे व्याकरण, वेदान्त इत्यादि यांत ) केलेला आढळतो त्याचप्रमाणें तो साहित्यशास्त्रांतहि केलेला आहे. उदाहरणार्थ पतञ्जलीच्या महाभाष्यांतही गौण व मुख्य अर्थ यांचा उल्लेख असून त्यांतील मुख्यार्थच प्राधान्यानें ग्राह्य होय असें ‘ गौणमुख्ययोर्मुख्ये संप्रतिपत्तिः, तद्यथा गौरनुबन्ध्योजोऽग्नीषोमीय इति न बाहीकोनुबध्यते ’ ( महाभाष्य, कीलहॉर्नप्रत व्हा. ३ ‘ अग्नेः स्तुत्स्तोमसोमाः ’ ८, ३, ८२ या सूत्रावर ). त्याचप्रमाणें तात्स्थ्य, ताद्धर्म्य, तत्सामीप्य व तत्साहचर्य या चार कारणांनी एका शब्दाचा लक्षणेने दुसराच अर्थ दाखविण्यासाठी प्रयोग करितात

असें महाभाष्यकार म्हणतात ( चतुर्भिः प्रकारैरतस्मिन् स इति भवति तात्स्थ्या-त्ताद्धर्म्यात् तत्सामीप्यात्तत्साहचर्यादिति । कीलहॉर्नप्रत व्हा. २. पा २१८ ). असें जरी आहे तरी अभिधा व लक्षणा यांचा सूक्ष्म ऊहापोह तर्कशास्त्रावरील ग्रंथांत व पूर्वमीमांसेवरील ग्रंथांत मिळतो. साहित्यशास्त्रकारांनीं अभिधा व लक्षणा यांच्या विवेचनासाठीं अभिधावृत्तिमातृका, शब्दव्यापारविचार, त्रिवेणिका, वृत्ति-वार्तिक इत्यादि स्वतंत्र ग्रंथ लिहून शिवाय काव्यप्रकाश, साहित्यदर्पण इत्यादि ग्रंथांतहि त्या विषयाचा परामर्श घेतलेला आहे. तर्कशास्त्रांत अनुमान हें एक प्रमाण आहे, पण साहित्यशास्त्रकारांनीं अनुमान असा एक अलंकार कल्पिला आहे व काव्यलिंग हाहि अलंकार तर्कन्यायमूलकच आहे. कार्यकारणभावाचे तर्क-शास्त्रांत सूक्ष्म परीक्षण केलेलें असतें. विभावना, विशेषोक्ति, अतिशयोक्ति ( एक प्रकार ), व्याघात, असंगति, विषम, विचित्र, विशेष इत्यादि अलंकार कार्य-कारणभावमूल आहेत. तर्कशास्त्रांत प्रामुख्याने येणारे प्रतिज्ञा, हेतु इत्यादि पारि-भाषिक शब्द घेऊन काव्यांत प्रतिज्ञेचे सहा दोष त्याचप्रमाणें हेतूचे तीन दोष यांचें भामहाने पांचव्या परिच्छेदांत विवेचन केलें आहे. पण दण्डी म्हणतो की, प्रतिज्ञाहानि इत्यादि दोषांचा विचार प्रायः कर्कश [ कठीण ] असल्यामुळें तो मी सोडून दिला आहे. यासंबधानें अधिक विवेचन वरतीं पृष्ठ ६१ येथ केलें आहे. महिमभट्टानें एकंदर ध्वनीचा अनुमानांत अन्तर्भाव करून आपले तर्कशास्त्रपाटव प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे शंकुकाचा रसाविषयींचा वाद हाहि तर्क-शास्त्रपद्धतीनें बसविलेला आहे. त्याचे मताने आलंबन व उद्दीपन विभाव हे अनुमापक आहेत व रस हा अनुमेय आहे.

सांख्यतत्त्वज्ञानाचा साहित्यशास्त्रावर कांहीं परिणाम झाल्याचे दिसत नाहीं. तथापि भट्टनायकाच्या रसवादांत सांख्यशास्त्रीय परिभाषेचा थोडा वास येतो. वरतीं भट्टनायकाचे मताचा अनुवाद करितांना अभिनवभारती व ध्वन्यालोक-लोचन यांतून उतारे घेतले आहेत त्यांत सांख्यतत्त्वज्ञानांतील सत्त्व, रजस् व तमः या तीन गुणांचीं नांवें व कार्यें [ प्रकाश, चंचलता व मोह ] यांचा प्रामु-ख्याने उल्लेख आहे. त्याचप्रमाणें भोगीकृति म्हणून जो तिसरा व्यापार भट्टनायक मानितो तोहि सांख्यतत्त्वज्ञानांत पुरुष भोगी असतो असा जो सिद्धान्त आहे त्याला धरून आहे.

पूर्वमीमांसाशास्त्रानेंहि साहित्यशास्त्राची वाढ करण्याला बराच हातभार लाविला आहे. शब्दाचा संकेत जातिगुणक्रियाद्रव्य या चतुष्टयावर असतो किंवा 'जाति' वर असतो असें काव्यप्रकाशांत म्हटलें आहे. यांतील दुसरें मत हें पूर्वमीमांसेचें मत आहे ( 'आकृतिस्तु क्रियार्थत्वात्' पूर्वमीमांसासूत्र १-३-३३ ). शब्दाचा जाति हा मुख्यार्थ असल्यामुळें जेव्हां 'गौरनुबन्ध्यः' असा प्रयोग आपण करितों तेव्हां 'गौः' म्हणजे गोत्वजातियुक्त व्यक्ति असा अर्थ जाति व व्यक्ति यांच्या नियत साहचर्यामुळें आक्षिप्त होतो परंतु प्रत्यक्ष शब्दानें तो अभिहित नसतो असेहि आणखी काव्यप्रकाशांत सांगितलें आहे ( गौरनुबन्ध्यः इत्यादौ जात्या व्यक्तिराक्षिप्यते न तु शब्देनोच्यते विशेष्यं नाभिधा गच्छेत्क्षीणशक्तिर्विशेषणे—इति न्यायात् । काव्यप्रकाश उल्लास २ ). पदांच्या ठिकाणीं अभिधा, लक्षणा व व्यञ्जना या तीन वृत्ति असतात त्याप्रमाणे पदसमूहरूपी जें वाक्य त्याचा अर्थ प्रतीत करणारी तात्पर्य नांवाची वाक्यवृत्ति आहे असें कांहींचें मत आहे असें काव्यप्रकाश ( तात्पर्यार्थोपि केषुचित् । उल्लास २ ), साहित्यदर्पण ( तात्पर्याख्यां वृत्तिमाहुः पदार्थान्वयबोधने । २-२० ) इत्यादि ग्रंथांत सांगितले आहे. ही तात्पर्यवृत्ति पूर्वमीमांसकांपका जे अभिहितान्वयवादी होते त्यांनीं अंगिकारिली होती व अभिहितान्वयवाद हा कुमारिलभट्टांना पसंत असून तो अन्विताभिधानवादापेक्षां श्रेष्ठ आहे असें पार्थसारथिमिश्र याने न्यायररत्नमालेत 'अर्थस्य तन्निमित्तत्वात्' ( पूर्व. मी. सूत्र १-१-२५ ) या सूत्राचा व शाबरभाष्याचा आधार घेऊन म्हटले आहे. अन्विताभिधानवाद्यांच्या मताने पदें एकमेकांशी वाक्यांत संबद्ध झालीं म्हणजेच त्यांना खरा अर्थ असतो व अशा वाक्यांत परस्परांशीं संबद्ध झालेल्या पदांचा जो अर्थ तोच वाक्यार्थ असतो, तात्पयार्थ म्हणून निराळा नाहीं. काव्यप्रकाशांतही अभिहितान्वयवाद व अन्विताभिधानवाद हे जे मीमांसकांतील दोन पक्ष त्यांचा उल्लेख दोनदां केलेला आहे ( आकांक्षायोग्यतासंनिधिवशाद्वक्ष्यमाणस्वरूपाणां पदार्थानां समन्वये तात्पर्यार्थो विशेषवपुरपदार्थोपि वाक्यार्थः समुल्लसतीत्यभिहितान्वयवादिनां मतम् । वाच्य एव वाक्यार्थ इत्यन्विताभिधानवादिनः । काव्यप्र. २; अनन्वितोर्थोऽभिहितान्वये पदार्थान्तरमात्रेणान्वितस्त्वन्विताभिधाने अन्वितविशेषस्त्ववाच्य एवेत्युभयनयेप्यपदार्थ एव वाक्यार्थः । काव्यप्र. ५ ). त्याचप्रमाणें काव्यप्रकाशांत 'गौरनुबंध्यः,' 'लोहितोष्णीषा ऋत्विजः

प्रवरान्ति, ‘यत्परः शब्दः स शब्दार्थः।’ (उ. ५) इत्यादि पूर्वमीमांसेंतील वाक्यांचा उपयोग साहित्यशास्त्रांतील तत्त्वें विशद करण्यासाठीं केलेला आहे. त्याचप्रमाणें काव्यप्रकाशांतील ‘ ज्ञानस्य विषयो ह्यन्यः फलमन्यदुदाहृतम् ’ ( उल्लास २ ) या कारिकेवर जी वृत्ति आहे ( फलं संवित्तिः प्रकटता वा ) ती अनुक्रमें प्राभाकर व कौमारिल मतांचा अनुवाद करिते. पूर्वमीमांसकांनी ‘ अर्थापत्ति ’ म्हणून एक स्वतंत्र प्रमाण मानिलें ( म्हणजे ‘ पीनो देवदत्तो दिवा न भुंक्ते ’ या वाक्यावरून अर्थापत्तीनें रात्रिभोजन निष्पन्न होतें असे मानिलें ), त्याच नांवाचा ‘अर्थापत्ति’ नांवाचा अलंकार अलंकारसर्वस्व, साहित्यदर्पण इत्यादि ग्रंथकारांनीं अंगीकृत केला आहे. अर्थात् आलंकारिकांची अर्थापत्ति व मीमांसकांची अर्थापत्ति ह्यांत थोडा फरक आहे ( तो माझ्या साहित्यदर्पणाच्या टिप्पनींत पहावा ). याशिवाय पूर्वमीमांसेंत अत्यंत प्रसिद्ध असा जो पारिभाषिक शब्द ‘ परिसंख्या ’ तोही एका अलंकार म्हणून रुद्रट, काव्यप्रकाश, साहित्यदर्पण इत्यादिकांनीं मानिला आहे. काव्यप्रकाशांत ‘ अभिधेयाविनाभूतप्रतीतिर्लक्षणोच्यते ’ हा श्लोक ( उल्लास २ ) व ‘ निरूढा लक्षणाः काश्चित्सामर्थ्यादभिधानवत् ’ ( उल्लास ७ ) हे श्लोक कुमारिलभट्टाच्या श्लोकवार्तिकांतून घेतले आहेत; तसेंच अभवन्मतयोग ह्या दोषाचें विवरण करितांना काव्यप्रकाशांत ( उल्लास ७ ) ‘ गुणानां च परार्थत्वादसंबन्धः समत्वात्स्यात् ’ ह्या पूर्वमीमांसासूत्राचा ( ३,१,२२ ) निर्देश केलेला आहे. आणखीज साहित्यदर्पण वगैरे ग्रंथांतूनही पूर्वमीमांसाग्रन्थांतील अवतरणें व न्याय वारंवार घेतलेले आहेत पण विस्तारभयास्तव ते येथे देत नाहीं ( उदाहरणार्थ साहित्यदर्पणांत ‘ स्वार्थबोधे समाप्तानां ’ ही श्लोकवार्तिकांतील कारिका पहिल्या परिच्छेदांत आली आहे व ‘ प्रकृतिप्रत्ययौ स्वस्वार्थबोधकौ ’ हा मीमांसान्यायही दुसऱ्या परिच्छेदांत दिलेला आहे ).

सर्वशास्त्रांत मुकुटमणि म्हणून शोभणारें जें वेदान्तशास्त्र त्यानेंही साहित्यशास्त्रांत आपला प्रभाव दाखविला आहे परब्रह्मासंबन्धानें उपनिषदांत वापरलेले ‘ रसो वै सः ’ हे शब्द जगन्नाथपंडितासारख्या साहित्यशास्त्रपारंगतांनीं रसाला लाविले आहेत. * ज्याप्रमाणे परब्रह्म हें आनन्दस्वरूपी आहे ( आनन्दो ब्रह्मेति व्यजानात् ) त्याचप्रमाणें आनन्द हेंच काव्याच्या सर्व प्रयोजनांत श्रेष्ठ आहे व त्याचा आस्वाद घेत असतां इतर वेद्य वस्तूंचें भान होत नाहीं तर

---

* वरतीं पान १८८ पहावें.

केवळ आनन्दाचेंच भान होतें असें काव्यप्रकाशांत ( ' सद्यःपरनिर्वृतये ' या कारिकार्धाचे वृत्तींत ) सांगितलें आहे. भट्टनायकाचा रसवादही अद्वैतवेदान्ताचा अनुवाद करणारा आहे हें वर भट्टनायकावरील परिच्छेदांत सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें काव्यप्रकाशाच्या चवथ्या उल्लासांत रसस्वरूपाचें विवरण करितांना मम्मटाचार्यांनीं जेव्हां रत्यादि स्थायी भाव ( आस्वादमात्रानें किंवा चर्वणामात्रानें ज्यांचें अस्तित्व भासमान होणारें आहे ) जणूं कांहीं प्रत्यक्ष रसिकाचेपुढें स्फुरण पावून इतर पदार्थांचें भान न होऊं देतां ब्रह्मास्वाद जणूं कांहीं अनुभवितात व अलौकिक चमत्कार निर्माण करितात तेव्हां शृङ्गारादि रस उपस्थित होतात असें फार तात्त्विक भाषेत वर्णन केलें आहे ( स्थायी रत्यादिकः...चर्व्यमाणैकताप्राणः...पुर इव परिस्फुरन्...सर्वामिव तिरोदधत् ब्रह्मास्वादमिवानुभावयन् अलौकिकचमत्कारकारी शृङ्गारादिको रसः ).

यापमाणें प्रमुख शास्त्रांचा साहित्यशास्त्रावर काय परिणाम झाला तें थोडक्यांत दाखविलें.

